# राहुल–साहित्य

या यादींतील * या चिन्हानें निर्देशिलेल्या ग्रंथांचे मराठी अनुवाद 'लोक-साहित्या'तर्फे प्रसिद्ध झाले आहेत अगर होत आहेत. इतर ग्रंथांचे अनुवादहि वाचकांच्या मागणी-नुसार यथावकाश प्रसिद्ध करण्यांत येतील.

**प्रवासवर्णनें:** (१) मेरी लदाख यात्रा (२) लंका (३) तिब्बतमें सवा वर्ष (४) मेरी तिब्बत यात्रा (५) मेरी योरोपयात्रा (६) जपान (७) ईरान (८) सोविएत भूमि

**साम्यवाद व राजनीतिः** (९) बाइसवीं सदी * (१०) साम्यवादही क्यौं ? (११) दिमागी गुलामी (१२) क्या करें ? (१३) तुह्मारी क्षय (१४) सोवि-एत न्याय ( अनुवाद ) (१५) राहुलजीका अपराध (१६) सोविएत संघ कम्युनिस्ट पार्टीका इतिहास ( दो भाग ) (१७) मानव समाज ( १८ ) मार्क्सवाद पाठावलि (१९) भागो नहीं दुनियाको बदलो

**तत्त्वज्ञानः** ( २० ) वैज्ञानिक भौतिकवाद (२१) दर्शन-दिग्दर्शन

**विज्ञानः** (२२) विश्वकी रूपरेखा

**साहित्य व इतिहासः** (२३) पुरातत्व निबन्धावलि (२४) तिब्बतमें बौद्धधर्म (२५) कुरानसार (२६) साहित्य निबन्धावलि (२७) हिन्दी काव्य धारा

**कादंबऱ्या व गोष्टीः** (२८) शैतानकी आँख (२९) विस्मृतके गर्भमें (३०) जादूका मुल्क (३१) सोनेकी ढाल (३२) जीनेके लिये * (३३) सतमीके बच्चे (३४) वोल्गासे गंगा * (३५) सिंह सेनापति * (३६) जय यौधेय *

**चारित्रः** (३७) नये भारतके नये नेता (३८) सरदार पृथ्वीसिंह * (३९) मेरी जीवन यात्रा

**बौद्धधर्मः** (४०) बुद्धचर्या (४१) मज्झिमनिकाय (४२) दीघनिकाय (४३) विनयपिटक (४४) धम्मपद (४५) बौद्धदर्शन

**भोजपुरी भाषेतील नाटकें:** (४६) जपानिया राछछ (४७) जरमन वाकै-हारनिहिचय (४८) देशरक्षक (४९) ई हमार लडाई (५०) ढुनमुनु नेता (५१) जौंक (५२) महरोरुनकी दुरदशा (५३) नइकी दुनिया

**तिबेटी भाषाः** (५४) तिब्बती बालशिक्षा (५५) तिब्बती व्याकरण

**संस्कृतः** (५६) विज्ञप्तिमात्रासिद्धिः (५७) अभिधर्मकोश वृत्तिः (५८) प्रमाण वार्त्तिकम्

**संस्कृत सिंहलः** ( ५९–६२ ) पहिलें, दुसरें, तिसरें, चवथें पुस्तक.

# ज य यौ धे य

[ एक ऐतिहासिक कादंबरी ]

लेखक

राहुल सांकृत्यायन

अनुवादक

स. ह. मोडक

एकमेव विक्रेते

लो क-सा हि त्य

८७ शिवाजी पार्क, मुंबई २८

# प्राक्‌ कथन

जय यौधेय ही एक ऐतिहासिक कादंबरी आहे. हींत इ.स. ३५० ते ४०० (गुप्त-संवत् ३० ते ८० या काळांतील भारताच्या राजकीय व सामाजिक स्थितीचें चित्रण करण्यांत आलें आहे. यौधेय हें एक अत्यंत बलाढ्य गणराज्य होतें. त्याचा विस्तार यमुना-सतलज ते चंबळा-हिमालय यांच्या दरम्यान होता. इतिहासकारांनीं आणि आमच्या प्राचीन लेखकांनीं यांच्या बाबतींत भलतेंच क्रूर मौन धारण केलें आहे. वस्तुतः या लेखकांच्या मनाप्रमाणें सगळया गोष्टी झाल्या असत्या तर यौधेय हें नांव देखील आमच्यापर्यंत येऊन पोंचलें नसतें. पण नाण्यांपुढें इलाज काय, तीं बिचारीं कुणाला न कळतच जमिनींत गाडून राहिलीं होतीं. आणि या नाण्यांनीं मोठमोठ्यानें ओरडून साक्षी द्यावयास सुरवात केली—प्रेतानें स्वतःच गुन्ह्याचा परिस्फोट केला! विसरले गेलेले यौधेय पुन्हां आमच्या समोर प्रकट झाले. आणि आतां तर हिंदु विद्यापीठाचे प्रोफेसर व भारतीय इतिहासाचे गाढे संशोधक डॉ. अळतेकर यांज-सारखे विद्वान स्पष्टपणें सांगूं लागले आहेत कीं भारतांतून विदेशी कुषाणांच्या सत्तेचा नायनाट करण्याचें श्रेय गुप्तवंश, भारशिव-वंश यांच्याकडे नसून यौधेयांकडे आहे.

इसवी सनाच्या चौथ्या शतकांत आपल्या अभिलेखांत अशोकाच्या पाषाणस्तंभा-वर ( हा स्तंभ पूर्वी कौशाम्बींत होता पण आतां अलाहाबादच्या किल्ल्यांत आहे ) समुद्रगुप्तानें यौधेयांच्या नांवाचा निर्देश करतांना असें सांगितलें आहे कीं " त्यांनीं कर-दान-आज्ञेला मान्यता देऊन व प्रणाम करून ( " सर्वकरदानाज्ञाकरणप्रणामा-गमन " ) मला संतुष्ट केलें. " समुद्रगुप्तानें यौधेगणाचा उच्छेद केला नाहीं हें त्याच्या लेखावरून कळून येतें. पण इसवी सनाच्या पांचव्या शतकाच्या आरंभीं पुन्हां आपल्याला यौधेय गणाचें नांव ऐकावयास मिळत नाहीं. याव-रून यौधेयांचे शिरकाण चंद्रगुप्त विक्रमादित्यानेंच केलें हें स्पष्ट होतें. मी माझ्या कादंबरींत त्याच गौरवशाली यौधेय गणाचें व त्याच्या शिरकाणाचें चित्रण केलें आहे. राजे, राजकुमार व इतर गुप्तवंशीय अधिकाऱ्यांचीं नांवें देण्यांत ऐति-

हासिक साधनांचा उपयोग केला आहे. यौधेयांचें नांव जमात या नात्यानें सुद्धां विस्मृत झालेलें होतें. मग त्या गणांतील व्यक्तींचीं नांवें मिळण्याची आशा कशाच्या आधारावर धरतां येणार ? समाजाच्या चित्रणासाठीं मी कालिदासाचे ग्रंथ व त्याच काळीं प्रवास करणारा चिनी भिक्षु फाहियान याच्या प्रवासवर्णनाचा उपयोग केला आहे. डॉ. अळतेकर, प्रो० राखलदास बानर्जी ( The age of the Imperial Guptas ) आणि डॉ. आर्. एन्. दांडेकर ( A History of the Guptas) यांचे ग्रंथ, गुप्तकालीन शिलालेख व नाणीं यांची पुष्कळशी मदत मी या ग्रंथांत घेतलेली आहे.

यौधेयांचीं नाणीं इसवी सनापूर्वी दुसऱ्या शतकापासून इसवी सनाच्या चौथ्या शतकापर्यंत सांपडतात. कुषाणांच्या ( इसवी सनाचें पहिलें शतक ) अगोदरच्या काळांतील नाण्यांवर " यौधेयानां बहुधान्यकानाम् । " अगर " भगवस्वामी ब्रह्मण्यदेवाय । " अशीं वाक्यें लिहिलेलीं आढळतात. नंतरच्या नाण्यांवर " यौधेय गणस्य जयः ।" अगर " यौधेयानां जयमंत्रशालिनाम् । " असें लिहिलेलें असतें. इ.स. १५० च्या आपल्या (जुनागड येथील) शिलालेखांत महाक्षत्रप रुद्रदामानें शत्रूच्या शौर्याला मान्यता देऊन असें लिहिलें आहे–" सर्वक्षत्राविष्कृत वीरशब्द जा ( तो ) त्सेकानां यौधेयानाम् । " भरतपूर संस्थानच्या हद्दीपासून दोन मैलांवर यौधेय गणाच्या एका महासेनापतीचा शिलालेख कोरलेला आहे— " सिद्धम् (।) यौधेयगणपुरस्कृतस्य महाराज महासेनापतेः पु.....ब्राह्मणपुरोगंचाधिष्ठानं शरीरादिकुशलं पृष्ट्वा लिखत्यस्तिरस्मा... ... " ( J. F. Fleet-Inscriptions of the early Gupta kings ).

प्रश्न असा उद्भवतो कीं या वीर यौधेयांचा अजिबात उच्छेदच झाला काय ? त्या युद्धांत यांची फार प्राणहानि झाली असेल, ( त्यांचे वंशज मेओ यांच्या बाबतींत तुघलकांनीं त्याच प्रकाराची पुनरावृत्ति केली तीवरून या प्राणहानीची कल्पना येते ), पण या कत्तलींतून कांहीं यौधेय बचावलेहि असले पाहिजेत. भावलपूर संस्थानापासून मुलतानपर्यंत पसरलेल्या एका जिल्ह्याला जोहियावार असे नांव आहे, आणि त्यांतील बहुसंख्य रहिवाशांना जोहिया ( यौधेय ) असें नांव आहे. कराचीच्या कोहिस्तानांत जोहिया लोक राहतात. मात्र त्यांच्या प्रमुखाला जोहिया जो-जाम असें नांव आहे. अलवार व गुरगांवचे मेओ आजहि यौधेयभूमींचेच रहिवासी आहेत, आणि त्यांच्या वीर-गाथा ऐकून आज सुद्धां अंगावर रोमांच उभे राहतात. हे लोक मुसलमान झाले आहेत, तरीहि यौधेय रक्ताला विसरलेले नाहींत. आज देखील त्यांच्या स्त्रिया जीं गाणीं गातात त्यांपैकीं स्त्रीकडून विद्दिरांची पूजा करवून घेण्याच्या वेळच्या गाण्यांत वीरांच्या प्राणत्यागाचें हृदयद्रावक वर्णन आहे.

यांच्या शिवाय अग्रवाल, अग्रहरी, रोहतगी, रस्तोगी, श्रीमाल, ओसवाल, वर्ण-वाल, गहोई (?) अशा ज्या आजकाल वैश्य समजल्या जाणाऱ्या जाती आहेत त्याहि योधेयांचीं सन्तानें आहेत. गणाच्या उच्छेदानंतर त्यांना तरवार सोडून तराजू घेणें भाग पडलें.

या कादंबरीच्या देहांत ऐतिहासिक सामग्रीनें हाडांच्या सांगाड्याची कामगिरी केली आहे, पण त्यांत रक्तामांसाची भर मी माझ्या कल्पनेनें घातली आहे.

प्रयाग<br>
१६-८-४४

# अनुक्रमणिका

# जय यौधेय

## ( १ )

## समुद्रगुप्त आणि यौधेय

माझी अगदीं लहानपणची आठवण मी साडेचार वर्षांचा होतो तेव्हांची आहे. परंतु ज्या उद्देशानें मी हें आत्मचरित्र लिहून ठेवतों आहे तो लक्षांत घेतां माझ्या जन्माच्या तीन वर्षें आधींच्या घडामोडीपासून याची सुरवात करणें सोईचें ठरतें. विशेषतः त्यानंतर पन्नास वर्षांनी ज्या गोष्टी चाललेल्या दिसत आहेत त्यांवरून मला तर असा संदेह वाटूं लागला आहे कीं भावी पिढयांना यौधेय या नांवाचाहि कदाचित विसर पडेल आणि ज्या गण-स्वतंत्रतेसाठीं लाखों नरनारींनीं हंसत हंसत मृत्यूला आलिंगन दिलें तिचीहि त्यांना दखल राहणार नाहीं. देवपुत्र शाही ( कुषाण ) यांचें कंबरडें आम्ही मोडलें, पण त्याचें श्रेय मात्र आज गुप्त-वंश उपटूं पाहत आहे. अडीचशें वर्षांपूर्वी महाक्षत्रप रुद्रदाम याला आम्ही असा इंगा दाखविला कीं परत कधींहि आमच्याकडे वर मान करून पाहण्याची त्याला हिंमतच झाली नाहीं. आणि त्याच्यानंतर तर क्षत्रपांची सरहद्द कोठपर्यंत राहूं द्यावयाची हें उज्जयिनीचे क्षत्रप ठरवीत नसून आम्हीच ठरवीत होतों. शक क्षत्रपांना निर्बल करण्याच्या कामागिरींत यौधेयांचा वांटा फार मोठा होता; परंतु त्याहि बाबतींत कालिदास आदि लोक गुप्तांना त्या यशाचे भागीदार करण्याच्या खटपटीत आहेतच.

माझा जन्म होण्याच्या तीन वर्षें अगोदरची गोष्ट. समुद्रगुप्तानें— यानेंच परम-भट्टारक महाराजाधिराज या नांवानें आपली ग्वाही फिरविली— आपली तिसरी विजय-यात्रा पश्चिमेकडे केली. अहिच्छत्राचा अच्युत आणि मथुरेचा नागसेन यांनीं एकदां समुद्रगुप्ताच्या चरणीं आपले मुकुट काढून ठेवले होते. परंतु तो कांचीकडे दिग्विजय करावयाला गेल्याबरोबर यांनी पुन्हां डोके वर काढलें. समुद्रगुप्तानें दाक्षिणे-कडून परत येऊन अच्युतवर चढाई केली. नागसेन व इतर कांहीं राजांनीं अच्युतला मदत केली, पण समुद्रगुप्ताच्या सेनेपुढें व त्याच्या युद्धकौशल्यापुढें अच्युतचा टिकाव

लागला नाहीं. मथुरेला पोंचल्यावर यौधेयांची भूमि, त्यांच्या घडे भरभरून दूध देणाऱ्या गाई, त्यांची सोनें पिकविणारी शेती, त्यांचीं सुखसमृद्धिसंपन्न खेडीं आणि शहरें इत्यादि हकीकती समुद्रगुप्ताला ऐकावयाला मिळाल्या आणि त्या ऐकून त्याच्या तोंडाला पाणी सुटल्यावांचून राहिलें नाहीं. परंतु त्यानें त्याचबरोबर असेंहि ऐकलें कीं यौधेयांचें राज्य हें अ-राजक आहे, प्रजातंत्र आहे, तिथें राज्यकारभार, संधि-विग्रह ( तहनामा–लढाया ) इत्यादि हरएक बाबतींत सारी यौधेय जनता भाग घेते. याशिवाय यौधेयांनी देवपुत्र ( कुषाण ) व महाक्षत्रप यांच्याशीं सामना करण्यासाठीं कुणिन्द गण व आर्जुनायनक गण या दोहोंशीं एकी करून एक गण-संघ स्थापन केलेला आहे आणि या संघाचे घटक अनेक बाबतींत आपापल्या परी अगदीं स्वतंत्र आहेत. समुद्रगुप्ताला प्रथम वाटलें कीं एकछत्री अमलाखालीं संघटित झालेल्या मगध-राजाच्या प्रचंड सेनेच्या एका फुंकरीसरशी असले लोक उडून जातील. परंतु यौधेयांसारखा दुर्दमनीय शत्रु आपल्याला आपल्या तिन्ही विजय-यात्रांमध्यें एकहि भेटला नाहीं हें समुद्रगुप्ताला मागाहून कबूल करावें लागलें. यौधेयांचें आपल्या जन्म-भूमीवर अत्यंत प्रेम आहे. त्यांना आपली गणस्वतंत्रता प्राणापेक्षाहि प्रिय आहे. तिच्यासाठीं तरुणांनींच नव्हे तर आबालवृद्धांनीं आणि स्त्रियांनीं देखील शस्त्र हातीं घेतलें. सारी यौधेय जनता शत्रूशीं मुकाबला करण्यासाठीं एकदिलानें तयार होऊन राहिली. मरूं किंवा स्वतंत्र राहूं—बस्स, हाच सर्वांचा दृढ संकल्प होता. मगध, लिच्छवि, काशी, कोसल, वत्स, पंचाल, अन्तर्वेदी इत्यादि देशांचे सामन्त आपा-पल्या सैनिकांसह परमभट्टारकाच्या आज्ञेनुसार यौधेयांशीं लढतां लढतां आगींत उड्या घालणाऱ्या पतंगाप्रमाणें जळून खाक होत होते. यौधेयांचीहि खूप प्राणहानि होत होती. लढाई त्यांच्या भूमींत येऊन पोंचली होती. आणि धर्माचे मक्तेदार म्हण-विणाऱ्या गुप्तांच्या सैनिकांनीं यौधेयांच्या गांवांना आगी लावण्याचा सपाटा चालवि-लेला होता. ते उभीं पिकें जाळून फस्त करीत होते, आणि समोर लहान मूल, म्हातारें माणूस, जें कोणी सांपडेल त्याला हालहाल करून ठार मारल्याशिवाय ते सोडत नव्हते. असल्या प्रकारांमुळें दहशत बसून यौधेय शरण येतील अशी त्यांची समजूत होती. परंतु यौधेय तर तळहातावर शिर घेऊनच रणांगणांत उतरले होते. त्यावेळीं समुद्रगुप्ताला आमच्या लोकांनींहि नावें ठेवलीं होतीं आणि नाहीं नाहीं ते उपाय करून त्याला सतावून सोडलें होतें. परंतु चंद्रगुप्तानें मागाहून जे प्रकार केले ते पाहिले म्हणजे समुद्रगुप्त हा वीर असूनहि त्याच्या ठिकाणीं केवढी मोठी उदारता होती हें कळून येते. आपल्या सैनिकांनीं लहान मुलांवर व म्हाताऱ्या माणसांवर हात उचलला आहे, घरें व शेतें जाळण्याचा सपाटा चालविला आहे, हें कळतांक्षणीं समु-द्रगुप्तानें या प्रकारांविषयीं मनापासून दिलगिरी प्रदर्शित केली. या बाबतींत त्यानें

आपले बलाधिकृत ( सेनापति ) व संधि-विग्रहिक ( युद्धमंत्री ) यांना तर फट-कारलेंच आणि शिवाय सरळ स्वदस्तुरचें एक पत्रहि यौधेयांना पाठविलें. आपल्या सैनिकांच्या या अत्याचारांबद्दल यौधेयांची क्षमा मागून त्यानें या पत्रांत सांगितलें– 'लिच्छवि-दौहित्र ( मुलीचा मुलगा ) यौधेयांचा उच्छेद करूं इच्छीत नाहीं. देवपुत्र आणि त्यांचे पारसीक धनी ( सासानियन ) यांच्या पंज्यांतून भरतभूमीला सोडविण्यासाठीं यौधेयांनीं जी कामगिरी केली, तिच्याविषयी लिच्छवि-दौहित्राला अत्यंत आदर व गौरव वाटतो. यौधेयांचा हा पराक्रम पाहून त्याला आपली अज्जुका ( आई ) कुमार देवी हिच्या लिच्छवि वंशाची आठवण होते. लिच्छवि देखील शूर क्षत्रिय आहेत; त्यांची वीरता हजार वर्षांपासून इतिहासांत गाजलेली आहे. परंतु आज त्यांना हें समजून चुकलें आहे कीं भारतातील सगळ्या राजांनीं व गणांनीं आपली सैनिक-शक्ति, आपली वीर-परंपरा एका सूत्रांत बद्ध केली तरच मीनान्दर व कनिष्क यांच्या तावडीतून भरतभूमीला वाचविता येईल. हेंच सूत्र आपण व्हावें एवढीच लिच्छवि-दौहित्राची इच्छा आहे. यौधेयांच्या एक तसूभर देखील भूमीचा त्याला लोभ नाहीं. भरतभूमींतून विदेशी म्लेच्छांचें समूळ उच्चाटन करण्यासाठीं यौधेयांचे खड्गहि या मोठ्या सूत्रांत बद्ध व्हावें येवढीच त्याची मनीषा आहे. ज्याला मी माझ्या मातुल-कुलाचें भूषण समजतो अशा गणाशीं इतक्या क्रूर रीतीनें लढावयाचें म्हणजे केवढी लाजिरवाणी गोष्ट ! यौधेयबंधु जर आमच्याशीं सहकार्य करून विदेशीयांशी सामना करावयाला तयार असतील तर हें बंधुघाती युद्ध मी एक क्षणभर देखील चालू ठेवायला तयार नाहीं. मी माझ्या सेनापतींना सात दिवस युद्ध बंद ठेवण्याचा आदेश दिलेला आहे आणि या मुदतीत यौधेय बंधूंनीं स्वतः भेटून लिच्छवि-दौहित्राच्या अंतःकरणाची ओळख पटवून घ्यावी येवढीच माझी इच्छा आहे '.

युद्धामधील अपार हानि पाहून यौधेयांनाहि काहीं तरी विचार करणें भागच होतें. तेवढ्यात समुद्रगुप्ताचें पत्र आलें. त्यातला येवढा उदार भाव पाहून त्यांनीं यौधेय गणाचे पुरस्कृत ( गणनायक ) माझे वडील महाराज महासेनापति कुमार यौधेय, आर्जुनायन गणाचे पुरस्कृत नर वर्मा, कुणिन्द गणाचे पुरस्कृत रोहित आणि तिघांच्या गण-संघाचे पुरस्कृत सुषेण यौधेय अशा चार जणांचें शिष्टमंडळ समुद्र-गुप्ताशीं वाटाघाटी करण्यासाठीं मथुरेला पाठविलें. समुद्रगुप्तानें त्यांचें ज्या प्रकारें स्वागत केलें, त्यांच्यासमोर आपलें अंतःकरण उघडें करून दाखविलें, परकीय शत्रूशीं मुकाबला करण्यासाठीं समाइक युद्धकोषांतला आपल्या वांटणीचा भाग म्हणून थोडेसे दीनार देतों असें सांगितलें–या सगळ्या बोलण्यावरून गणपुरस्कृतांचा ग्रह त्याच्या विषयीं अनुकूल झाला. त्यांनीं परत येऊन सगळी हकीकत गण-संस्थेला

सादर केली आणि तिन्हीं गणांनीं तिला मान्यता दिली. गण-संघाचे पुरस्कृत महाराज महासेनापति सुषेण यौधेय हे अधिकारानें या शिष्टमंडळामध्यें सर्वांत श्रेष्ठ असले तरी सगळयांत जास्त तडफदार व समंजस वृत्ति कुमारांची आहे हें बोलण्या चालण्यावरून समुद्रगुप्ताला कळून आलें. म्हणून समुद्रगुप्ताला कुमार यौधेय यांचें त्यांतल्या त्यांत विशेष आकर्षण वाटलें. तह झाला. समुद्रगुप्तानें यौधेय-नगरी अग्रोदका ( अग्रोहा ) हिला समक्ष भेट देऊन यौधेयांविषयीं बंधुभाव प्रदर्शित करण्याची इच्छा व्यक्त केली. एक दिवस तो थोडेसे प्रतिहार ( शरीर-संरक्षक ) व सामन्त बरोबर घेऊन अग्रोदका येथें आला. युद्धाची क्रूरता व यौधेयांवर झालेले अत्याचार यांविषयीं संस्थागारांत पश्चात्तापाचे उद्गार काढतांना त्याचा गळा रुद्ध झाला, त्याच्या डोळयांतून खळखळां अश्रू वाहूं लागले. " माझ्या पायीं हें सगळं झालं. माझं मस्तक आपणांपुढं हजर आहे. या लिच्छवि-दौहित्राला आपण हवी ती शिक्षा करा. " येवढें सद्गदित स्वरांत कसें बसें त्यानें सांगितलें. पुढें त्याच्या तोंडून शब्दच निघेना. यौधेयांचे डोळेहि असेच ओले झाले; त्यांचीं अंतःकरणें विरघळलीं; आणि महासेनापति कुमार यौधेय यांचे पाय धरण्यासाठीं समुद्रगुप्तानें जेव्हां आपले हात खालीं केले तेव्हां कुमारांनीं लगेच त्याला उचलून गाढ आलिंगन दिलें. नंतर त्यानें गणसंस्थेच्या सर्व सदस्यांना आलिंगन दिलें. ही खबर साऱ्या यौधेय भूमीवर वणव्यासारखी पसरली. लोक सारी शत्रुता विसरून गेले आणि घरोंघरीं समुद्रगुप्ताची प्रशंसा होऊं लागली. थोड्याच दिवसांनंतर माझी बहीण दत्ता हिच्याशीं विवाह करून त्यानें तिला महादेवी ( पट्टराणी ) केलें, तेव्हां तर यौधेयांच्या आनंदाला सीमाच राहिली नाहीं. ते त्याला आपला आप्तच मानूं लागले.

*　　*　　*　　*

माझी बहीण दत्ता हिचा पहिला मुलगा रामगुप्त याचा जन्म पाटलिपुत्र येथें झाला. तिचे दुसऱ्या खेपेला जेव्हां दिवस भरत आले तेव्हां तिनें माहेरी जाण्याची इच्छा पतीजवळ प्रकट केली. अग्रोदका येथें दत्तानें आपला दुसरा पुत्र चन्द्रगुप्त याला जन्म दिला. त्यानंतर तीनच महिन्यांनीं मी या दुनियेंत आलों. ताई अजूनहि अग्रोदका येथेंच राहिलेली होती आणि पतीचीं एकसारखीं पत्रें येऊं लागलीं तेव्हां एक वर्ष राहून ती राजधानीला परत गेली. ताई चंद्रापेक्षांहि माझ्यावर अधिक माया करी. आम्हांला पाजावयाला दाया ठेवलेल्या होत्या. परंतु " यौधेयांचं दूध औरच असतं " असें म्हणून ताई चन्द्राला स्वतः प्यावयाला घेत असे. ताई आम्हां दोघांनाहि मांडीवर घेत असे; आणि किती तरी वेळां तिनें मोठ्या प्रेमानें मलाहि आपलें स्तनपान दिलें. दत्ता माझी थोरली बहीणहि होती आणि मला पाजणारी आईहि होती. तिच्या प्रेमाचा मला कधींच विसर पडणें शक्य नाहीं. सासरीं जातांना

तिनें मला आपल्या बरोबर नेण्यासाठीं आईजवळ मागणी केली. पण आईला या गोष्टीचें फारच अवघड वाटत होतें. मी आईचा एकुलता एक मुलगा. तो सुद्धां पुष्कळ उशीरां झालेला. तरी देखील थोरल्या मुलीचें म्हणणें आईला टाळतां येणें शक्य नव्हतें. तिनें वर्ष भरल्यावर मला पाठविण्याचें वचन दिलें. पण दुर्दैवानें मला वर्ष झालेलें पाहायला आई जिवंत राहिली नाहीं. आईच्या मृत्यूची वार्ता ऐकतांच ताई धांवतच अग्रोदकाला आली आणि मला आपल्याबरोबर पाटलिपुत्राला घेऊन गेली. मी अगदींच अजाण असतांना आईला पाहिलेलें. पण इतर लोक सांगत असत कीं दत्तताईचा चेहरा हुबेहूब आमची आई जयसेना हिच्यासारखाच आहे. मी जेव्हां ताईच्या चेहऱ्याकडे बघत असें तेव्हां मला आईची आठवण होई. ताईचा स्वभाव अत्यंत गोड होता. समुद्रगुप्ताची महादेवी झाली असतांना देखील तिला काडीइतकाहि गर्व चढला नाहीं. दासींना व चेटींना सुद्धां ती कधीं रागराग करतांना अगर आपला वरचढपणा दाखवितांना दिसली नाहीं. समुद्रगुप्ताच्या मृत्यूच्या दोन वर्षें अगोदर ( सन ३७२ सालीं ) ती जेव्हां निधन पावली तेव्हां सारा परिजन, नगरांतल्या साऱ्या स्त्रिया आठवडेच्या आठवडे आंसवें गाळीत राहिल्या. मी त्या प्रसंगीं सिंहलद्वीपांत होतों, म्हणून मला बातमी फार उशीरा मिळाली. त्या वेळीं कित्येक महिनेपर्यंत माझें चित्त विव्हल होऊन राहिलें होतें. मी अनुराधपुरच्या महाविहारांतून कांहीं तरी सबब सांगून चैत्यगिरीवर ( मिहिन्तले येथें ) चालता झालों व तेथें कित्येक महिने माझ्या आंसवांना खंड म्हणून पडेना.

( २ )

## बाळपण

मला समजं लागलें तेव्हांपासून चन्द्राला मी माझ्या अभिन्न अंगासारखा मानीत आलों. आम्ही दोघं आवळ्या जावळ्या भावांसारखे होतों. चंद्र महापुंड होता. त्याच्या पाठीमागें मुलें त्याला चन्द्र म्हणण्याऐवजीं चण्ड ( खोडकर ) म्हणत असत. पण चन्द्र माझ्याशीं कधींच चण्ड झालेला दिसत नसे. तो चेटींवर व अंतःपुरांतल्या इतर राण्यांवर करडा अंमल गाजवी. तो लहान असतांना देखील त्याचा हुकुम

मोडण्याची कुणालाच हिंमत होत नसे. अज्जुकाचा तो धाकटा व लाडका मुलगा. याच कारणामुळें तो अधिक हट्टीहि झालेला होता. त्याच्या इच्छेविरुद्ध जरा जरी कांहीं झालें तरी तो जिकडे तिकडे तोडफोड माजवीत असे आणि मग प्रमदवनां-तील क्रीडापर्वतावर जाऊन मूर्तीसारखा हटून बसत असे. अशा वेळीं अज्जुका मला जवळ घेऊन माझें मुख चुंबून मला सांगावयाची– " बाळ ! तूंच जा बाबा चण्डाची समजूत घालायला. केवळ तुलाच जमेल तें ! " आणि खरोखरीच, मी " भैया भैया " म्हणत चन्द्राजवळ जावें आणि त्यानें गालांतल्या गालांत हंसत माझ्या गळ्यांत गळा घालावा असें हटकून घडावयाचेंच. असें न घडल्याचा माझ्या लहानपणींचा एकहि प्रसंग मला आठवत नाहीं. वयोमाना-नुसार चन्द्राच्या वृत्तींत परिवर्तन झालें, परंतु चन्द्राचा स्वभाव जसाचा तसाच राहिला हें सांगितलेंच पाहिजे. मात्र तो पुढें पुढें आत्मसंयमन कर-ण्यांत अधिकाधिक यशस्वी होत गेला. समुद्रगुप्ताचेंहि माझ्यावर प्रेम होतें. मात्र त्याच्या सहवासांत मला चन्द्राप्रमाणें अभिन्नता नाहीं जाणवली. राजकाजाच्या भानगडी करण्यापुढें व हजारो राण्यांना आपल्या संगतीचा लाभ देण्यापुढें त्याला आमच्याशीं मोकळ्या मनानें बोलायचालायला अगर तासचे तास आमच्याशीं खेळावयाला कदा-चित फुरसतच होत नसेल. त्यांतल्या त्यांत त्याला जी काय सवड मिळे ती तो रामासाठीं राखून ठेवी--अखेर रामच तर युवराज भट्टारक होता. रामाचा स्वभाव फारच गोड होता--चन्द्राच्या नेमका उलट. म्हणून परिजन लोक त्याचा गैरफायदा घेत असत. लहानपणीं सगळ्याच बालकांप्रमाणें आम्हांलाहि गोष्टी ऐकण्याची विशेष आवड होती आणि हर देशच्या गोष्टी ऐकण्याची आम्हांला अनुकूलताहि होती. परमभट्टारकाची धर्नुग्राहिणी यवनी आथे हिची म्हातारी आई कुलूपा खूप चटकदार गोष्टी सांगत असे. तिचा चेहरा कापरासारखा गोरा होता व तिचे केंसहि तसेच पांढरेशुभ्र होते. सत्तर वर्षांची असूनसुद्धां तिच्या चेहऱ्यावर कुठेंहि सुरकुती म्हणून दिसत नव्हती. ती आमची सगळ्यांत आवडती परिचारिका होती. अज्जुका देखील तिला मोठा मान देत असे. तिला आमच्या देशांत रहावयाला येऊन पंचवीस वर्षें झालीं असलीं तरी अजूनसुद्धां तिला मागधी भाषा शुद्ध बोलतां येत नव्हती. ती " हल " ऐवजीं " अल " म्हणे, आणि "सुह ( शुभ )" ऐवजीं "सुअ" म्हणे — "ह" चा तिला उच्चारच करतां येत नसे. आम्ही तिच्या तोंडून मोठमोठ्या गोष्टी ऐकत असूं आणि म्हणून तिचा "अ" समजून घेण्याच्या बाबतींत आम्हांला जाग-रूक रहावें लागत असे. कुलूपा देवांच्या व राक्षसांच्या गोष्टी सांगे त्या आम्हांला फार आवडत. पण त्या ऐकल्यावर रात्रीं आम्हांला डोळे उघडावयाची सुद्धां भीति वाटत असे. रामाची अवस्था तर आणखीच केविलवाणी होई. दुपारच्या उन्हाचा त्रास

चुकविण्यासाठीं तळघरांत एकटा जायची त्याला दिवसा देखील हिंमत होत नसे. मलाहि थोडीशी भीति वाटेच, पण चन्द्राला मात्र या सगळया गोष्टींची केवळ मौजच वाटत असे. भूत-वेताळ, पिशाच-पिशाचिनी इत्यादिकांचें त्याला रेंसभर देखील भय वाटत नसे. विशेषतः रामाला भेवडावण्यासाठीं तर तो मोकाच शोधीत असावयाचा. एक दिवस अन्तःपुराच्या बागेंत वसंतोत्सवाच्या वेळीं कामदेवाची पूजा करण्यासाठीं पुष्कळशा राण्या जमलेल्या होत्या. आम्ही गाणीं ऐकावयाला, मद्याच्या चुळा भरावयाला व नूपुरबद्ध चरणाच्या लाथेबरोबर अशोकवृक्ष कसा फुलतो तें बघावयाला गेलों होतों. या सगळया गोष्टी खोटया आहेत असें चंद्रानें मला अगोदरच सांगून ठेवलें होतें, तरी पण आम्हांला ती एक चांगलीच मौज बघावयाला मिळत होती. कामपूजा संपेतोंवर अंधार पडला. चुळा भरणें व चरण-ताडन हे कार्यक्रमहि आटोपले. मी अशोकाच्या चुरमुटलेल्या पानांकडे अगदीं टक लावून बघत राहिलों होतों. पण तिथें कुसुमोद्गमाचा पत्ता होता कुठें ? चन्द्र तर एका निराळयाच पुंडाईचा विचार करीत होता. कंचुकी, वामन व एक परिचारिका हीं युवराज भट्टारकाला त्याच्या महालांत पोंचविण्यासाठीं त्याला घेऊन जात होतीं. याच्या अगोदरच मला बरोबर घेऊन चन्द्र तमालकुंजांत गेला. आम्ही दोघे वाटेवर आलेल्या तमाल-शाखेवर चढून चुपचाप बसून राहिलों होतों. युवराज भट्टारक रामगुप्त आपल्या कबिल्यासह त्या झाडाखालीं पोंचल्या बरोबर मी संकेतानुसार जोराजोरांत फांदी हलवूं लागलों व चंद्र एका हातानें तांब्याच्या तपेलींतल खडे खडखडावीत तोंडानें वाघ, घुबड इत्यादि भलभलत्या जनावरांचे आवाज काढूं लागला कंचुकीनें घाबरून धूम ठोकली; पण म्हाताऱ्याच्या अंगावरील ऐसपैस कंचुकानें त्याला दगा दिला व थोड्याच अंतरावर तो अडखळून कोसळला. वामन हातवारे करीत जोरजोरानें ओरडूं लागला आणि निपुणिका चेटी तर तिथल्या तिथेंच बेशुद्ध पडली. राम मागच्या पावलीं पळाला पण चंद्रगुप्तानें फांदीवरून खालीं उडी मारून तपेली खडखडावीत भीषण आवाज काढीत नाकांतील स्वरानें कांहीं तरी वडबडत त्याचा पाठलाग केला: त्या बरोबर तोहि तीस कदमांवरच कोसळून बेशुद्ध पडला. तो निश्चेष्ट पडलेला पाहून चंद्रगुप्त घाबरला आणि माझ्याकडे आला. आतां आम्ही केलेला हा विनोद आमचा आम्हांलाच गैर वाटूं लागला; पण सगळया आधीं आमचा जीव आम्हांला वांचवायचा होताच. म्हणून आम्ही वांकड्या तिकड्या वाटेनें अज्जुकाजवळ जाऊन पोंचलों आणि अगदीं गंभीर बनून राहिलों. अज्जुका हस्तिदंताच्या सुंदर चौरंगावर बसलेली होती. तिचा डावा हात चौरंगाच्या पाठीवर होता व परिजनांशीं बोलतां बोलतां उजव्या हातानें ती निरनिराळया मुद्रा करीत होती. तिच्या लांब केसांमध्यें जाईचीं व मल्लिकेची फुलें अत्यंत सुंदर रीतीनें गुंफलेलीं होतीं. तिच्या अंगावरील अंगद, कंकण, हार, कर्णफूल

हे सर्व दागिने लाल पिवळ्या व पांढऱ्या फुलांचे होते. वरून जागोजाग जर-तारी तारांत गुंफलेले हंस, बदक, इत्यादि आकृति असलेले शुभ्र दुकूल ती नेसलेली होती. आसपास स्त्रिया होत्या. त्यांपैकीं कुणाच्या हातीं चवऱ्या, कुणाच्या हातीं भृङ्गार ( गडवा ), कुणाच्या हातीं छत्र, कुणाच्या हातीं अत्तर व इतर निर-निराळीं प्रसाधनें होतीं. अज्जुका फारच खुषींत दिसत होती. आज महाराज इथल्याच श्रीगर्भांत रात्र घालविणार होते. आम्ही दोघे अज्जुकाच्या दोन्ही बाजूंना जाऊन उभे राहिलों. आम्ही आतां सात वर्षांचे होतों. अज्जुका बसलेली होती म्हणूनच आमचे हात तिच्या खांद्यांपर्यंत पोंचूं शकत होते. मी अज्जुकाच्या खांद्यावरून घसरलेलें उत्तरीय ( दुपट्टा ) दुकूल सरळ केलें व त्याच्यावर अंकित केलेल्या सुंदर हंसयुगुलाकडे पाहूं लागलों. चंद्र अज्जुकाच्या पायथ्याशीं बसून तिचीं नूपुरें बोटांनीं उलटसुलट फिरवूं लागला. अज्जुकानें मोदक आणायला सांगितले, तेव्हां आम्ही सद्वनेनी मुलांचा आव आणून "भूक नाहीं" असें सांगितलें व अज्जुकाला बिलगलों. थोड्या वेळानें परमभट्टारक आले. "जेदु जेदु भट्टा" असा पुकारा दुरू-नच ऐकूं येऊं लागला आणि आतां तर अज्जुका व तिचा परिवारहि उभा राहून जयजयकारांत सामील झाला.

परम भट्टारकानें अज्जुकाच्या हाताला धरून तिला चौरंगावर बसविलें आणि आपणहि एकीकडे बैठक मारली. राजाच्या अंतःपुरांत हजाराहून अधिक स्त्रिया होत्या. आणि त्या सुद्धां एकीपेक्षां एक सुंदर. किती तरी सुवर्णकेशी गौरवर्णी यवनी, किती-तरी नीलकेशी अरुणमिश्रित धवलवर्णी पार्शिणी, किती तरी गांधारी, सौराष्ट्री, पार्वती इत्यादि अनेक जमातींच्या स्त्रिया त्याच्या गणीवशांत असल्या तरी समुद्रगुप्ताच्या मनांत सर्वांत जास्त प्रेम आणि त्याहूनहि अधिक आदर फक्त अज्जुकाविषयींच होता. अज्जुका व परमभट्टारक आज वसंतोत्सव एका विशेष रीतीनें साजरा करणार होते. वीणा वादनांत परमभट्टारकाचा हातखंडा, तर अज्जुका कोकिळकंठी म्हणून प्रख्यात. आज मद्यपान, संगीत, नृत्यमहोत्सव, असा कार्यक्रम होता. वीणा आलेलीच होती. परमभट्टारकानें ती मांडीवर घेतली व तिच्या तारा छेडण्यास सुरवात केली. नृत्यकु-शल मधुकरिका एकीकडे नृत्यमुद्रांचा अभिनयहि करावयाला लागली. तेवढ्यांत निपुणिका धांपा टाकीतच आली आणि अज्जुकाच्या पायांशीं लोळण घेऊन रडत रडत सांगूं लागली—

"भट्टिणी, परित्तायध, परित्तायध ! युवराज भट्टारकाला ब्रह्मपिशाच्यानं पकडून कुठं नेलंय कळत नाहीं. जालुक वामनहि तमालकुंजांत बेशुद्ध होऊन पडलेला आहे. आणि कंचुकी आर्यलात कांहींतरी बरळत राहिलाय. मीहि बेशुद्ध झाली होत्यें." तिचें बोलणें संपावयाच्या आंतच परमभट्टारक व अज्जुका उठून उभी राहिली. निपुणिकेचें बोलणें

व घाबरगुंडी पाहून चन्द्राला हंसूं आवरण्याची मुष्किल झालेली होती म्हणून तो अज्जुकाच्या आड लपून राहिला. प्रतीहारी ‘इतो इतो भट्टा’ असा पुकारा करीत पुढें चालली व पाठोपाठ कुब्ज, मूक, बधिर इत्यादि सार्‍या परिजनांसमवेत अज्जुका व परमभट्टारक निघाले. मूक व बधिर परिजनांना काय भानगड आहे ती धड कळलेलीहि नव्हती. ते कुबड्या कुरभकाकडून एकंदर प्रकार समजून घेण्याची खटपट करीत होते आणि तोहि जातां जातां हातांनीं खुणा करून त्यांना कांहीं समजून सांगण्याची खटपट करीत होता. चन्द्राचें जणुं अजूनहि समाधान झालें नव्हतें, म्हणून तो उलट सुलट खुणा करून त्यांची अशी समजूत करून देत होता कीं ‘ब्रम्हसमंध तुम्हां दोघांचे बळी मागतोय.’ त्याच्या या इशार्‍यानें दोघेहि बिचारे घाबरले आणि पळून जाण्याचा बेत करूं लागले; पण कुबडा कुरभक व त्याचा मित्र वामन रेवतक हे त्यांना जाऊं देईनात.

युवराज भट्टारकावरील संकटाची वार्ता सगळ्या राणीवशांत पसरली आणि ही मंडळी तमालकुंजापर्यंत पोंचेतों शेंकडों दीपयष्टी ( मशाली ) घेऊन सारें अन्तःपुर तिकडेच लोटलें. रामगुप्त अजूनहि पहिल्यासारखाच जमिनीवर निश्चेष्ट पडलेला होता, परंतु आतां तो शुद्धीवर आलेला होता. मात्र घाबरल्यामुळें तो डोळे उघडीना. अज्जुका सर्वांपेक्षां जास्त घाबरलेली होती. तिला मनांतल्या मनांत दुःखाचे कढ येत होते. ती धांवतच पुढें गेली व रामाचें मस्तक मांडीवर घेऊन बसली. तिनें ‘वच्छ,’ ‘वच्छ’ अशा हांका मारून दोनतीनदां हालविल्यानंतर रामानें डोळे उघडले. अजून-सुद्धां तो बराच घाबरलेला होता व ही हिंवाळ्यांतली रात्र असूनहि त्याच्या सगळ्या अंगाला दरदरून घाम सुटलेला होता. अज्जुका व परमभट्टारक हीं दोघें रामाला बरोबर घेऊन आपल्या श्रीगर्भांत आलीं.

राम तर थोड्याच अवधींत ठीकठाक झाला. पण तमालकुंजांतील महापिशा-च्चाची ‘चक्षुर्वै सत्यम्’ कहाणी मात्र निपुणिका, कंचुकी व वामन पुढें कित्येक महिनेपर्यंत सांगत राहिलेला होता. सार्‍या पाटलिपुत्र शहरांत या महापिशाच्चाच्या बाबतींत शेंकडों प्रकारच्या दंतकथा पसरल्या. पिशाच्च-शांतीसाठीं ब्राह्मणांनीं खूप जप-होम केले, परमभट्टारक व परमभट्टारिका यांनीं लाखों दीनार ( मोहरा ) दान-धर्मांत खर्च केले.

चन्द्राच्या लहानपणच्या खोड्यांच्या कथा किती म्हणून सांगाव्यात ? त्याचें डोकें हरहंमेश नवनव्या खोड्या शोधून काढण्यांत गर्क झालेलें असे. उद्यानांत पुष्कळसे प्राणी ठेवलेले होते; त्यांत एक रक्तमुख ( लालतोंड्या ) वानरहि होता. चन्द्राची नजर एक दिवस त्याच्याकडे वळली. मग तो मला बरोबर घेऊन तिकडे खेपा करूं लागला. कधीं केळीं घेऊन जाई, कधीं दुसरीं कसलीं तरी फळें. कधीं

कुलूपा आमच्याबरोबर असे, कधीं दुसरी चेटी. दोन एक दिवसांतच चन्द्रानें रक्त-मुखाला खाऊं घालतां घालतां त्याच्या जवळ बसून त्याच्या पाठीवरून हात फिरवायला सुरवात केली, त्याबरोबर कुलूपा भयंकर घाबरली. पण चन्द्रानें तिला चार समजुतीच्या गोष्टी सांगून व थोडीशी दमदाटी-धाकदपटशा देऊन गप्प केलें. दोन आठवड्यांच्या अवधींतच रक्तमुख व चन्द्र यांची इतकी दोस्ती जमली कीं तो दोन्ही पायांवर उभा राहून चन्द्राच्या हाताला धरून हिंडूंफिरूं लागला. नोकरांना सांगून चन्द्रानें त्याचें दावें काढून टाकवलें आणि आतां रक्तमुख हा आम्हां दोघांचा तिसरा दोस्त झाला. त्याला घेऊन तो सगळीकडे भटकत राही आणि कुबडे, वामन, कंचुकी व चेटी या सर्वांची पांचावर धारण बसे. खूण करण्याचा अवकाश कीं कुबड्यांच्या कुबडावर स्वार व्हावयाला रक्तमुख तयारच असे. अज्जुकाजवळ सर्वांनीं ढीगभर तक्रारी केल्या. तिला चन्द्र सांगे—

" नाहीं ग अज्जुका ! रक्तमुख फारच सज्जन प्राणी आहे. त्याला जर कुणी चिडवलं, वेडावलं अगर दगड मारला तर त्याच्यावरच तो नाराज होतो. मी त्याला तुझ्याकडे घेऊन येतों हं. पहा तर खरी कसा छान वानर आहे तो. " येवढें बोलून चन्द्र वानराला आणण्यासाठीं जायला निघाला त्याबरोबर परिजन सांगूं लागले-" भट्टिनी ! त्याला मनाई करा ! " वामन आणि कुबडे तर धूमच ठोकूं लागले. चंद्र एका दमांत रक्तमुखाला घेऊन आला. त्यानें वाटेंत त्याला अगदीं नीट रीतीनें समजावलें. जणूं काय त्याचें सगळें बोलणें त्याला कळतच होतें—
" हें बघ बेटा ! अज्जुकाच्या समोर जायचं आहे. माझ्या सारखाच तूंहि सज्जन मुलगा होऊन रहा. कान-शेंपूट खालीं कर अन् मी जेव्हां तुझं तोंड वर करीन तेव्हां अज्जुकाकडे बघतांना डोळ्यांतून पाणी आण. जरा जर चूक केलीस तर या लाठीची तुझ्या डोक्याशीं गांठ आहे, समजलास. रक्तमुखाला पाहतांक्षणीं लोक त्याला वाट देण्यासाठीं इतके भराभर मागें हटत कीं जणूं काय परमभट्टारकाची स्वारीच आली आहे; उणीव फक्त " जेदु जेदु " या पुकाऱ्याचीच काय ती होती. वामन तर कंचुकींच्या ऐसपैस सोग्यांआड दडूं लागले आणि चेटी एकमेकींच्या पाठीशीं दडूं लागल्या—त्यांतल्या त्यांत ज्यांना रक्तमुखाचा परिचय एकदोन वेळां झालेला होता त्यांची तर फारच तारांबळ उडाली. अज्जुकाहि थोडीफार मनांतल्या मनांत टरकलीच; पण तिचा आपल्या देवावर पूर्ण विश्वास होता-अज्जुका कधीं कधीं चन्द्राला 'देव' या नांवानें हांक मारीत असे आणि मी तिच्याकडे राहायला आल्यानंतर आम्हांला जय-देव असें जोडनांव मिळालें. चन्द्र आला आणि अज्जुकाच्या पायांपाशीं बसून राहिला. रक्तमुखहि मागोमाग येऊन मान खालीं घालून त्याच्याजवळ बसला. चन्द्र सांगूं लागला-- " बघितलंस अज्जुका ! रक्तमुख किती सज्जन आहे बरं ! लोक

याला नाहक त्रास देतात." हें सांगतां सांगतां त्यानें रक्तमुखाची हनुवटी हातीं धरून त्याचें मुख वर केलें अज्जुकानें त्याच्या पातळ पापण्या व पांढऱ्या बुबुळांच्या मधोमध असलेल्या काळ्या बाहुल्याहि पाहून घेतल्या. चन्द्राच्या बोलण्यावर तिचा विश्वास बसला. चन्द्रानें रक्तमुखाला खुणेनें अज्जुकाचे पाय दाखविले. रक्तमुखानें तिच्या पायांवर आपले हात ठेवले. अज्जुकाच्या मुखांतून उद्गार निघाले--" खात्रीनं सज्जन आहे हा."

रक्तमुखाचा त्रास सोसलेल्या कंचुकीनें व इतरांनीं सांगितलें– "नाहीं हो भट्टिनी ! हा वानर मोठा लबाड व खट आहे." कुणी सांगितलें– "यानें आमचं कंचुक फाडलं." कुणी शिवण घातलेलें उत्तरीय दाखविलें. परंतु रक्तमुख सज्जन आहे अशीच चन्द्रानें अज्जुकाची खातरजमा करून दिली.

तीच ती गोष्ट ऐकण्याप्रमाणें त्याच त्या प्रकाराचा खेळ पुन्हां पुन्हां खेळण्यांत चन्द्राला आनंद वाटत नसे. रक्तमुखाचा खेळहि त्याला दोन तीन महिन्यांनंतर नीरस वाटूं लागला. चन्द्राला धाडसाचे खेळ विशेष आवडत. झाडावर चढणें, पोहणें, उंच घाटावरून उडी मारणें, मोकळपाठी घोड्याला लगाम न लावतां त्याच्यावर स्वार होऊन दौड करणें, इत्यादि खेळ त्याला आवडत. यांतल्या कित्येक बाबतींत पाटलिपुत्र अगर दुसरी राजधानी साकेत ( अयोध्या ) येथें तितकीशी मोकळीक नसे. परंतु आम्हांला पांचवें वर्ष लागल्या नंतर दर दोन वर्षांच्या अंतरानें आम्ही दोघे अग्रोदकाला हटकून जात असूं आणि तेथें तात महासेनापति आम्हांला पूर्ण स्वातंत्र्य देत असत. हवा तो खेळ खेळावा, हवा तसा दिवस घालवावा; मात्र आम्हीं दुसऱ्या कुणा मुलाला दुःख दिलेलें त्यांना आवडत नसे. चन्द्राला तशी अनुकूलता असती तर तो आपल्या संवयीच्या आहारीं गेला असता. परंतु इथें यौधेय मुलांशीं गांठ होती; एक दोन वेळां त्यानें राजकुमाराचा रुबाब दाखवून पहिला पण यौधेय कुमारानें पहिल्याच सपाट्यासरशीं त्याच्या पायांत हात घालून त्याला जमिनीवर आदळलें. अग्रोदकाच्या मुलांचें पाणी निराळेच आहे हें समजण्याला त्याला वेळ नाहीं लागला. परंतु या दोन तीन घटना चन्द्रानें मनावर घेतल्या नाहींत हें मात्र जरूर सांगितलें पाहिजे. पुढें पुढें तर तो अग्रोदकाच्या मुलांना खूपच हवाहवासा वाटूं लागला. अवघ्या सात आठ वर्षांच्या लहान वयांत देखील पाटलिपुत्र व अग्रोदका या दोन ठिकाणांपैकीं एकाहून दुसऱ्या ठिकाणीं जातांक्षणीं त्याच्या वृत्तींत इतका एकदम बदल कसा होत असे हें एक आश्चर्यच होतें. यौधेयांची शिक्षा-दीक्षाहि जरा वेगळयाच प्रकारची होती. ते आपल्या मुलांचे खूप लाड करीत असले तरी ते मुलांना फुलांसारखे नाजुक बनवून ठेवूं इच्छीत नव्हते. प्रत्येक यौधेय मुलाला जन्मतांक्षणीं खड्ग धुवून त्यानें पाणी पाजण्यांत येत असे. लहानपणा पासून तो खड्गाशीं खेळावयास शिकत असे.

स्वतःला धोक्यांत घालून घेणें ही यौधेयाला नित्याचीच गोष्ट आहे. तो जिवाची पर्वा करीत असला तरी मृत्यूची पूर्ण अवहेलना करूनच ही पर्वा ठेवीत असतो. आम्ही दोघे दहा वर्षांचे झालों नव्हतों तोंच आम्ही आमच्या इतर युवकबांधवांसमवेत रानडुकराची शिकार करावयाला जात असूं. कधीं भाला घेऊन घोड्यावर स्वार होऊन आम्ही शिकारीचा पाठलाग करीत असूं. आणि कधीं कधीं परत जाण्याला उत्सुक असूनहि रानडुकराच्या जंगलांतच आम्ही सारी रात्र घालवीत असूं. आम्ही तिरंदाजीहि करीत होतों. आम्ही दोघांनींहि निशाणबाजींत चांगलाच लौकिक मिळविलेला होता. पण बाणानें रानडुक्कर कसा मरणार ? त्याच्या साठीं भाला हेंच योग्य हत्यार असतें आणि तो सुद्धां मर्मावर लागला तरच. चौदाव्या वर्षी चन्द्रानें आपल्या हातानें पहिला रानडुक्कर शिकारींत मारला, आणि मागाहून कांहीं महिन्यांनीं मींहि मारला. परंतु शिकारीचा आनंद आम्ही सुरवातीपासूनच उपभोगूं लागलेलों होतों. अंधेरांत अगर दिवसाउजेडीं रानडुक्कर, शल्की ( साही ), हरिण अगर रोज ( नीलगाय ) अशा प्राण्याचा शिकार यशस्वी रीतीनें केल्यानंतर शिकारी त्या प्राण्याजवळ पोंचल्याबरोबर जोरांत अशी हांक देई–" कुणी भाईबन्द आहे या जंगलांत ? शिकार मेलेली आहे. या आणि आपलो वांटणी उचला." माणूस स्वतः शिकार केल्यावर इतरांना वांटणी देण्यासाठीं कां बोलावतो हें आम्हां दोघांना समजत नसे. परंतु मग बाबांनीं असा खुलासा केलाः –"दुनियेंत जें कांहीं पैदा करण्यांत येतं, जी कांहीं मिळकत होते, ती केवळ एकट्याच्या मेहनतीनं होत नाहीं. शेंकडों लोक प्रयत्न करीत असतात आणि त्यांतला एखादा जर यशस्वी होतो, तर यशाच्या श्रेयांत नव्याण्णव तथाकथित अयशस्वी लोकांचे परिश्रमहि समाविष्ट आहेतच. म्हणून कोणत्याहि यशाचं श्रेय आपण एकट्यानं घेतां कामा नये. मग एकानं यशस्वी व्हावं आणि बाकीच्यांनीं रिकाम्या हातीं जंगलांतून परत यावं, का सर्वांनीं थोडं थोडं यशस्वी व्हावं, यांतली चांगली गोष्ट कोणती हें जरा उदार बुद्धीनं पाहिल्यावरहि कळून येईल." मला त्या जंगलांत शिकार करते वेळींच एका नव्या गोष्टीचा, एका नव्या भावनेचा प्रकाश पहिल्या प्रथम मिळाला.

जंगलांत जर आणखी कोणी शिकारी असेल तर घरीं नेण्यासाठीं शिल्लक ठेवलेल्या मांसांत त्यालाहि वाटा मिळत असे. घरीं मांस नेण्याची बात नंतरची. अगोदर शिकार हातीं लागतांक्षणी आम्ही लांकडें गोळा करावयास लागत असूं. रामदेखील एकदोनवेळा आजोळीं आला असेल. पण रात्रींच्या वेळीं शिकारीसाठीं त्याला बाहेर पडावयाची हिंमत होत नसे. आम्ही मात्र तसल्या रात्रीं अंधेरांत देखील धांवाधांव करून लाकडें गोळा करून आणीत असूं. चन्द्राचे मामा लोक शिकार ठीकठाक करीपर्यंत चन्द्र व मी चकमकीनें विस्तव तयार करून देत असूं.

लांकूडफाळ्याच्या विस्तवावर भाजलेल्या संपूर्ण डुकराचें मांस आम्हां दोघांना विशेष आवडत असे. तुकडे करून भाजलें तर भाजतेवेळीं डुकराची चर्बी विस्तवांत पडून त्याला होमकुंडाचें स्वरूप प्राप्त होई. परंतु सबंधच्या सबंध डुक्कर भाजला म्हणजे त्याची चर्बी आंतल्या आंत पचून जाई. पाटलिपुत्राच्या राजवाड्यांतील मुदपाक-खान्यांत असल्या मांसाला अगदींच अळणी म्हणत असत. तेथें दक्षिणसमुद्राकडून आणि इतर कुठून कुठून आणलेले एला ( वेलची ), लवली ( लवंग ) व इतर कितीतरी पदार्थ घालून मांस शिजविण्यांत येत असे. मलाहि लहानपणापासून तसलेंच मांस खाण्याची संवय होती. परंतु यौधेयांच्या घरीं शिजविलेलें अगर शिकारीचे वेळीं भाजलेलें मांसच मला जास्त आवडे. त्यांच्या घरीं मांस शिजविण्याच्या बाबतींत तितक्या भानगडी करीत नसत. माझें यौधेय रक्त व त्याविषयींचा माझा पक्षपात हें कदाचित या आवडीचें कारण असेल. परंतु एक गोष्ट मात्र अनुभवसिद्ध आहे. एला, लवली, आणि भरपूर तूप घालून शिजविलेलें मांस साध्या अन्नाहूनहि पचावयास जास्त जड जातें; आणि याच्या उलट साधें शिजविलेलें अगर भाजलेलें मांस साध्या अन्नापेक्षांहि लवकर पचतें. सबंध डुक्कर भाजावयास फार वेळ लागतो; परंतु विस्तवावर ठेवावयाच्या अगोदर त्याचें पोट फाडून आंतडी बाहेर काढतांना काळीजहि काढीत आणि ती माझे भाऊ—चन्द्राचे मामा लोक—आम्हां मुलांनाच देत असत. शिकारीचे वेळीं धांवाधांव करावयाची, रात्र-रात्र जागावयाचें, उन्हांत तळत रहावयाचें, या सगळ्या कष्टाच्या गोष्टी अर्थातच होत्या; परंतु उत्साहामुळें ते कष्ट कळून येत नसत.

'काय रे, तुला अग्रोदका आवडते का पाटलिपुत्र ?' असें जर त्या बाळपणींच्या काळांत चन्द्राला कुणी विचारलें असतें तर त्याला एक निश्चित उत्तर देणें मुष्किलीचें झालें असतें. पुढें पुढें आमचें शिक्षण जेव्हां जोरांत चालू झालें तेव्हां मग अग्रोदकाला जाण्याची संधि आम्हांला क्वचित मिळे, आणि ते महिना दोन महिने हा हां म्हणतां निघून जात, याचें आम्हांला फार वाईट वाटे. चन्द्र गाण्या-नाचण्यांत फारच कुशल होता आणि मीहि या बाबतींत त्याच्या पेक्षां कमी नव्हतों. परंतु एका गोष्टींत मी चन्द्रापेक्षां नक्कीच कमी होतों. ती गोष्ट म्हणजे नकला करणें—बहुरूपी होणें. त्यानें वेष बदलण्यासाठीं किती प्रकारचे कपडे जमा केले होते त्याला कांहीं सुमारच नव्हता. शुभ्र, काळी, पिवळी, अशा निरनिराळ्या रंगाच्या दाढ्या, लहान-मोठ्या मिशा, चेहरा रंगविण्याचे रंग, स्त्रीपुरुषांचे नानाप्रकारचे दागिने आणि वस्त्रें. त्याच्या भरमसाट उपद्यापांमध्यें मी पुढाकार घेत नसलों तरी आम्हां दोघांचा संबंधच असा होता कीं मला त्याला साथ देणें भागच पडत असे. कुबड्या कुरभ-काला लग्न करण्याची फार इच्छा होती. तो राहात असे अन्तःपुरांत आणि तिथें

 र स्त्रीराज्यच होतें. परंतु या अष्टावक्राकडे कोणत्या स्त्रीचें लक्ष जाणार ? विवाहाचें
ामिष दाखवून त्याची इतक्यांदा चेष्टा झाली होती कीं कुणाहि चेटीवर त्याचा
श्वास राहिलेला नव्हता. आम्ही अकरा बारा वर्षें वयाचे होतों त्या वेळची गोष्ट.
ाम्ही कुबड्याला फसविलें. चंद्रावर कदाचित त्याचा विश्वास असावा. मी थापाथापी
ल्यावर तो लग्न करण्यासाठीं अगदीं पागल बनून राहिला. कुबड्याला आम्ही सांगि-
लें कीं एक त्रैलोक्य-सुंदरी कन्या तुझ्याशीं लग्न करूं इच्छिते. कारण काय, तें
खील आम्ही चांगल्या प्रकारें सांगितलें. ही कन्या दुसरी तिसरी कुणी नसून खुद्द
द्राची अप्सरा रंभाच आहे. तिच्या हातून कांहीं तरी चूक झाल्यामुळें ब्रह्मदेवाचा
त्र अष्टावक्र मुनी यानें तिला असा शाप दिला कीं आतां तुला स्वर्गांत जागा मिळ-
ार नाहीं. पुष्कळ हातां पायां पडल्यावर मुनीचें अंतःकरण विरघळलें आणि त्यानें
ांगितलें—" जा. मानवी होऊन जर तूं माझ्यासारख्याच एखाद्या कुबड्याशीं लग्न
लेंस तर तुला परत सदेह इंद्रलोकांत येतां येईल, "

ही कन्या कुणाची ? आम्ही सांगितलें कीं विंध्याटवींतील परिव्राजक साम-
ाची ही कन्या आहे. आमच्या या कटांत एकदोन दोस्तांना व दोनतीन चेटींनाहि
ाम्ही सामील करून घेतलें होतें. परंतु सप्तपदीचा प्रश्न निघाल्यावर चेटीं-
कीं कुणीच तयार झाली नाहीं. अखेरीस चन्द्र म्हणाला-- ' मीच वधू
ोईन '. चंद्र अज्जुकाप्रमाणेंच अत्यंत सुंदर होता. मी रंगानें त्याच्यापेक्षांहि
जळ होतो व माझी आंगलटहि त्याच्यापेक्षां चांगली होती. परंतु त्याच्या
पांत एक प्रकारचा न्याराच स्त्रैण नाजुकपणा होता. लांब लांब केंस स्त्रियांना व
रुषांना सारखेच असतात. शेंडीचें परिवर्तन वेणीमध्यें केलें कीं काम झालें. चतुरिका
धू व्हावयाला तर घाबरली होतीच. आणि तें बरोबरहि होतें. सर्व कांहीं यथाविधि
ालें असतें तर मागाहून धर्मासनानें ( कोर्टानें ) तिला कुबड्याची बायको होणें
ाग पाडलें असतें. नाहींतरी बडे लोक ही थट्टा होती इकडे थोडेंच लक्ष देणार
ोते ? मात्र चतुरिकेच्या चतुर हातांनीं चंद्राला सजविलें छानच. मधें मधें फुलें
फून तिनें चंद्राची वेणी घातली. कानांतील कुंडलें काढून कर्णफुलें घातलीं. गळ्यांत
ोत्यांची एकदाणी व निष्कमाला ( मोहनमाळ ), दंडांत मोत्यांचे झुबके लावलेले
त्नजडित अंगद, हातांत सोन्याच्या बांगड्या, कमरेला घागऱ्यांचा कमरपट्टा, आणि
ायांत सुंदर नूपुरें, केंसांत जियें तिथें रत्नें व मोतीं. चतुरिकेनें त्याच्या डोळ्यांत
अगदीं बारीकशी अंजनरेखा काढली, पायांना अलक्तक ( महावर=मेंदी ) आणि
अंगाला अंगराग व चेहऱ्याला मुखचूर्ण ( फेस पावडर ) लावलें. दोन नारिंगांचे
कृत्रिम स्तन बनवून ते चोळीखालीं झांकून टाकले. नंतर चीनांशुक ( पातळ )
नेसवून तिनें आम्हां सगळ्यांना पाहावयास बोलावलें. तिथें मूळच्या चन्द्रगुप्ताचा

पत्ताच राहिला नाहीं. ही खरोखरीच उच्चकल्पाच्या ( विन्ध्याटवीच्या ) महाराजाची कन्या आहे असें मानावयास खुद्द अज्जुकादेखील कदाचित तयार झाली असती. मला तर फारच आश्चर्य वाटलें. चतुरिका आणि तिच्या सख्या तर "सही चन्दे !" ( सखि चन्द्रे ) असें म्हणून त्याला पुन्हां पुन्हां कवटाळत होत्या. मी चन्द्राला म्हणालों--"भायर! खरोखरच तुझ्या ठिकाणीं मूळ स्वरूपाचा मागमूसहि राहिलेला नाहीं. जरा मोठ्या आरशांत स्वताचं सगळं रूप पहा तर खरं." चंद्रानें पाहिलें आणि पाहिल्याबरोबर स्वतःच्या यशस्वी वेषांतरावर खूष होऊन तो मनसोक्त हंसला.

आम्ही कुबड्याला ' मुलगी ' पाहण्यासाठीं बोलावलें. ' मुलीनें ' लज्जा-संकोचाचा अभिनय अत्यंत लालित्यपूर्ण असा करून दाखविला. कुबड्याच्या देखतच आम्ही शापाची व लग्नाच्या संमतीची गोष्ट विचारून घेतली. ' मुलीनें ' लग्नाला संमति दर्शविण्यासाठीं मान झुकविलेली पाहून कुबड्याचा आनंद गगनांत मावेना. लग्नविधीचे मंत्र म्हणण्यांत आले, सप्तपदी झाली, स्त्रियांनीं मंगल गीतें गाइलीं. कुबड्याला सबंध महिनाभर भ्रमांत ठेवण्यांत आलें. तो नववधूला भेटण्यासाठीं व्याकुळ झालेला होता. परंतु आम्ही दुष्टग्रहांची व तोंडाला येईल ती सबब सांगून टाळाटाळ चालविली. मग ही थट्टा जेव्हां शिळी होऊं लागली तेव्हां एक दिवस चन्द्रानें तोंड आंबट करून कुबड्याला सांगितलें- " कुरभक ! त्या सुंदरीनं आजच गंगेंत उडी घेतली. तिला वांचविण्यासाठीं जय पाण्यांत उतरला, परंतु ती कसची हातीं लागते ? आम्ही धारेवर मागं पुढं नजर टाकीत होतों तेवढ्यांत एक अप्सरा पाण्यांतून हळूहळू वर आली –प्रथम तिचा घननील केशकलाप, मग मुखचंद्र, नंतर कम्बुग्रीव ( शंखासारखी मान ), मग स्फटिक-शिला-सम कलश-युगल-सहित वक्षस्थळ, नंतर सत्रिवलि क्षीणकटि (पोटाच्या तीन घड्या व त्यांच्या खालची बारीक कमर), मग विशाल नितंब, जानु-कदली ( केळीच्या खुंटांसारख्या मांड्या ) व पदकमलं पाण्याच्या पृष्ठभागावर आलीं आणि एकाच क्षणांत पाण्यापासून अलग होऊन अधांतरीं उभी राहून तिनं आम्हांला हांक मारून सांगितलं- " भाऊजी ! लग्न झाल्याबरोबर मी शापमुक्त झाल्यें. आतां त्रिदशपतीच्या ( इन्द्राच्या) आस्थानांत (दरबारांत) मला गेलं पाहिजे. मी आर्यपुत्रांचं (पतीचं ) दर्शन घेण्यासाठीं तगमगत आहे खरी, परंतु मी 'परब्बसो अप्पा' (परस्वाधीन अप्सरा). म्हणून तुम्ही दहा नखं जोडून माझ्या वतीनं पद्मांजलि बांधून आर्यपुत्रांना अनेक वंदना करून सांगा कीं मी त्यांची भेट घेण्यासाठीं एखाद दिवशीं येईन. नील नभांत क्षीरोदधिसंभूत ( चंद्र ) आपलीं क्षीरश्वेत किरणें प्रसारित करील अशा वेळीं सापाच्या कातीसारखें दुकूल नेसलेली ही दासी क्रीडापर्वतावर आर्यपुत्रांना भेटावयास येईल."

या सगळ्या गोष्टींवर कुरभकाचा विश्वास इतका पक्का बसला कीं तो हटकून चांदण्या रात्रीं क्रीडापर्वतावर जाऊन बसून राही. त्याच्या वधूनें विवाहाचे वेळीं

त्याचे हात प्रत्यक्षच आपल्या हातीं घेतले नव्हते का ? त्याच्या शरीराला तिनें स्पर्श केला नव्हता का ? हो कल्पना थोडीच होती ? त्याला आपल्या प्रेयसीचा विसर पडणें शक्यच नव्हतें. मात्र एखादी फुटक्या दाताची काळी मिचकूट दासी जरी त्याला आपला नवरा करून घ्यावयाला तयार झाली असती तरी तो या अप्सरेला जरूर विसरला असता.

( ३ )

## गंधार देशाची यात्रा

आम्ही दोघे सहा वर्षांचेहि झालों नव्हतों तोंच तीन गुरु आम्हांला शिक्षण देण्यासाठीं नेमण्यांत आले. आमच्या बरोबर शिकण्यासाठीं आणखी कांही सामन्तपुत्र जमा करण्यांत आले होते. त्यांमध्यें वीरसेन हा मुलगा विशेष चलाख व बुद्धिवान होता. आतां दोहों ऐवजीं तिघांची गट्टी जमली. प्रथम प्रथम पाटीवर धूळ पसरून तीवर आम्ही काटकीनें लिहीत असूं. ज्या दिवशीं "ॐ नमः सिद्धम्" असें सांगवून आमच्या हातीं लेखणी देण्यांत आली त्या दिवशीं अज्जुकानें मोठा समारंभ साजरा केला. अध्यापकांना क्षौम-युगल ( रेशमी वस्त्रें ) व इतर भेटी देण्यांत आल्या. आमचें कुल बौद्धमतवादी होतें. भगवान सुगतावर बाबांची मोठी श्रद्धा होती. परंतु ते अंधश्रद्धा बाळगणाऱ्यांपैकीं नव्हते. त्यावेळींहि ते कधीं कधीं बुद्धाविषयीं मला जे सांगत, तें मला ऐकावयाला खूप गोड लागे. परंतु ते जेव्हां उपदेशाच्या खोल पाण्यांत शिरत तेव्हा मला कांहींच समजेनासें होत असे. अज्जुकाचें पतिकुल ब्राम्हण होतें; गाईचें व विष्णूचें परम भक्त; मात्र तिची श्रद्धा सुगतावरच सर्वांत अधिक होती. दर अष्टमी, चतुर्दशी व पौर्णिमेला ती नगराच्या दक्षिणेकडील अशोकारामांत तथागताच्या शरीर-धातूची ( हाडांची ) पूजा करण्यासाठीं जाई, संघाला भोजन घाली व धर्मोपदेश ऐके. पाटलिपुत्रांत असतांना अज्जुकाबरोबर अशोकाराममध्यें मी बहुतेक रोजच जात असें. समजूं लागण्याच्या अगोदर पासूनच मी इंद्राच्या वैभवाला लाजविणाऱ्या पाटलिपुत्राच्या राजप्रासादामध्यें येऊन राहिलों व तिथेंच माझा सारा वेळ जाई. कधीं कधीं पाहुणा म्हणून मी अग्रोदकाला जात होतोंच. परंतु माझ्या डोळ्यांसमोर समुद्र-गुप्ताचा विशाल राणीवसा, त्याचे दास-दासी, परिचारक-परिचारिका, रत्न-सुवर्ण हेंच

वैभव असावयाचें. मी महादेवीचा धाकटा भाऊ व द्वितीय युवराजाचा अभिन्न सहचर असल्यामुळें सगळे लोक मला स्वामी म्हणूनच मानीत असत. परंतु समजूं लागल्या-नंतर जेव्हां मी अगदीं प्रथम अग्रोदकाला गेलों व स्वजनांच्या स्नेहपूर्ण वात्सल्याचा व कौतुकाचा अनुभव घेतला, तेव्हां माझ्या नसांनसांतून यौधेय रक्त सळसळूं लागलें. पुढें दिवसें दिवस ही भावना आणखीच बळावली. पाटलिपुत्राच्या राजप्रासादांत मला मान मिळे, पण त्याच्या बुडाशीं भय असे. ज्यांच्याशीं मी बरोबरीच्या नात्यानें वागूं शकेन असे लोक तिथें एक कोडीहून अधिक नव्हते. अग्रोदकामध्यें आम्हां यौधेयांची एक हजार घरें होतीं. जरी कुणाकुणाच्या घरीं थोडें अधिक धन असलें, व्यापाराच्या योगानें थोडी अधिक मिळकत होत असली, आणि जरी कित्येकांना आपलें सारें काम आपल्या हातांनीं करावें लागत असलें, तरी देखील हीं हजार घरें सगळीं समान होतीं. यांतल्या एका घरीं अन्न असेल तर इतर घरीं कुणी उपाशी राहणें शक्य नव्हतें; एका घरीं मदिरा असेल तर इतर घरच्या लोकांचे ओठ ओले झाल्याखेरीज राहणें शक्य नव्हतें. यांत दानधर्माचा व उपकाराचा सवाल नव्हता. प्रत्येक यौधेय आपल्या कुणाहि बांधवाचा आहारविहाराचा नैसर्गिक हक्क मानीत होता. मला चुलत्या कमी असल्या तरी भावजया जास्त होत्या. मी अग्रोदकाला गेलों कीं स्वतःच्या घरीं जेवणखाण करण्याची संधि मला क्वचित एखाद्याच दिवशीं मिळे. तेरा चौदा वर्षांचा झाल्यावर मी जेव्हां नृत्यगाण्यांतील माझें कौशल्य दाखवूं लागलों, तेव्हां तर माझ्या सगळ्या भावजया मला आपल्या पदरांत बांधण्यासाठी एकमेकींशीं चढाओढ करीत असत. त्यांचा माझ्यावर केवढा अपार लोभ होता म्हणून सांगूं! वडिलांचा एकुलता एक पुत्र असल्यामुळें मला सख्खी भावजय नव्हती; परंतु यौधेयांमध्यें सगळ्या भावजया सख्ख्याच असतात; कारण एकाच मूळ पुरुषाचें रक्त आपल्या नसांमध्यें सळसळत आहे असा सगळ्या यौधेयांचा सहानुभव असतो. शेतीची लागवडीला आलेली अगर पड पडलेली सारी जमीन साऱ्या यौधेय वंशाच्या मालकीची समजली जाते, आणि नांगरटीच्या वेळीं साधनांच्या अनुकूलतेनुसार लोकांमध्यें शेतांची वांटणी केली जाते. दर वर्षी नांगरून मशागत केलेलीं शेतें पुन्हां साऱ्या यौधेय जमातीच्या समाईक मालकीचीं होऊन राहतात. आणि शेत मिळतें तें आपल्या मालकी हक्कानुसार मिळत नसून यौधेय परिवाराचा घटक म्हणून मिळतें; याहि कारणामुळें यौधेय लोक स्वतःला एका घरचे सख्खे भाऊ समजतात. एकट्या अग्रोदकाचेच नव्हे, तर रोहितकी, खण्डिला, श्रीमाल, ओस इत्यादि सगळ्या नगरांतले व खेड्यांपाड्यांतले यौधेय एकमेकांकडे सख्या भावाच्या नजरेनें पाहत असतात. यौधेय-भूमीच्या कोणत्याहि वस्तींत जाऊन ‘ मी यौधेय आहें ’ येवढें सांगण्याचा अवकाश, कीं सगळीं घरें त्याचींच होतील, तो परिवारांतलीच एक व्यक्ति समजला जाईल आणि

त्याच्या बांबतींत परकेपणा, भेदभाव मुळीं राहावयाचाच नाहीं. मी अनेक वेळा आपल्या बांधवांच्या घरीं या आनंदाचा उपभोग घेतलेला आहे. समुद्रगुप्ताच्या राज-सूप-शालेंतले ( स्वयंपाक घरांतले ) तऱ्हेतऱ्हेचे पन्नास प्रकारचे सूप, मांस, तेमन आणि गंधशाली-ओदन ( सुगंधी तांदुळाचा भात ) तेथें नसत; परंतु तरीहि तिथलें अन्न किती तरी गोड लागे. जसजशीं वर्षें जाऊं लागलीं तसतसें अज्जुकाचें अग्रोदकाला जाणें-येणें कमी कमी होत गेलें; परंतु ती माहेरी जाण्यासाठीं हमेशा झटपटत राही. ती अग्रोदकाला आली कीं आपण गुप्त चक्रवर्तीची महादेवी आहोंत याचा तिला अजिबात विसर पडत असे. ती आपल्या बरोबर फार थोडा परिवार घेऊन येई—तिच्या माहेरचें अकृत्रिम जीवन पाहून त्याचा भलताच अर्थ मनांत घेणार नाहींत अशाच लोकांना ती बरोबर आणी. ती एकदां आली म्हणजे वेळेवर पाटलिपुत्राला कधींच परत जायचाची नाहीं; एक महिन्याकरतां आली कीं दोन महिने राहिलीच. आई हयात नव्हती तरी तिच्या दोघी धाकट्या बहिणी होत्या; शिवाय अग्रोदकाच्या हजार यौधेय-घरांमध्यें दरेक घरीं तिच्या सख्ख्या बहिणी, सख्ख्या चुलत्या, सख्ख्या भावजया होत्याच.

अज्जुकाचें माहेरीं येणें क्वचित् क्वचित् होऊं लागलें तेव्हां मी येण्याचे वेळीं आपल्या भावजया, बहिणी व इतर आप्तेष्टांना देण्यासाठीं ती कित्येक महिने अगो-दरपासून भेटीच्या वस्तू जमा करीत असे. कित्येकींना आपल्या हातचे लेख (पत्रें) लिही आणि एका बरच्या कुणा भावजयीला अगर चुलतीला पत्र लिहिते वेळीं ती नांवें दे देऊन इतक्या जणींना परिष्वंग व कंठग्रह (आलिंगनें व गळ्यांत गळे घालणें) लिहीत असे कीं भोजपत्राच्या खालीं आणखी भोजपत्रें चिकटवावीं लागत. सगळ्या जणी म्हणत—" दत्ता वहिनी आम्हांला विसरली नाहीं. इतकीं नांवं तिच्या लक्षांत तरी कशीं राहतात ? " मी एकदां हें बोलणें अज्जुकाला सांगितलें, तेव्हां तिनें माझ्या मस्तकाचें चुंबन घेऊन सांगितलें—" बाळ ! यौधेयांचं रक्त विसरायचं का असतं ? त्यांनीं मला यौधेयभूमींतून दूर फेंकून दिलं असलं तरी मी आजन्म यौधेय-पुत्रीच राहणार." या वेळीं मी पावसाळ्याच्या अखेरीस अग्रोदकाला पोंचलो होतों. पाटलिपुत्राहून आमची नाव पावसांतच निघाली. पूर्वेचा वारा हिला फारच अनुकूल असतो. पाणी वाढल्यामुळें या वेळीं तर कित्येक सामुद्रिक-वोहित ( समुद्रांतून जाणारीं गलबतें ) देखील ययद्वीपाहून कौशांबीपर्यंतचा पल्ला गांठतात — मात्र हीं गलबतें फक्त मागध सार्थवाहांचींच ( व्यापाऱ्यांचींच ) तेवढीं असतात. एक संपूर्ण नाव अज्जुकाने दिलेल्या भेटींनीं भरलेली होती. नावेच्या कूपदण्डावर ( मस्तुलावर=डोल-काठीवर ) मोठें पाल चढविलेलें होतें. ती वाऱ्याच्या गतीबरोबर पश्चिमेकडे सरासर चालली होती. वाराणसीमध्यें मी उपरिकाच्या ( व्हाइसरॉयच्या ) प्रासादांत मुक्काम

केला आणि ऋषिपतनाचें (सारनाथाचें) दर्शन घेऊन आलों. यौधेय रक्त मला जी एक प्रकारची प्रेरणा देत असे, तिच्याच अनुरोधानें या वडिलार्जित धर्मावरहि माझी अबोध श्रद्धा होती. म्हणूनच जिथें तथागतानें पहिल्या प्रथम आपल्या धर्माचा उपदेश केला त्या स्थानाचें दर्शन घेतल्याशिवाय मला राहवतच नव्हतें. प्रतिष्ठान ( झूंसी ) येथेंहि आमची नाव एक दिवस व एक रात्र थांबून राहिलेली होती. इथले राजप्रासाद, राजोद्यान, यांचा पाटलिपुत्रापुढें काय पाड लागणार ? साहजिकच त्यांचें मला कांहींच आकर्षण वाटलें नाहीं. मात्र लोक आपण मेल्यावर स्वर्गांत जाऊं या भावनेनें गंगायमुनांच्या संगमाच्या ठिकाणीं बुडून मरतात हा इथला प्रकार पाहून त्या वेळच्या माझ्या बालमनाला काय वाटलें असेल कोण जाणे. हें चांगलें आहे का वाईट, हें समजण्याची पात्रता माझ्या ठिकाणीं नव्हती, परंतु पुढें पुढें ज्या गोष्टींनीं माझ्या मनांत ब्राह्मणांच्या धर्मजालाविषयीं भयंकर तिरस्कार निर्माण केला, त्यांपैकीच हीहि एक गोष्ट होती.

प्रतिष्ठान येथें आम्ही यमुना नदींत शिरलों. कौशांबीला जरा जास्त थांबावें लागलें. इथेंहि मी उपरिकाच्या ( व्हाइसरॉयच्या ) प्रासादांत मुक्काम केला. अशोक राजाचा महाल—विशेषतः मोठमोठ्या शिलास्तंभांचा आस्थानमंडप—मी पाटलिपुत्रांत कितीदां तरी पाहिलेला होता. कौशाम्बींत मी दोन प्रचंड दगडी स्तंभ पाहिले. त्यांपैकीं एकावर कांहीं लेख कोरलेले होते. ज्या वर्षी माझा व चंद्राचा जन्म झाला, त्याच वर्षी माझ्या मेव्हण्यानें एक लांबलचक लेख याच स्तंभावर कोरवून घेतला. मला अक्षरें वाचतां येत असली तरी त्या लेखाची भाषा होती संस्कृत आणि ती समजण्याइतकें संस्कृतचें ज्ञान मला नव्हतें. लोक सांगत होते कीं या लेखांत कुमारामात्य हरिषेणानें एक फारच सुंदर कविता लिहिलेली आहे.

कौशाम्बीहून नदींतून प्रवास करीत करीत आम्ही मथुरेला पोंचलों. देवपुत्र शाहीचे ( कुषाणाचे ) कितीतरी प्रासाद इथें आहेत; त्यांत आजकाल मगधाचे अधिकारी राहतात. इन्द्रप्रस्थाला गेल्यावर आम्ही नाव सोडून दिली. आतां आम्ही यौधेय-भूमींत येऊन पोंचलों. नावेंतलें सामान चढविण्यासाठीं कांहीं गाड्या पाहिजे होत्या. परंतु त्यासाठीं मला थांबण्याचें कारण नव्हतें. मी एक स्वार बरोबर घेतला आणि अग्रोदकाला गेलों. वडिलांनीं मला हृदयाशीं कवटाळून माझ्या मुखाचें चुंबन घेतलें. या वेळीं मी दोन वर्षांनीं आलों होतों. मी अंगानें चांगलाच वाढलों होतों; यौधेयांची शरीरसंपत्ति मी गमावून बसलों नाहीं हें पाहून बाबांना संतोष झाला.

या खेपेला मला एक फारच मनोरंजक यात्रा करण्याची संधि मिळाली. अग्रोदका व पाटलिपुत्र यांच्या दरम्यान मी इतके वेळां यात्रा केली होती कीं तींत आतां कसलेंच नाविन्य राहिलेलें नव्हतें. बाबा या प्रसंगीं यौधेयांच्या पुरस्कृत ( गणपति )

पदावरून निवृत्त झालेले होते. ते थोडा-फार व्यापार करीत असले तरी कामाची जबाबदारी बहुतांशीं नोकरचाकरांवर होती. व्यापारासाठीं पूर्वदेशांतलें तलम कापड, काशीचा जरतारी कपडा, चंदन व इतर वस्तु ते आणीत असत. तसेंच गंधार देशाहून शुभ्र कांबळीं, सुकीं द्राक्षें, कापिशेयी सुरा आणि शिवाय कंबोजचे घोडेहि आणण्यांत येत. आतांच्या खेपेला आपल्या सार्थाबरोबर बाबा स्वतःच जाणार होते. त्यांत त्यांचा उद्देश केवळ व्यापार करणें हाच कांहीं नव्हता. तक्षशिलेचे धर्मराजिका-चैत्य आणि पुरुषपुर (पेशावर) येथें असलेल्या भगवान बुद्धाच्या भिक्षापात्राचें दर्शन घेण्याची इच्छा हाहि त्यांचा यात्रेचा एक मुख्य हेतु होता. पावसाळा संपून गेला होता, जमीन सुकलेली होती, नदीनाल्यांचें पाणी कमी झालें होतें, पेरण्याहि होऊन गेल्या होत्या, अशा समयाला बाबांचा सार्थ यात्रेला जाण्यासाठीं तयार झाला. मीहि बरोबर येण्यासाठीं बाबांना विचारलें. माझ्या कोणत्याहि इच्छेच्या आड येणें बाबांना आवडत नसे हें मी आधींच सांगितलें आहे. त्यांची वृत्ति खूपच गंभीर असली तरी त्यांचा स्वभाव फारच गोड होता. यौधेय कुलांतील व्यक्तीला तर ते प्राणांपेक्षांहि प्रिय मानीत असत. समुद्रगुप्तानें कितीतरी वेळां आपल्या सासऱ्याला उच्च पद देण्याची इच्छा दर्शविली, परंतु बाबा मात्र यौधेयांची सेवा हाच सर्वांत मोठा बहुमान समजत असत. इष्ट-मित्र, ज्ञाति-संबंधी यांच्यासाठीं जो खर्च पडे त्याची कांहींतरी तजवीज करणें भागच होतें. परंतु धनाकडे ते अत्यंत तिरस्काराच्याच दृष्टीनें पाहत असत. एका ठिकाणीं धन जमा होणें हेंच अनर्थाचें मूळ होय असें ते सांगत— "यौधेय ज्या तऱ्हेनें व्यापार, धन आणि प्रभुता मिळविण्यासाठीं धांवाधांव करीत आहेत, तीच आमच्या अध:पाताचें कारण होईल." आमचा सार्थ फारच मोठा होता. त्यांत पांचशें शकट ( गाड्या ), कितीतरी उंट आणि घोडे होते. शकटांवर माल लादलेला होता. लाखों दीनार किंमतीची संपत्ति आमच्या बरोबर होती. म्हणून दस्यूंचें ( चोरांचें ) भय चांगलेंच होतें. विशेषतः आम्ही शतद्रु ( सतलज ) नदीपार होऊन यौधेयांच्या हद्दींतून देवपुत्र शाही ( कुषाण ) याच्या राज्यांत शिरलों तेव्हांपासून तर चोरांचें भय नक्कीच सुरू झालें. मात्र आम्हाला चोरांची डर नव्हती. आमच्या जवळ शंभर स्वार तर होतेच आणि त्याच बरोबर प्रत्येक गाडीवान व इतर प्रवासीहि तरवार चालविण्यांत प्रवीण होते. वाटेंत जिथें पाणी, गवत व अन्न मिळण्याजोगें असेल तिथें मुक्काम करावयाचा हें ठरलेलेंच होतें. मुक्कामाच्या जागीं गाड्यांच्या अर्धेमधें राहून शस्त्रधारी जागता पाहरा करीत असत. हत्यार आणि मनुष्यबळ तर आमच्या जवळ होतेंच आणि वर आणखी यौधेय जवानांचा लौकिक सर्वांनाच माहीत होता. म्हणून कुणाचीहि आमच्याकडे वांकड्या नजरेनें पाहण्याची हिम्मत होत नव्हती. बाबा साऱ्या सार्थाचे प्रमुख होते.

शतद्रुपार होतांक्षणीं आम्हांला देवपुत्र शाही याचे शक-सैनिक व अधिकारी भेटूं लागले. तसे पाटलिपुत्रांत व इतर ठिकाणी मी कांहीं शक पाहिले होते; मात्र शेंदोनशें शकांना एकत्र पाहण्याचा मोका हाच प्रथम मिळाला. शकांना दाढी इतकी कां आवडते हें मला समजेना. दाढीच्या एका केंसाचेंहि नुकसान झालेलें त्यांना खपत नाहीं. तिच्यामुळें त्यांचा चेहरा रुबाबदारच नव्हे तर भीतिदायकहि दिसतो. आमच्याप्रमाणें ते आंखुड कंचुक न घालतां पायघोळ कंचुक घालतात; कमरेभोंवतीं कित्येक हात लांबीची पट्टी गुंडाळतात; डोक्यावर टोंकदार टोपी घालतात; पायांत सुतना असतो परंतु कंचुकाच्या आडून तो जवळ जवळ दिसतच नाहीं. त्यांचे जोडे पिशवीसारखे उंच असून गुडघ्याच्या अर्ध्या अंतरापर्यंत पोंचतात. त्यांच्या वेषांत तर फरक आहेच आणि भाषेंतहि फरक आहे; परंतु आमच्याप्रमाणें शकहि बौद्ध अगर ब्राह्मण-धर्मच मानतात--त्यांतल्या त्यांत बौद्धधर्माचें प्रस्थ त्यांच्यामध्यें अधिक आहे. कुणी कुणी जैनहि आहेत, परंतु मांसाहार सोडून देणें त्यांना फार जड जातें म्हणून फारच थोडे शक लोक त्या धर्माचे अनुयायी होतात. पाटलिपुत्राच्या राजप्रासादांत राहून राहून मी म्लेच्छ शकांच्या अनेक निन्दाजनक कथा ऐकून ठेवल्या होत्या. परंतु दाढीशिवाय त्यांची दुसरी कोणतीहि गोष्ट मला तरी नावडती आढळली नाहीं. आमच्या बरोबर पंधरावीस यौधेयिका तीर्थयात्रा करण्याराठीं आलेल्या होत्या. शकानिया त्यांना आपल्या घरीं नेऊन त्यांचें खूपच आदरातिथ्य करीत असत. तशीच वेळ आली असती तर यौधेय तरुणी सुरा व नृत्याच्या मोहापासून अलिप्त राहूं शकल्याच नसत्या; परंतु त्या उपोसत व्रत घेऊन तीर्थयात्रेसाठीं चालल्या होत्या; शिवाय त्यांच्यामध्यें तरुणी फारशा नव्हत्याहि; बहुतेक जणी मध्यमवयस्क आणि वृद्धाच होत्या.

इरावती ( रावी ), चंद्रभागा ( चिनाब ) आणि वितस्ता ( झेलम ) या नद्या पार करून आमचा सार्थ तक्षशिलेच्या समोर पोंचला आणि धर्मराजिका महाचैत्य दिसूं लागला, तेव्हां पुरुष मंडळींनीं हात जोडून जागच्या जागीं नुसतेच प्रणाम केले; परंतु आमच्या चुलत्या व भावजया शकटांतून खालीं उतरल्या व त्यांनीं तिथेंच भूमीवर मस्तक, हात व गुडघे टेंकून पंचप्रतिष्ठितांनीं तीन वेळां वन्दना केली. माझी मावशी देवसेना सर्वांत जास्त धर्मश्रद्धाळू होती. तिच्या देखत मीहि वन्दना केली. आमच्या सार्थांतले सारे बौद्ध नर-नारी धर्मराजिकाविषयीं आदर दर्शविण्यासाठीं पायींच चालू लागले.

तक्षशिलेमध्यें सार्थांच्या राहण्याची चांगली सोय होती. बागा, मैदानें व पाण्याचे पाट होते; गवत, लाकडें व अन्न आम्हांला बाजारांत मिळत होतें. देवपुत्राची राजधानी इथें नसून पुरुषपूरला ( पेशावरला ) असली तरी तक्षशिलेचें वैभव पेशावर-

पेक्षां कमी नाहीं. किंबहुना व्यापाराची राजधानी तर तक्षशिलाच आहे; श्रेष्ठी सार्थवाहांचे मोहल्ले व त्यांचे प्रासाद तर हुबेहूब राजेशाही थाटाचे दिसत होते. इथून कम्बोज, कपिशा, बाल्हिक, पारसीक, यवन आणि इतर पाश्चात्य जनपदांकडे वणिक्पथ ( व्यापारी माल वाहतुकीचा रस्ता ) जातो खरा; परंतु दोनच दिवसांच्या प्रवासानंतर शकटांचा रस्ता संपतो. म्हणून पूर्वेकडून येणारे व्यापारी इथेंच आपला माल विकून आपल्याला हवा तो माल इथून घेऊन परत जातात. इथें आम्हांला पाटलिपुत्राचा सार्थवाह गणदास याचा मुलगाहि भेटला. हे लोक यमुनेंतून आणखी वर उत्तरेकडे जाऊन स्रुघ्नपूर ( अंबाला ), शाकल नगरी हीं गांवें घेऊन मग इकडे आले होते. बाबांनीं तक्षशिलेच्या बाबतींत मला पुष्कळशा गोष्टी सांगितल्या. ते म्हणाले --" तक्षशिला हें केवळ व्यापाराचेंच नव्हे, तर एका काळीं विद्येचेंहि फार मोठें केंद्र होतें. त्या वेळीं मगधापर्यंतचे विद्यार्थी इथं येत असत. आतां तर खुद्द पाटलिपुत्रच एक मोठं विद्या-केन्द्र झालं आहे. उज्जयिनी व मथुरा या ठिकाणींहि पठन-पाठनाची तरतूद आहे; म्हणून आतां उत्तरापथ ( पंजाब ) आणि इतर पश्चिमी देशांतलेच विद्यार्थी तेवढे इथं येतात." तक्षशिलेंत पुष्कळसे विहार आहेत. त्यांपैकीं धर्मराजिका महाविहार हा सर्वांत मोठा आहे. धर्मराजिका-चैत्याच्या पाषाण गुहांमध्यें फारच सुंदर मूर्ति कोरलेल्या आहेत. आजू बाजूला कित्येक लेणीं आहेत. त्यांत भगवान् बुद्ध आणि बोधिसत्व अवलोकितेश्वर यांच्या मनोहर प्रतिमा स्थापन केलेल्या आहेत. पूजागृहामध्यें तुपाचा नंदादीप लावलेला असतो. बाबांनीं धर्मराजिकासमोर नंदादीप लावण्यासाठीं दहा दीनारांचा कायम निधी दन्तकार-श्रेणी ( हस्तिदंताचें काम करणाऱ्या शिल्पींचा संघ ) च्या स्वाधीन केला. श्रेणीने सालिना एक दीनार व्याज देण्याचें कबूल केलें. हा एक दीनार वर्षभराच्या नंदादीपाला पुरेसा होता. धर्मराजिकाच्या इतिहाससंबंधांत बाबांनीं सांगितलें-"भगवान् बुद्धांच्या निर्वाणानंतर त्यांच्या शरीरधातूची ( हाडांची ) वांटणी करून राजगृह, कुशीनगर, वैशाली, कपिलवस्तु, रामग्राम इत्यादि ठिकाणीं आठ नऊ चैत्य बनविण्यांत आले. भगवानांच्या निर्वाणानंतर सव्वा दोनशें वर्षांनी जेव्हां अशोक राजा झाला तेव्हां त्यानं आपल्या राज्यांत निरनिराळ्या स्थानीं शेंकडों चैत्य निर्माण करविले, आणि त्यांमध्यें भगवानांच्या शरीरधातूची स्थापना केली. अशोक परम धार्मिक राजा होता, त्याला धर्मराज अशोक असेंहि म्हणत असत आणि त्याच्याच नांवावरून या चैत्याला धर्म-राजिका चैत्य असं नांव रूढ झालं. " मी विचारलें--

" पाटलिपुत्राच्या महाराजा अशोकाचं राज्य इथं पर्यंत होतं ? "

" इथं पर्यंतच नव्हे तर इथून पन्नास योजनं आणखी पश्चिमेकडे त्याचं राज्य फैलावलेलं होतं. आतांहि या देशांचे लोक बौद्धच आहेत आणि धर्मराज अशोका-

विषयीं त्यांना अत्यंत आदर आहे. राजवंश येतात आणि जातात परंतु पुण्यात्म्यांची कीर्ति अढळ होऊन राहते. ”

पाटलिपुत्र येथील अशोकारामांत देखील मी शक, पारसीक व यवन भिक्षु पाहिले; परंतु इथं गांधारांच्या खालोखाल सर्वांत जास्त संख्या शक भिक्षूंची होती. त्यांना विद्येची फार आवड होती. माझी मावशी तर सरळ भिक्षुणी-विहारांत जात असे आणि शकपुत्री आर्या वाशिष्ठी हिच्या ज्ञानाची, उपदेशाची व गोड स्वभावाची प्रशंसा एकसारखी करण्याचा तिला कंटाळा म्हणून येत नसे. आम्ही आतां गंधार देशांत होतों खरे, परंतु गंधार देशाचा गाभा सिंधु नदीच्या पलीकडे होता. गंधारांचे पोशाख आम्हां लोकांच्याहून भिन्न होते. त्यांचे सुतने खूपच घेरदार व असे कांहीं वांकडे तिकडे शिवलेले असतात कीं कापडाला किती तरी निरप्या चुण्या पडलेल्या दिसतात. गांधारींचे सुतनेहि अशाच धर्तीचे असतात, मात्र त्यांची धाटणी याहून अधिक सुंदर असते. हे सुतने अंगांत घातले कीं त्यांचा घेरदारपणा वरून खालपर्यंत निमुळता होत जातो आणि त्यांचे बंद कापडाच्या सुंदर रंगांशी मिळते होऊन फारच चित्ताकर्षक दिसतात. स्त्री-पुरुष दोघेहि कंचुक घालतात. डोक्यावर गांधारी उत्तरीय घेतात आणि गांधार उष्णीष ( पगडी ) घालतात. पायांत दोघेहि वेणीदार जोडे घालतात. शक आणि शकानियां यांचे पोशाख बहुधा एकाच प्रकारचे असतात. तसेच पायघोळ झगे, तसेच उंचच्या उंच पिशवीसारखे जोडे, तसाच कमरबंद आणि तशीच टोंकदार टोपी. शकानियांच्या अंगावर गांधारींपेक्षां दागिने कमी असतात. विशेषतः कर्णपूर तर त्यांना आवडतच नाहींसे दिसले. मगधवासीयांपेक्षां आणि आम्हां यौधेयांपेक्षाहि गांधारांचा व शकांचा रंग अधिक गोरा असतो. बहुतेक जणांचे केस भुरे व डोळे घारे असतात. तिथें श्यामकेशी ( श्याम = काळे केसवाल्या ) पेक्षां सुवर्णकेशी ( पिंगला ) ना जास्त मान मिळतो. मी पुरुषपुरांत किती तरी काम्बोज उपासक ( बौद्ध ) नरनारी पाहिल्या. त्यांच्यामध्यें तर काळे केस व काळे डोळे असलेले लोक आढळतच नाहींत. आणि कित्येकांचे केस तर थोडीशी पिवळया रंगाची झांक सोडली तर बिलकुल सफेतच असतात. शकांपुढें गांधार नमून असतात हें कांहीं मला आवडलें नाहीं. त्यांचे राज्य मात्र टिकलें येवढी गोष्ट खरी. बाबांनीं सांगितलें कीं देव पुत्रशाही आतां स्वतंत्र राजा राहिलेला नाहीं; तो पारसीक शहाला खंडणी देतो.

तक्षशिलेंत आम्हांला दोन आठवडे राहावें लागलें. या अवधींत आमच्या सार्थानें आपला माल विकून टाकला. कांहीं लोकांना शकटांसाठीं मागें ठेवून बाकीचे आमच्या बरोबर घोड्यांवर स्वार होऊन पुरुषपुराला रवाना झाले. सिंधू ही गंगेपेक्षा मोठी नदी आहे असें मी ऐकलें होतें. परंतु पाटलिपुत्राच्या गंगेपेक्षां हिचें पात्र

जास्त रुंद दिसत नाहीं असें मी बाबांना सांगतांच ते म्हणाले कीं हिची धार अधिक खोल व वेगवान् आहे. सिन्धुतटावर आम्हांला पहाड आढळूं लागले. इथून पहिल्या प्रथम मी रजतराशिसमान हिमालयाचीं हिम-शिखरें पाहिलीं. तिथें देवतां व अप्सरा राहतात असें मावशो सांगत होती. हें खरें कीं खोटें यासंबधीं कसलाचं निर्णय देण्याची पात्रता या वेळीं माझ्या अंगीं नव्हती.

सिन्धु-पार झाल्यानंतर पुष्कलावती ( चारसद्दा ) वरून कांहीं दिवसांनीं आम्ही पुरुषपूरला पोंचलों. देवपुत्राचे प्रासाद फारच सुंदर होते. इथल्या मूर्तींसारख्या मूर्ती व चित्रें तर मी आतांपर्यंत पाहिलींच नव्हतीं. मला मागाहून समजून आलें कीं गंधार मूर्तिकला ही यवनकलाकारांच्या सहवासाची देणगी आहे. नगराचे रस्ते व चौक खूपच प्रशस्त होते. मंदिरांची तर कांहीं गणतीच नव्हती. आम्ही तिथें कनिष्कविहारांत दर्शनासाठीं गेलों. बाबांनीं सांगितलें कीं अशोकानंतर तीनशें वर्षांनीं त्याच्याच सारखा आणखो एक बुद्ध-भक्त राजा कनिष्क होऊन गेला; पुरुषपूर ही त्याची राजधानी होती. त्यानेंच हा सुवर्ण-रत्न-खचित महाचैत्य व विहार बांधविला. कनिष्कानें पाटलिपुत्र व त्याच्याहि पुढचे प्रदेश जिंकलेले होते. इथल्या या रत्न-सुवर्णाच्या झगझगाटानें सुशोभित केलेल्या मंदिरांत भगवानाचें जें भिक्षापात्र आम्ही पाहिलें तें अगोदर लिच्छवींची राजधानी वैशाली येथें होतें. हें भिक्षापात्र व एक विद्वत्श्रेष्ठ भिक्षु तिथून आणण्याची आज्ञा कनिष्कानें आपल्या सेनापतीला देऊन ठेवली होती. सेनापतीनें हें पात्र इथें आणलें. आणि गंधारला आलेले विद्वत्-श्रेष्ठ म्हणजे साकेतक आर्य सुवर्णाक्षीपुत्र महाकवि अश्वघोष होत. त्या वयांत मला बाबांनीं सांगितलेल्या साऱ्या गोष्टी स्पष्टपणें कळत नव्हत्या. परंतु मागाहून प्राचीन ग्रंथराशी-मध्यें मी जेव्हां आकंठ निमग्न आलों तेव्हां सगळ्या गोष्टी माझ्या मनश्चक्षूंसमोर मूर्तिमंत उभ्या राहूं लागल्या. आतां साठ वर्षांनंतर मी ज्या या गोष्टी या वेळीं आठवणींतून लिहीत आहे त्यांवर नंतरच्या ज्ञानाचा बराचसा प्रभाव पडला असण्याचा संभव आहे.

कनिष्क विहार आणि भिक्षापात्राचें दर्शन व पूजा करण्यासाठीं आम्ही कितीतरी वेळां गेलों. आणि याहून अधिक वेळ बाबा आर्य असंगांच्या सेवेंत घालवीत होते. आर्य-असंगांचें नांव पाटलि-पुत्राच्या अशोकारामापर्यंत अगोदरच पोंचलेलें होतें. त्यांचें ज्ञान अगाध होतें. आणि त्यांचा स्वभाव तर बालकासारखा सरळ होता. त्यांची सत्तरी उलटून गेलेली होती. केंस-दाढीचें मुंडन केलेलें असल्यामुळें त्या मार्गानें त्यांचें म्हातारपण व्यक्त होणें शक्य नव्हतें. आणि त्यांच्या चेहऱ्यावर तर सुरकुत्या मुळींच नव्हत्या. त्यांच्या ओठांवर स्मिताची अस्फुट रेषा सदैव नाचत असे. त्यांच्या तप्त-कांचन-गौर शरीरावरील अरुण चीवर ( भिक्षुवस्त्र ) हें बालसूर्यानें कवटाळलेल्या

उषेसारखें वाटत होतें. ते आपल्या कुटींतून बाहेर येऊन परिवेषांत (अंगणांत) बसावयाचा अवकाश कीं विद्वान भिक्षु व गृहस्थ त्यांच्या भोंवतालीं बसून राहत असत. बाबा आणि इतर श्रोते त्यांना बुद्ध व यवन (ग्रीक) तत्वज्ञानासंबंधीं बारीक सारीक गोष्टी विचारीत असत. त्या समजण्याइतका मी अजून प्रौढ झालेलों नव्हतों, परंतु मलाहि तिथें बसण्याचा कंटाळा नसे येत. पहिल्याच दिवशीं वंदना करतेवेळीं आर्य असंगांनीं मला जवळ बोलावलें, माझ्या मस्तकावरून हात फिरविला आणि बाबांना उद्देशून सांगितलें–" उपासक सेनापति! हा तुमचा मुलगा हुशार दिसतोय. याला खूप शिकूं द्या. "

बाबांनीं हात जोडून सांगितलें–"आर्य ! आपणच वत्स जयाला आपल्या चरणां-पाशीं ठेवून घ्यावं."

" मी ठेवून घेतला असता, सेनापति ! परंतु आतां मी फारच वृद्ध झालेलों आहें. ध्यान व चिंतन केल्यानंतर जी फुरसत मला राहते ती तुम्हासारख्या उपास-कांच्या कामीं येते. वत्स जयाच्या अध्ययनांत माझ्याकडे फार अडचणी येतील."

" आर्यांच्या चरणांपाशीं राहून याला पुष्कळशा गोष्टी शिकून घेतां येतील."

" नाहीं, त्याचा फार वेळ फुकट जाईल. माझे अनुज वसुबंधु यांना तुम्ही ओळखत असालच. "

" होय, आर्य; आचार्य वसुबन्धु यांना न ओळखणारा आपल्या जंबुद्वीपांत कुणी नसेल."

" होय. ते प्राची (पूर्वदेश) कडे गेले आहेत. कदाचित् पाटलिपुत्र अगर साकेतांत त्यांचा मुक्काम असेल. त्यांना असा मिथ्या विश्वास वाटतोय कीं कुणा चक्रवर्ति वंशांत एखादा धर्मराज अशोकाचा अवतार निर्माण केल्यानं तथागतांचं शासन पुन्हां पांचशें वर्षं पर्यंत खूप सफलतेनं चालेल. "

" चक्रवर्ती-वंशाच्या आश्रयानं ? "

" होय. मला तर असं वाटतं कीं बुद्धाचा धर्म चक्रवर्तींच्या हातीं गेल्यामुळं निर्बल व मलिन होऊन राहील. तो बहुजन-हिताचा धर्म आहे. राजा अस्तित्वांत कसा आला हें तुम्ही तर तथागतांच्या वचनामृतांत वाचलं असेलच. प्राचीन काळीं राजा मुळींच नसे. जन (जनता) स्वतःच आपला सगळा कारभार चालवीत होता. तुम्ही यौधेय जन आज जसा कारभार चालवितां, तथागतांच्या काळी लिच्छवि जसा कारभार चालवीत असत, तशीच सगळीकडे प्रथा होती. मग लोकांनीं धनसंचय सुरू केला, गरीब-श्रीमंत असा भेद निर्माण केला. गांवां शेजारीं खड्डे पाहिले असतील तुम्ही ?"

" होय."

" ते कां झालेले असतात ? त्यांतून माती काढ काढून उंच उंच घरं उभारलीं जातात, म्हणून हे खड्डे निर्माण झालेले असतात. बरोबर अशाच तऱ्हेनं श्रीमंता-जवळ धनसंचय होतो. धन कांहीं आकाशांतून नाहीं खालीं पडत. नऊशें नव्याण्णव मानवांच्या तोंडचा घांस, अंगावरचा कपडा आणि त्यांची सारी कमाई लूटून हे बडेबडे प्रासाद उभे होतात, हे सुवर्णरत्नखचित नंदादीप उजळतात, हे दुकूल, चीनांशुक व पाण्डुकंबल ( दुशाला ) अंगावर घातले जातात. ज्यांचं सारं धन, सारं वैभव बहुजनांना ( सर्व साधारण जनतेला ) दुःखी-दरिद्री केल्यानंच प्राप्त होतं, ते तथागतांच्या बहुजनहिताय धर्माचं कार्य कसं काय करतील ? आपल्या प्रासादां-सारखाच रत्नामोत्यांनीं झगझगणारा एखाद दुसरा चैत्य, एखाद दुसरं प्रतिमा-गृह, एखाद दुसरा विहार त्यांना अवश्य बांधवितां येईल. कनिष्काच्या वंशानं तीनशें वर्षांमध्यें एक-एक करीत पुष्कळसे सुंदर-सुंदर विहार बांधविले आहेत. आज तुम्ही या विहारांमध्यें जेवढे हिरे-मोतीं पाहतां तेवढे कदाचित् पुरुषपूरच्या राजप्रासा-दांतहि नसतील. पण म्हणून काय तथागतांचा धर्म हिऱ्यामोत्यांसाठीं होता ? "

" नाहीं, आर्य ! बहुजनहिताय होता. "

" बरोबर बोललांत सेनापति ! तथागतांचा हा जो धर्म राजे लोकांच्या पदरांत बांधून पडला आहे, तो पुन्हां बहुजनहिताय कसा करतां येईल यासाच मी विचार करून राहिलों आहें. लिच्छवि-कुमारांच्या राज-भोगापेक्षां अंबापाली गणिकेचं भोजन तथागतांना जास्त आवडलं. कां ? "

" कारण भगवानांना उच्च-नीच हा भेद नष्ट करायचा होता. "

" केवळ भिक्षुसंघलाच नव्हे, तर गृहस्थांमधला देखील. तथागतांनीं दाखवून दिलेल्या मार्गानं सर्वांनीं चालावं म्हणून तर भिक्षु-भिक्षुणी व उपासक-उपासिका असे चारी प्रकारचे संघ निर्माण झाले. परंतु आज काय स्थिति आहे ? "

" ब्राह्मणांचे श्रावक ( शिष्य ) जशी जात-पात मानतात तशीच उपासक-उपा-सिकाहि मानतात. "

" होय, सेनापति ! तथागतांच्या श्रावकांनीं राजांचा आश्रय घेण्यांत धर्माची अभिवृद्धि आहे अशी समजूत करून घेतली, म्हणूनच ते बहुजनहिताय राहिले नाहींत. जिथं सगळ्या नद्या भेदभाव सोडून एक होतात अशा समुद्राची उपमा भगवानांनीं या चतुर्विध संघाला दिली आहे ही गोष्ट तथागतांच्या श्रावकांनीं लक्षांत घेतली नाहीं. "

" परंतु आर्य ! ब्राह्मण त्याचं चालूं देतील तर ना ? "

" सेनापति ! भगवान जर ब्राह्मणांना भीत असते तर त्यांनीं ऋषिपतनांत ( सारनाथ येथें ) धर्म-चक्र-परिवर्तन ( पहिला उपदेश ) केलंच नसतं. तथागतांचा

धर्म जो भारत, चीन, पारस, यवन इत्यादि दूरदूरच्या देशांमध्यें फैलावला, तो ब्राह्मणांच्या अगर कुणा राजाच्या कृपेनं नव्हे. आपल्या अंगभूत सत्वेपणामुळं तो इतका फैलावला. त्याच्यामध्यें प्राणिमात्राविषयीं प्रेम होतं, ज्ञान-प्रकाश फैलावण्याचा आदेश होता, आणि बहुजनांवर उपकार करण्याची भावना होती. याच गुणांनीं तथागतांच्या धर्माचा प्रसार पृथ्वीच्या प्रत्येक कोनाकोपऱ्यापर्यंत केला. उलट पक्षीं आज तथागतांच्या जन्मभूमींत काय स्थिति आहे ? हे विहार, त्यांचं सोनंरुपं, त्यांचे हिरे-मोती, आणि दान म्हणून मिळालेलीं अनेक ग्रामं पाहिलींत तर तुम्ही असं खात्रीनं म्हणाल कीं तथागतांचा धर्मवृक्ष फळांफुलांनीं खूप बहरला आहे खरा, पण त्याच्या मुळाला कीड लागलेली आहे. आम्ही बहुजनहिताय असं कसलंच काम करीत नाहीं. आम्ही शिळी कमाई खात बसलों आहोंत. ”

“ मग यांतून कांहीं मार्ग तरी आहे का आर्य ? ”

“ मार्ग ! होय. मार्ग आहे. बोधिसत्वांचा मार्ग--महायान--हाच तो मार्ग होय --मनुष्यानं आपल्या सुखासाठीं, आपल्या निर्वाणासाठीं धडपड करूं नये; त्यानं आपले जीवन-प्राण बहुजनहितासाठीं समर्पण केले पाहिजेत. जोंपर्यंत एकहि प्राणी, एकहि मानव, दुःखांत आहे, बंधनांत आहे, तोंपर्यंत आम्हांला निर्वाण नको, आम्हांला स्वर्ग नको. तोंपर्यंत आमचं स्थान आर्त, दुःखी, दीन, यांच्या मध्येंच आहे. भगवानांनीं आपल्या धर्माला ‘ एहिपास्यिक ’ अशी संज्ञा दिली आहे. त्याचा गुण इथंच याच दुनियेंत दाखवून दिला पाहिजे. दुनियेचा बहुजन दुःखी आहे, राजे लोक आपल्या राणीवशांत पांचशेंच्या जागीं हजार स्त्रियांची भरती करण्यासाठीं व भोग-ऐश्वर्यांत चूर होण्यासाठीं फटफाट माजवितात आणि यालाच म्हणतात दिग्विजय. ”

“ तर मग, आर्य ! राजतन्त्र आपल्याला पसंत नाहीं ? ”

“ जर तथागतांना राजतंत्र पसंत असतं तर त्यांनीं आपल्या पाठीमागं कुणी निरंकुश, निभ्रान्त गुरु नेमून ठेवला असता. पण त्यांनीं तर आपल्या जागीं संघाची स्थापना करून ठेवली ! ”

“ परंतु आर्य ! राजाशिवाय देखील राज्यकारभार चालूं शकतो ही गोष्ट आमच्या गणांपासून दूर अंतरावर असलेल्या भिक्षूंना व उपासकांना देखील ठाऊक नसते ! ”

“ हीच तर ब्राह्मणांची जादू आहे ! राजाबरोबर संगनमत करून बहुजनांच्या कमाईची लूट करण्यापलीकडे यांना दुसरं कांहीं कामच राहिलेलं नाहीं. आजसुद्धां कित्येक राजे स्वतःला बुद्धाचे भक्त म्हणवून घेत असले तरी त्यांच्याठायीं ब्राह्मणभक्तीच जास्त आहे. ”

“ ब्राह्मण-भक्ति आणि गोभक्ति. ”

" जो ब्राह्मण-भक्त होतो, त्याला गो-भक्त व्हावंच लागतं. " असें म्हणून आर्य असंग हंसले! श्रोत्यांनींहि त्यांना साथ दिली. पुन्हां त्यांनीं बोलणें पुढें चालू केलें--" हसूं नका. या गोष्टीनं रडूं आलं पाहिजे. बहुजनसमाज आणि त्याच्या हजारों भावी पिढ्या यांच्या सुखदुःखाचा हा प्रश्न आहे म्हणून तर या गोष्टीचं आपल्याला जास्तच वाईट वाटलं पाहिजे. मानवाला खोट्या श्रद्धेची भुरळ घालून त्याचा पशू करून ठेवायचा आणि मूठभर लोकांनीं त्याच्या जिवावर ऐष-आराम करीत राहायचं ही मानवी हृदयाला काळिमा लावणारी गोष्ट आहे. यवन, शक इत्यादि लोक जेव्हां आमच्या देशांत आले तेव्हां ब्राह्मण त्यांना काय म्हणत होते हें ठाऊक आहे का तुम्हांला ? "

" आर्य ! काय म्हणत होते ? "

" त्यांना म्लेच्छ म्हणत होते. उलट तथागतांच्या श्रावकांनीं आपल्या गुरूचं वचन मानलं. त्यांच्याशीं प्रेमानं व सन्मानानं वर्तन केलं. ते तथागतांना शरण आले, या देशांत वस्ती करून राहिले आणि ज्या ज्या जागीं तथागतांची पायधूळ झडलेली होती ती ती प्रत्येक जागा त्यांच्या लेखीं पवित्र स्थान होऊन राहिली. स्थविर नागसेनाचा शिष्य यवनराज मिलिन्द यानं मोठमोठे विहार बांधविले. शकराज कनिष्क यानं केवढं शिल्प निर्माण केलं हें तुम्हांला तक्षशिलेच्या व पुरुषपूरच्या विहारांचं वैभव पाहिल्यावर समजून आलं असेलच. शेवटीं परकीयांना म्लेच्छ म्हणण्यांतली चूक ब्राह्मणांना उमगली, दक्षिणेच्या लोभाचा पगडा त्यांच्या-वर बसला. त्यांनीं नवे नवे श्लोक तयार केले; आणि या यवन, शक आदिकरून विदेशी जाती क्षत्रिय आर्यच आहेत, मात्र ब्राह्मणांचं दर्शन न झाल्यामुळं त्या संस्कारभ्रष्ट झाल्या होत्या, असं सांगून टाकलं. "

" अन् आर्य ! आतां तर काय, उज्जयिनीचा क्षत्रप-वंश शक म्लेच्छ नाहीं म्हणे, उलट तो क्षत्र-क्षत्रिय आहे ! "

" होय. एकूण काय, तथागत-श्रावकांनीं राजांच्या पदराला धरून धर्माची अभिवृद्धि करण्याची इच्छा धरली खरी, परंतु आतां तें घबाड ब्राह्मणांच्या हातीं सांपडलं आहे. तथागत-श्रावकांना मानवी समानतेच्या गोष्टीं सांगतां येत होत्या; परंतु कुणाला उच्चवर्णांत दाखल करायचं असेल तर तो अधिकार फक्त ब्राम्हणांनाच होता. म्हणून राजे-सामन्त ब्राह्मणांच्या आहारीं गेले. तथागत-श्रावकांनीं 'बहुजनहिताय' हा बोधिसत्वाचा मार्ग जर पतकरला नाहीं तर तथागतांचं शासन (धर्म) या भूमीवरून नामशेष होऊन जाईल. "

बाबांच्या बरोबर मी नियमानं आर्य असंगांच्या बैठकीला जात असे आणि त्यांचीं भाषणं ऐकत असे. परंतु मीं जें वर लिहिलं आहे त्यांतला कितीसा भाग

लहानपणींच्या आठवणींतला आहे आणि कितीसा मागाहून अभ्यासलेल्या आर्य असंगांच्या ग्रंथांतला आहे हें मला नाहीं सांगतां येणार. या यात्रेचा एक परिणाम मात्र अवश्य झाला. तो हा कीं माझ्या मनांत आर्य असंगांचे विचार व तथागतांचे उपदेश विस्तारानें समजून घेण्याची जिज्ञासा उत्पन्न झाली. बाबाहि मला प्रोत्साहन देत राहिले. आर्य असंगांनीं त्यांना सांगितलें— " वसुबन्धु पूर्वदेशांत आहेत. त्यांच्याचकडे मुलाला धाडा." हो. आणखी एक गोष्ट त्यांनीं सांगितली. ती दगडावर कोरलेल्या आकृतीप्रमाणें माझ्या मनावर कायमची ठसून राहिली–– " कोणतीहि गोष्ट तुमच्या अनुभवाच्या व बुद्धीच्या कसोटीला उतरून खरी ठरत नाहीं तोंपर्यंत ती कुणीहि सांगितलेली असली तरी खरी मानूं नका. " हें वाक्य कालमानानुसार पुसट होत जाण्याऐवजीं माझ्या मनश्चक्षूंसमोर अधिकाधिक स्पष्ट होत राहिलें.

त्या वेळीं द्राक्षांचा हंगाम होता. सोनेरी लांब लांब घोंस दिसावयाला जितके सुंदर तितकेच खावयाला गोड होते. मी एकदोनदां पाटलिपुत्रांत उंची गांधारी द्राक्षें खाल्लीं होतीं. परंतु द्राक्षालतांच्या छायेंत उभें राहून घोंसांतलीं द्राक्षें तोड तोडून तोंडांत घालण्यांत जी गोडी येई ती सहा महिन्यांच्या शिळ्या अर्धवट सुकलेल्या द्राक्षांना कशी असणार ? लाल लाल उदुम्बर ( अंजीर ) आणि इतरहि कित्येक फळें मी गंधारदेशांत खाल्लीं. त्यांचीं झाडें मला इथेंच प्रथम पाहावयास मिळालीं. यौधेय भूमीपेक्षां गांधार भूमि मला जास्त आवडली असें कांहीं मला म्हणतां येणार नाहीं. परंतु तिथलीं फळें, तिथलें पाणी, फारच गोड असल्याचें नक्कीच आढळून आलें. पुरुषपुरला जाऊन मला कांहीं नव्या गोष्टी कळून आल्या, माझी दृष्टि आणखी विशाल झाली. तिथल्या रस्त्यांतून हिंडणाऱ्या नाना देशींच्या नर-नारी, त्यांचे रंगी बेरंगी पोशाक, भिन्न भिन्न मुखमुद्रा इत्यादि गोष्टी मी अगदीं लक्षपूर्वक पाहत असे. एक दिवस मी आरक्त नारिंगवर्णी चेहऱ्याच्या कांहीं नर-नारी पाहिल्या. नुसता रंगाचाच फरक असता तर माझें लक्ष तिकडे आकर्षित झालें नसतें. परंतु स्त्रियांच्या प्रमाणें पुरुषांच्याहि चेहऱ्यांवर दाढी–मिशा नाहींत हेंहि मला दिसून आलें. डोळे म्हणाल तर जशी कांहीं एकेक बारीक पांढरी-काळी रेघच; आणि गालांची हाडें बरींच वर आलेलीं. त्यांचे कपडे केवळ चामड्याचे होते. या चामड्यांचे केंस आंतल्या अंगाला होते. मात्र डोक्यावरल्या टोपीचे केंस तेवढे बाहेरच्या अंगाला दिसत होते. हे लोक हूण असून साठ योजनें अंतरावरून व्यापारासाठी आले आहेत असें मला मागाहून कळलें. पुरुषपुरांत पारसीक खूप होते. देवपुत्र शाही त्या सुमारास पारसीक शाहंशहाच्या दरबारास गेले असल्यामुळें त्यांची आम्हांला भेट होऊं शकली नाहीं.

पुरुषपुराहून आम्ही मग तक्षशिलेला परत आलों. मग कितीतरी दिवसांची यात्रा केल्यानंतर आमचा सार्थ अग्रोदकाला पोंचला.

## ( ४ )

# शिक्षण

पावसाळा सुरू होण्याच्या अगोदर मी पाटलिपुत्राला पोंचता झालों होतों. अज्जुकानें गन्धार-यात्रेविषयीं खूप माहिती विचारून घेतली. या यात्रेचा कार्यक्रम आपल्याला कळला नाहीं म्हणून तिला फार वाईट वाटलें. नाही तर धर्मराजिका व पात्रधातूच्या पूजेसाठीं ती उपायन पाठविणार होती. बाबांनीं तक्षशिलेंत दीपदाना-प्रीत्यर्थ नंदादीप चालू केला असून त्याच्या पुण्यांत भागीदार म्हणून अज्जुकाचें व माझें नांव दगडावर कोरवून घेतलें आहे हें मी तिला सांगितलें. आचार्य वसुबंधु पावसाळ्याच्या मुक्कामासाठीं अशोकारामांतच आले आहेत हें कळल्यावर मला खूपच आनंद झाला. आर्य असंगांच्या बरोबर बाबांचें जें बोलणें झालें तें मी अज्जुकाला सांगितलें आणि मला आचार्य वसुबन्धूंच्या हाताखालीं शिकावयास ठेवण्यासाठीं तिच्या जवळ खूप आग्रह धरला. अज्जुकानें कांहीं वेळां आचार्य वसुबन्धूंचें दर्शन घेतलेलें होतें, त्यांचा उपदेशहि ऐकलेला होता. तिच्या मनांत आचार्यांच्या विद्वत्तेविषयीं व प्रेमळ वर्तनाविषयीं खूपच आदर निर्माण झाला होता. परमभट्टारकांजवळ तिनें जेव्हां आचार्यांची प्रशंसा केली तेव्हां त्यांनीं चेष्टेखोरपणानें सांगितलें--'' तूं तर वसुबन्धूंची शिष्या झालेलीच आहेस; आतां काय सारं घरदार त्यांच्या शिष्यगणांत सामील करणार ? '' परंतु परमभट्टारक देखील मनोमन आचार्यांचेच भक्त होते. हरिषेणानें त्यांना महाकवि म्हटलें होतें आणि इतर आस्थान-पंडितांपैकीं कुणी त्यांना महान् तार्किक म्हणत होते, तर कुणी त्यांना सर्व-शास्त्र-निष्णात म्हणत होते. परमभट्टारक स्वतःच त्यांना भेटावयास गेले व त्यांना पाटलिपुत्रांत राहण्याचा त्यांनीं खूपच आग्रह केला.

माझ्या शिक्षणाच्या प्रश्नाचें उत्तर अज्जुकानें एका दिवसांत नाहीं दिलें. ती विचार करीत राहिली. ''बाबांचा हा एकुलता एक मुलगा, आणि माझा एकुलता एक धाकटा भाऊ. हा आचार्यांच्या संगतींत राहून भिक्षु तर नाहीं ना होऊन जाणार ? '' परंतु आचार्यांच्या तोडीचा गुरु मिळणार नाहीं हेंहि ती जाणून होती. दुसऱ्या दिवशीं

अज्जुका मला बरोबर घेऊन न्याहारी करीत होती. त्याचवेळीं माझ्या मनाला खूपच चिन्ता लागून राहिली. मी विचार करीत होतों : " अज्जुका माझं मागणं धुडकावून तर नाहीं ना लावणार ? " या भीतीनेंच मी तिला कांहीं एक विचारलें नाहीं. तीच आपण होऊन म्हणाली--

" बाळ जय ! तुला आचार्यांच्या हाताखालीं विद्या शिकायची इच्छा आहे ना ? "

मी माझा गाल अज्जुकाच्या खांद्यावर टेंकून जरा उतावळेपणानेंच म्हणालों--
"अज्जुका ग ! तूं आज्ञा दिली आहेस ? मी जरूर शिकेन. बाबांनींहि मला सांगितलं आहे. "

" होय बाळ ! मी विचार करून राहिल्यें. विद्याभ्यासासाठीं असा गुरु मिळायचा नाहीं. तुझा हा नटखट भायर ( भाऊ ) देव देखील तुझ्या जोडीला अभ्यासाला राहिला तर बरं होईल असं मला वाटतं. मी आचार्यांना भेटून त्यांना विनंति करीन. ते माझी विनंति मान्य करतील अशी मला उमेद वाटते. "

त्याच दिवशीं अज्जुका आचार्यांकडे गेली. आचार्य एका जागीं बांधून राहण्यास तयार नव्हते तरी देखील त्यांनीं तिचें म्हणणें मान्य केलें. अज्जुकानेंहि सांगितलें : " भन्ते ! आपल्याला मी एका जागीं बांधून ठेवूं इच्छित नाहीं. आपण मर्जीला येईल त्याप्रमाणें इथं अशोकारामांत अगर साकेताच्या कालकारामांत अथवा वैशाली, राजगृह किंवा इतर कोणत्याहि विहारांत राहावं. माझा धाकटा भाऊ जय यौधेय आणि मुलगा चंद्रगुप्त हे आपल्या सहवासांत राहतील. आपल्या संगतींत राहून हे दोघे बुद्धशासनाला थोडीफार मदत करणारे निघण्याचा संभव आहे."

आषाढी पौर्णिमा आली. वर्षोपनायिकेला महादान दिल्याबरोबर पावसाला आरंभ झाला. आम्ही दोघेहि त्याच दिवसापासून आचार्यांजवळ शिकण्यासाठीं जाऊं लागलों. दहा वर्षे वयाच्या मुलानें जेवढें शिक्षण घ्यावयाला पाहिजे त्याहून थोडें अधिकच आम्ही आधीच शिकून तयार होतों. आमचा अभ्यास अर्थातच विशेषतः मागधी ( प्राकृत ) गद्यपद्य, गणित आणि सुलेख याच विषयांचा झालेला होता. संस्कृतचें ज्ञान आम्हांला फारच कमी होतें. थोडें बहुत बोलणें चालणें जमत असलें तरी पुस्तकांचें वाचन जड जाई. आचार्यांनी आम्हांला आमचा झालेला अभ्यास विचारून घेतला. किती तरी वेळपर्यंत त्यांनीं आमच्या आवडी निवडी माहित करून घेण्याचा प्रयत्न केला.

मोठ्या आकर्षक रीतीनें आमच्या शिक्षणाला सुरवात झाली. आचार्यांनीं आमच्यासाठीं "सप्तकुमारिकावदान" इत्यादि कितीतरी कथा लिहिल्या. आम्हांला त्या कथा वाचतांना परिश्रम बिलकुल वाटत नसत. ताज्या शाईनें लिहिलेल्या नव्या तालपत्रांच्या

पोथींतूनच आम्ही या कथा वाचीत असूं, तरीसुद्धां आम्ही कितीतरी दिवस असेंच समजत होतों कीं या कथा कसल्या तरी जुन्या पोथींतल्या असाव्यात. कित्येक कथांमध्यें अधूनमधून सुंदर गद्य व गोड कविता असत. आचार्यांच्या या नव्या कृती आहेत आणि त्या केवळ आमच्याचसाठीं लिहिलेल्या आहेत हें आम्हांला मागाहून कळलें. अज्जुका तर नवीं अवदानें ( कथा ) वाचण्यासाठीं आमच्यापेक्षां देखील अधिक उत्सुक होऊन राही. कारण या केवळ कथाच नव्हत्या; फारच सुंदर उपदेश होते हे आणि यांचें भाषालालित्यहि उत्कृष्ट होतें अज्जुकानें लेखकांचीं सेना कामाला लावून हीं अवदानें लिहवून घेतली आणि पाटलिपुत्रांतल्या व बाहेरगांवच्या अनेक सामंत-नारींकडे, तसेंच अग्रश्रेष्ठि, सार्थवाह व कुलिक इत्यादिकांच्या बायकांकडे पाठवून दिलीं. या अवदानांसाठीं त्यांच्याकडून वारंवार महादेवीकडे मागण्या येत असत. आमच्या शिक्षणाच्या पहिल्या दोनतीन वर्षांच्या अवधींतच आचार्य वसुबंधूंचा महिमा अंतःपुराच्या अगदीं आंतल्या गाभ्यापर्यंत पोंचला होता. आचार्यांची ख्याती होती तर्ककर्कश पांडित्याबद्दल. त्यांच्या लेखणींतून अशा सरस व सरळ कृती देखील निर्माण होऊं शकतात हें कुणाला खरेंच वाटत नव्हतें.

भाषा सोपी असल्यामुळें आतां मला संस्कृत सहज समजत होतें. आणि आचार्य मधून मधून व्याकरणाचे नियम अशा रीतीनें दाखवून देत असत कीं त्यांच्यांत अवघडपणा राहातच नसे. मी कधीं कधीं संस्कृत व मागधी शब्दांची तुलना करीत असें आणि दोहोंच्या उच्चारांतील फरक स्वतःच लक्षांत घेण्याच्या खटपटींत असें. आचार्यांच्या हें लक्षांत आलें. त्यांनीं एक दिवस ताडपत्रावर लिहिलेल्या कांहीं गोष्टी माझ्या हातीं देऊन सांगितलें–" घे, ह्या वाच. ही ६०० वर्षांपूर्वींची मागधी आहे." पहिल्या प्रथम मी जरा बाचकलों––" ही कसली मागधी ? " परंतु कांहीं गोष्टी वाचल्यावर मला ती भाषा समजूं लागली. आचार्यांना कुठें ना कुठें थोडी मदत द्यावीच लागली. मी कितीतरी दिवस विचार करीत होतों; मग एक दिवस आचार्यांसमोर म्हणालो––

" भन्ते ! ही भाषा आमच्या मागधीलाहि जवळची आहे अन् संस्कृतलाहि जवळची आहे असं मला दिसतंय. "

आचार्य स्मित करीत म्हणाले, " बरोबर बोललास बरसा ! ही दोहींच्या मधली भाषा आहे."

" भदन्त ! लोक नव्या नव्या भाषा कां तयार करतात ? संस्कृत तर होतीच, आमची भाषाहि आहेच, मग ही तिसरी भाषा तयार करण्याची आवश्यकता काय ?"

" कुणी माणूस बसल्या बसल्या नवी भाषा तयार करतो असं तूं समजतोस होय ? कुणी एक अगर दहा लोक मिळून नवी भाषा नाहीं तयार करीत. भाषा

पिढ्यानुपिढ्या तयार होत असते. तूं जर शंभर वर्षांपूर्वीच्या तुझ्या योधेय आजीशीं बोलला असतास तर तिची भाषा आणि तुझी आई बोलते ती भाषा या एक नव्हेत असं तुला दिसून आलं असतं. ”

“ तर मग काय, भन्ते ! भाषा बदलत असतात ? ”

“ वत्स ! दुनियेंत जी बदलत नाहीं अशी एकहि वस्तु नाहीं. मी एका काळीं छोटंसं मूल होतों, मग तुझ्यासारखा किशोर झालों, मग ओठांवर भुऱ्याभुऱ्या लवेची रेषा उमटली, शरीर पूर्वीपेक्षां मोठं व अधिक बलिष्ठ झालं. मग, कसं कुणाला ठाऊक, पण अंधारांत दबा धरून बसलेल्या म्हातारपणानं धीरेधीरे चाल करून येऊन मला दडपून टाकलं. आज पहा बरं, माझ्या तोंडांत दोनचारच दांत राहिले आहेत. टाळूवरचे केस नाहींसे झाले. डोळ्यातलं तेज पहिल्यासारखं राहिलं नाहीं. जास्त वेळपर्यंत कांहीं वाचणं होत नाहीं; आतां केवर लटकां पडणंच बाकी राहि-लंय. बाळपणापासून म्हातारपणापर्यंत केवढं हें परिवर्तन ! ”

“ भन्ते ! म्हातारपण नसतं तर किती छान झालं असतं, नव्हे ? ”

“ काय फायदा ? तर काय तुला सदा किशोर, तरुण अगर शिशूच राहणं आवडेल म्हणतोस ? ”

“ शिशु तर फारच परतंत्र असतो. सदा किशोर राहणंहि मला नाहीं पसंत; कारण त्या अवस्थेंत शरीर निर्बल असतं. ”

“ म्हणजे तुला सदा तरुण राहणं आवडतं ? ”

“ होय ! ”

“ अन् तरुणावस्थेंतच जन्मावंसं वाटतं ? ”

मी जरा विचारांत पडलों. आचार्य म्हणाले- “ तरुणावस्थेंतच जन्म झाला तर आईची जरूर राहात नाहीं. तरुणाचं शरीर जननीच्या गर्भात राहायचं कसं ? ”

“ म्हणजे याचा अर्थ असा झाला की मग कुणाची आईहि राहणार नाही. ”

“ हो. ना कुणाला आईचं प्रेम मिळायचं, ना बापाचं वात्सल्य, ना भाऊबहिणींचा अकृत्रिम जिव्हाळा, ना बाळपणींचे खेळ व खेळणीं, ना रक्ताच्या नात्यांतील बांधवांचा गोड स्नेह. ”

“ तर मग दुनिया अगदीच नीरस झाली असती, भन्ते ? ”

“ होय तर. इतकी नीरस कीं तीत प्रेमाला अगदींच गौण स्थान राहणार आणि मग आईबापांना पुत्र पैदा करण्याची लालसा राहणार नाही. नव्या पिढ्या येण्याची मग काय जरूर ? जीं नरनारी अनंत काळापूर्वी भूतलावर आलीं, तींच अनंत काळ-पर्यंत जिवंत राहणार. मग या जगांत मीहि आलों नसतों, ना तूंहि. अन् तें चिर-

तारुण्य एकट्या मानवापुरतंच राहिलं नसतं. जगांतल्या हरएक वस्तूला चिरंतर, अचल राहावं लागलं असतं. ''

" अचल ! "

" हो. अचल राहण्याचा नियम एकट्या तरुणपणालाच तेवढा थोडाच लागणार आहे ! आज परिवर्तन हा विश्वाचा नियम आहे, तसा मग अपरिवर्तन हाच विश्वाचा नियम झाला असता. मग ग्रीष्मऋतु हाच कायम राहिला असता, अगर वसंत किंवा पावसाळाहि कायम राहिला असता. "

" तर मग भन्ते ! नवेपणा कुठंच दिसला नसता ? "

" अन् सौन्दर्यहि नसतं दिसलं. नवेपणालाच सौंदर्य म्हणतात. नवेपणाच मनाला मोहित करतो. हेमन्तामागून वसंत येतो, नवी फुलं, नवी पालवी दिसूं लागते. कुंजांत पक्षिगण किलबिल करतो. या साऱ्या चिजांना पारखं व्हावं लागलं असतं. "

" पण परिवर्तन झालं नसतं तर आपण मेलोंहि नसतों. "

" मृत्यूला भितोस ? "

" स्वतःसाठीं नाहीं भीत; परंतु आपल्या प्रिय बांधवांचा वियोग किती असह्य असतो बरं ! "

" मृत्यूचं हें अप्रिय रूप आहे खरं; परंतु मृत्यू जर नसता तर नवं जीवनहि नसतं. तूं मरून गेलेल्यांची पर्वा करतोस ? हे जे नवे बांधव जन्माला येत आहेत, जे नवे चेहरे, नवे हातपाय, अन् त्यांच्या नव्या कृति आपल्या समोर येतात, हा काय आपल्याला कमी लाभ झाला म्हणायचा ? "

" तरीहि भन्ते ! मृत्यु ही कांहीं आवडण्याजोगी चीज नव्हे. "

" मीहि तेंच सांगतोय--मृत्यु ही मृत्यूच्या स्वरूपांत आवडण्याजोगी चीज नसली तरी ती नवजीवन देण्याचं काम करीत असते. नदीचा आरंभींचा प्रवाह फारच लहान, एखाद्या अगदीं अरुंद रेघेसारखा असतो. ती जसजशी पुढं जाते तसतशी तिची धार अधिक विस्तृत, अधिक गंभीर होत जाते. नदी जर आपल्या मूळ प्रवाहाच्या स्वरूपांतच राहिली असती तर तिची बारीक अरुंद धार तशीच राहिली असती, आणि प्रवाह जोरदार नसल्यामुळं तिचं पाणी कदाचित् गढूळहि राहिलं असतं. "

" प्रवाहामुळंच नदीचं पाणी शुद्ध राहतं हें तर मी पाहतोंच. "

" संसार ( जग ) आपल्या संसरणामुळं ( गतीमुळं ), प्रवाहामुळं, परिवर्तना-मुळंच अधिक वैचित्र्यपूर्ण, अधिक आकर्षक होत असतो. भूक लागली नसती तर माणसाला सगळीं पक्वान्नं अप्रिय झालीं असतीं. परिवर्तन हें विश्वाच्या कणाकणांत

आहे, माझ्यांत आहे तुझ्यांत आहे. आपलं मन, आपला अन्तस्तल क्षणोंक्षणीं बदलत असतो. हाच विश्वाचा नियम आहे, अन् हा कांहीं वाईट नाहीं. मागधी भाषा काय संस्कृतपेक्षां कमी मधुर आहे ? ''

'' नाहीं भन्ते ! मला तर ती संस्कृतपेक्षां अधिक सरस आहे असं वाटतं. विशेषतः भास, सौमिल्ल, इत्यादि कवींच्या सुन्दर मागधी कविता फारच मोहक आहेत. ''

'' म्हणून म्हणतों कीं परिवर्तन ही कांहीं वाईट गोष्ट नव्हे. परिवर्तनाचा नियम आपल्याला बंद पाडतां येत नाहीं. वसंत, आंब्याचा नवा मोहोर अन् भ्रमरांचं गुंजन यांचं जसं आपण स्वागत करतों तसं या परिवर्तनाचं जर आपण स्वागत करूं, तर आपल्याला दुःखी व निराश होण्याची आवश्यकताच राहिली नसती. परिवर्तनाच्या या नियमामुळेंच सर्वांचे हात मोकळे झालेले आहेत. साऱ्यांना काहीं ना कांहीं निर्माण करतां येतंय. परंतु अपरिवर्तनशील जगांत कुणाला काहीं करायची गरजच राहात नाहीं. मग मानवाच्या हातांपायांचा व बुद्धीचा उपयोग काय ? ''

भाषांच्या परिवर्तनाचं उदाहरण घेऊन या साऱ्या गोष्टी आचार्य मला दाखवून देत होते त्या वेळी हें कांहीतरी मूलभूत तत्त्वज्ञान आहे, भगवान बुद्धानं याच्या योगानं जगाचा उलगडा करून दाखविण्याची उमेद धरली, हें मात्र मला समजत नव्हतें. दुनियेतल्या सगळ्या गोष्टी बदलत राहतात या गोष्टीची सत्यता आतां मला पावलोंपावलीं दिसूं लागली. मी अशोकाचा आस्थान-मंडप पाहिला; त्याची बांधणी आजकालच्या आस्थानमंडपांहून भिन्न आहे. मी महाबोधि-वज्रासनाची ( बुद्धगया ) पाषाण-वेष्टनी पाहिली आणि तिच्यावर कोरलेल्या नरनारींच्या मूर्तीहि पाहिल्या. आजच्या स्त्रिया ज्या तऱ्हेनें कुंडलें परिधान करतात, त्या तऱ्हेनें त्या काळच्या स्त्रिया कुंडलें परिधान करीत नव्हत्या. त्या वेळचे गळ्यांतले जिन्नस निराळ्याच प्रकारचे होते. कंकण व नूपुरांऐवजीं सारा हात व पाय चुड्यांनीं झांकून टाकलेला असे. कपडेहि निराळ्या प्रकारचे होते. उष्णीष ( पगडी ) हि निराळ्या प्रकारची. आणि स्त्रिया देखील डोक्याला उष्णीष बांधत असत.

आचार्य आम्हांला अश्वघोषाचीं महाकाव्यें मोठ्या उत्साहानें शिकवीत असत. ' बुद्धचरित ' व ' सौन्दरानन्द ' वाचण्याची आम्हांला फार गोडी वाटे. माझा गळा खूपच गोड होता. परमभट्टारक स्वतः चतुर वीणावादक व संगीताचे मोठे भोक्ते होते; म्हणून राजप्रासादांत संगीताच्या मैफली रोजच भरत असत. मलाहि संगीताची आवड होती आणि वीणावादनांत प्रावीण्य मिळविण्यासाठीं मी खूप झटत असे. मी तेरा वर्षांचा असतांनाची गोष्ट. एके दिवशीं मी वीणा वाजवून तिच्यावर एक फारच सुंदर गाणें

म्हटलें होतें. बाघितलें तर जिकडे तिकडे माझ्याच गाण्याची चर्चा चालू ! मग मला अशी धास्ती वाटूं लागली कीं ही गोष्ट जर परमभट्टारकांच्या कानावर गेली तर मग सारा वेळ त्यांना गाणीं म्हणून दाखविण्यांतच कदाचित खर्च होणार आणि आचार्य वसुबन्धूंच्या अपार ज्ञानराशीचा जो फायदा मी घेत होतो त्याला मला पारखा व्हावें लागणार. तेव्हांपासून चन्द्र व कांहीं थोडे समवयस्क मुलगे-मुली यांच्या शिवाय इतर कुणाच्याहि देखत मी गाणें बजावणें करीनासा झालों. मात्र मी पाटलिपुत्रांतील एका गुणी संगीताचार्याकडे जाऊन माझा संगीताचा अभ्यास नीट चालूच ठेवला.

प्राचीन व नव्या सुन्दर मूर्ति व त्यांच्या प्रतिकृति पाहिल्या कीं त्यांच्याकडे आकर्षित होणें हा माझा एक उपजत गुणच होता. चित्रांचे मोहक रंगहि माझें चित्त वेधून घेत असत. अज्जुकाची परिचारिका चतुरिका फारच सुंदर चित्रें काढी. मी तिच्याजवळ बसून पाहत असें. ती कापड ताणून बसवी, त्याच्यावर लेप लावी, तो सावलींत सुकवी, मग पातळ रंगाच्या बारीक रेषांनीं शरीराचे भिन्न भिन्न अवयव या पटावर अंकित करी. मग दिवसच्या दिवस बसल्या-बसल्या त्यांत तऱ्हेतऱ्हेचे रंग भरी. मी भट्टिनीचा भाऊ होतों म्हणूनच केवळ नव्हे तर माझी सहानुभूति व सरळ स्वभाव पाहून चतुरिका मला फार मान देत असे. शुभ्र पटावर सुंदर डोळे कसे उमटूं लागतात ! -- प्रथम बारीकशी लाल रेघ, मग खालचा-वरचा भाग असा वटारलेला अगर अर्धवट मिटलेला डोळा, त्याच्या पापण्या, बाहुल्यांसकट बुबुळ, आणि सूक्ष्म लाललाल तंतूंनीं सजविलेल्या डोळ्याचा मोहक श्वेतिमा. कोऱ्या पटावर ती सौन्दर्याची निर्मिति कशी करीत असे हें मी पहात राही. चित्र काढण्याच्या वेळीं ती तन्मय होऊन जाई. तिला सगळ्या गोष्टींचा विसर पडे. चित्रें काढण्यासाठीं प्रमदवन, क्रीडापर्वत, धारागृह यांपैकी कोठेंहि माझ्या निवासा इतकी निवान्त जागा तिला मिळूं शकत नव्हती. माझ्या निवासांत तिला त्रास द्यावयाला तिची कुणी मैत्रीणहि येत नव्हती. मी कधीं कधीं संधि मिळाल्यास प्रशंसेचे चार दोन उद्गार काढीत असें. तिचीं चित्रें पाहून मलाहि चित्रें काढण्याची लालसा होऊं लागली, परंतु माझ्या कलमांत चतुरिके इतकें सामर्थ्य कदाचित असणार नाहीं असें मला वाटे. तरी देखील चतुरिकेला दाखविण्यालायक कांहींना कांहीं कलानिर्मिति आपण करावी अशी मला फार इच्छा होई. या विचारांत गर्क होऊनच मी कांहीं शिल्पकारांचीं कामें पहावयास गेलों. कुशल तक्षक चन्दनावर व लाकडावर सुन्दर वेली-फुलें व मूर्ति कोरून काढीत होते तें मी पाहिलें. दन्तकार हस्तीदंतावर सुन्दर-सुन्दर आकृति काढीत होते त्या पाहिल्या. त्या काळीं कित्येक माथुर मूर्तिकार दगडांवर कोरीवकाम करून आपलें कौशल्य दाखवीत होते. मी विचार केला, या तीन शिल्पांपैकीं कोणतें तरी एक हस्तगत करून आपल्याला चतुरिकेला चकित करतां येईल. मी चोरून मारून शिल्पाचार्याकडे जाऊं लागलों. आचार्य वसुबन्धूंच्या

हाताखालीं जें शिक्षण मी घेत होतों तो माझा मुख्य विषय होता. परंतु बाकीचा वेळ मी चन्द्राप्रमाणें खेळण्या-बागडण्यांत घालवीत नव्हतों. मला आपल्याबरोबर खेळांत गुंतविण्यासाठीं चन्द्रानें कित्येक महिनेपर्यंत खटपट करून पाहिली. परंतु आतां मी खास खास प्रसंगींच तेवढा त्याचा अभिन्न सहचर राहूं शकेन हें त्याला दिसून आलें. म्हणून आतां वीरसेनाची व त्याची जोडी जमली होती. लाकडाच्या कोरीव कामावर थोडासा हात बसल्यानंतर मी हस्तीदन्तावर कोरीव काम सुरू केलें; आणि शेवटीं मला सर्वांत जास्त आवडली दगडाच्या मूर्ति बनविण्याची शिल्पकला. आपल्या हातांत घेतलेल्या दगडाला तासून तासून त्यांतून एक तऱ्हेचें सौन्दर्य बाहेर काढावयाची ही कला पाहून नुसता आनन्दच नव्हे तर मोठा अभिमान वाटतो. मी चार पांच वर्षेपर्यंत संध्याकाळच्या वेळीं कांहीं घटका बेपत्ता होत असे, परंतु या गोष्टीचा कुणालाहि थांग पत्ता लागलेला नव्हता. मी मूर्तिकलेंत पुष्कळसा निष्णात झाल्यानंतर मग असें कळलें कीं कुणी यवन ( ग्रीक ) मूर्तिकार शहरांत आहे आणि तो माणसाचें हुबेहूब रूप दगडांतून निर्माण करतो. माथुर मूर्तिकार सुन्दर मूर्तीची घडण करीत असत, कपड्यांचा साजशृंगार व बारकावा दाखविण्यांत तर त्यांचें कमालीचें कौशल्य दिसे, परंतु त्यांच्या या सगळ्या मूर्ती केवळ काल्पनिक असत. त्यांत कुणाचा प्रत्यक्ष चेहरा जसाचा तसा दगडावर अंकित झालेला नसे. मी एके दिवशीं यवन मूर्तिकाराकडे गेलों, माथुर शिल्पाचार्यहि माझ्याबरोबर होते. मी तिथें परमभट्टारकांचा एक अपूर्ण पुतळा पाहिला. आतांपर्यंत नुसता चेहराच पूर्ण झालेला होता. परंतु संगमरवरी पाषाणाच्या त्या मूर्तीमध्यें नाकाचें वळण, उठाव, हनुवटी व गालांचा चढउतार, तसेंच डोळ्यांचें सौंदर्य हें सगळें कोरीव कामांत प्रगट झालेलें पाहून मला आश्चर्य वाटलें. ही कला जर पुढेंमागें मला हस्तगत झाली तर चतुरिकेला मी खात्रीनें चकित करूं शकेन. आणि या कामांत विशेष अडचणहि आली नाहीं. मी यवन आचार्याला माझी खरी ओळख सांगितलीच नाहीं. मी तयार केलेली एकाद-दुसरी मूर्ति, माझें लहान वय व उत्साह पाहून त्यानें मला आपला शिष्य करून घेण्याचें कबूल केलें. या व्यवसायामुळें कांहीं महिनेपर्यंत माझ्या इतर कामांत थोडाफार व्यत्यय नक्कीच आला. मी आचार्य वसुबन्धूंचा पाठ ऐकण्यासाठीं सतत हजर रहात असे. परंतु बाकीच्या वेळांत अभ्यासाकडे तितकेंसें लक्ष मला देतां आलें नाहीं. यवन आचार्यानें समोर सजीव मूर्ति ठेवून ओल्या मातीचा नमुना तयार करण्याची कला मला शिकविली. या बाबतींत मला सर्वांत जास्त मेहनत करावी लागली. चेहऱ्याचे अगदीं बारीकसारीक चढ-उतार अत्यंत काळजीपूर्वक मातीच्या नमुन्यांत आणावे लागत होते--इकडून थोडीशी माती काढावयाची, आणि तिकडे थोडीशी माती लावावयाची, असें फार वेळां करावें लागे. छिन्नी घेऊन हा नमुना दगडावर उतरणें मला

तितकेसें जड नाहीं गेलें. पहिला पुतळा मी एका भिकाऱ्याचा बनविला. आचार्यांकडून त्याबद्दल मला शाबासकी मिळाली. मला फार आनंद झाला. चतुरिका एका मोठ्या पटावर विरहिणी व वसंत यांचें चित्र तयार करीत होती. ती तासचे तास माझ्या खोलींत तन्मयतेनें आपल्या कामांत मग्न होऊन राहत असे. या वेळीं मी खिडकीच्या आड बसून तिच्या मूर्तीचा मातीचा नमुना तयार करण्याचें काम सुरू केलें. एके दिवशीं माझ्या दिवाणखान्यांत एक संगमरवरी पुतळा येऊन पोंचला. माझा बेत तिला एकदम चकित करण्याचा होता. म्हणून हा पुतळा कांहीं दिवस तसाच कपड्यांत गुंडाळलेला पडून राहिला. त्याचें उद्घाटन करण्यासाठीं काय युक्ति करावी याचा मी विचार करीत होतों. शेवटीं मला कुबड्या कुरभकाची आठवण झाली, कुरभक त्या वेळीं चांदण्या रात्रीं क्रीडापर्वताकडे एकाग्र नजरेनें बघत उभा होता. मी म्हणालों–"काय रे, अजूनहि अप्सरा नाहीं आली ? "

कुरभक माझ्यावर तितकासा चिडत नसे. कारण मी त्याच्याबद्दल इतरांपेक्षां जास्त सहानुभूति दर्शवीत असें. एक उसासा टाकून तो गप्प राहिला. मी ह्मणालों– "कुरभक! आपणां दोघांचं नशीब सारखंच आहे. तूं जिच्यावर प्रेम केलंस ती आकाशांत विलीन होऊन गेली अन् मी जिच्यावर प्रेम केलं ती निर्जीव शिळा झाली. "

कुरभकाला माझ्याजवळ आणखी चौकशा कराव्याशा वाटल्या. मी त्याला माझ्या खोलींत आणलें. समोरच्या पुतळ्याकडे बोट दाखवून मी म्हणालों– "हीहि एक अप्सरा आहे. एका काळीं ही माझ्यावर प्रेम करीत होती. परंतु आज या शिळेंत कसचं राहिलंय प्रेम ? "

" तर मग भर्तृदारक ! माझ्या प्रमाणंच तुह्मांलाहि आतां झोंप नसेल येत. "

" झोंप कसची येते बाबा कुरभका ! बस्स. एकच आशा आतां शिल्लक राहिली आहे व तिच्यावरच मी जिवंत राहिलों आहे––कुणी सुन्दरी जर आपल्या तूलिकेनं या शिळेला स्पर्श करील तर ही पुन्हां सजीव होईल. बस्स. हें जर नाहीं साधलं तर तुला सांवली क्रीडापर्वताची अन् मला सांवली या शिळेची." हें सांगतां सांगतां माझा कंठ दाटून आला. कुरभकानें माझें खूप सांत्वन केलें आणि विचारलें– " भट्टारिकेच्या परिजनांपैकीं कुणी तूलिकाधारिणी आहे का ? "

" पण सगळ्या तूलिकाधारिणींना ही शिला दाखवून मला थट्टेचा विषय नाहीं व्हायचं. "

" भर्तृदारक ! मला आपल्या दुःखाची जाणीव आहे. कारण मलाहि याचा अनुभव आहे."

" भद्र ! हें बघ, ही गोष्ट कुणाला सांगूं नकोस, अन् मी इथं नसेन अशा वेळीं सर्वांत जास्त तरुण व सुंदर तूलिकाधारिणीला इथं घेऊन ये अन् तिच्याकडून या शिलेला स्पर्श करीव. तुझे हे उपकार मी जन्मोजन्मीं नाहीं विसरणार. "

दुसरे दिवशीं मी माझ्या बैठकीच्या खोलींत गेलों तेव्हां मला असें दृश्य दिसलें: चतुरिका पुतळयाकडे मोठ्या कौतुकानें पाहत राहिली आहे आणि कुरभक तिच्या हातीं तूलिका देऊन तिच्याकडून पुतळयाला स्पर्श करविण्यासाठीं जीव टाकतो आहे. मला पाहिल्यावर तो म्हणाला– " भर्तृदारक ! तुम्हीच सांगा हिला. ही स्पर्श करीत नाहीं म्हणत्ये. "

मी त्याला कांहींतरी सांगून वाटेला लावलें. चतुरिका आपण होऊन कांहीं विचारते कीं काय हें पाहण्यासाठीं मी जरा वेळ तसाच गप्प राहिलों. पण ती कांहीं विचारणार नाहीं हें मी जाणून होतों. म्हणून मीच अगोदर सांगायला सुरवात केली. " यवन चित्रकारानं ही मूर्ति सातां समुद्रांपलीकडून आणली होती. खूप खटपट केली तेव्हां मला त्यानं ही एक हजार दीनार घेऊन विकत दिली."

ही हजार दीनारांची मूर्ति आहे अशी चतुरिकेची समजूत कितीतरी दिवसपर्यंत तशीच राहिली. मग तिच्या इतर सहचरींनीं तिला ओळखलें. तेव्हां मग चतुरिकेनें मला खरी हकीकत विचारून घेतली. मी सांगितलें––"हा तुझाच प्रसाद आहे. तूंच माझ्या मनांत या कलेविषयीं आस्था निर्माण केलीस. परंतु हें रहस्य कुणाजवळ उघड करूं नकोस."

" अन् ही माझी मूर्ति कुणी तयार केली असं जर एखाद्यानं विचारलं तर उत्तर काय देऊं ? "

"असं सांग कीं ' गंगातटाकीं सायंकाळीं बसल्या बसल्या एका नव्या चित्राच्या कल्पनेंत तन्मय झाल्यें होत्यें, त्या वेळीं कुणीतरी माझी प्रतिमा घेऊन ठेवली असणार'."

"अन् यवन मूर्तिकाराला कुणी विचारलं तर ? "

"यवन चित्रकार पाटलिपुत्र सोडून केव्हांच निघून गेलाय. त्याची काळजी नको करूंस."

संगीताकडे व मूर्तिकलेकडे माझा विशेष ओढा होता. परंतु तो त्या शिकून घेण्यापुरताच. एरव्हीं सगळा वेळ आचार्य वसुबन्धूंच्या हाताखालीं शिक्षण घेण्यांतच जाई. आचार्यांनीं अज्जुकासमोर माझी प्रशंसा केली. तिला अत्यंत आनंद झाला. तिनें बाबांना पत्र पाठविलें. आणि बाबांनी आमच्या भेटीविषयीं उत्सुकता प्रदर्शित केली.

( ५ )

# राजकुल

आम्हां दोघांना आतां पंधरावें वर्ष लागलें. चंद्राचें मन साहित्यवाचनांत चांगलेंच रमत असे. परंतु इतर गोष्टी त्याला रुक्ष वाटत असत. आचार्यांनीं 'सारिपुत्रप्रकरण' आणि 'राष्ट्रपाल परिपृच्छा' हीं अश्वघोषाचीं नाटकें आम्हांला शिकविलीं. तेव्हांपासून चन्द्राच्या डोक्यांत अभिनय करण्याची लहर शिरली. अभिनयासाठीं त्यानें 'राष्ट्रपाल परिपृच्छा' या नाटकाची निवड केली. कित्येक महिने पदें तयार होत होतीं, पात्रांची निवड करण्यासाठीं वाटाघाटी चालू होत्या. मी सांगितलें–"वयस्य ! राष्ट्रपाल तूंच हो कीं."

"अन् नायिका ?"

"चतुरिका कशी काय करील काम ?"

"पण तिनं हें काम केलं तर मला वैराग्याचा अभिनय नाटसा करतां नाहीं येणार."

कितीतरी दिवस तयारींत गेल्यावर एके दिवशीं युवराज चन्द्रगुप्ताच्या प्रासादांत नाटकाचा खेळ झाला. युवराज भट्टारक रामगुप्तहि नाटकाला हजर होते. अज्जुकाला मुद्दामच कळविलें नव्हतें. कारण चन्द्रानें नाटकांत आपल्या मर्जीप्रमाणें कितीतरी फेर-फार करून तें अधिक शृंगार-प्रधान करून ठेवलें होतें. राष्ट्रपालाची भूमिका मला घ्यावी लागली. चन्द्रानें राष्ट्रपालाच्या बापाचें काम केलें. चतुरिकेला नायिकेचें व इतर कामें इतर तरुणतरुणींना देण्यांत आलीं. महाश्रेष्ठीचा मुलगा भिक्षुवेषांत कित्येक वर्षांनीं आपल्या दरवाज्याशीं आला. आई भिक्षूचा पोशाख पाहतांच संतप्त होऊन म्हणाली–"याच श्रमणांनीं माझ्या मुलाला बहकवलं. हे महा कठोर लोक आहेत." तिथें भिक्षा कसची मिळणार ! तोंडावरची प्रसन्नता ढळूं न देतां राष्ट्रपालानें पुढें जाण्याचा विचार चालविला होता. तेवढ्यांत एक दासी शिळें वरण फेंकून देण्यासाठीं बाहेर आली. राष्ट्रपालानें सांगितलें–"भगिनी ! फेंकूनच द्यायचं असलं तर या माझ्या पात्रांत घालून टाका." दासीनें तें वरण भिक्षूच्या पात्रांत घातलें. राष्ट्रपाल तिथेंच भिंतीलगत बसून परळांतून वरण खाऊं लागला. दासीला राष्ट्रपालाचा आवाज ओळखीचा वाटला. तिनें त्याच्या वडिलांना बातमी दिली. वडिलांनीं त्याला ओळखलें

व घरीं चल म्हणून सांगितलें. या सगळया गोष्टींचा अभिनय चन्द्रगुप्ताला माझ्यापेक्षां जास्त यशस्वी रीतीनें करतां आला असता असें मला वाटतें. माझें काम बिघडेल कीं काय या भीतीनें माझें काळीज धडधडत होतें. दुसरे दिवशीं राष्ट्रपालाला भोजनाचें निमंत्रण मिळतें व सोन्याच्या थाळींत त्याला पंचपक्वान्नें वाढण्यांत येतात असा शेवटचा प्रवेश आहे. त्याच्या समोर हिरे-मोतीं-सोन्याच्या राशी रचण्यांत आल्या आणि आईनें सूनबाईला सांगितलें– " अम्मा, माझा मुलगा ज्या वस्त्रआभूषणांनीं व शृंगारसाजानं मोहित होत असें तो तूं कर अन् नटूनथटून ये. " चतुरिका या नव्या पोशाखानें आणि शृंगारसाजानें आणखीच खुलून दिसत होती. तिनें लाजऱ्या नजरेनें राष्ट्रपालाजवळ जाऊन त्याला विचारलें– "आर्यपुत्र ! ज्यांच्यासाठीं तुम्ही इतकी तपस्या करतां आहांत त्या अप्सरा कशा आहेत हो ? " राष्ट्रपालानें पूर्ण वैराग्य दर्शवून सांगितलें–" भगिनि ! मी अप्सरांसाठीं तपस्या नाहीं करत. "

राष्ट्रपालाच्या भूमिकेंत मी हे शब्द उच्चारले खरे, पण त्या वेळीं माझ्या काळजाला धक्काच बसला. कारण चतुरिकेवर माझें प्रेम बसूं लागलें होतें. अर्थात हें प्रथम किशोरावस्थेंतलचें प्रेम होतें. चतुरिकेला कदाचित याचा पत्ताहि नसेल. ती राजान्तःपुरांतील परिचारिका होती. तिच्यावर भट्टारकाचा व भट्टारकाच्या बरोबरीच्या पुरुषांचा हक्क होता. नाटक कसेंबसें समाप्त झालें. माझें मन बावरलेलें असल्यामुळें माझ्या हातून कांहीं चूक तर नाहीं ना होणार, ही मला धास्ती लागलेली होती. चन्द्राला या प्रयोगाच्या यशस्वितेबद्दल तितकेसे समाधान वाटलें नाहीं. तो आपले विचार या स्वरूपांत प्रकट करूं लागला–"जय ! या कवींचं हें असंच. एकीकडे हे सौन्दर्य निर्माण करतात, तर दुसरीकडे त्या सौन्दर्याची मोडतोड करून त्याचे तुकडे तुकडे करून ठेवतात. वैराग्यच जर दाखवायचं होतं तर हें मधुर सौन्दर्य निर्माण करण्याची जरूरच काय होती ? "

" भायर चन्द्र ! माझंहि या बाबतींत तुझ्या सारखंच मत आहे. जिथं योग–वैराग्याचा प्रश्न येतो तिथं सौन्दर्य-सरसता आणूंच नये. "

" जय ! कवींची असली खटपट परस्परविरोधी आहे असं मला तरी वाटतं. त्यांचा खरा उद्देश भोगाचं व शृंगाराचं चित्रण करण्याचाच बहुधा असतो. कसली तरी गोष्ट छपविण्यासाठींच ते योग-वैराग्याची भानगड मध्यें घुसडतात. "

" किंवा भोग–शृंगाराचे प्रसंग जर ठेवले नाहींत तर कोरडं योग-वैराग्य बघायला फारच थोडे प्रेक्षक तयार होतील असंच कां म्हणूं नये ? "

चन्द्राला या नाटकांत आनंद नाहीं वाटला. ज्यांत जीवनाची मदिरा कांठोंकाठ भरलेली आहे व ज्यांतल्या नायकाची भूमिका आपण स्वतःच करीत आहोंत असलें नाटक बसविण्याचा त्यानें निश्चय केला. भासाचीं व सौमिल्लाचीं नाटकें तिथें हाताशीं

होतींच. चन्द्राला 'चारुदत्त' नाटक फार आवडलें; चारुदत्ताची भूमिका त्यानें स्वतः केली.

आमची किशोर अवस्था संपत आली होती व यौवनानें आमच्या आयुष्यांत पहिलें पाऊल टाकलें होतें. तशांत तिथें तर जिकडे पहावें तिकडे स्त्री-सौन्दर्य दृष्टीस पडत होतें. राजकुमारांना बंधन कसलेंच नसतें. त्यांना विवाह होईपर्यंत प्रणयाची वाट बघत राहण्याची आवश्यकता नसते. चन्द्रगुप्ताचा स्वतःचा स्वतंत्र महाल होता. त्यांत एकींहून एक सुंदर अशा विसाच्या वर परिचारिका होत्या. आतां तसें म्हटलें तर त्याला वसुबन्धूंच्या नीरस विद्येची काय जरूर होती ? त्याच्या भोंवतीं तरुणींचा घोळका जमलेला असे; आणि त्यांच्या तोंडून ऐकलेल्या काव्यनाटकांचा आस्वाद त्याला घेतां येत होता. त्याला आतां मदिरेचा व मदिरेक्षणांचा नाद लागलेला होता. परमभट्टारक देखील याच बाबतीत त्याचें मार्गदर्शन करीत होते. आम्हां मंडळीमध्यें या गोष्टींचा चेष्टा होत होती. चंद्रगुप्त सांगे--" म्हाताऱ्याला म्हातारपणीं काय झालंय कळत नाहीं. अन्तःपुरांत अगोदरपासूनच हजारों सुंदरींची गर्दी झालेली आहे; आणि असं असतांहि वर हा नव्यां नव्या किशोरी एकसारख्या आणतोच आहे. "

" परमभट्टारक रोकड्या धर्माचे उपासक आहेत रे- ' जोंवर जिवंत आहोंत तोंवर मौज करावी. ' "

" यांत वाईट कांहींच नाही. पुढच्या जन्मीं राजा व्हायला मिळेल का नाहीं, याचा नेम काय सांगावा ? कुणा गरीबाच्या पोटीं जन्म मिळाला, अगर दुसऱ्याच एखाद्या नीच योनींत जन्माला यावं लागलं तर मग हा आनंद कुठून मिळणार ? मी तर कौटिल्याला माझा गुरू मानतों. "

"खरंच, देवतांच्या व परलोकाच्या मागं लागणारे लोक अगदींच मूर्ख असतात."

" मलाहि तुझं हें बोलणं बरोबर वाटतं. मात्र यांत देखील इतका अतिरेक होतां कामा नये; नाहींतर जीवनाच्या आनंदालाच धोका यायचा. बाबांचं काय होतय तें बघतोसच ना तूं ? आतांशा राज-काज बघायला त्यांना फुरसतच नसते. हें नाहीं मला आवडत. भगवान कौटिल्यांनाहि हें पसंत नाहीं. "

" तर मग भायर चन्द्र ! भगवान कौटिल्यावर आजकाल तुझी फार मर्जी बसलेली दिसते म्हणायची ? "

" आमच्या सारख्यांना भगवान कौटिल्याहून जास्त चांगला मार्गदर्शक कुणी मिळायचाच नाहीं. एका चन्द्रगुप्ताचं मार्ग-प्रदर्शन त्यानं केलं होतं. "

" चन्द्रगुप्त मौर्याच्या पावलावर पाऊल टाकून हा चन्द्रगुप्तसुद्धां भगवान् कौटिल्यांनीं दाखविलेल्या मार्गानं जायला तयार आहे म्हणायचा. त्यांचा सर्वांत

महत्वाचा धडा असा आहे कीं देवता, परलोक, हीं चरकारीं जाऊं देत चुलींत, केवळ या दुनियेचीच तेवढी फिकिर करा. ''

" दुनियेची फिकिर करायची असेल तर त्या बाबतींत मीहि तुझ्याशीं सहमत आहें. परंतु भगवान् सांगतात कीं केवळ स्वतःचीच फिकिर करावी. ''

" स्वतःची व स्वकीयांची. ''

" स्वकीयांची फिकिर राजेलोकांना कितपत असते तें दिसतंच! बाप केव्हां मरेल याची वाटच बघत असतो मुलगा! बापाची चिता विझते न विझते तोंच भाऊ भाऊ एकमेकांचे गळे कापायला लागतात. ''

" राजलक्ष्मीला बळी हवा असतो. जो आपण स्वतः सगळ्यांत जास्त लायक आहोंत असं सिद्ध करतो त्याच्या गळ्यांत ती जयमाला घालते. ''

" तर मग दुनियेची फिकिर करण्याचा प्रश्न निकालांतच निघाला म्हणायचा. ''

" जय! तुला वसुबन्धूंचं सगळं तर्कशास्त्र शिकून घ्यायला हवंय म्हणायचं? माझं मत मात्र असं आहे कीं जगावर राज्य तर्काचं नसतं, तरवारीचं असतं. ''

" होय तर. तूं तरवारीचा धनी होण्यासाठीं भरपूर खटपट करतोयस हें तर मला दिसतंयच. ''

" मी तरवारीचा धनी तर होणारच आहे. अन् तो सुद्धां पक्का धनी! चन्द्र-गुप्ताच्या नांवाला मी कमीपणा नाहीं आणणार. ''

" कधीं कधीं मला शंका वाटूं लागते याबद्दल. सूर्य मावळायच्या आंतच तरुणी तुझ्याभोवतीं गराडा घालून बसतात अन् तूं प्याल्यांवर प्याले उडवूं लागतोस. अन् हें पाहिल्यावर माझं मन शंकित होतं. ''

" जय! मुळींच शंकित होऊं नकोस. ज्याच्या मजबूत हातांत धारदार खड्ग असतं त्याच्याच नशिबांत मद्याचे प्याले व सुंदरी असतात हें चन्द्रगुप्त पक्कं ओळखतो. मद्याचा प्याला व सुंदरींचा उपभोग घेण्याची एक ठराविक वेळ असते. वेळेच्या बाहेरहि तूं कधीं चन्द्रगुप्ताला मद्यपान व सुन्दरी यांच्यांत गुरफटलेला पाहिला आहेस का? ''

" पण भायर! अजून तुला पंधरा वर्षदेखील पूर्ण झालेली नाहीं. येवढ्या अल्प वयांत हें अतिरिक्त व्यसन शरीराला व मनाला दोहोंलाहि चांगलं नव्हे. ''

" छान! म्हणजे तूं वसूबन्धूंचं तर्कशास्त्र शिकूनच न थांबतां त्यांच्या सारखा उपदेश करायला पण शिकतोयस म्हणायचा! ''

" चन्द्र! माझं बोलणं असं हंशावारी नको नेऊंस! पंडु व आणखी कितीतरी राजे अतिभोगापायीं ऐन तारुण्यांत क्षयाला बळी पडले हें काय तुला ठाऊक नाहीं? ''

" एकूण तूं असंच समजतोस कीं एकट्या चंद्रगुप्तासाठींच तेवढ्या तरुण सुंदरी प्राण टाकतात. अरे, राजप्रासादांत संयमाला वावच नाहीं. इथली हवा, इथलं आकाश,

सगळं केवळ वासनांनीं भरलेलं आहे. तूं स्वतःकडे पाहतोस तरी का ? तरुणी तुझ्या-बद्दल काय ह्मणतात ?– ' जय सुंदर आहे, सबल आहे, तरूण आहे, अन् तरीदेखील कुणाहि तरुणीशीं मोकळया मनानं बोलत नाहीं. ' तरुणींनीं एखाद्या पुरुषाला षंढ समजायचं ही लाजिरवाणी गोष्ट नव्हे का ? तुला काय भिक्षू व्हायचंय वाटतं ? "

" नाहीं, मला यौधेयच राह्यचंय. यौधेयांमध्यें अन्तःपुर नसतं; हजारों हजार सुंदरींचा तुरुंग नसतो. "

" याला तुरुंग कां म्हणतोस ? सुंदरींना हें स्वर्गीय सुख इतरत्र कुठं मिळालं असतं ? हें नन्दनवन, हा क्रीडा-कुंज, हे स्फटिकाहून चकचकीत प्रासाद, हें तलम, मऊमऊ दुकूल, हे रत्न-सुवर्णाचे दागिने, हीं अत्तरें व अंगराग,—या गोष्टी काय कैदी स्त्रियांना मिळतात ! असं असलं तर इन्द्राच्या अन्तःपुराला सुद्धां तुरुंग म्हणतील. "

" जर यांतल्या प्रत्येक स्त्रीला आपापला एकेक स्वतंत्र पुरुषहि असता तर मी याला इन्द्रपुर म्हणायला कबूल झालों असतों. परंतु या कापरासारख्या शुभ्र सौधांच्या आंतल्या भागांत केवढी आग धुमसत राहिलेली आहे, किती मर्मवेदना होत आहेत, हें तुला स्वतःलाच ठाऊक आहे. आपला जीव व अब्रू संभाळून जिथं राहतां येईल अशी जागाच या कैदी स्त्रियांना कुठं मिळण्याजोगी नाहीं. राजा व समाजाचा लांब पंजा यांच्या तावडींतून सूटून जाणं यांच्या बाबतींत संभवनीय नाहीं, म्हणून बिचाऱ्या नाइलाजानं इथं पडून आहेत. "

" जय ! मला राहून राहून एका गोष्टीचं आश्चर्य वाटतं. माझ्या प्रमाणं तूंहि याच वातावरणांत वाढलास, पण तूं इतका निष्ठुर कसा झालास ? ' निष्ठुर ' हा शब्द मी चतुरिकेच्या तोंडचा सांगतोय हं. तिनं तुझ्यावर फारच जीव लावलेला होता. "

" चन्द्रगुप्त ! मला स्त्रीचं आकर्षण नाहीं असं नाहीं माझं म्हणणं. पण आम्ही अजून बच्चे आहोंत असं मला वाटतं. अजून माझं तेवढं वय झालेलं नाहीं. आमच्या समोर सारं आयुष्य उपभोगासाठीं पडलेलंच आहे कीं. "

" परंतु चतुरिकेनं तुझ्यावर फारच जीव लावलेला होता. तूं तिची निराशा केलीस. "

" अंतःपुरांत राहणाऱ्या स्त्रियांना निराश होण्याचं कारणच नाहीं. "

" या सत्तर सत्तर वर्षांच्या म्हाताऱ्या कंचुकींना अनुलक्षून बोलतोयस तूं हें ? "

" यांच्या सत्तर वर्षें वयामुळं यांच्या बाबतींत अन्तःपुराला धास्ती नसते हा नुसता समज आहे असं मला वाटतं. पण मी मुळीं कंचुकींचा विचारच मनांत आणीत नाहीं. "

" तर काय वामनांचा व कुबड्यांचा विचार मनांत आणीत असशील ? छीः ! छीः !! कुणी सुंदरी त्यांच्या तोंडावर थुंकायला तरी तयार होईल का ? "

" त्यांना इतर कुणी पुरुष मिळण्याचा संभव नाहीं असं जर तूं समजत असशील तर मला वाटतं वामनांवर व कुबड यांवर देखील थुंकायची सोय नाहीं. "

" पण याच राजप्रासादांत तूंहि राहतोयस ना ? "

"मीहि आहेंच, परंतु माझ्या समोर माझं सगळं भावी आयुष्य व आशा-आकांक्षा आहेत त्यांचं काय ? "

" खरंच जय ! आपल्या भावी आयुष्याविषयींहि तूं कांहीं विचार केला आहेस ? "

" विचार जर केला नसता तर ज्या वेळीं तूं आपल्या रंगढंगांत दंग असतोस त्या वेळीं मी समईसमोर ताडपत्रांवर डोळेफोड कशाला करीत राहिलों असतों ? मी सध्यां ज्ञानार्जन करीत आहें, साधनसंपन्न होत आहें. शरीर व मन या दोहोंनाहि सामर्थ्यवान करणं हेंच माझं आतांचं काम आहे. "

" अन् पुढं ? "

" पुढच्या सगळ्या गोष्टी अजून स्पष्ट झालेल्या नाहींत. तरी पण केवळ स्वतःची पर्वा करण्याचं तत्व मला मान्य नाहीं. "

" अच्छा भाई ! मी तर आतां चाललों. माझ्या रंगढंगाची वेळ झाली."

चन्द्रगुप्ताला दुरून कांहीं तरुणी येत असलेल्या दिसल्या त्यांत अग्रश्रेष्ठी गोपाल यांची तरुण कन्या सानुमती हीहि होती.

आतां मी यौवनांत पदार्पण करीत होतों. आतांपर्यंत ज्या कितीतरी गोष्टी अनुकरण म्हणून आम्ही करीत होतों, त्यांचा अर्थ आतां आम्हांला कळूं लागला होता. अंतःपुर तर कामशास्त्राची खुली पाठशाळाच असते. मग आपल्या आसपासच्या गोष्टी मला समजत होत्या यांत नवल कसचें ? मला कुणाचेंच आकर्षण वाटत नव्हतें अशांतला प्रकार नव्हता.परंतु या सार्‍या प्रलोभनांमध्यें, या सार्‍या सौंदर्यांमध्यें कांहीं तरी उणें-उणें, सुनें-सुनें, वाटत होतें. मला राहण्यासाठीं एक स्वतंत्र प्रासाद मिळालेला होता. दुर्दैवानें तो चन्द्राच्या प्रासादाला लागूनच होता. तिथें अंतःपुरांतल्या परिचारिका अज्जुकाच्या कांहीं कामानिमित्त कधीं कधीं येत असत. आणि माझ्याकडून विशेष उत्साह प्रदर्शित होत नाहीं म्हणून त्या जास्त वेळ थांबत नसत. चतुरिका अजूनहि कधीं-कधीं येई. तिच्याशीं मी कधींच रुक्ष वर्तन केलें नाहीं, पण ती मला निष्ठुर कां समजत होती कोण जाणे. याबद्दल मी तिला विचारलें देखील, पण तिचें उत्तर मला अस्वाभाविकसें वाटलें. ती म्हणे-" प्रथम जेव्हां मी चित्र काढण्यांत तल्लीन राहत होत्यें तेव्हां तुम्ही माझ्याजवळ बसत असां, आपल्या स्पर्शानं माझं अंग पुलकित करीत असां; अन् आतां तुमचं स्मितच तेवढं शिल्लक राहिलंय. मी येवढ्यावरहि संतुष्ट राहायला तयार आहें, पण बिजेच्या कोरेसारखं हें देखील केव्हां लुप्त होऊन जाईल कोण जाणे. "

मी तिच्या खांद्यावर माझा हात ठेवून म्हणालों– " चतुरिका ! हें स्मित कधींहि लुप्त होणार नाहीं. तुझं अंग पुलकित करायला मी आतां देखील तयार आहे. परंतु आजकाल अभ्यासांत मला किती वेळ घालवावा लागतो हें तुला ठाऊक आहे ना ? आमच्या आचार्यांजवळ ज्ञानाचं अपार भांडार आहे. त्यांचं वय झालंय, अन् त्यांत पुन्हां ते एका ठिकाणीं स्थिर राहत नाहींत.म्हणून मी माझा सारा वेळ विद्यार्जनाच्या कामीं लावूं इच्छितों. "

" विद्यार्जन तर तुम्ही पूर्वींहि करींत होतांच कीं. खरं सांगूं ? तुम्ही माझ्याबद्दल विरक्त झालां आहांत. "

" विरक्त अन् रक्त कसं व्हायचं तें मला नाहीं समजत. पण तूं आहेस माझ्यापेक्षां मोठी. म्हणून मला तुझ्या बोलण्याला प्रतिवादहि नाहीं करतां येत. पण विद्येच्या क्षेत्रांत मी जितका अधिक आंत-आंत प्रवेश करतोंय तितकं तिचं क्षेत्र अधिकच विशाल होत चाललंय. "

चतुरिका कांहींएक न बोलता कितीतरी वेळ तशीच शून्यमनस्कपणें उभी राहिली. मग ती एक दीर्घ निःश्वास सोडून म्हणाली–

" म्हणजे तुम्ही मला म्हातारी समजतां, असं स्पष्ट कां नाहीं सांगत ? पण तुम्ही छिन्नी घेऊन रात्र रात्र भर माझा पुतळा तयार करींत बसत असां तेव्हां कांहीं मी म्हातारी नव्हत्यें. ठीक ...... "

मी तिचे हात माझ्या हातांत घेऊन म्हणालों–"सुंदरि ! तुला म्हातारी म्हणणारा नक्की आंधळाच असला पाहिजे. तुझ्या अंगीं यौवन आहे, सौंदर्य आहे, अन् अनेक सुंदर गुण आहेत. ही भाषा मी वाचलेल्या काव्यांतून उसनी घेतलेली असली तरी माझे मूकभावच या शब्दांच्या रूपानं व्यक्त झालेले आहेत. तुझ्यावर प्रेम करून मला निर्वाह करतां आला असता तर मी नक्कीच खूष झालों असतों. पण हें घडून यायचा संभव नाहीं हें मी जाणून आहें. मला चांगले पंख फुटल्यावर मी आकाशांत भराऱ्या मारूं लागेन. तर मग काय राजान्तःपुरांत ज्या प्रकारचा प्रणय चालतो त्याचीच नक्कल मी करावी असं वाटतं तुला ? "

" कांहीं बिघडलं नसतं. मी पण राजान्तःपुरांतच जलमल्यें अन् इथंच लहानाची मोठी झाल्यें. "

असलें उत्तर निदान चतुरिकेकडून मिळेल असें नव्हतें मला वाटलें. मी तिला इतर परिचारिकांच्यापेक्षां वेगळी समजत होतों. तिचें हें उत्तर ऐकून मला जरा वाईट तर वाटलेंच. परंतु तिच्या भावनांची बूज राखण्यासाठीं मी हंसून म्हणालों–
"तसंच असेल तर अजूनहि कांहीं वेळ गेलेली नाहीं. पण आचार्यांकडून मला जितकं ज्ञान घेतां येईल तितकं लवकर-लवकर घेऊं तर देशील."

" अन् तोंपर्यंत तुम्हांला चांगले पंख फुटतील. मग उडतं पांखरूं हातीं कसचं लागतंय ? "

" चतुरिका ! एक गोष्ट तूं लक्षांत ठेवली पाहिजेस. इथल्या कितीतरी तरुणींमध्यें जिच्यावर मी अधिक अनुरक्त आहे अशी तूंच तेवढी आहेस. अंतःपुरांतल्या तरुणींच्या सारखंच जर तुला वागायचं असलं तर मी आणखी कांहीं वर्षं तरी पाटलिपुत्र सोडून नक्कीच जात नाहीं. "

चतुरिका आपले अधर माझ्या अधरांजवळ आणून म्हणाली–"म्हणजे मी एका चुंबनाची मालकीण आहें म्हणायची ! "

मी मुकाट्यानें आपलें मुख खालीं लवविलें.

चतुरिका निघून गेली. आणि तिचें मन बहुधा अधिक प्रसन्नहि झालें असावें. परंतु माझ्या मनांत मात्र विचारांचा समुद्र उसळून राहिला होता. मी चुपचाप आसन्दी ( खुर्ची ) वर बसलों होतों. मी जरा चिंताग्रस्त असलेला पाहून कुलूपा म्हणाली–' भर्तृदारकांची प्रकृति तर ठीक आहे ना ? आज येवढे उदास कां ? "

मी माझ्या चेहऱ्यावर मुद्दाम प्रसन्नतेची छटा आणण्याची खटपट करीत म्हणालों–"तसं कांहींच नाहींग आई. " कुलूपाचा प्रेमळ स्वभाव पाहून मी तिला केव्हांपासून आई म्हणूं लागलों होतों कोण जाणे. आणि वेगळ्या प्रासादांत आल्यावर मी अज्जुकाकडून तिलाच मागून घेतली होती. कुलूपाच्या चेहऱ्यावरून माझें बोलणें तिला खरें वाटलें नसावेंसें दिसलें. म्हणून मी विषयांतर करण्यासाठीं म्हणालों– " आई ! तुझ्या देशांत देखील अशाच प्रकारचीं राजान्तःपुरं असतात का ? "

कुलूपानें एक दीर्घ श्वास घेऊन सांगितलें–"भर्तृदारक ! आमच्या यवन देशांत राजा कुणी नसतोच ! "

" तर तिथं काय यौधेयांच्या सारखं गणशासन असतं ? "

" कधीं काळीं गणशासन होतं, मग राजाचं शासन चालू झालं; आतां आमचा राजाहि नाहीं. आम्ही रोमन राजाच्या आधीन आहोंत. "

गणाची गोष्ट ऐकून माझी उत्सुकता आणखी वाढली. कारण भारतांत आणखी कुठल्या गण-शासनाची गोष्ट मी ऐकलेलीच नव्हती. मी विचारलें–" आई ! तूं तुझ्या गणाची कांहीं हकीकत सांगशील का ? "

" कितीतरी दिवसांपूर्वीची हकीकत आहे ती. कितीतरी युगं लोटलीं, मला ठाऊकहि नाहीं. मात्र अलसंदर ( अलेक्झांडर ) च्या बापानं आमचं गण-राज्य नष्ट करून आपलं राज्य स्थापन केलं असं मी ऐकलं आहे. "

" अलसंदर अलिकसुन्दर ( शिकंदर ) !! भारताच्या हद्दीच्या आंतपर्यंत जो आला होता तोच ? "

" होय. त्याच्या राज्यावर सूर्य मावळत नव्हता असं ऐकलंय मी."

" आचार्य सांगत होते कीं अशोकाचे आजोबा चन्द्रगुप्त मौर्य हे राज्यावर येण्याच्या थोडं अगोदर तो पुरुषपुर, तक्षशिला व त्याच्याहि पुढं पर्यंत आला होता. पण पुढं त्याच्या सैनिकांचा धीर खचला. म्हणून मग, उदयाचल राहोच, तो मथुरा व पाटलि-पुत्रापर्यंत देखील पोंचला नाहीं. तो मोठा राजा होता यांत संदेह नाहीं. त्याच्या नंतर अधून मधून कितीतरी यवन राजांनीं भारतावर राज्य देखील केलं. तर मग अखेरीस अलिकसुंदरचं अगर त्याच्या वंशजाचं राज्यदेखील राहिलं नाहीं म्हणायचं ? "

" कुणाचं तरी राज्य कायमचं थोडंच राहतं. अलिकसुंदरच्या मागून कितीतरी काळपर्यंत आमच्या देशावर राजांचं राज्य होतं. मात्र त्यांच्या बाबतींत मला माहिती अशी कांहींच नाहीं. आमच्या भाषेंत आमच्या इतिहासाचे कितीतरी ग्रंथ आहेत, कितीतरी कहाण्या आहेत, परंतु मला त्या सगळ्या आठवत नाहींत. "

" गणाची एखादी कहाणी तुला आठवते का ग आई ? "

" एक कहाणी नाहीं विसरल्यें मी. कुणा यवन कवीनं कसलं तरी नाटक लिहिलं होतं. रोम शहरीं माझ्या एका बांधवानं तें मला सांगितलं. जरा विचित्र अशीच आहे ही कहाणी. अन् मी ती कितीतरी वेळां सांगितलेली आहे."

" पण आई ! तूं मला नाहीं सांगितलीस ती ! पिशाच–राक्षसांच्या तर कितीतरी गोष्टी सांगितल्यास तूं. पण ही कहाणी नाहीं कधीं सांगितलीस."

" ही स्त्रियांची कहाणी आहे. अन् जेव्हां केव्हां ती सांगितली ती स्त्रियांनाच सांगितली. "

" आई ! जर कांहीं तशी हरकत नसेल तर मलाहि सांग ना ग ती. "

" हरकत कसली असणार भर्तृदारक ! ऐका. त्यावेळीं यवन-गणाची राजधानी अथेन्स नगरी होती. अथेन्स आज देखील मोठं शहर आहे. नगरदेवीचं नांव आहे अथनी. माझी मुलगी तिथंच जलमली, म्हणून तिचं नांव अथना ठेवलं होतं. "

" म्हणजे आई ! तुमच्या इथं देखील देवींची पूजा करतात ? "

" माझ्या जन्माच्या कितीतरी अगोदरची गोष्ट आहे ही. आतां तर यवन (ग्रीक) रोमन, सगळ्यांनींच येशू ख्रिस्ताचा धर्म स्वीकारला आहे. परंतु येशूचा धर्म तिथं पोंचायच्या अगोदर देखील यवनांचा भाग्यसूर्य मध्यान्हीं तळपूं लागलेला होता. म्हणूनच आजकालचे यवनदेखील त्या काळच्या सगळ्या स्मृतिचिन्हांकडे मोठ्या प्रेमानं व आदरानं बघत असतात. "

" ठीक. पण त्या कहाणीचं काय ? स्त्रियांची कहाणी सांगणार होतीस ना तूं ? "

" होय. सांगत्यें ऐका. घरोघरींच्या प्रमुखांची सभा अथेन्सचं राज्य करीत असे."

"आई! आमच्या इथंहि यौधेय अशाच तऱ्हेनं राज्य करतात."

"आजदेखील असलं राज्य आहे? भर्तृदारक! मी तर कांहीं ऐकलं नव्हतं. मी तर असं समजत होत्यें कीं भट्टिनी कुणा महाराजाची कन्या आहे."

"माझे वडील महाराज होते, महासेनापति होते. परंतु आमच्या इथं महाराज महासेनापति हीं गणाच्या प्रधानाची अगर पुरस्कर्त्यांची पदवी असते. ते या राजां-सारखे राजे नसतात.

"तरीच म्हटलं भट्टिनींचा स्वभाव इतका मृदु व कोमल कसा. त्यांच्या अंगीं गर्वाचा लवलेशहि नाहीं. अन् भर्तृदारक! तुमचा स्वभावहि त्याच वळणावर गेलेला दिसतोय मला."

"बरं तें असो. पण आई! ती स्त्रियांची कथा तर सांगशील."

"अथेन्सचं राज-काज गणसभा करीत असे; मात्र सभेचे सदस्य सगळे पुरुषच असत. ते आपसांतहि लढत असत अन् बाहेरूनहि लढाई विकत घेत असत. अथेन्सच्या स्त्रियांनीं विचार केला — या पुरुषांना नीट राज्य करायचं कळत नाहीं, यांच्या अंगीं राज्य करण्याची योग्यता नाहीं. यांच्या अंगीं स्त्रियांच्या सारखं अंतःकरण व सहानुभूति नाहीं. स्त्रिया स्वतःच राज-काज आपल्या हातीं जेव्हां घेतील तेव्हांच देशांत शांतता व सुखाची स्थापना होऊं शकेल. म्हणून साऱ्या स्त्रियांनीं गुप्तपणीं घरोंघरीं वाटाघाटी केल्या. पुरुष खूप दारू पिऊन उशीरपर्यंत नाच-गाणं करीत असत. त्यांची झोंप लवकर कसची संपते! एक दिवस पुरुष असेच गाफिलपणीं झोंपलेले असतांना त्यांचे दरबारी पोशाक स्त्रियांनीं स्वतः घातले आणि त्या पुरुष-वेषांत गणसभाभवनांत गेल्या. भवन-रक्षकानं यांना सदस्य समजून अडविलं नाहीं. स्त्रियांनीं सभा केली, गण-पतींची निवडणूक केली आणि असा ठराव पास केला कीं पुरुष राज्य करायला नालायक आहेत म्हणून आजपासून गणाचं राज्य स्त्रियांच्या हातीं दिलं जात आहे. हा ठराव लेख-बद्ध करण्यांत आला. सभा-भवनावर व नगराच्या चौकांतून हें व्यवस्थापत्र लावण्यांत आलं. मग स्त्रिया आपापल्या घरीं परतल्या. तिथें पुरुष आपले राजकीय पोशाक शोधतां शोधतां बेजार झालेले होते. शेवटीं एकदांचे त्यांना पोशाक मिळाले. परंतु ते घालून ते सभाभवनांत जातात तों भवन-रक्षकांनीं त्यांना आंत जायला मनाई केली. सदस्यांनीं घोषणा-पत्र वाचलं. त्यांत पुरुषांचं राज्य रद्द करण्यांत आलं होतं इतकंच नव्हे तर आजपासून सारीं शेतं, सारीं जंगलं सारीं घरं एकंदर गणाच्या मालकीचीं आहेत असंहि त्यांत जाहीर केलेलं होतं. सारा अथेन्स परिवार एक आहे; इथं सगळ्यांना आपापल्या योग्यतेप्रमाणें काम करावं लागेल अन् सगळ्यांच्या खाण्या-कपड्याची तरतूद गणामार्फत होईल."

मी ही साधीसुधी कहाणी ऐकून जरा विचार करूं लागलों. गण म्हणजे कांहीं मला नवीन गोष्ट नव्हती. परंतु साऱ्या गणाची संपत्ति समाइक असते याची मला कल्पनाहि करतां येत नव्हती. यौधेयांमध्यें शेतांची मालकी गणाकडे असते, परंतु शेती समाइक नसते. शेती व व्यापाराचा लाभ सगळे अलग-अलग घेतात. या कथेनें माझ्या मनावर जोराचा आघात केला. या संबंधांत विचार करणें म्हणजे एका दिव-साचें काम नव्हे हें मी समजून चुकलों. चतुरिकेचें वर्तन पाहून मनांत जी विषण्णता आलेली होती ती तर बहुतेक दूर झालीच. परंतु राजान्तःपुराच्या बाबतींत मी जो प्रश्न विचारला होता त्याचें उत्तर मिळालेलें नव्हतें. म्हणून कुलूपाला मी पुन्हां विचा-रलें--" आई ! ही कहाणी खूपच मनोरंजक आहे. हें स्त्रियांचं गण-राज्य कांहीं दिवस तरी चाललं का ? "

" तें मला नाहीं ठाऊक. इतर कथांच्या सारखी हीहि बहुधा एक कथाच आहे . "

" रोमन राजांचं अन्तःपुर असतं कीं नाहीं ? तिथंहि एकेका राजाच्या हजार राण्या असतात ? "

" अन्तःपुर तर असतंच. परंतु तिथं राजाची राणी एकच असते. राजाला एकीपेक्षां अधिक स्त्रियांशीं विवाह नाहीं करतां येत. यवन व रोमन लोकांचा हा रिवाज म्हणा अगर धर्म म्हणा; तिथं राजापासून तों साध्या माणसापर्यंत कुणालाहि ऐंकीहून अधिक स्त्रियांशीं विवाह करतां येत नाहीं. स्त्रीनं एकाच वेळीं अनेक पुरुषांशीं विवाह करण्याची गोष्ट ऐकून त्यांना जितकं आश्चर्य वाटेल तितकंच आश्चर्य त्यांना बहुपत्नीकत्वाची चाल ऐकूनहि वाटेल. "

" आई ! तो फार चांगला रिवाज आहे. खरं म्हटलं म्हणजे असंच पाहिजे. आमच्या इथलं राजान्तःपुर कसलं तें, हजारों स्त्रियांचं बन्दीगृह आहे नुसतं ! "

" पण तिकडेहि राजान्तःपुरांत हजारों स्त्रिया असतातच. मात्र राणी असते एकच. "

" अस्सं. म्हणजे तिथल्या जनानं राजावर कमींत कमी येवढा तरी निर्बंध घातला आहे म्हणायचा--त्याला एकीहून अधिक स्त्रियांशीं विवाह तर नाहीं करतां येत. हजारों स्त्रियांना परिचारिका म्हणून ठेवणं हें धनवैभवामुळं करतां येतं. जोंपर्यंत एका माणसाजवळ पुष्कळ धनवैभव आहे अन् दुसऱ्या जवळ कांहींच नाहीं, तोंपर्यंत नर-नारींची विक्री होतच राहणार. पण काय ग आई ! तिथं देखील आमच्या दास-दासींच्या प्रमाणं बाजारांत माणसांची खरेदी-विक्री चालते का ? "

"होय भर्तृदारक ! तिथंहि दास-दासींची विक्री चालते. तिथंहि त्यांना मनुष्यदेह-धारी पशु समजतात. राजान्तःपुरांतले परिचारक-परिचारिका क्रीतदास नसतात, अक्रीत दास असतात. परमभट्टारक जर लक्ष देत नसेल तरच त्यांना अन्तःपुर

सोडून कुठंहि निघून जातां येतं. परंतु एकदां अन्तःपुरांत आल्यावर माणसाची अवस्था वृक्षाच्या आश्रयानं राहणाऱ्या वेलीसारखी होते. त्याला आपल्या पायांवर उभा राहण्याची लायकी येतच नाहीं."

"तर मग तिथल्या राजान्तःपुरांत जेव्हां तेव्हां केवळ कामविकाराचीच चर्चा चालू असेल. राजा, राणी, परिचारिका, साऱ्यांचं लक्ष कामुकतेच्या गोष्टींतच मग्न असणार."

"एक राणी असल्यामुळं राजकुमारी व राजपुत्रांची संख्या कमी राहते. इतर गोष्टींच्या बाबतींत इथल्या नि तिथल्या स्थितींत कांहींच अन्तर नाहीं."

"आई! तिथल्या राजान्तःपुरांतल्या स्त्रियांच्या बाबतींत मी तुला कांहीं विचारूं इच्छितों. तूं याचा भलता अर्थ मात्र घेऊं नकोस हं."

"भलता अर्थ कसचा घेणार मी, भर्तृदारक! रोमचं राजान्तःपुर असो वा पाटलिपुत्राचं असो, मला तरुणपणीं धन्याची इच्छा अगर आपली इच्छा पूर्ण करायसाठीं तयार राहावं लागतच असे; अन् आतां वय होऊन गेल्यावर मला दूतीचं काम करावं लागतं--मग तें पुरुषाच्या तर्फेनं असो अगर स्त्रीच्या तर्फेनं असो. तुम्हीं तर मला असलं काम कधींच सांगितलेलं नाहीं. परंतु तुमच्यासाठीं या अन्तःपुरांतल्या साध्या सुध्या चेटीच नव्हेत तर राणीच्या दर्जाच्या सुद्धां किती तरी सुंदरी प्राण टाकत आहेत हें मला ठाऊक आहे. माझ्याशीं वागतांना त्या लाज-संकोच ठेवीत नाहींत. वस्तुतः राजप्रासादांत लाज-संकोचाचा पडदा फारच झिरझिरीत असतो.

"काय म्हणालीस? राण्या देखील! माझ्या अज्जुकाच्या सवती? ज्यांना मी बहिणी मानतों?"

"राजान्तःपुरांत रक्ताच्या नात्यापर्यंत देखील संबंध चालतो. ही कांहीं नवलाची गोष्ट नव्हे. तुम्हीच विचार करा, भर्तृदारक! यौवन; निरोगी अन् सुंदर शरीर; इतर सारे भोग भोगायची तजवीज; कामदेवाची पूजा केवळ वसंतोत्सवाच्या दिवशींच नव्हे तर रात्रंदिवस संगीत-नृत्य व प्रेमसंकीर्तनाच्या रूपानं चालूच; त्यांत पुन्हां हजार-हजार स्त्रियांसाठीं एकच पुरुष. अर्थात् भट्टांनीं जरी सगळ्या जणींशीं सारखंच वागायचं ठरविलं तरीसुद्धां तीन वर्षांतून फक्त एकदांच समागमाची आशा! मग अन्तःपुरांतल्या स्त्रियांकडून तुम्ही कसल्या वर्तनाची अपेक्षा करणार?"

"आई! तूं सांगितलंस तें बरोबर आहे. मी अन्तःपुरांतल्या स्त्रियांवर नाराज होतां कामा नये. त्या बिचाऱ्यांचा अपराध येवढाच कीं त्या स्त्रीजातींत जन्माला आल्या. त्यांना रूप मिळालं, कुळशील मिळालं; आतां त्यांना जन्मभर या वैभवपूर्ण बन्दी-गृहांत अस्वाभाविक अमानुषिक जीवन घालवावं लागणार. माझ्या मनांत असा विचार

येतो -- एकपत्नीची चाल असूनसुद्धां जर पुरुषांच्या नालायकीमुळं अथेन्सच्या नारींना जुनी राज्यव्यवस्था उलथून पाडायची आवश्यकता वाटली, तर आज आमची राज्यव्यवस्था उलथून पाडायची आवश्यकता त्याच्या पेक्षां हजार पटींनीं अधिक आहे. "

" पण राज्यव्यवस्था उलथून पाडतां येते का ? "

" हाच तर विचार करण्याजोगा प्रश्न आहे, आई ! परंतु काल अनन्त आहे. जें आज अशक्य आहे तें पुढं कधीं काळीं शक्य होईल. "

" भर्तृदारक ! तुम्ही कधीं कधीं तुमच्या वयाच्या मानानं फार पुढच्या गोष्टी बोलतां असं मला वाटतं. "

" अर्थात, दुधपित्या बाळाच्या तोंडीं येवढ्या बड्या-बड्या गोष्टी शोभत नसतील ? "

" मी नांवं ठेवायसाठीं नाहीं बोलल्यें. मी तर या गोष्टीबद्दल तुमची प्रशंसाच करीत असल्यें. तारुण्याच्या मस्तीनं धुंद झालेल्या या तरुणी जेव्हां तुम्हांला नांवं ठेवूं लागतात तेव्हां मी सांगत्यें-- 'आमचे भर्तृदारक असे तसे नाहींत ग, काळतोंड्यांनों ! आमचे भर्तृदारक हजार पुरुषसिंहांत एक आहेत, समजलांत ! जा, चालत्या व्हा, तुम्ही तुमचं तोंड आणखी कुठं तरी काळीं करा जा ! ' तरीसुद्धां त्या माझं ऐकत नाहींत. चतुरिका मात्र तसली नाहीं हो ...... "

" म्हणजे आई ! तूं आतां चतुरिकेची शिफारस करायला लागलीस म्हणायची ! "

" ती तुमच्या बाबतींत तसला कटाक्ष ठेवीत नाहीं, येवढ्या पुरतांच मी तिची तारीफ करीन. तसं म्हटलं तर तीसुद्धां तुम्हांला निष्ठुर म्हणतेच. "

" आई ! यांत निष्ठुरपणा ग कसला ? जर मी सगळ्या जणींवर स्नेहाची दृष्टि ठेवली तर मी प्रसादावारीच खलास नाहीं का होणार ? अन् चतुरिकेनं तर आज एक चुंबन वसूल केलंन् सुद्धां. आतां ती मला निष्ठुर म्हणणार नाहीं येवढी तरी आशा आहे. प्रेमाच्या बाबतींत माझ्या मनांत आदर असला तरी या समाजांत मात्र प्रेमाला वाव मला कुठंच दिसत नाहीं. प्रेमाच्या गोष्टी तर मला आतांशाच कांहीं दिवसां अगोदरच समजूं लागल्या आहेत. परंतु इथले प्रकार बघितल्या बरोबर मनाचा भडका उडतो. इथं मानवतेनं पशुतेच्या अगदींच जवळचं स्थानं मिळवलंय. "

" बरोबर बोललांत भर्तृदारक ! रोम शहरीं काय, अगर आणखी कुठं काय, आम्ही परिचारिका व परिचारक पशू म्हणूनच गणले जातों. जवळ बांधून ठेवलेल्या एखाद्या पशूसमोर जसं सगळं कांहीं निःसंकोचपणानं करावं, तसंच आमच्या समोरहि करतात. हीं माणसं बघत राहिलीं आहेत असं त्यांच्या मनांतहि येत नाहीं. हे लोक आमच्या बाबतींत कसचा विचार करणार ! "

कुल्पा मला बहुधा कुणीतरी अतिमानव समजूं लागली असावीसें दिसलें: म्हणून मी तिला सांगितलें -- " मी अतिमानव नाहीं, अन् अतिमानव होणं मला आवडतहि नाहीं. परंतु मी मानव खासच आहें. अन् पशूच्या इतक्या नीच पातळीवर जाणं फारच वाईट असं मी मानतों. मला दुटप्पी सदाचाराची भयंकर चीड आहे. कपडे काढल्यावर एका तऱ्हेनं वागायचं अन् कपडे घातल्यावर निराळ्याच तऱ्हेनं वागायचं, हीं गोष्ट मला बिलकुल आवडत नाहीं. ज्या अन्तःपुरिकांच्या या साऱ्या लीला तूं मला सांगितल्यास त्याच सटव्या मंदिरांत व धर्मस्थानांत जाऊन सती-साध्वींचा आव आणतात. अखेर असल्या ढोंगापासून फायदा काय ?"

" परलोकाला घाबरतात त्या. नरकाच्या आगीला घाबरतात. त्यांना असं वाटतं--आपण जें कांहीं करतों तें गैर आहे, परंतु व्रतपूजा केल्यानं कदाचित आपलं पाप धुवून निघेल. "

" नरकाच्या व परलोकाच्या भयानं का माणूस सदाचारी बनणार ! मी तर भयामुळं कुणी सदाचारी झालेला पाहिलाच नाहीं. तूं यवन लोक पाहिलेस, रोमन लोक पाहिलेस, अन् तूं आमच्या देशांत राहिल्याला एक युग होऊन गेलं. तूंच सांग बरं--परलोकाच्या व नरकाच्या भयानं माणूस—त्यांतल्या त्यांत राजा-सामंत व धनी-श्रेष्ठ—कधींतरी सदाचारी झाला आहे का ? "

" नाहीं, मी सुद्धां नाहीं पाहिला, भर्तृदारक ! श्रेष्ठी-सार्थवाह व राजेलोक यांच्या अंन्तःपुरांची तर गोष्टच सोडून द्या जे सगळ्यांत मोठे धर्मात्मे आहेत, परलोकाचे व नरकाचे सगळ्यांत मोठे ज्ञानी आहेत, याच्या बाबतींत जे लंबींचवडीं प्रवचनं झोडतात व स्वतः आंसवं ढाळून हजारों लोकांना रडूं आणतात, त्या लोकांची गोष्ट सांगतें मी. त्यांचीहि रीत मी पाहिली. माझा कौमार्यभंग करणारा असाच एक रोम शहराचा धर्मात्मा होता. त्यानं प्रथम माझ्यावर प्रेम केलं; मला गर्भ राहिला तेव्हां त्यानं मला अथेन्सला पाठवून दिलं. परंतु तेवढ्यावर सुद्धां त्याला निर्धास्तपणा वाटेना, अन् मग तीर्थयात्रेला नेण्याचा बहाणा करून त्यानं मला या देशांत आणून सोडून देववलं. "

" तीच गोष्ट इथंहि आहे आई ! ज्याला लोक बडा म्हणतात, ज्याच्याजवळ धन व ज्ञान असतं, त्याच्या लेखीं नरक व परलोक या केवळ भाकडकथा आहेत. मला हा दुटप्पी सदाचार नाहीं आवडत. सदाचार तोच म्हणावा कीं जो आंत-बाहेर एकच असतो अन् जो मानवाच्या आवांक्यांत असतो. "

मी जेव्हां तेव्हां आचार्यांच्या तोंडून यवन दार्शनिकांची प्रशंसा ऐकलेली होती. भारतांत केव्हांतरी येऊन वस्ती करून राहिलेल्या यवनांच्या बाबतींतहि ते कधींमधीं सांगत असत. आचार्य नागसेनांना यवनराज मिलिन्दानें ( मीनान्दरनें )

कसकसे मार्मिक प्रश्न विचारले होते हें " मिलिन्द प्रश्न " वाचतांना मला दिसून आलें. शाकला ( सियालकोट ) ही मिलिन्दाची राजधानी होती हेंहि मला त्याच वेळीं कळलें. परंतु पूर्वी यवनांचें गणराज्य होतें, यवनांच्या देवी-देवता होत्या, आणि आजकाल त्यांनीं येशू ख्रिस्ताचा नवा धर्म स्वीकारला आहे, इत्यादि गोष्टी मात्र मला त्या वेळीं नव्हत्या ठाऊक. मागाहून जेव्हां जेव्हां वेळ मिळे, तेव्हां तेव्हां मी कुलूपाकडून यवन व रोमन लोकांच्या बाबतींत पुष्कळशा गोष्टी विचारून घेत असें. माझें सहानुभूतिपर वर्तन पाहून कुलूपा अगदी निःसंकोचपणें मला साऱ्या गोष्टी सांगत असे. मात्र यवनांच्या गणराज्याचा नाश एका राजानें केला आणि आज सारे यवन लोक परकीय राजाचे गुलाम आहेत, ही आठवण मनांत आली कीं माझें मन अगदीं बेचैन होऊन जात असे.

## ( ६ )

# वडिलांची शेवटची भेट

बाबांचे अनेक लेख येऊन राहिले होते. ते मला भेटण्यासाठीं फार उत्सुक झालेले होते आणि अज्जुकालाहि बरोबर घेऊन ये असें त्यांनीं लिहिलें होतें. हेमंत-ऋतु संपावयाच्या सुमारास चन्द्र व अज्जुकाला बरोबर घेऊन मी अग्रोदकाला पोंचलों. माझें वय आतां सोळा वर्षांचें असलें तरी वडिलार्जित शरीरसंपत्ति व व्यायाम यांच्या योगानें मी वीस वर्षांचा धष्टपुष्ट गबरू जवान दिसत होतों. अली-कडच्या दोन वर्षांत बाबा जास्तच वृद्ध झालेले होते. काळज्या हेंहि याचें कारण होतें. स्वतःची अगर माझी काळजी नव्हे. त्यांना यौधेय गणाची काळजी लागलेली होती. तसें पाहिलें तर परमभट्टारकांनीं यौधेयांच्या अंतर्गत कारभारांत हस्तक्षेप केला नाहीं, आणि ते करहि नाममात्र घेत असत; आणि तो सुद्धां भेटी, बक्षिसें यांच्या रूपानें परत करीत असत. परंतु यौधेयांच्या मनांतून गणाची भावना ओसरूं लागलेली होती. शेतांवाडीची खासगी मालमत्ता तर त्यांना हवीतशी वाढवितां येतच नव्हती. परंतु ते व्यापार करून खूप धन जमा करीत होते. स्वतःसाठीं दीनार जमा करणें आणि महाल उठविणें, या गोष्टींकडे त्यांचें जेवढें लक्ष होतें तेवढें शस्त्रविद्या

व युद्धविद्या शिकण्याकडे नव्हतें. ते मथुरेला येत असत. महादेवीच्या कुळांतले असल्यामुळें उपरिक महाराज त्यांचा खूप मानमराबत ठेवत असत. सोन्याच्या चषकांतून उदुंबरवर्णा द्राक्षी ( लाल ) सुरा आतिथ्य म्हणून प्यावयास मिळे. सोन्याच्या व हिरे-मोत्यांच्या दागिन्यांनीं भारावलेल्या गणिका नाच करून दाखवीत. राजमाल्यांनीं बहुमूल्य वस्त्राभूषणें घातलेलीं त्यांना दिसत. मग या गोष्टींचें अनुकरण करण्याची त्यांना इच्छा होई. बाबा या गोष्टींकडे भयंकर भयाकुल नजरेनें बघत असत. बाबांचें मन प्रसन्न राखण्यासाठीं अज्जुका हर तऱ्हेच्या युक्त्या करीत असे. चन्द्राचा सारा वेळ तर आखेट ( शिकार ) व मामांच्या संगतींत नाचणें-गाणें यांतच जाई. माझ्या भावजया मलाहि या कार्यक्रमांत ओढून नेऊं इच्छित होत्या, परंतु मी माझा बहुतेक वेळ बाबांच्या सहवासांतच घालवीत होतों. त्यांना यौधेयांचा प्राचीन इतिहास, यौधेयांची वीरता, यौधेयांचा धर्म, या विषयांचें विशाल ज्ञान होतें. मला आतां तें समजून घेण्याची पात्रता आलेली होती. या गोष्टी सांगण्यासाठीं बाबा जितके उत्सुक असत, त्यापेक्षांहि मी त्या ऐकण्यासाठीं अधिक उत्सुक असे. अर्ध्या-अर्ध्या रात्रीपर्यंत आमच्या गप्पा चालू असत. मी एके दिवशीं विचारलें– "आम्हां लोकांना यौधेयहि म्हणतात, अन् आग्नेयहि म्हणतात. हीं दोनदोन नांवं कां ?"

बाबांनीं सांगितलें– " यौधेय गणांत अनेक जमाती अगर उपगण आहेत. आग्नेय, रोहितकी, खांडिल्य इत्यादि असलेच उपगण होत. कित्येक शतकांपूर्वी हे उपगण छोटे-छोटे स्वतंत्र गण होते. त्यांचे अलग-अलग कार्षापण ( मुद्रा=नाणीं ) होते; गणसभाहि अलग होत असत. एका गणाचा दुसऱ्या गणाशीं झगडा-झंझट होत नसे. परंतु पुढं आमच्या पूर्व व पश्चिम बाजूला मोठमोठीं राजतंत्रं स्थापन झालीं. राजे लोक आमच्या दूध तुपानं समृद्ध अशा शस्य-श्यामल भूमीकडे लोभी नजरेनं बघूं लागले. आणि त्यांनीं आमच्यावर आक्रमण सुरू केलं. मग मात्र आम्हांला स्पष्ट दिसूं लागलं कीं छोट्या छोट्या गणांच्या रूपानं राहून आम्हांला आमचं संरक्षण नाहीं करतां येणार. सगळ्या गणांच्या पुरस्कर्त्यांनीं एकत्र जमून विचार केला. आणि यौधेयांच्या सगळ्या गणांना एकत्र करून एक मोठा गण स्थापन करण्याखेरीज दुसरा कोणताहि मार्ग त्यांना दिसला नाहीं. आम्ही युद्धामध्यें दुर्धर्ष ( निधड्या छातीचे ) आहोंत म्हणूनच आमच्या गणाला यौधेय हें नांव मिळालं. या घटनेला आज सुमारें ४०० वर्षं झालीं असतील. मालवांनीं अशी एकजूट नाहीं केली. त्यांनीं एकट्यांनींच लढायचा बेत केला. परंतु अर्ध्या अर्ध्या महाद्वीपाच्या राजांच्या विशाल सेनेबरोबर त्यांना कुठवर टिकाव धरतां येणार ? आज पाहिलंस ना, ते आमच्या हद्दीच्या आणखी दक्षिणेला सरकले आहेत. त्यांच्यामध्यें वीरतेची उणीव नव्हती; जन्मभूमी विषयीं त्यांनाहि अपार प्रेम होतं;

परंतु सगळं कांहीं करूनहि जेव्हां त्यांना आपलं अस्तित्व राखणं अशक्य झालं तेव्हां त्यांना आपली भूमि सोडून मुलांबाळांसहित नव्या भूमींत जाऊन वसाहत करावी लागली. आमच्या पश्चिमेला शतद्रूच्या तटाकीं जो प्रदेश आज यौधेयांच्या हातीं आहे, त्यांत एका काळीं मालवांची वस्ती होती."

"मग ती भूमी आमच्या हातीं कशी आली हो बाबा?"

"स्वार्थासाठीं भावांच्या व बापाच्या रक्तानंहि स्वतःचे हात रंगविणाऱ्या राजांच्या सारखा गण कांहीं लहान परिवार नसतो. म्हणूनच गणाचा उच्छेद करणंहि तितकं सोपं नसतं. मौर्यांनीं पुरुषपुराच्याहि पुढंपर्यंत जाऊन विजय मिळविले, परंतु त्यांनीं फारच थोड्या गणांचा उच्छेद केला. समुद्रगुप्ताप्रमाणंच चंद्रगुप्त मौर्य देखील सांगत होता कीं 'गण हे अंतर्गत कारभाराच्या बाबतींत स्वतंत्र राहूं देत. विदेशी शत्रूशीं सामना करतांना भारताच्या साऱ्या तरवारी एक व्हाव्यात हीच आमची इच्छा आहे.' मौर्यांनीं तक्षशिलेनजीकच्या कांहीं गणांचा उच्छेद केला खरा, परंतु मौर्यवंशाच्या विनाशानंतर मौर्य साम्राज्याचे निरनिराळे भाग आपल्या ताब्यांत घ्यायसाठीं खटपट करणाऱ्या राजेलोकांमुळंच गणांवर संकट कोसळलं. यवन राजा मिलिन्द व त्याचे वंशज यांच्या कारकीर्दीत उत्तरापथाच्या गणांवर आफत ओढवली. पश्चिमेकडील गण खूप शौर्यानं लढले आणि कितीतरी गणांना नाइलाजानं आपली मातृभूमि सोडावी लागली. त्यांच्या पैकीं कांहीं आमच्यांत सामील झाले आणि आज ते यौधेय आहेत. ज्या गणांना आपल्या जन्मभूमींत राहणं अशक्य झालं त्यांनींच यवनांचा पहिला हल्ला आपल्या अंगावर घेतला व यवनांची ताकद खच्ची करून आम्हांला मदत केली. जर यवनांचा पहिला प्रहार आमच्यावर झाला असता तर आम्ही बचावलों असतों असं मला नाहीं वाटत. कुषाणांच्या वेळीं आमच्यावर पुन्हां संकट ओढवलं, परंतु तोंपर्यंत सगळ्या गणांना एकत्र आणून आम्ही आमचा यौधेय गण चांगला संघटित केलेला होता. आमच्या शौर्याला व निर्भयपणाला व्यापक संघटनेची जोड मिळाल्यामुळं आमचं सामर्थ्य खूप वाढलं. राजे काय, घटाप्रमाणं उगवतात, आणि विखरून जातात. एकदोन पिढ्यांपर्यंत देखील आपलं लष्करी सामर्थ्य टिकवून धरायची त्यांना मुष्किल होते. गणांचं सामर्थ्य मात्र त्यांच्याहून कितीतरी अधिक चिरस्थायी असतं. या आणि पूर्वीच्या प्रसंगावरून आम्ही असा धडा घेतला कीं गण या नात्यानं आम्हांला आमचं अस्तित्व अजिबात नष्टच करून घ्यायचं नसेल तर आमच्या पूर्वजांनीं मौर्यांच्या बाबतींत जी वेतसी (वेताप्रमाणें लवण्याची) वृत्ती स्वीकारली होती तीच आम्ही पतकरायला हवी. कुषाणांची स्वारी आली त्या वेळीं आम्ही हेंच धोरण पतकरलेलं होतं. कुषाणांनींहि अधिक लोभ धरला नाहीं. कारण यौधेयांचं रक्त किती कडक असतं हें यांना ठाऊक होतं. यौधेयांमधलेच लहान लहान गण एकत्र

करून त्यांच्याच आम्ही एक संयुक्त मोठा गण केला अशांतला प्रकार नव्हता. आम्ही शतद्रु व विपाश ( बियास ) या दोन नद्यांदरम्यानचे कुणिन्द व आमच्या दक्षिणेकडले आर्जुनायन हे गणहि आमच्यांत सामील होऊन आमचा एक मोठा गणसंघ झाला."

"पण मालवांनाहि या संघांत कां सामील करून घेतलं नाहीं ? ते शूर लढवय्ये आहेत."

"त्यांच्यांत कित्येक श्रीमंत पुढारी निर्माण झाले आहेत. स्वतःच्या स्वार्थासाठीं ते मालवांना आमच्यांत सामील होऊं देत नाहींत. मालव शूर आहेत हें निःसंशय. ३०९ वर्षांपूर्वी त्यांनींहि कुषाणांची दाणादाण उडविलेली होती. याची खूण म्हणून त्यांनीं मालव संवत ( विक्रम संवत् ) चालू केला. अवन्ति-सौराष्ट्राचा महाक्षत्रप रुद्रदामा यानं यौधेयांचा उच्छेद करायची प्रतिज्ञा केली होती त्याला दोनशें वर्षे होऊन गेलीं. यौधेयांचा उच्छेद तर त्याच्या हातून झालाच नाहीं. उलट आम्हींच त्याचा पराभव केला. परंतु मालवांनीं उत्तरापथांत असतांना कुषाणांची जशी दाणादाण उडविली तशी आम्हांला रुद्रदामाची सपशेल दाणादाण उडवितां आली नाहीं. मालव देखील अलग-अलग लढण्याऐवजीं आमच्या संघटनेंत सामील झाले असते, तर आम्ही रुद्रदामाला दांतीं तृण धरून शरण यायला लावलं असतं. रुद्रदामाच्या स्वारीचा एक चांगला फायदा मात्र जरूर झाला--आज कुणिन्द, यौधेय व आर्जुनायन हे तीन्ही गण एका सेनापतीच्या नेतृत्वाखालीं एकजुटीनं शत्रूवर हल्ला करूं शकतात हें त्याच्याच स्वारीचं फळ म्हटलं पाहिजे."

"आमचे पूर्वज ज्या भूमींत अगदीं प्रथम येऊन वस्ती करून राहिले, ती सारी भूमि आजसुद्धां आमच्या ताब्यांत आहे का हो ?"

"मला वाटतं त्या वेळेपेक्षां थोडी जास्तच भूमि आज आमच्या ताब्यांत आहे. शेजारचे राजे जसजसे निर्बल झाले, तसतसा आसपासचा बेवारशी प्रदेश आम्ही सर करींत गेलों."

"परंतु बाबा, समुद्रगुप्ताचं मातुल-कुल जे लिच्छवि त्यांनींहि मगधांतून कुषाणांच्या सत्तेचा उच्छेद केला होता. केवळ ५० वर्षांपूर्वीच पाटलिपुत्रांत कुषाणांचा क्षत्रप राहत असे. आणि आज पहावं तर आमची भूमि हिमालयाच्या पायथ्यापर्यंत व खलतिका ( कालसी ) पर्यंत पसरलेली आहे. मग या रस्त्यानं कुषाणांना मगधापर्यंत कसं जातां आलं ?"

"बलवान शत्रूसमोर आम्ही वेतसी वृत्ति पत्करली असं मी आधींच नाहीं कां सांगितलं ? स्रुघ्न ( अंबाला ) व त्याच्या उत्तरेच्या भागांतून आम्ही त्यांच्या जाण्यायेण्याचा रस्ता सोडून देत राहिलों. कुषाणांना मध्यदेश जो सोडावा लागला तो समुद्रगुप्ताच्या वडिलांच्या अगर लिच्छवींच्या मान्या-

मुळं नव्हे; आम्हां यौधेयांच्याच मान्यामुळं त्यांना तिथून हटावं लागलं. राजे लोकांप्रमाणं एका परिवाराच्या भोगविलासासाठी आपल्या हजारों बांधवांना बळी देऊन दुसऱ्याच्या राज्याचा अपहार करावा, अशी गणाची इच्छा नसते. म्हणूनच आम्हां कुषाणांना विपाश् व दक्षिण शतद्रूच्या पलीकडे पिटाळून सोडून दिलं. तरी सुद्धां कुषाणांना स्वतःच्या सुरक्षिततेची खात्री वाटेना. आणि देव-पुत्रशाहीनं पारसीक शाहंशाहाकडे धांव घेऊन त्याच्या चरणांवर आपला मुकुट ठेवला. कुषाणांना व क्षत्रपांना आम्हीं परके समजत नाहीं. पांचशें वर्षांपूर्वी ते पर-देशाहून आलेले असले तरी आतां ते याच देशाचे रहिवासी आहेत. कुषाण देव-पुत्रानं पारसीकांच्या आश्रयाला जाणं ही खरोखरीच फार निन्दास्पद गोष्ट आहे. "

यौधेयांचा पूर्वेतिहास ऐकल्यावर मी भविष्यकाळासंबंधीं मला वाटूं लागलेली काळजी बाबांना सांगितली. बाबा म्हणाले—" बरोबर आहे बाळ! राजतन्त्र व गणतन्त्र हीं दोन्ही परस्पर विरोधी आहेत. गणतन्त्र आपल्या अमलाखालील प्रत्येक व्यक्तीच्या मनांत स्वाभिमान व आत्मविश्वास निर्माण करतं. अन् राजतन्त्र सगळ्यांना मेंढरं बनवतं. "

" बाबा! हें तर अगदींच अनुचित आहे! माणसाला मेंढरूं बनवणं ही समाजाला कल्याणप्रद गोष्ट नव्हे. असं असतांना सुद्धां हें अन्यायपूर्ण शास्त्र कां हो चालू राहतं? "

" तें चालतं म्हणूनच तर बलिष्ठांना इतरांवर गुलामगिरी लादायला अवसर मिळतो. नाहींतर तो कसा मिळाला असता? तें चालतं म्हणूनच गणांच्यापेक्षां कितीतरी पटींनीं जास्त तरवारी त्यांना जमा करतां येतात. "

" तर मग समाजांत अन्यायाचंच पारडं जड झालेलं आहे? "

" दुर्बल राहणं हा सुद्धां अन्यायच आहे; हें पाप आहे; याच पापापायीं देश गुलाम होतात. "

" बाबा! मी एका यवनीच्या तोंडून ऐकलं कीं यवन देशांत देखील पूर्वी गणतन्त्र होतं. त्या काळीं त्यांची राजधानी अथेन्स नगरी होती. यवन लोक तिथं आमच्याच सारखं गणसंस्थेच्या द्वारां शासन करीत होते. उत्तरापथापर्यंत स्वारी करून आलेल्या अलिकसुन्दराच्या बापानं गणशासन मोडून राजशासन स्थापन केलं. अन् आज तर कित्येक शतकांपूर्वीपासूनच यवन रोमनांचे गुलाम आहेत. हें ऐकून मला कधीं कधीं फार काळजी वाटूं लागते. "

" काळजी वाटणं स्वाभाविक आहे. परंतु जोंपर्यंत यौधेयांच्या मनगटांत खड्ग धारण करायची ताकत आहे, जोंपर्यंत ते आपल्या जन्मभूमीसाठीं आपले प्राण तृणवत् समजत आहेत, आणि जोंपर्यंत ते सगळे एकजुटीनं काम करीत आहेत, तोंपर्यंत

काळजीची आवश्यकताच नाहीं. मात्र एकजुटींत अडथळे येऊं लागले आहेत ही मात्र नक्कीच काळजी करायजोगी गोष्ट आहे. ”

“ एकजुटींत कसले अडथळे येताहेत, बाबा ? ”

“ दीनारांसाठीं प्राण टाकायच्या वृत्तीमुळं आतां यौधेयांमध्यें भेदभाव दिसूं लागले आहेत. राजेशाही थाटाचीं वस्त्रं-आभूषणं अंगावर घालून किती तरी यौधेय स्वतःला इतर यौधेयांपेक्षां बडे समजूं लागले आहेत. इतर यौधेयहि त्यांचा थाटमाट पाहून त्यांचा हेवा करूं लागले आहेत. समुद्रगुप्ताच्या वीस वर्षांच्या संपर्कानं जर येवढा फरक झालेला दिसूं लागला तर हा फरक पुढं असाच आणखी वाढणार. भयंकर धोक्याची गोष्ट ती हीच. ”

“ बाबा ! पण मला वाटतं राजे लोकांचेहि विलास दिवेंसदिवस वाढत चालले आहेत. विलासांसाठीं जास्त जास्त दीनारांची त्यांना जरूर लागते आहे. दीनारां-साठीं प्रजेला लुटावं लागतं, शेजाऱ्यांना लुटावं लागतं. म्हणून यौधेयांच्या समृद्ध भूमीला दिवसें दिवस जास्त जास्त धोका येण्याचा संभव आहे. रामगुप्त तर साधा-भोळा माणूस आहे. त्याच्या अमदानीपर्यंत समुद्रगुप्ताचं हें धोरण कदाचित् राहणा-रहि नाहीं. परंतु बाबा ! तो पाटलिपुत्राच्या सिंहासनावर टिकेल का नाहीं याची मला शंका वाटते !

“ कां रे, हें काय सांगतोयस तूं, बाळ ? ”

“ चंद्रगुप्त महा हुशार अन् धूर्त आहे. आणि तो आपल्या मनांत काय काय डाव योजीत असतो, त्यांचा तर तो कुणालाच पत्ता लागूं देत नाहीं. मात्र तो चन्द्र-गुप्त मौर्य व विष्णुगुप्त चाणक्य यांना आपले मार्गदर्शक समजतो. ”

“ बाळ ! ही तर जरूर काळजी करण्याजोगी गोष्ट आहे. परंतु चन्द्रगुप्ताला वाटेला लावणं म्हणजे आमच्या शक्तीबाहेरची गोष्ट आहे. तो गणतन्त्राचा समर्थक असणं शक्य नाहीं. होय. बाकी गण जर मजबूत झाला तर त्याला आपण थोपवूं धरूं शकतों. ”

“ मलाहि असंच वाटतं. आपला गण मजबूत कसा करतां येईल या विषयीं मी फार फार विचार करीत असतों. आचार्य वसुबन्धूनीं लिच्छवींच्या पुष्कळशा गोष्टी सांगितल्या. त्यांनीं सांगितलं कीं भगवान् बुद्धानं लिच्छविगणाचा नमुना पुढं ठेवूनच भिक्षु-संघ निर्माण केला. तथागतांना राजतन्त्रापेक्षां गणतन्त्रच अधिक पसंत असे. ज्या शाक्यांमध्यें ते स्वतः जन्मले, ते शाक्य देखील गणतन्त्रीच होते. हो. एक गोष्ट मला मधेंच विचारून घ्यायची आहे. ”

“ विचार ना बाळ ! ”

" भिक्षुसंघाच्या व्यवस्थेचे पुष्कळसे नियम आहेत. हे नियम ते फक्त भिक्षूं-नाच सांगतात. ते लिखित स्वरूपांत मिळत नाहीत. ते नियम काय काय असतात ? ते समजून घ्यायसाठीं मला एखादवेळ कदाचित् भिक्षु व्हावं लागेल. "

बाबा जरा घाबरून म्हणाले—" नाहीं बाळ ! तूं भिक्षु होतां कामा नये. तूं माझा एकुलता एक पुत्र आहेस. माझी व यौधेय गणाची तुझ्यावर पुष्कळच मदार आहे. "

" बाबा ! मी वैराग्यासाठीं व निर्वाणासाठीं नाहीं होणार भिक्षु ! याबद्दल खात्री असूं द्या तुमची जर कधीं काळीं थोड्या मुदतीपुरता मी भिक्षु झालोंच तर तो केवळ याच हेतूनं होणार कीं यौधेयांची सेवा करायसाठीं मला लायक कसं होतां येईल. "

" असं जर असेल तर माझी कांहींच हरकत नाहीं. "

" मी बुद्धांच्या उपदेशांत असं वाचलंय कीं ते हरप्रकारचे भेदभाव बाजूला सारून संघांत सर्वांना एकत्र आणूं इच्छीत असत. आज देखील अशोकारामांत यवन, पारसीक; शक, मागध, वैदर्भ, सैंहलक, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, असे सगळया देश-जाति-वर्णांचे भिक्षु आहेत; परंतु ते आपसांत लहान मोठेपणाची भावना फक्त संघांत येण्याच्या अनुरोधानंच ठेवतात. माझ्या मनांत कधीं कधीं असा विचार येतो--आमच्या गणांमध्यें कां नाहीं तशी व्यवथा होत ? "

" बौद्ध व जैन हे दोघेहि पंथ संघालाच सर्वोपरि ( सर्वश्रेष्ठ ) मानतात. गुप्त जसे विष्णूला मानतात तसे हे पंथ समाजाचा कर्ता-हर्ता कुणी एकच ईश्वर असतो असं मानून त्याच्यावरच भरंवसा ठेवीत नाहींत. म्हणूनच ब्राह्मणांचा धर्म गण-तन्त्राला अनुकूल आहे असं मला वाटत नाहीं. उलट श्रमणांचाच ( बौद्ध-जैनांचा ) धर्म गणतन्त्राला अत्यंत अनुकूल आहे असं मला वाटतं. जर आमच्या भूमींत वस्ती करून राहिलेल्या यौधेयेतर जमातींनाहि गणसंस्थेंत भाग घेण्याचा हक्क असता तर आमचं लष्करी सामर्थ्य दुप्पट झालं असतं यांत सन्देह नाहीं. "

" तर मग याच्यासाठीं खटपट कां नाहीं करीत ? "

" आजच्या परिस्थितींत ही खटपट यशस्वी होणार नाहीं. आमचा गण सतत रक्तसंबंधी लोकांपुरताच मर्यादित राहिलेला आहे. जी गोष्ट फार प्राचीन काळापासून चालत आलेली आहे, ती सोडून देणं फार कठीण असतं. शिवाय आमच्यांतल्या धनी लोकांच्या ताब्यांत विकत घेतलेले दास-दासी असतात; कामंधामं करायला चाकर असतात; आमचे लोक कारागिरांचीसुद्धां आपल्या चाकरांतच गणना करतात. हे धनी लोक बज्या बज्या यौधेयांना भडकावण्यासाठीं सांगतील—' यौधेयेतरांच्या हातीं राज्यसत्ता सोंपवण्याचा हा डाव आहे. आमच्या भूमींत यौधेयेतरांची संख्या

निम्म्याहून अधिक आहे. तसं केलं तर सारं राज्यच यौधेयेतरांच्या हातीं जाईल.' अशा तऱ्हेनं स्वार्थी लोक यौधेयांमध्यें आपसांत फूट पाडण्यांत यशस्वी होतील. जिच्यामुळं यौधेयांमध्यें फूट पडेल अशी कोणतीहि गोष्ट करणं आजच्या स्थितींत योग्य ठरणार नाहीं हें तुझ्या लक्षांत आलंच आहे."

"यौधेयांचा रक्ताच्या शुद्धतेवरचा कटाक्ष ही या बाबतींतली मोठीच अडचण आहे हें मला कबूल आहे. परंतु यौधेयांना आपलं सामर्थ्य आणखीहि वाढवायचं आहे त्याचं काय?"

"ही गोष्ट या घटकेला तरी यौधेयांना सबल करण्याऐवजीं निर्बल करील असं मला वाटतं. पुढं कदाचित असं करायला अनुकूल संधि आली तर कांहीं सांगतां येत नाहीं."

गणांच्या व संघांच्या बाबतींत जेव्हां जेव्हां मला कांहीं ऐकण्या-वाचण्याची संधि मिळते तेव्हां तेव्हां मी या विषयावर अत्यंत लक्षपूर्वक विचार करतों. मला या विषयाची मोठीच जिज्ञासा आहे. दुनियेतील इतर गणतन्त्रांपासून आपल्याला जें कांहीं शिकतां येईल तें शिकून घेऊन आपला गण अधिक मजबूत करावा असें मला वाटतें.

* * * * * *

अज्जुका या खेपेला भद्रा, खंडिला, पृथूदका (पेहुआ), रोहितकी इत्यादि नगरांमध्येंहि जाऊन आली. तशी मलासुध्दां इतर ठिकाणच्या आमच्या बांधवांना भेटण्याची उत्सुकता होतीच; आणि अज्जुका निघाल्यावर तर तिच्याबरोबर जाणें जरूरीचेंच होतें. चन्द्राला त्याच्या शिकारी व नाचगाण्यांपुढें बाकीच्या सगळ्या गोष्टींचा विसरच पडलेला होता.

अग्रोदकाप्रमाणें इतर शहरींहि यौधेयांमध्यें विलासीपणा वाढलेला होता. सगळ्याच ठिकाणच्या लोकांनीं अज्जुकाचा व माझा भरपूर आदरसत्कार केला. रोहितकी नगरांत आमच्या चुलतभावाची सासुरवाडी होती. सुनन्दावहिनीहि या वेळीं माहेरींच होती. सुनन्देचा मी फार लाडका होतों. अग्रोदकामध्यें नृत्याच्या प्रसंगीं मी जेव्हां हजर असें तेव्हां ती माझ्याचबरोबर नाचे. तिनें माझ्या नाच-गाण्याच्या प्रशंसेचें एक रामायणच रचलेलें होतें. आणि मग रोहितकीच्या सहा दिवसाच्या मुक्कामांत मला रोज सहा-सहा सात-सात तासपर्यंत एकीहून अधिक तरुणींच्या बरोबर नाचावें लागलें. कधीं कधीं आम्ही दहा दहा पंधरा पंधरा तरुण तरुणींचा फेर धरून रास-क्रीडाहि करीत असूं. सुनन्दाची धाकटी बहीण नन्दा वयानें माझ्यापेक्षां थोडी मोठी व बलिष्ठ यौधेयिका होती. नाचण्यांत मी तिच्यापुढें हरलों नाहीं, पण ती मला हरविण्याचा मोका एकसारखा शोधत होती. एकेका

वेळेला एकेक घडा दूध फस्त करणें हा यौधेय तरुणांना नुसता खेळ वाटत असे. पाटलिपुत्राच्या राजप्रासादांत वाढलेल्या तरुणाला ही गोष्ट जमण्याजोगी नसली तरी मी यौधेयभूमींत आलों कीं पुरता यौधेय होण्याची कसोशी करीत असें. एके दिवशीं सर्वांनीं कट केला आणि मला दुग्धालयांतून दूध घेऊन येण्यास सांगितलें. मी दुग्धालयांत शिरणार इतक्यांत नन्दा येऊन दरवाज्यांत उभी राहिली. ती आपल्या दोन्ही हातांनीं दरवाज्याच्या चौकटीचे दोन्ही खांब धरून उभी राहिली आणि मला हांक देऊन म्हणाली—" हवं तर माझ्या दोन्ही पायांखालून जा, नाहींतर मला बाजूला करून जा. " मी खूप आर्जवें-विनवण्या केल्या. तिला आपल्या सामर्थ्याचा गर्व होता. आणि मीहि स्वतःला कमी समजत नव्हतों. परंतु स्त्रिशीं लढून आपल्या शक्तीची परीक्षा करून घेणें मला प्रशस्त वाटेना. नन्दा म्हणाली—" भाऊजी ! तुम्ही मला स्त्री म्हणून हीन समजतां आहांत, होय ना ? "

" नाहीं ग नन्दाताई ! मी स्त्रीला हीन समजत नाहीं. "

" स्त्रीला तुमच्या हृदयांत स्थान नाहीं हें मला ठाऊक आहे. "

मी वीरासन घालून बसलों व दोन्ही हात जोडून म्हणालों—" देवी ! मी तुला माझ्या हृदयांत स्थान द्यायला तयार आहें. तुझ्यापुढं माझं बळ दाखवायला मात्र मी तयार नाहीं. "

" जय भाऊजी ! हें नाटक बस्स करा म्हटलं ! तुम्ही फार निष्ठुर आहांत असं ताईच तर सांगते. "

" सुनन्दा वहिनीचं माझ्या बाबतींत हें मत ! तूंच सांग बरं, मी तुझ्याबरोबर अगर कुणाहि तरुणीबरोबर नाचायच्या बाबतींत जरा तरी कांकूं केली आहे का ? तूं मला रात्र-रात्रभर नाचत ठेवून अर्धमेला करून टाकलंस, तरी मी कधींतरी ' नाहीं 'म्हटलंय का ? "

"तो तर तुमच्या इज्जतीचा प्रश्न होता. तुम्हांला कुणाकडूनहि हार खायला नको आहे. "

" म्हणजे नन्दाताई ! तूं मला हार खायला लावूं इच्छितेस तर ! मी तुझ्यापुढं हार कबूल करायला तयार आहे कीं ! "

" मग घासा माझ्यापुढं नाक अन् जा माझ्या दोन्ही पायांच्या मधून. "

" नाक काय, मी तुझ्या पायांवर शंभर वेळां घासायला तयार, पण ही दुसरी अट तुलाहि नाहीं शोभत नि मलाहि नाहीं शोभत. "

" शोभायची गोष्ट सोडून द्या. आज तुम्ही एकतर रिकाम्या हातीं परत जाऊन मित्रांच्या शिव्या खा, नाहींतर नन्दा जें सांगते तें पतकरा. "

" म्हणजे मी काय तुझ्याशीं कुस्ती खेळूं ? पण ही कुस्ती खेळायची जागाहि नव्हे; अन् कुस्ती खेळायला योग्य असा तुझा पोशाकहि नाहीं."

" जागा कोणतीहि चालते. अन् कपडे बदलायची गोष्ट मात्र और काढलीत खरीच ! नन्दानं कपडे बदलायला जावं अन् तुम्ही इकडच्या इकडे पोबारा करावा असाच तुमचा मतलब कीं नाहीं ? "

"मी पोबारा नाहीं करणार. यौधेयाच्या शब्दावर तर तुझा विश्वास आहे ना ?"

" नाहीं रे बाबा ! मी विश्वास-बिश्वास कांहीं एक जाणत नाहीं. "

मी मोठ्या फिकिरीत पडलों. मागच्या दारांतून अधून मधून हास्याचा मंद ध्वनि ऐकूं येत होता व मध्येच कुणी तरी हळूच डोकावून जात होतें. मी मागचा पुढचा विचार करून नन्दाला म्हणालों-"असं कर नन्दाताई ! एकादा भार उचलायची चढाओढ लाव. तो तूंहि उचल अन् मीहि उचलतों. जो जास्त भार उचलेल त्याची सरशी."

" ऊंहूं ! भार काय, गाढवं उचलतात. "

" ठीक ! मी ही माझी मूठ मिटून तुझ्यापुढं करतों. तूं जर ही उघडलीस तर माझी हार नि तुझी सरशी. "

" हूं, ही जरा अकलेची गोष्ट दिसते आहे खरीच. " नन्दा या गोष्टीला तयार झाली. मी मूठ मिटून तिच्यापुढें धरली. तिचे गुलाबी गाल आणखीच आरक्त झाले. आणि ती ओरडून म्हणाली-" ताई सांगत होती तें खरंच आहे म्हणायचं, जयभाऊजी ! तुम्ही स्त्रीला फारच हीन समजतां; माझ्या समोर उजवा हात न धरतां डावा हात धरला आहांत."

मी हंसत हंसत डावा हात मागें घेऊन उजवा हात तिच्या समोर केला. तिनें दोन्ही हातांनीं माझी मूठ उघडण्याचा बेत केला. पण तिला माझी मूठ कसची उघडते ! तिच्या कपाळावर घामाचे थेंब ओथंबले. तिचे केस विसकटून गालांवर आले. मी अधून मधून ते माझ्या डाव्या हातानें मागें सारत होतों आणि ' साधु साधु ' असे उद्गार काढून तिला उत्साहित करीत होतों. ती आणखीच उत्तेजित होऊन मूठ उघडण्याची खटपट करीत होती. अंगणांत आणखी किती तरी तरुण-तरुणी हा देखावा पाहण्यासाठीं जमा झाले. मी म्हणालों--" नन्दाताई ! हे सगळे लोक आपणां दोघांना मूर्ख ठरवूं पाहात आहेत. चल, आपण समजुतीनं घेऊं या. मी असाच हरलों म्हणून कबूल करायला तयार आहें."

बिचारी पोर ! माझे हात लोखंडासारखे टणक आहेत हें तर तिला दिसतच होतें. मूठ उघडण्याच्या प्रयत्नांत तिच्या दोन्हीं हातांवरून घामाच्या धारा लागल्या.

तरी देखील ती हार कबूल करीना. हात जेव्हां बाजूला होत तेव्हां तिचा चेहरा लालेलाल होई. यश मिळण्याची आशा तर नव्हती. तरी सुद्धां ती हार कशी कबूल करणार ? कांहीं झालें तरी ती रोहितकीची यौधेया होती ना ! येवढयांत सुनन्दा-वहिनी तिथें आली. तिनें नन्दा घामाघूम झालेली पाहून सांगितलें--" नन्दा ! या लोकांचं कारस्थान तुला कळलं नाहीं. जय तुझ्या बरोबर जास्त वेळ नाचत होता म्हणूनच यांनीं तुम्हां दोघांना मूर्ख बनवलं. ऊठ, सोड त्याचा हात. जय पुरा यौधेय आहे हें तुला कळलं ना आतां ! म्हणत असलीस तर जयमाला आणून देतें, ती जयच्या गळयांत घाल तूं. "

जयमालेचा संकेत ऐकून बिचारी नंदा लाजली. ती उठून उभी राहिली. मीहि उठून उभा राहिलों. मी तिचे केंस सावरूं लागलों. मग म्हणालों--"आतां तरी दूध घेऊन जायची परवानगी आहे ना ? "

सुनन्दा वहिनी म्हणाली-" विजयाची घोषणा करतां आहांत होय भाऊजी ? "

मी गुडघे टेंकून पद्मांजलि करून म्हणालों -" नाही ग वहिनी ! विजय तर तुमचाच. आम्हांला दूध हवंय. "

" छ छे ! रोहितकीच्या सगळयाच कुमारिका फूल-मंजिऱ्यांसारख्या नाजुक आहेत असंच तुम्ही समजत असाल. "

" वहिनी ! रोहितकीच्या कुमारिकांशीं ज्याचा संबंध आलेला नसेल तोच अशी समजूत करून घेत असेल. मी तर तुमचा जुनाच दास आहें. "

सुनन्दा गालांतल्या गालांत हंसून म्हणाली--" रजुल्ल्यांच्या घरीं बाता मारायला फार लवकर शिकतां येतं. ठीक आहे, उठा भाऊजी ! दूध घेऊन जा. मात्र रात्रीं रोहितकीच्या कुमारिकांबरोबर पान-गोष्ठीचा ( मद्यपानाचा ) कार्यक्रम आहे हं."

" तुमच्या पानगोष्ठीच्या कार्यक्रमांतून मी कधीं पळून गेलोंय का वहिनी ? "

" पळून तर नाहीं गेलांत. मात्र तुम्ही मोठे चतुर आहांत. आज नुसती जीभ बुडवून चषक (प्याला) बाजूला ठेवतां नाहीं येणार. "

" म्हणजे आज तुम्ही लोकांनी मला भूत बनवायचा निश्चय केलाय तर. "

" भाऊजी ! सासुरवाडीला आलां आहांत तुम्ही. नाहींतरी रोहितकीच्या कुमा-रिकांना अशी संधि कधीं मिळणार ? "

आम्ही सगळेजण दूध प्यालों. रात्रीं मला एकट्यालाच कुमारिकांच्या पान-गोष्ठीच्या कार्यक्रमाला जावें लागलें. मद्यपानाचा अतिरेक होऊं नये म्हणून मी फार सावधगिरी ठेवली. पण नन्दा व तिच्या मैत्रिणींची फौजहि जागरूक होती. मी

आपला भरलेला चषक घेऊन जवळच्या कुमारीला सांगायचें—" सखि ! स्त्रीनें उष्टावल्याशिवाय मदिरा मधुर लागत नाहीं; जरा ही तुझ्या ओठाला लावून पवित्र करून दे बरं. "

माझी विनंति कुणाहि मुलीनें अमान्य केली नाहीं. आणि डोळ्यांमध्यें जरा लाली चढूं लागल्यावर तर ओठाला लावून मदिरा पवित्र करतां करतां त्या मोठे मोठे घोट घेऊं लागल्या. अशी युक्ति करून मी जरी कमीत कमी मदिरा पीत होतों, तरी चोहोंकडून " आणखी–आणखी " असा मारा चाललेलाच होता. हा मारा चुकविण्यासाठीं मी गाऊं लागलों. मी सौमिल्लाचीं कांहीं शृंगारिक पदें म्हटलीं. या पदांनींच माझा बराचसा बचाव केला. एक घोंट घ्यावा, आपला चषक नन्दाच्या किंवा इतर कुणातरी तरुणीच्या हातीं द्यावा आणि पुन्हां गाऊं लागावें, असा क्रम मी चालू ठेवला. इतर तरुणींनींहि गाणीं म्हटलीं. शेवटीं धुंदी चढल्याचा बहाणा करण्यासाठीं मी मुद्दाम बेसूर गाऊं लागलों. तरुणी विजयोन्मादानें हसूं लागल्या. मात्र पानगोष्ठी संपवून बाहेर जातांना मान झुकवून वंदना करतां करतां मी तरुणींना सांगितलें—" सख्यांनो ! बघा माझी धुंदी उतरली सुद्धां. " आणि मी पूर्ववत् व्यवस्थित रीतीनें त्यांना एक गाणें म्हणून दाखविलें. सगळ्या जणींचे डोळे लाल झालेले होते; सगळ्या जणींचे ओंठ फुरफुरत होते; माझ्या ताना व माझें मार्मिक हंसूं समजण्या इतकी शुद्ध एकीलाहि नव्हती.

## ( ७ )

# हिमालय आणि उत्सवसंकेत

हिमालय मी दुरून अगोदरच पाहिलेला होता. हिमालयावरील देवदार वृक्ष व त्या प्रदेशांत राहणारे साधे भोळे रहिवासी यांच्या हकीकती आचार्यांनीं आम्हांला कितीतरी वेळां सांगितलेल्या होत्या. मी चन्द्राजवळ हिमालयावर जाण्याचा विषय काढला. असल्या गोष्टी करावयाला तो केव्हांहि तयार असे. अज्जुकानेंहि संमति दिली आणि बाबांनीं तर आणखीच उत्तेजन दिलें. आम्ही इन्द्रप्रस्थापर्यंत जाऊन अज्जुकाला नावेंत चढवून दिली आणि मग घोड्यांवर स्वार होऊन उत्तरेची वाट धरली.

सुघ्नापर्यंत आणि त्याच्याहि पुढें आम्ही यमुनेच्या पश्चिम कांठानें गेलों. जंगलांतली वाट लागली. परंतु आम्हांला सार्थाची ( व्यापारी कारवानाची ) सोबत होती. हिमालयाच्या पायथ्याशीं दूरवर पसरलेल्या या दाट जंगलांत वाघ, हत्ती, गेंडे वगैरे अनेक प्रकारचे प्राणी आहेत, परंतु आम्ही शिकार करावयाला निघालेलों नव्हतों. कितींतरी दिवस प्रवास केल्यानंतर सपादलक्ष ( शिवालिक ) पर्वतश्रेणीचे लहान लहान पहाड ओलांडले आणि हिमालयाच्या पायथ्याशीं वसलेल्या खलतिका ( कालसी ) नगरींत पोंचलों. आजकाल नगरींत लोकांची खूप गर्दी होती. पंचाल, अन्तर्वेदी, यौधेय, सुघ्न, या ठिकाणचेच नव्हेत तर दूरदूरचेहि सार्थवाह आपले घोडे, खेचरें, बैल घेऊन तिथें आलेले होते. हिमालयाच्या दुर्गम स्थळांहून पुष्कळसे लोक पहाडी मेंढ्या-बकऱ्यांवर सामान लादून तिथें घेऊन आले होते. पहाडी लोकांचे कपडे बहुतांशीं लोकरीचे होते. त्यांची घाटणी कांहीं अंशीं शकांच्या कंचुक व सुत्थनांसारखी होती. कुणी कुणी बिनशिवलेलीं कांबळींच खांद्यावर लोखंडाच्या खिळ्यांत अडकवून अंगाभोंवतीं लपेटलेलीं होतीं. स्त्रियाहि लोकरीच्या साड्या नेसलेल्या होत्या. मात्र त्यांची धाटणी, साड्यांसारखी नव्हती. या साड्या गात्री ( गात्री=मानेवर गांठ मारलेलें वस्त्र ) च्या धर्तीवर डाव्या खांद्यावर लोखंडी खिळ्यांत अडकवून त्या अंगाभोंवतीं लपेटलेल्या होत्या. पहाडी लोकांना आंघोळ ठाऊक नसते. त्यांचें शरीर, कपडे, सगळें कांहीं अत्यंत घामट होतें आणि जवळ गेलें कीं त्यांच्या अंगाला घाण येत होती. व्यापारी या साध्याभोळ्या लोकांना अनेक प्रकारें ठकवीत असत. मात्र खलतिका जेव्हां यौधेयांच्या राज्यांत होती तेव्हां असे प्रकार होऊं नयेत म्हणून जास्त कडक देखरेख ठेवली जात असे. पुढें खलतिका देवपुत्र शाहींच्या व मागाहून समुद्रगुप्ताच्या ताब्यांत गेली. मग आतां अशा लुच्च्या व्यापाऱ्यांचें चांगलेंच फावलें. बिचाऱ्या पहाडी लोकांना हिशेब देखील कळत नसे मग कुषाणांचीं व गुप्तांचीं नाना प्रकारचीं दीनार, पण, वगैरे नाणीं मोजतांना त्यांची फसगत कां नाहीं होणार ? व्यापाऱ्यांनीं त्यांना फसविण्याची आणखी एक युक्ति काढलेली आहे. ते त्यांना उत्तम प्रकारचें लाल मद्य देतात आणि मग तोंडाला येईल त्या रकमेला मालाची खरेदी-विक्री करतात.

खलतिका यमुनेच्या उजव्या कांठावर वसलेली आहे. इथेंच यमुना नदी पहाडांतून खालीं उतरलेली आहे. म्हणून या नगरीला यमुना-द्वार असें नांव देतां येईल. इथें यमुनेच्या कांठावरच जरा उंच अशा ठिकाणीं एक शिलास्तंभ आहे; त्यावर अशोकाचे लेख खोदलेले आहेत. फार प्राचीनकाळापासूनचें हिमालयाच्या प्रदेशांतील एक चांगल्यापैकीं व्यापारी केन्द्र असा खलतिका नगरीचा लौकिक चालत आलेला आहे. खलतिकाच्या कुमारामात्यानें (जिल्ह्याच्या प्रमुख अधिकाऱ्यानें) युवराज चन्द्रगुप्ताचें

व त्याच्या मामाचें (म्हणजे माझें) मोठ्या थाटामाटानें स्वागत केलें. युवराजासाठीं तर एक छोटासा दरबारच भरविण्यांत आला होता. लोक जमिनीवर मस्तकें टेंक टेकून वंदना करीत होते आणि भेटीच्या वस्तु देत होते. आम्ही कुमारामात्याजवळ हिमालयाच्या प्रवासाची गोष्ट काढली. त्यानें सांगितलें- " मी तर फार दूरवर गेलेलों नाहीं. परंतु पहाडी लोक फारच सज्जन असतात; त्यांना बनवाबनवी, कपट, चोरी, बदमाशी, ठाऊकच नसते. हो. रस्ता मात्र कठीण आहे. अजपथ आहे--शेळ्या व मेंढ्यांनाच तेवढा हा रस्ता सुगम आहे. पहाडी लोक देखील या दुर्गम रस्त्यांवरून शेळ्यांसारखेच खटाखट चढत जातात. मात्र इथें हिंस्र पशूंचं विशेष भय नाहीं. चार पांच दिवस चढ चढून गेल्यानंतर उन्हाळ्याचा ताप नाहींसाच होतो, आणि मग हिंवाळ्यासारखं आनंददायक हवामान लागतं. परंतु भद्रा ! आपण तीनचार दिवसांच्या वाटेवरच जाणार असाल तर प्रश्नच नाहीं, नाहीतर जास्त दिवसांचा कार्यक्रम असेल तर खाण्यापिण्याचे फार हाल होतील. "

मी म्हणालों-" निदान हे पहाडी लोक कांहींतरी खात असतीलच कीं नाहीं ?"

" त्यांच्या खाण्याचा कसचा प्रश्न ? जंगलांतल्या झाडपाल्याची भाजी, मांस व जवाचं सत्तू चालतं त्यांना. मिठाचीहि त्यांना पर्वा नसते. "

चन्द्रगुप्त म्हणला-" तर मग अमात्य ! आम्हांला तसलं खाणं पुरेसं आहे. आम्ही एकादवेळ मांस विस्तवावर भाजून घेऊं; एकादवेळ शिजवून घेऊं. इथून पुरेसं सैन्धव घेऊन जाऊं अन् दीनार तर तिथं चालतीलच. "

" दीनाराच्या मोलाचा बाजार तिथं कुठून मिळणार ? फारफार तर पण ( तांब्याचा पैसा ), पादक ( दमडी) अन् माशक ( मासाभर वजनाचें तांब्याचें नाणें), हीं नाणीं घेऊन जावींत. परंतु याची फिकिर करायची जरूरच नाहीं. मी पहाडी ग्रामकांना व भामन्तांना आपला बडदास्त ठेवायसाठीं लिहून कळवीन. "

मी म्हणालों—" चन्द्र ! मला वाटतं आपण राजेशाही थाटांत जाऊं नये. नाहींतर होईल काय, एक सबंध सेनाची सेना आमच्या बरोबर येईल ! मग गांवों-गांवच्या लोकांनाहि त्रास होईल अन् आम्हांलाहि त्रास होईल. तिकडे गांवं तर आहेतच ना ? "

अमात्यानें सांगितलें— " गांवं नसायला काय झालं ! मात्र दूर दूर अंतरावर आहेत अन् बहुतेक सगळीं लहान लहानच आहेत. "

" तर मग अमात्य ! आमच्याबरोबर चारपांच माणसं द्या, अन् कांहीं ग्रामकांच्या व सामन्तांच्या नांवानं पत्रं लिहून द्या. एक चांगला वाटाड्या मात्र पाहिजेच हं. "

" वाटाड्या तर मिळेलच. पण आपण जाणार कोणत्या दिशेला ? "

" आम्हांला जायचं आहे उत्सवसंकेतांत. अन् हिमालयाचं सर्वांत सुन्दर दृश्य बघायचंय आम्हांला. "

" उत्सवसंकेत तर इथून पुढच्या पहिल्याच गांवापासून सुरू होतो. पुढंहि दहा पंधरा दिवसांच्या वाटेवर सारा उत्सवसंकेतच आहे. मात्र हा भाग पायथ्याच्या प्रदेशासारखा नाहीं. इथं एकेक दिवसाच्या अंतरावर चारसहा घरांचं एकेक गांव लागतं. पहाडी सामन्तांचीं गांवं जरा मोठीं असतात. "

खलतिकामध्यें आम्ही पाहण्याजोग्या फारशा गोष्टी नव्हत्या. त्याच पहाडी नर-नारी आणि त्यांचीं तीं मळकीं-घामट वस्त्रें; शेळ्यामेंढ्यांच्या झुंडी व त्यांच्यावर लादावयाच्या लहानलहान पडशांचे ढीग. कुमारामात्यानें विज्जक नांवाचा एक पहाडी इसम आमच्याबरोबर वाटाड्या म्हणून दिला. विज्जक जरी पहाडी प्रदेशांत जन्मलेला असला तरी तो आपल्या बहिणीबरोबर कुमारामात्याजवळ कित्येक वर्षां-पासून राहिलेला होता आणि आमचे रीतिरिवाज त्याला उत्तम प्रकारें माहीत होते. त्याला हात-तोंड धुण्याची संवय होती. आम्ही विचारल्यावर त्यानें सांगितलें—
" शेळ्या-मेंढ्यांवर सामान लादून नेतां येईल खरं, पण त्यांची चाल फार धिमी असते; त्यांच्याबरोबर आम्ही जायचं म्हणजे एक अगर सव्वा योजनापेक्षां अधिक चाल व्हायची नाहीं. "

शेवटीं पांच ओझेवाले घेऊन जाण्याचा बेत ठरला. पुढें पुढें गारठा फार पडतो असें विज्जकनें सांगितलें. त्याच्यासाठीं ऊर्ण-वस्त्रांचीं ( गरम कपड्यांची ) पूर्ण तरतूद करून निघालें पाहिजे. कंचुक, सुत्थन, कानटोपी व मजबूत उपानह ( सगळा पाय झांकणारा जोडा ) आम्ही तयार करवून घेतले. खाण्याच्या पदार्थांमध्यें मीठ जरा जास्त घेतलें. एका दिवशीं आम्ही सात इसम खलतिकाहून निघालों. खल-तिकाच्या वस्तीवर यावयाला आम्हांला जरी थोडासा पहाड चढावा लागला असला तरी तो कांहींच नव्हता म्हटलें तरी चालेल. पुढें निघाल्यावर पहिल्या दिवशीं मात्र दोन तीन तास चालल्यावर आमचे पाय भरून आले. एक सारखी घशाला कोरड पडूं लागली. आम्ही दोघेहि व्यायाम व अवघड प्रकारच्या नृत्याचे निरंतर अभ्यासी होतों, तरीसुद्धां संध्याकाळच्या आधीं आम्ही पुढच्या गांवीं विश्रांतीसाठीं मुक्काम केला त्या वेळीं आमचें सगळें अंग ठेंचून निघाल्यासारखें आम्हांला वाटूं लागलें. त्या दिवशीं आम्हांला दोन योजनां ( १२ मैलां ) पेक्षां जास्त चालवलें नाहीं. थोडेंसें चालून गेलें कीं विश्रांति घेण्यासाठीं बसावें लागे. सगळा पर्वत खालपासून वरपर्यंत हिरव्या-गार वृक्षांनीं व त्यांना लपेटलेल्या लतांनीं झांकून गेलेला होता. नानाप्रकारचे पक्षी भिन्न-भिन्न स्वरांत कलरव करीत होते. त्यांचा स्वर फार मधुर होता. त्यांचे हिरवे-पिवळे, लालरंगी उडते चमकदार पंख फारच सुंदर दिसत होते. आणि

रातकिडे तर चढाओढीनें एकसारखा झंकार करीत होते. जागोजाग झरे होते आणि त्यांचें पाणी खूप गार होतें. परंतु चालतां चालतां पाणी पिणें म्हणजे वीष पिण्यासारखें आहे असा विज्जकनें आम्हांला धाक घातलेला होता. काय करणार ? घशाला कोरड पडलेली असतांनासुद्धां थंड पाण्याच्या जवळ कितीतरी वेळ चुपचाप बसावें लागे. विज्जकला वाटेंतली सगळीं गांवें माहित होतीं. त्यानें वरच्या प्रदेशांतल्या उत्सव-संकेतापासून फार दूर असलेल्या विशाल सरोवरांच्या प्रदेशापर्यंत मजल मारलेली होती. म्हणून आम्ही वाटेच्या बाबतींत निश्चिंत होतों. आम्ही कुमारामात्याचे जातवाले आहोंत याच्या पलीकडे आमच्या विषयीं कुणाला कांहीं सांगावयाचें नाहीं अशी त्याला सक्त ताकीद होती; परंतु आम्ही कोण आहोंत हें त्याला स्वतःला ठाऊक होतेंच.

दोन योजनांची वाटचाल म्हणजे अर्ध्या दिवसाचेंहि काम नव्हे; परंतु आम्ही संध्याकाळ होण्याच्या थोडेंसेंच अगोदर मुक्कामाला पोंचलों. विज्जकानें चौघां ओझेंवाल्यांना पुढें पाठवून दिलें होतें.

पहिला गांव म्हणजे शंभर घरांचीं एक चांगल्यापैकीं वस्ती होती. हा गांव नदीकांठाच्या जरा वरच्या अंगाला साधारण सपाट अशा पठारावर वसलेला होता. पायथ्याची वस्ती असती तर आम्ही ग्रामज्येष्ठकाला 'ग्रामिक' म्हणून संबोधलें असतें; परंतु इथें त्याला 'राजा' म्हणत होते. पहाडावरील कितीतरी वस्तु मगधराजाला नजराणा म्हणून त्याला द्याव्या लागत असत. हा मोठा गांव व इथून पांच योजन अंतरापर्यंतच्या आणखी वरच्या प्रदेशांतील पहाडी गांवांवर त्याचाच अंमल होता. राजाला अगोदर खबर मिळालेली होती. त्यानें आपल्या मुख्य वेशीवर आमचें स्वागत केलें. त्याचा पोशाक इतर पहाडी लोकांसारखा नव्हता. तो बराचसा शकांच्या सारखा होता. मात्र आतां त्याच्यावर मध्यदेशाचाहि प्रभाव पडूं लागलेला होता. त्याचा वाडा, किल्ला व निवासस्थान या दोन्ही दृष्टींनीं उपयोगी पडण्याजोगा होता. तो बराच मोठा होता. भिंती लहान-मोठ्या दगडांच्या होत्या आणि छत लांकडी होतें. तक्तपोशीसाठीं व सजावटीसाठीं लांकडाचा खूपच उपयोग केलेला होता. आम्हांला खास महालांतील दोन खूपच स्वच्छ खोल्या देण्यांत आल्या. गेल्याबरोबर गरम पाणी आलें— ही विज्जकची तरतूद होती. विज्जकनें आमचे पाय धुतले व आम्हांला अंथरुणावर पडून राहण्यास सांगितलें. तशा थकलेल्या स्थितींत आम्हांला कांहीं खाण्याची इच्छा होईना; म्हणून आम्हांला तसेंच स्वस्थ पडूं द्यावें असें सांगण्यांत आलें.

मी एकदां छताच्या मोठमोठ्या तुळयांकडे, तर एकदां लाकडी तक्तपोशीकडे बघत राहिलों होतों. मी पलंगावर झोंपलेलों होतों. मात्र ही सोय म्हणजे पायथ्या-

कडील लोकांच्या संपर्काचें फळ आहे हें अजून माझ्या लक्षांत आलें नव्हतें. थोड्याच अवधींत एक षोडशी काष्ठपात्रांत तेल घेऊन माझ्या खोलींत दाखल झाली. तिचे हात तोंड धुतलेलें होतें; कपडेहि स्वच्छ होते; केंसांच्या दोन वेण्या पाठिवर रुळत होत्या. तिच्या ठिकाणीं सौंदर्य व तारुण्याचें सुंदर संमिश्रण झालेलें प्रथमदर्शनींच लक्षांत येत होतें. षोडशीनें मस्तक लववून प्रणाम केला आणि मग ती माझ्या पायांना तेल चोळूं लागली. या गोष्टी अशा कांहीं झटाझट झाल्या कीं मला कांहीं बोलण्याला अवसरच मिळाला नाहीं. आणि मग तेल लावल्यावर ती हलकया हातानें माझे पाय चेपूं लागतांच मला इतका आराम वाटूं लागला कीं नको म्हणण्याची इच्छाच राहिली नाहीं. तिचें मालिश करण्याचें काम किती वेळ चाललें हें मला कळलेंच नाहीं. थकव्यानें असो वा तिच्या संवाहनानें ( चेपण्यानें ) असो, मला झोंपच लागली. असाच किती वेळ झोंपून राहिलों कोण जाणे. मग पाहतों तों कुणी तरी माझे पाय दाबून मला जाग आणीत आहे. या वेळीं रात्र झालेली होती. खोलीच्या एका कोंपऱ्यांत पितळेच्या समईंत चतुर्मुख दीपक तेवत होता. मी डोळे उघडलेले पाहून विज्जक म्हणाला-- " भर्तृदारक ! भोजन तयार आहे. "

याच्या जवळ षोडशी विषयीं चौकशी करावी असें मळा वाटलें. परंतु झोंपेंतून उठल्यामुळें हा विचार जरा उशीरां मनांत आला. मी डोळे चोळत चोळत यन्त्रासारखा त्याच्या पाठोपाठ चालूं लागलों. चंद्र माझ्या अगोदरच तिथें पोंचला होता. राजानें आमच्या भोजनासाठीं तऱ्हतऱ्हेचें मांस, गंधशालीचा भात, सूप व तोंडीलावणीं तयार करविलीं होतीं. राजाला अनेकदां कुमारामात्याकडे जावें लागत असे; म्हणून गुप्तांच्या सूपशालेंतील किती तरी साधनें त्यानें आपल्या घरीं प्रचारांत आणलीं होतीं. उदुंबरी ( अंजिरी रंगाची ) सुराहि त्याच्याकडे तयार ठेवलेली होती. चंद्रगुप्त तर सगळा थकवा केव्हांच विसरून गेला होता; परंतु माझ्या अंगांत अजून सुस्ती तशीच होती. खाण्यापिण्यांत व गप्पा मारण्यांत रात्रीचा आणखी बराच वेळ खर्च झाला. मी माझ्या खोलीकडे परत आलों तेव्हां चंद्रगुप्तहि माझ्या बरोबर तिकडेच आला. मी विचारलें--" काय भानगड आहे ? "

" मला तर थकवा जाणवत सुद्धां नाहीं. अन् तुला कसं काय वाटतंय, जय ?"

" मला तर थोडा थोडा थकवा जाणवूं लागला आहे. "

" तर मग तूं थकव्यावर औषध नाहीं घेतलंस ? "

" माझ्या पायांना तेल लावून मालिश तर झालंच, अन् त्याच्यामुळं आरामहि वाटला. "

" जय ! तूं अगदीं तसाच राहिलास. "

" तसाच म्हणजे ? "

" बावळट ! सपशेल बावळट ! षोडशीनंच तर माझा सगळा थकवा घालवून टाकला ! "

" असं म्हणतोस ! आश्चर्य आहे ! चन्द्र ! तुझ्यासाठीं इथं सुद्धां पाटलिपुत्रांतलं अन्तःपुरच आलं म्हणायचं ! "

" अन् जय ! यालाच म्हणतात भाग्य ! अन् तूं तर अगदींच अभागी आहेस ! "

" अभागी कां ? "

" षोडशीबरोबर कांहीं बोललास का ? "

" ती हलक्या हातानं माझे पाय चेपत असतांना मला झोंपच लागली अन् डोळे चोळतचोळतच मी जेवायला गेलों. "

" म्हणजे तुला हें सारं मला शिकवावं लागणार. षोडशीला आमची सेवा करायसाठीं आमच्याकडे पाठवलेलं होतं. हा उत्सव-संकेत आहे. इथं सन्माननीय अतिथि ( पाहुणा ) आला म्हणजे घरची कुमारी अतिथीच्या सेवेसाठीं अर्पण करतात. जसं भोजन व मद्यपान, तसंच हें. घरीं षोडशी कुमारी नसेल तर घरांतली कुणीहि तरुणी प्रदान करणं हें अतिथिसेवाधर्माचं अभिन्न अंग समजतात. "

" मला यांतलं कांहीं उमजतच नाहीं रे. "

" पायथ्याच्या प्रदेशांतील मोठमोठ्या राजघराण्यांतसुद्धां हीच चाल आहे; परंतु तिथं आपली कन्या अगर आपली वधू अर्पण करीत नाहींत. तिथं तें काम दासी अगर परिचारिकेकडून करवून घेतात. "

" चन्द्र ! तुला हें कळलं कसं ? "

" थकवा तर मलाहि आलेला होताच. परंतु षोडशी आंत आल्याबरोबर मी तिला तशीच तिथं थांबायची खूण करून विज्जकाकडे गेलों. त्यानं सांगितलं कीं ' या दोघीजणी राजाच्या लहान-मोठ्या राजकन्या आहेत, अजून यांचीं लग्न झालेलीं नाहींत, अशा रीतीनं अतिथिसेवा करणं हा आमच्या उत्सव-संकेताचा धर्मच आहे.' "

" तर मग ? "

" तर मग काय ? षोडशीच्या स्पर्शानंतरसुद्धां शरीरांत थकवा शिल्लक राहतो थोडाच ? शरीराच्या ज्या ज्या भागाला तिचा स्पर्श झाला, त्या त्या भागाची सारी व्यथा नाहींशीच झाली. "

" तूं मोठा ... ... "

" नीच आहेस, असंच म्हणायचंय ना तुला ! पण उत्सव-संकेतांत अतिथीला हा हक्कच असतो. "

" हक्क वाईट आहे असं नाहीं म्हणत मी. पण उत्सव-संकेतवासी अतिथींनासुद्धां हा हक्क मिळाला पाहिजे. "

" आम्ही कां म्हणून या हक्काला पारखे व्हावं ? "

" कारण आमचीं हृदयं जास्त कुटिल, जास्त निर्ढावलेलीं असतात. हे पहाडी लोक फारच साधेसुधे आहेत. हे स्त्रीपुरुषसंबंधाचा विचार खाण्यापिण्याच्या इतर वस्तूंसारखाच शुद्ध भावानं करतात. परंतु आमच्या मनांत हें पाहून वेश्यांचा विचार येतो. वेश्येला आपलं शरीर विकावं लागतं; ती पैशासाठीं तसं करत्ये; परंतु इथं पैशाचा कांहीं विचारच नसतो. देशभर सर्वत्र हीच प्रचलित प्रथा असल्यामुळं उपकार व कृतज्ञतेचा विचारहि यांत नसतो. हा शुद्ध भाव पाहून मला एका प्राचीन कथेची आठवण होते. "

" भक्कम जमीन द्यायची सोडून, अन् धांव घ्यायची कधीं प्राचीन कथेकडे तर कधीं आकाशाकडे. असा आहेस तूं ! पुरुषाच्या जन्माला आलास तरी कशाला ? "

" माणूस व्हायला. विचार करायला. एकाच देशांत भिन्न-भिन्न काळीं भिन्न-भिन्न आचार रूढ असत असं प्राचीन ग्रंथ वाचल्यावर कळून येतं. शाक्यांच्या उत्पत्तीसंबंधांत एक गोष्ट सांगतात ती अशी– बापानं आपल्या अनेक मुलां-मुलींना जंगलांत पाठवून दिलं. तिथं त्यांनीं आपल्या वर्णांत ( रंगांत ) भेसळ होण्याच्या भयानं आपल्याच बहिणींशीं लग्नं केलीं. अशाच प्रकारच्या दंतकथा देवकन्यांच्या बाबतींत चालत आलेल्या आहेत–त्यांच्यांत स्थायी विवाहाची चाल नव्हती; देव-कन्या एकेका दिवसापुरती कुणाचीहि पत्नी होत असे. इथंहि आम्ही आतां ही प्रथा पाहत आहोंत; हींत वेश्यावृत्ति अगर पैशासाठीं शरीर विकणं असा मुळींच प्रकार नसतो. परंतु आमच्या समाजांतून इथं आलेला माणूस इथली प्रथा खऱ्या अर्थानं घेऊं शकणार नाहीं. "

" तुझ्या तंत्राप्रमाणं चालायचं म्हणजे आम्हांसारख्यांना गंगेजवळ पोंचून देखील तहानेलेच राहावं लागायचं. त्यांतल्या त्यांत आमचं हें सुदैवच म्हणायचं कीं तुला आपलं तत्वज्ञान इथल्या उत्सवसंकेत-वासीयांना उभ्या जन्मांत कांहीं पटवून देतां यायचं नाहीं. ठीक. मी चाललों. तूंहि आतां आराम कर. अन् शक्य असेल तर या यात्रेपुरता उत्सव-संकेत-निवासी होऊन जा. "

चन्द्र निघून गेला. मी माझ्या पलंगावर पडल्या पडल्या विचार करूं लागलों. थोड्या वेळानें पावलांची चाहूल ऐकूं आली आणि षोडशी माझ्या खोलींत दाखल झाली. मला आतां स्वतःपुरता कांहींतरी निश्चय करावयाचा होता––माझ्यासमोर अडचणींचे डोंगर उभे होते; माझ्या मनांतला भाव समजावून सांगावयाची कांहींच युक्ति मला सुचत नव्हती. षोडशीला परिचित असलेल्या सनातन सदाचार धर्माच्या

विरुद्ध वर्तन करावयाचें म्हणजे आपण तिच्या मनांत नाना प्रकारच्या शंकाच निर्माण करावयाच्या ना ? ती आंत येऊन पलंगावर बसली. मी पाय पसरले. ती चेपूं लागली. मला विचार करावयाची संधी तर मिळाली; परंतु निश्चय कोणता करावा याचीच मुष्किल झाली. ग्रीष्मांतले कपडे शिशिरांतहि तसेच अंगावर ठेवणाऱ्या माणसाची जशी अवस्था होते, तशीच माझी अवस्था झाली. ती चुपचाप बसून पाय दाबत होती. तिची नजर खालीं लागलेली होती; परंतु अधून मधून ती माझ्याकडेहि बघत होती. प्रथमदर्शनीं मी जी समजूत करून घेतली होती तिच्या पेक्षांहि ती जास्त सुंदर होती. हृदयांत तारुण्याचें तुफान उठलें. कांहीं झालें तरी मीहि तरुणच होतों, मीहि पुरुषच होतों. षोडशीच्या कोमल स्पर्शानें माझ्या साऱ्या शरीरावर रोमांच उभे राहिले होते. एकदां असें वाटे कीं धर्माचें आचरण देश कालाला धरून करावें; परंतु मग असा विचार येई : "माझ्या मनालाहि या धर्माच्या साच्यांत दाबून ठेवणं मला जमेल का ? जर जमत नसेल तर हा अधःपात ठरेल."

अशा संदिग्ध मनःस्थितींत मी किती वेळ राहिलों कोण जाणे. मग झोपेनें मला घेरलें. सकाळीं जागा होऊन पाहिलें तों षोडशी माझ्या कुशींत झोंपलेली ! मी झटकन उठून बाहेर चालता झालों. प्रातर्विधि उरकतां उरकतां सूर्योदय होऊन गेला. विज्जकनें सांगितलें कीं चन्द्र अजून गाढ झोंपलेला आहे. सकाळच्या न्याहारीसाठीं त्याला उठवलेंच नाहीं. दुपारच्या भोजनासाठीं एकदांचा तयार होऊन आला. मी म्हणालों--"पुढं चलायचं कीं नाहीं ?"

"इच्छा तर नाहीं होत. अजून थकवा पुरता नाहींसा झालेला नाहीं."

"असला अतिथि-सत्कार उत्सव-संकेतांत कुठंच दुर्मिळ नाहीं. आतां कुठं तूं उत्सव-संकेताच्या हद्दींत नुकतंच पाऊल घातलेलं आहेस. आपल्याला हिमालयाचं वैभवहि बघायचं आहे ना ?"

"हो, ठीक सांगितलंस. भुंग्यानं एकाच पुष्पांत स्वतःला गुरफटून घेतां कामा नये. चला, जाऊं या."

दुपारनंतर आम्ही पुढें निघालों. पुढचें गांव दीड योजनापेक्षां अधिक दूर नाहीं असें विज्जकनें सांगितलें होतें. आम्हीहि पहाड चढण्याचा सराव करण्यासाठीं सरसावलेलेंच होतों. पाय दुखावयाचे तसेच राहणार नाहींत हें व्यायामाच्या अनुभवावरून आम्हांला माहीत होतें. आमचे पहाडी ओझेवाले भारी बोजा पाठीवर घेऊन चटाचट चालत होते. विज्जकाच्या पाठीवर थोड्याशा खाण्यापिण्याच्या चिजा असत. मी त्याला सगळ्या ओझेवाल्यांना पुढच्या गांवीं पाठवून देण्यास सांगितलें. जसजसें पुढें जावें तसतशी पहाडांची उंची कमी होण्याऐवजी वाढतच होती. आम्ही पुढची मजल मारली कीं आमच्या समोरच्या क्षितिजावर नवी पर्वतश्रेणी दिसूं लागे. आज

चालतांना कालच्या पेक्षां त्रास कमी वाटत होता. आज या मनोहर दऱ्यांखोऱ्यांतील सुन्दर देखाव्यांनीं डोळ्यांचें पारणें फेडून घेत घेत आम्ही पुढें चाललों होतों. आज चढ कालच्यासारखाच असला तरी कालच्याप्रमाणें मानसिक विकलता वाटत नव्हती. कधीं मधीं पाय ठेवतांना भय वाटे. अजून आम्हांला अजपथावरून चालण्याचा सराव नव्हता. खडा चढ, चार अंगळें रुंदीचा रस्ता, आणि आणि एका बाजूला हजारों हात खोल खड्डा — मग काळजाचा थरकांप कां नाहीं होणार ? मात्र जें काम विज्ज-कला करतां येतें तें मला कां नाहीं करतां येणार, या विचारानें मी मनाला धीर देत होतों. विज्जकच्या पाठीवरील ओझ्यांत मी बांसरी पाहिली. माझ्या सांगण्यावरून त्यानें एक पहाडी राग वाजविला. तो अगदीं साधा असला तरी फारच मधुर होता. त्या वेळीं मला माझ्या वीणेची आठवण झाली. परंतु या अजपथावरून वीणा घेऊन चालणें कुणी शहाणपणाचें लक्षण नसतें मानलें. बांसरी वाजविण्याचा मी फारसा सराव तर केलेला नव्हता. इथल्या वातावरणाला तें वाद्य फारच अनुकूल दिसलें. मी बांसरी घेऊन तिच्यावर एक द्विपदी छेडली. हा प्रकार पाहून विज्जक अत्यंत खूष झाला. या एका समानधर्मानें विज्जकाला माझा परम स्नेही बनविलें.

संध्याकाळीं आम्ही मुक्काम केला त्या गांवीं चार घरें होती. एक घर जरा बऱ्यापैकीं होतें, त्यांतच आम्ही राहिलों. इथें अलग अलग खोल्या कुठून मिळणार ? दोन घरांत तर खालच्या पडवींत शेळयामेंढ्या व गाईंचे गोठे होते. राजाच्या हातचें पत्र ओझेंवाल्यांनीं ग्रामिकाला ( पाटलाला ) दाखविलें होतें. ग्रामिक बिचारा शिकलेला तर नव्हताच. परंतु त्याला आपल्या राजाची मोहर ओळखत होती; आणि भोजपत्रावर जिथें लेख संपलेला होता तिथें ती हजर होती. ओझेंवाल्यांनीं आमची ऐसपैस प्रशंसा केली—मध्यदेशचे युवराज ( तरुण राजकुमार ) इत्यादि काय काय आमच्या बाबतींत त्यांनीं सांगितलें कोण जाणे. ग्रामिकानें आपणहूनच आमच्यासाठीं फार चांगली जागा दिली होती. गरम पाण्यानें पाय धुण्यासाठीं दोन स्त्रिया आल्या. चन्द्राच्या पसंतीला त्या उतरल्या नाहींत. कारण वयानेंहि त्या जरा जास्तच होत्या. त्यांच्या अंगावर मळाचीं पुटें चढलेलीं होतीं, आणि त्या तितक्याशा सुन्दरहि नव्हत्या.

आज आम्हांला थकवा कमी वाटत होता. ग्रामिकानें आमच्या समोर चषक व यवाच्या मेरयाचे ( कच्च्या दारूचे ) बुधले आणून ठेवले. आम्ही ग्रामिकासमवेत त्यांतून दोन एक चषक प्यालों. या घरांत चार पांच पुरुष होते, स्त्रिया दोघीच होत्या; त्यांतली एक माहेरवाशीण बहीण होती. मुलगे होते, पण मुलगी एकहि नव्हती. विज्जकनें सांगितलें–उत्सव-संकेतांत सगळया भावांची मिळून एकच बायको असते. या पांच भावांची ती बायको. मी उत्सव-संकेताविषयीं कितीतरी गोष्टी विज्जकला

विचारून घेतल्या. त्याचा संकोच गेलेला होता, म्हणून आम्ही मोकळ्या मनानें बोलत होतों.

जेवण झालें. राजाच्या स्वयंपाकघरांतलें जेवण तर इथें नव्हतें; मात्र मांस विस्तवावर भाजलेलें व मिठाबरोबर शिजवलेलें असें दोन्ही प्रकारचें होतें. त्याच्याच जोडीला, झोंपायच्या अगोदर सहा तास शिजत लावलेलें मांसमिश्रित हाडांचें गरमागरम सूप आम्हांला मिळालें. तें पितांना खूपच मजा आला. आमच्या झोंपायच्या सोईसाठीं घरांतल्या माणसांनीं जागा रिकामी करून दिलेली होती. मला वाटलें कालच्या प्रकाराची इथें पुनरावृत्ति होणार. परंतु याच वेळीं अंगाला खाज सुटूं लागली. मी खाजवूं लागलों तसतशी खाज वाढतच चालली. हात लावून पाहिला तों साऱ्या अंगावर गांधी उठल्या होत्या. मी चन्द्राला विचारलें–" काय रे, झोंप आली का ? काळजी नको करूंस. घरचं कामकाज संपविल्यावर एकादी पादसंवाहिका ( पाय चेपणारी ) नक्कीच येईल. "

" पादसंवाहिका राहूं दे तुझी; इथं तर साऱ्या अंगाला आग लागली आहे. "

" विरह-ज्वर आलाय होय ? "

" म्हणजे जय, तुझ्या अंगाला कांहींच नाहीं जाणवत ? "

" साऱ्या अंगाला सुया बोंचताहेत असं वाटतंय मला. कांहीं तरी चावलंय ! इथं झोंपायची सोय नाहीं. चल बाहेर जाऊं या. "

विज्जकला बोलावून विचारल्यावर त्यानें सांगितलें --

" आतां आपण पिसवांच्या देशांत आलों आहोंत. याच्यापुढं तर यांच्या तावडींतून जिथं जीव वांचवितां येईल असं एकहि घर बहुधा मिळायचं नाहीं. "

मी चन्द्राला विचारलें -- " काय विचार आहे ? "

" विचार काय असायचा ? पिसवांच्या भयानं आम्ही पळून जायचं होय ? "

" तसं नव्हे, रणांगणांतून पळून आलेल्या वीराला पाहून घराचं दार बंदच होत असतं. आपण बाहेरच खुल्या जागेंत कां झोंपूं नये ?" विज्जकनें एक चबुतरा झाडझूड करून साफ करून दिला. तिथें आम्ही आरामांत झोंपलों. आज आणखी अतिथि-सत्काराची आवश्यकता नाहीं असें चन्द्रानें विज्जकाला समजावून सांगितलें.

तिसऱ्या दिवसापासून आमची चाल चांगली जोरांत चालू झाली होती. आठवडा संपावयाच्या सुमारास तर आम्हीहि पहाड चढण्यांत शेर होऊन राहिलों. दिवसाकाठीं चारचार पांच पांच योजनें चालणें आम्हांला मुळींच जड जात नव्हतें. जसजसें पुढें जावें तसतसा गारठा एकसारखा वाढत चालला; मात्र आमच्या जवळ पुरेसे कपडे होते. सात दिवसांनंतर पहाडी लोकांचें साधेंसुधें मांसहि चन्द्रगुप्ताला बेचव वाटेनासें

झालें. पुढें पिसवांवर काय इलाज करावयाचा तो आम्हांला कळाला. जर नवें अगर पुष्कळ दिवस रिकामें असलेलें एखादें घर मिळालें, तर आम्ही आंत झोंपत असूं; नाहीं तर आमची पथारी खुल्या जागेंत लागत असे. आतां चढण्यामुळें थकवा वाटेनासा झाला होता. म्हणून मुक्कामाच्या जागीं पोंचल्याबरोबर झोंपून जाण्याचा प्रश्नच नव्हता. गावांतील बहुतेक नरनारी संध्याकाळीं मेरयपानानंतर एकत्र नृत्य करीत असत. त्यांच्या नृत्यमुद्रा आम्ही प्रथम शिकून घेतलेल्या नव्हत्या; मात्र त्या होत्या फारच साध्या. दोनतीन दिवस अभ्यास केल्यानंतर आम्हीहि त्यांच्या नृत्यांत सामील होऊं लागलों. विजकनें माझ्यासाठीं देवनळाची एक बांसरी तयार करून दिली होती. इकडच्या लोकांना आमच्या रागदारीची तितकीशी गोडी वाटत नाहीं असें मला दिसून आलें. म्हणून मी इकुडचींच कांहीं गाणीं शिकलों. आतां आम्हांला उत्सवसंकेतवासीयांच्या उत्सवपूर्ण जीवनाचा पूर्ण आस्वाद घेतां येऊं लागला.

आमच्या रस्त्यांत कधीं खडा चढ लागे, कधीं खडा उतार. आणि कधीं कधीं आम्हांला पर्वताच्या माथ्यावरून चालावें लागे. माथ्यावर मोठें पठार असे. तिथें अधून मधून मेंढपाळांचे तंबू आढळत. कितीतरी दिवस अम्हांला गांवां ऐवजीं या तंबूंमध्यें मुक्काम करावा लागला. पठारांवरून हिमाच्छादित शिखरांच्या रांगा दुपारीं रुपेरीं व सकाळ-सायंकाळ सोनेरी दिसत असत. आम्ही दोघे पहिल्या प्रथम तर पंधरावीस दिवसांत परत येण्याचा निश्चय करून निघालेलो होतों. परंतु आतां हिमालय अयस्कांतमणिके (लोहचुंबका) प्रमाणें आमचीं हृदयें आपल्याकडे खेंचून घेत होता. आम्हांला तो आणखी जवळून पाहावासा वाटूं लागला.

या यात्रेंतील दोन घटनांचा आम्हांला कधींच विसर पडणें शक्य नाहीं. या दोन्ही प्रसंगीं आमच्या अंगावर रोमांच उभे राहिले होते. एका प्रसंगीं आमच्या घशाला कोरड पडली होती व दुसऱ्या प्रसंगीं आम्हांला अद्भुत आनंदाचा साक्षात्कार झाला होता. हिमालयांतील नद्या अतिशय चपळ व प्रगल्भ असतात; तिथल्या स्त्रियांच्या नेमकी उलट वृत्ति असते त्यांची. त्यांचें पाणी फारच थोड्या ठिकाणीं पाण्यासारखें दिसतें. खडकांवर धडका मारमारून त्या एकीकडे घोर घर्घर नाद करीत असत, तर दुसरीकडे उकळत्या फेंसाळ दुधासारख्या त्या दिसत असत. एका जागीं आम्ही नदीजवळ पोंचलों. ओलांडण्यासाठीं तिथें ना काष्ठसेतु (लांकडी पूल) होता, ना रज्जुसेतु (दोरीचा पूल). रज्जुसेतूवरून आम्ही कांहीं वेळां नदीपार गेलों होतों. पहिल्या पहिल्यांदा तो हलतांना पाहून आम्ही थोडेसे घाबरत असूं. परंतु पुढें पुढें हात दीड हात उंचीच्या दोर बांधलेल्या लांकडी चौकटींच्या मदतीमुळें आम्हांला धीर येऊं लागला. या ठिकाणीं मात्र नदी ओलांडण्यासाठीं फक्त वल्कलांचा (झाडाच्या सालीचा) एक दोर होता व दोन्ही कांठावरील झाडांना तो बांधलेला

होता. विज्जक व इतर ओझेवाल्यांनी आपल्या पाठीवरील करंड्यातून आठआठ अंगळें लांबीची एकेक काठी काढली. काठीच्या खालच्या अंगाला दोराचा अर्धगोल भाग बसण्यायेवढी खोबण होती. आणि वरच्या अंगाला बारीक दोरी बांधण्यासाठीं खांचे केलेले होते. त्यांनीं काठी दोरावर बसविली, मग जवळच्या दोरीच्या मुदनी काठीला अडकवून दोन फांस तयार केले. मी पहात होतो येवढ्यांत हां हां म्हणतां एका ओझेवाल्यानें करंडी पाठीवर घेऊन आपले पाय फांसांत अडकवले व दोन्ही हातांनीं दोराला धरून सरासर सरकत थोड्याच वेळांत पलीकडचा कांठ गांठला. अशा प्रकारें एकामागून एक सगळयांनीं नदी ओलांडली. मी माझें हृदय चांचपत उभा होतों. माझी अवस्था मोठी कठीण झालेली होती. साऱ्या अंगावर कांटा उभा राहिला होता. काळीज थरथरत होतें. मी चन्द्राला विचारलें--" सांग बाबा, काय विचार आहे ? "

" विचार काय आहे ? पांचजण जसे नदीपार गेले तसेच आपणहि जाऊं. भय तर वाटतंयच. परंतु पहिल्यांदां असं व्हायचंच. "

विज्जकनें आमच्यासाठींहि फांस तयार करून दिला आणि दोर पकडून पुढें सरकण्याची रीत दाखविली. आपण स्वतः जास्त बेडर आहोंत असें दाखविण्यासाठीं मी चन्द्राच्या अगोदर माझे पाय फांसांत अडकवले. एकाच झटक्यांत माझे पाय डगरीवरून पुढें गेले. आतां मी खालचें प्रचंड खळखळाट करणारें पाणी व त्यांतील अगणित खडक यांच्यापासून वीस हात उंचीवर लटकत होतों. खालीं पडण्याचा परिणाम काय होईल याचा विचारहि मनांत आणण्याची हिंमत होत नव्हती. परंतु मी एकदां अधांतरी लोंबकळूं लागल्याबरोबर माझें सारें भय नाहींसें झालें. आतां दोराच्या सहाय्यानें सरकतांनाहि मला झोंपाळ्यावर झोंकें घेतल्यासारखा आनंद वाटूं लागला. पलीकडे गेल्यानंतर आम्हां दोघांनाहि आरंभींच्या घाबरगुंडीची आठवण होऊन हसूं येत होतें.

दुसरा प्रसंग होता आम्हीं देवदाराच्या वनांत पहिल्याप्रथम प्रवेश केला त्या-वेळचा. हा दुनियेंतला सर्वांत सुंदर वृक्ष. हा निसर्गलक्ष्मीचा जयस्तंभ आहे यांत संदेह नाहीं. त्याचें साधें सरळ खोड व समोरच्या बाजूला पसरलेल्या त्याच्या हजारों फांद्या. या फांद्यादेखील खालपासून वरपर्यंत लहान लहान होत होत शेवटीं या वृक्षराजाला यांच्यामुळें टोंकदार शिखराचें रूप मिळालेलें असतें. त्याच्या गर्द हिरव्या पानांवर पानझडीचा प्रभाव कधींच पडत नाहीं. त्याच्या ठायीं सदैव वसंतश्रीचा निवास असतो. खालच्या अंगाला तर वनदेवीनें सुवासिक जलानें भरलेल्या कलशांनीं साऱ्या अरण्यभूमीवर सडासंमार्जन केलें आहे असें वाटतें. शेंकडों वर्षांपासून त्याच्या पायथ्याशीं गळून सांठून राहिलेल्या सूचीपत्रांमुळें खालच्या भूमीला मऊ बिछान्याचें

स्वरूप आलेलें असतें. या प्रदेशांत गांव आढळत नाहीं. कुठें कुठें एखाद दुसरें घर आढळतें. तें बहुधा पशुपालांचें त्या त्या ठिकाणचें मुक्कामाचें स्थान असावयाचें.

ज्या दिवशीं आम्ही देवदाराचें दर्शन घेतलें त्याच दिवशीं आम्हांला पहिल्या प्रथम चमरीहि पाहावयास मिळाली. मी शुभ्रचमर राजकुलांत ( राजाच्या दरबारांत ) पाहिलेलें असल्यामुळें तें माझ्या चांगलें माहितींतलें होतें. ही चमरी म्हणजे मृगाचें ( हरणाचें ) शेंपूट असतें असेंहि मी ऐकलें होतें. चमरी बहुधा सान्या काळ्या असतात. कांहीं कांहींच्या शेपट्या शुभ्र असतात. त्याच कापून राज्यलक्ष्मीची खूण म्हणून उपयोगांत आणतात. त्या चमरी म्हशींयेवढ्या मोठ्या होत्या आणि त्यांच्या सान्या अंगावर जमिनीपर्यंत पोंचणारे काळेभोर केंस होते. पण त्या मृग जातीच्या नव्हेत. पशुपाल त्यांना गाई-बैलांप्रमाणें पाळत होते. त्या दूधहि पुष्कळ देतात. आम्ही हिम ( बर्फ ) केव्हां पाहावयास मिळेल याची विज्जकाकडून चौकशी करविली. पशुपालानें सांगितलें — " अवघड रस्त्यानं जायचं असेल तर दोन दिवसांत हिमक्षेत्रांत ( बर्फाच्या प्रदेशांत ) पोंचतां येईल. नाहींतर आठवडा लागेल. दोन महिने अगोदर आले असतां तर हीच जागा हिमाच्छादित दिसली असती. "

आम्ही दोन दिवसांचा रस्ता धरला आणि बरोबर पशुपालकांनाहि घेतलें. पशुपालकांनीं आपल्या बरोबर दोन चमरी आणल्या.

आम्ही आतां शतद्रु नदीच्या खोऱ्यांत होतों. मात्र आम्ही तिच्या पात्रापासून इतके दूर होतों कीं आम्हांला तिचें पाणीहि दिसत नव्हतें आणि तिच्या प्रवाहाचा खळखळाटहि ऐकूं येत नव्हता. पशुपालकांनीं सांगितलें कीं हिमक्षेत्रांत पोंचल्यावर तिथून दुसऱ्या बाजूला गंगेच्या खोऱ्यांतून उतरतां येतें आणि तिकडून खालीं जावयाला रस्ता आहे. शूरपणा दाखविण्यासाठीं आम्ही दोन दिवसांचा रस्ता पतकरला खरा, पण आतां आम्ही त्याबद्दल पस्तावलों होतों. दहा पावलें चाललों नाहीं तोंच असें वाटत होतें कीं काळीज तोंडांतून बाहेर येणार ! धांप लागून लागून दमछाट होत होती. आम्ही दर दहा पावलांवर थबकत होतों. आमचे जोडीदारहि तितके जोरांत चालत नव्हते. पशुपालकांनीं सांगितलें कीं या प्रदेशांत नाना प्रकारच्या विषारी वनस्पति आहेत आणि त्यांच्यामुळेंच श्वास कोंडतो. शेवटच्या दिवशीं त्यांनीं आम्हां दोघांना चमरींवर बसविलें; मग मात्र श्वास कोंडेनासा झाला. चन्द्र सांगूं लागला–" विषारी वनस्पतींच्या थापाच दिसतात यांच्या. चमरीवर बसल्यावर कां नाहीं विषबाधा होत ? "

हिमप्रदेश सुरू होण्याच्या कितीतरी अगोदरच देवदारांचें वन संपलें होतें. मात्र देवदारांचें वन एकदम नाहीं संपलें. प्रथम त्यांची जागा त्यांच्यापेक्षां अधिक सुगन्धी परंतु लहान-लहान वृक्षांनीं घेतली. या लहान देवदारजातीय वृक्षांमध्यें

अधूनमधून भोजपत्राचे ( भूर्ज ) वृक्षहि होते. यांचीं पानें सुईसारखीं ( सूचीपत्रें ) नव्हतीं; पायथ्याच्या प्रदेशांतील वृक्षांच्याप्रमाणें तीं ऐसपैस होतीं. त्याची साल दुरून पाहिल्यास हिमाच्या रंगाशीं एकरूप होऊन जात होती. आम्ही भोजपत्रावर लेखन करीत असूं. लहानपणापासूनच हीं ऐसपैस पानें आम्ही पाहात असूं. परंतु आतांपर्यंत आमची समजूत अशी होती कीं भोजपत्र म्हणजे कशाचें तरी पानच आहे. आमच्या देखतच विज्जकनें भोजपत्राच्या झाडाची हातभर लांब, वीतभर रुंद, अर्धे अंगळ जाड अशी साल काढली; मग तिचे कांहीं पापुद्रे काढले. त्यांतूनहि पातळ-पातळ असे आणखी कितीतरी पापुद्रे काढले. तेवढ्या सालींतून पंचवीस पत्रें ( भोजपत्रें ) निघालीं. इथले लोक लांकडी छपराखालीं भोजपत्राचे पापुद्रे लावून ठेवतात; म्हणजे त्यांतून पाणी खालीं गळत नाहीं. भोजपत्रावर पाण्याचा परिणाम होत नाहीं असें मी ऐकलें. उन्हांत मात्र तीं सुकल्यावर फाटूं लागतात हें मी स्वतःच पाहिलें होतें. पाटलिपुत्रांत व इतर ठिकाणींहि भोजपत्रांपेक्षां तालपत्रांचा वापर जास्त चालतो. तालपत्र जास्त मजबूत असतें हें कदाचित याचें कारण असेल. तालपत्राची पुस्तकें दोन अडीच अंगळांपेक्षां रुंद ठेवतां येत नाहींत. भोजपत्राचीं पुस्तकें भरपूर रुंद ठेवतां येतात; परंतु उलटसुलट करतांना तीं बहुधा लवकर फाटतात; म्हणूनच आमच्याकडे पुस्तकें तालपत्रावर लिहितात. तरी पण मध्यप्रदेशांत व उत्तरापथांत चिठ्ठयाचपाट्या व नेहमींच्या कामासाठीं भोजपत्राचा वापर विशेष चालतो. दक्षिणापथांत व सिंहलद्वीपांत, बहुधा हिमालयापासून फार दूर असल्यामुळें महाग पडतात म्हणून तीं वापरांत असलेलीं दिसत नाहींत. पहाडी लोकांना उन्हाळ्यांत भोजपत्राची साल काढून खालीं पाठविण्याबद्दल भरपूर दीनार मिळतात.

भोजपत्रांच्या जंगलांतहि कुठें कुठें थोडें हिम दिसलें. त्याच्या पुढें पर्वताच्या पृष्ठभागावर पिंजलेल्या कापसासारखें परंतु दाणेदार असें हिम सर्वत्र पडलेलें होतें. आमच्या साथीदारांनीं भोजपत्रांची हिरवीं पानें टोपीखालीं दडपून डोळ्यांवर लट-कावलेलीं होतीं. आम्हीहि त्यांचें अनुकरण केलें. असें केलें नाहीं तर हिमाच्या शुभ्र राशी बघून बघून डोळे दुखूं लागतात व माणसाला एक दोन दिवस दिसेनासें होतें असें ते सांगत होते. चन्द्रानें यावर मखलाशी केली-- " ही देखील विषारी वनस्पतींच्याच प्रकारची बात आहे. " पण त्यानेंहि डोळ्यांवर हिरवीं पानें लटकावून ठेवलेलीं मी पाहिलीं. विचारल्यावर त्यानें सांगितलें-- " मला दोन दिवस आंधळा होण्याचा प्रयोग करायची इच्छा नाहीं. " पर्वताच्या सर्वोच्च स्थानावर पोंचल्यानंतर आम्ही दोघे चमरींवरून उतरलों. तिथून आम्ही चहूं बाजूला नजर टाकली. उत्तरेच्या बाजूला हिमाच्छादित शिखरांची रांग पूर्वपश्चिम पसरलेली होती. इतर तीन दिशांना हिरवेगार

पर्वत असून ते क्रमशः लहानलहान होत गेलेले होते. जवळच, पर्वताच्या दोन्ही अंगाला, त्याच टोंकदार सदाहरित मंजु देवद्रुमांचें अरण्य होतें. आम्ही हिमाचा एखाददुसरा तुकडा तोंडांत टाकला; परंतु तिथें हिम खाण्याची हिंमत कसची होते ? या वेळीं पाटलिपुत्रांत कडक उन्हाळा चालू असेल, लोक घामाघूम झालेले असतील, आणि पंख्याचा अगर गर्भगृहाचा ( तळघराचा ) आश्रय घेत असतील. परंतु इथें आमच्या अंगावर खूप मोठें लोंकरीचें कंचुक व तसलेंच सुत्थनहि आहे; डोक्यावर खूप नरम व गरम केसाळ चामड्याची कानटोपी आहे. कुमारामात्यानें शकांच्या पायतणांचे दोन जोड दिले होते त्यांचा फायदा आम्हांला आतां कळूं लागलेला होता. ते जोडे जर नसते तर आमचे पाय सुन्न झाले असते. परंतु इतकी तरतूद असतांहि आम्ही गारठून जात होतों. विज्जकनें सांगितलें-- " वारा नाहीं हें सुदैवच आहे; नाहींतर नाकाच्या व गालांच्या खुल्या भागांवर गारठ्यानें चाबकासारखे निष्ठुर फटकारे लगावले असते. " मी विचार करीत होतों-- "पाटलिपुत्र अगर खलतिका यांच्याहून इथं इतका फरक कां असावा बरं ? एकाच भूमीवर कुठं भयंकर उन्हाळा तर कुठं कडाक्याची थंडी. " उतरणीला लागल्यावर जितकें खालीं जावें तितका उष्मा वाढत चालला आहे असें मला दिसून आलें. तिथें इतका गारठा आहे तो जास्त उंचीमुळें आहे हें यावरून माझ्या लक्षांत आलें. गारठा जर उंचीमुळें होतो तर सूर्याच्या जवळ गेल्यामुळें गारठा वाढला पाहिजे; मग सूर्य इतका उकाडा कां देतो ? अशा प्रकारच्या कितीतरी विचारांचें चक्र माझ्या मनांत चालू झालें.

आम्ही आतां पहाडाच्या दुसऱ्या अंगानें उताराला लागलों. खालीं जाण्यासाठीं वाहनाची जरूर नव्हती आणि आतां विषारी वनस्पतींचीहि धास्ती नव्हती. चन्द्र सांगूं लागला--"वर चढतांना मेहनत जास्त पडते, हवेचा खर्चहि जास्त होतो; तिथं हवेची कमतरता असावीसं वाटतं. " विज्जक म्हणाला--" नशीब आपलं, म्हणून आज सगळं वातावरण शांत होतं; नाहींतर वर वारा असा चालतो कीं तो माणसाला देखील उडवून लावतो. " मग तर आम्ही विषारी वनस्पतींच्या बाबतींत नक्कीच शंका घेऊं लागलों. हिमप्रदेशाच्या अखेरच्या टोंकाला पोंचल्यावर आम्ही पुन्हां एकवार उन्हांत तळपणारी हिमालयाची ती रौप्यराशि डोळे भरून पाहून घेतली आणि मग खाली उतरूं लागलों. कुठें कुठें रस्ता फारच खराब होता-- त्याला रस्ता म्हणणेंच बरोबर नाहीं; त्याची खूण अधूनमधून कुठें मिळालीच तर ती शेळयामेंढ्यांच्या लेंड्या अगर त्यांच्या खुरांच्या खुणा याच स्वरूपांत मिळे. या वरच्या पहाडांच्या प्रदेशांत आपल्या मेंढ्या चरावयाला आणणारे पशुपालक अगर भोजपत्राच्या साली काढणारे लोक हेच तेवढे येतात असें दिसतें. आम्हांला एका जागीं एक शिकारी कस्तुरी मृगाची शिकार करतांना दिसला. या मृगाच्या बेंबींत उग्र वासाची काळ्या

दाण्यांची पुरचुंडी सांपडली. कस्तुरी मृगाचें मांस आम्हांला इतर हरणांच्या मांसा-सारखेंच लागलें. परंतु त्याच्या अंगावर खूप लांब केंस होते. हे केंस दोन प्रकारचे होते. एक देवदाराच्या पानांप्रमाणें खरखरीत व सुईसारखे टोंकदार व दुसरे त्यांच्या अधेंमधें अत्यंत बारीक व मऊ. शिकाऱ्यानें सांगितलं कीं " आजकाल ही मऊ लोंकर फारच थोडी अधूनमधून शिल्लक राहिलेली आहे; थंडीच्या दिवसांत ही जाड केंसांच्या अधेंमधें अशी दाट भरून जाते कीं जशी कांहीं पावसाळ्यांत मोठमोठ्या वृक्षांच्या बुंध्यांशीं माजलेली नाजुक हरळीच." मला गांधार देशाच्या पाण्डु कंबलाची आठवण झाली. तितकी बारीक, तितकी मऊ, तितकी चमकदार लोकर तर मेंढ्यांच्या अंगावर नाहींच दिसावयाची.

त्या दिवशीं संध्याकाळीं आम्ही देवदारांच्या जंगलांत पशुपालकांच्या तंबूंत मुक्काम केला. इथेंच आम्हांला कस्तुरीमृगाचें मांस खावयास मिळालें. बरोबर आलेल्या पशुपालकांना इथूनच परत पाठवावयाचें होतें. आम्ही एकेकाला तीन तीन दीनार दिले. त्यांना मोठा संतोष झाला. ते आपल्या चमरींसह परत गेले.

आमचा रस्ता गंगेच्या खोऱ्यांतून खालीं उतरत होता. मेंढ्यांच्या पाऊलवाटे खेरीज ( अजपथाखेरीज ) तिथें दुसरा कसलाच रस्ता नव्हता. आम्हांला खालच्या वाटेनें जावयाचें आहे येवढेंच आम्हांला ठाऊक होतें. आमच्या ओझेवाल्यांपैकीं एकजण या बाजूला कांहीं वेळां भोजपत्रें व लोकर नेण्यासाठीं आलेला होता.

कांहीं दिवस उतार उतरल्या नंतर आतां आम्हांला उष्मा जाणवूं लागलेला होता. हिमाचा व देवदारांचा मागमूसहि कमी होत होता. विज्जकनें सांगितलें कीं " इथून कांहीं दुर्गम पहाड ओलांडून आम्हांला खलतिकाला जातां येईल; कनख-लचा रस्ता इथून फारच सुगम आहे." आम्ही कनखलचा रस्ता धरला. कनखलला गंगेच्या पाण्यानें अजून आपली शीतलता अजिबात गमावलेली नसली तरी या ठिकाणीं गंगा आपली पितृ-भूमि सोडून मैदानांत येऊन चुकली होती. कनखलच्या अधिकाऱ्यानें युवराजाचें व आमचें थाटांत स्वागत केलें. मग आम्हांला स्वयंपाक-घरांतलें सुस्वादु भोजन मिळालें; मग उंबरवर्णा द्राक्षी सुरेनें भरलेला काच-कुतुप ( काचेची बाटली ) आला. चन्द्रानें कुतुपाची उंच बारीक गर्दन व खालीं लटकलेले उदर हातीं घेऊन मोठ्या प्रेमानें तो आपल्या ओठाला लावला. परिचारिका गालां-तल्या गालांत हंसली. मग चन्द्रानें सांगितलें—" सुंदरी ! या अरुण-वर्णा देवीचं दर्शन किती दिवसांनीं झालंय ठाऊक आहे तुला ? जवाचं मेरय पितां पितां जीव आंबून गेला."

मी म्हणालों—" म्हणजे तुला ही यात्रा पसंत नाहीं पडली ? "

" पसंत म्हणतोस ? जय ! मी तुझा सदैव कृतज्ञ राहीन. एका तऱ्हेनं मी मनांत नसतांहि तुझ्यापायीं ओढला जाऊन या यात्रेंत सामील झालों होतों. परंतु हिमालयानं मला आपला कायमचा भक्त बनवून ठेवलं आहे. "

कनखलहून आम्ही कांहीं अंतर घोड्यावरून गेल्यावर नावेंत बसलों. खलतिकाच्या कुमारामात्याच्या नांवें एक लेख व पुरस्कार देऊन विज्जकला आम्ही रजा दिली व स्वतः पाटलिपुत्राकडे जाणाऱ्या नावेंत बसलों. तींतून आम्हांला कान्यकुब्जापर्यंत जातां आलें. कान्यकुब्जहून आम्ही दुसरी नाव घेतली. तीन महिन्यांच्या अवधीनंतर आम्ही अज्जुकासमोर उपस्थित झालों; त्यावेळीं पावसाळा संपलेला होता.

## (८)

## पाटलिपुत्रांतील शेवटचें वर्ष

आचार्य चातुर्मासासाठीं साकेतला गेले होते, परंतु प्रवारणा ( अश्विनी पौर्णिमा ) नंतर ते अशोकारामांत परत येणार होते. कित्येक महिन्यांत मी पोथीला स्पर्श केलेला नव्हता; परंतु वडिलांच्या चरणीं व हिमालयाच्या मांडीवर घालविलेले दिवस फुकट नाहीं गेले. मी आतां एक वेगळाच माणूस झालों असें माझें मलाच दिसूं लागलें. सहा महिन्यांपूर्वी मी जेव्हां पाटलिपुत्र सोडलें तेव्हां अजून मी शैशवाच्या सीमेच्या आंत होतों; परंतु आतां मी स्वतःला सर्व प्रकारें तरुण समजूं लागलों. अज्जुका माझ्याजवळ हिमालयाच्या यात्रेसंबंधीं कांहीं दिवसपर्यंत विचारपूस करीत राहिली. मी उत्सवसंकेतांतले सगळे प्रयोग तिला अर्थातच सांगितले नाहींत; मात्र ते लोक बुद्धाचा धर्म मानतात, कुठें कुठें तिकडे बौद्ध-भिक्षुहि दिसतात, या गोष्टी मी तिला जरूर सांगितल्या. ती म्हणाली— " तर मग उत्सवसंकेतांत एखादा मोठा विहार बांधावा, तिथं शेंपन्नास भिक्षूंनीं राहावं आणि लोकांस जाऊन उपदेश करावा, अशी मी संघाजवळ प्रार्थना करीन. "

अज्जुकानें मागाहून हजारों दीनार या कामासाठीं दिले. तिथें एका रमणीय स्थानीं फारच सुंदर सुगतालय व भिक्षु-आवास बांधविण्यांत आले. विहार बांधण्या-

साठीं कितीतरी प्रस्तर-शिल्पी व मूर्तिकार पाटलिपुत्र व मथुरेहून रवाना झाले. परंतु उत्सवसंकेतांत जाऊन हे भिक्षु तिथल्या धर्मानें प्रभावित झाल्याशिवाय कितपत राहिले असतील याची मला शंकाच आहे.

कार्तिकी पौर्णिमेला आचार्य अशोकारामांत आले आणि मग माझा अभ्यास सुरू झाला. आचार्यांच्या चरणांपाशीं पुढचीं अडीच वर्षं घालवून मी जितकें वाचलें व शिकलें तितकें पुन्हां आयुष्याच्या कित्येक वर्षांत मला साधलें नाहीं. दर्शनाकडे ( तत्वज्ञानाकडे ) माझा विशेष ओढा होता. आचार्यांजवळ अगोदरहि मी कांहीं पुस्तकें वाचलीं होतीं परंतु त्यांचें विशाल दर्शन-ज्ञान मात्र आतांच मला आकलन होऊं लागलें. मी या ज्ञानाला पात्र आहे हें त्यांनाहि कळूं लागलें; म्हणून ते मला मनापासून शिकवीत असत. यवन ( ग्रीक ) दार्शनिकांची प्रशंसा ऐकून एक दिवस मी त्यांना विचारलें— " यवनांत देखील दार्शनिक झालेले आहेत ? "

" फारच मोठमोठे दार्शनिक. हेराक्लितु [ हेराक्लिटस –( इ. पू. ५३५-४२५ ) ], देमोक्रितु [ डिमॉक्रिटस· ( इ. पू. ४६०-३७० ) ], सुक्रात [ सॉक्रेटिस - ( इ. पू. ४६९-३९९ ) ], प्लातो [ अफलातूं-प्लेटो- ( इ. पू. ४२७-३४७ ) ], अरिस्तात [ ॲरिस्टॉटल- ( इ. पू. ३८४-३२२ ) ], यांच्या सारखे मोठमोठे दार्शनिक आजच्या कितीतरी अगोदर होऊन गेले आहेत. "

' आमच्या इकडे जे कित्येक बौद्ध, ब्राह्मण दार्शनिक होऊन गेले त्यांच्यापेक्षांहि ते मोठे होते ? "

" तुलना करून कुणाच्याहि बाबतींत ' होय ' अगर ' नाहीं ' असं एका शब्दांत सांगतां येत नाहीं. कित्येक बाबतींत ते खात्रीनं मोठे होते. आमच्या इकडचे प्राचीन दार्शनिक शुद्ध दर्शनाविषयीं फार मागाहून लिहूं लागले आहेत; आणि तेहि यवन दार्शनिकांचे विचार भारतांत आल्यावर मगच. "

" म्हणजे आपण यवन दार्शनिकांचे ऋणी आहोंत असाच याचा अर्थ ना ? "

" यांत संदेह नाहीं; मात्र आजचे ब्राह्मण हें मान्य करायला कबूल नाहींत. "

" तरी सुद्धां त्यांनीं कितीतरी गोष्टी घेतलेल्या आहेत. "

" अर्थात. ब्राह्मणी सुवर्णाक्षीचा कुसवा पवित्र करून भदन्त अश्वघोषांनीं साकेतांत जन्म घेतला त्याला सुमारें तीनशें वर्षं होत आलीं. कनिष्काच्या सेनापतीनं गंधारला घेऊन जाण्यासाठीं मगधाच्या भिक्षुसंघाकडून एका महाविद्वानाची मागणी केली. गंधार देशांत जाऊन यवन-दर्शनाचं पूर्ण ज्ञान प्राप्त करून घेऊन त्यांच्या पुष्कळशा गोष्टी स्वीकारणारी पाहिली व्यक्ति भदन्त अश्वघोष हीच होती. "

" कोणकोणते दार्शनिक त्यांना विशेष आवडले ? "

" ज्या दार्शनिकांची नामावळी मी आतांच सांगितली तेच. जो सिद्धांत आम्हांला बुद्धाच्या तत्वज्ञानांत आढळतो, त्याच सिद्धान्ताचा प्रचार हेराक्लितु यवन-देशांत करीत होता. दुनियेंत कोणतीहि वस्तु स्थिर नाहीं, परिवर्तन हेंच दुनियेचं सार आहे, आपण एकाच धारेंत दोनदां उतरत नाहीं, दुसऱ्या क्षणीं आपण त्याच धारेंत उभे राहिलों तरी धारेंतला प्रत्येक थेंब ती जागा सोडून गेलेला असतो,--हा सिद्धान्त तो सांगत होता. देमोक्रतूनं धारेचं परिवर्तन तर मान्य केलं, परंतु तो बिन्दु स्थिर आहे असं मानीत असे. "

" बिन्दु कसला ? "

" बिन्दु ही एक उपमा समज. धाराच काय, वीट, दगड, काच, मणि, या सर्वांमध्यें परिवर्तन तर चालूच असतं. परंतु या सगळया वस्तु ज्या अत्यन्त सूक्ष्म परमाणूंच्या ( कणांच्या ) बनलेल्या असतात ते सदैव एक-रस ( एकाच गुणधर्माचे ) राहतात. "

" म्हणजे त्यानं जगतांत स्थिरता व अस्थिरता या दोन्ही प्रवृत्ति मान्य केल्या. "

" परंतु प्लातो जड परमाणूंना विश्वांतले सूक्ष्मतम कण म्हणून मान्य करीत नाहीं. तो सांगतो कीं अंतिम कण म्हणजे विज्ञान चेतना ( ज्ञानाची जाणीव ) हीच होय. "

" म्हणजे तो विज्ञान नित्य ( स्थिर ) आहे असं मानतो काय ? "

" होय. विश्वाचं मूळ कारण विज्ञान असतं या प्लातोच्या मताशीं माझे वडिल बंधु असंग सहमत आहेत. परंतु त्याच बरोबर ते ' सर्वं अनित्यम् ' हा बुद्धाचा सिद्धान्तहि मान्य करतात. "

" म्हणजे विश्वाच्या अन्तस्तलांत ( गाभ्यांत ) विज्ञान-धारा प्रवाहित झालेली आहे असं मानायचं काय ? "

" ती विज्ञान-धाराच विश्वाच्या रूपांत व्यक्त झालेली आहे, याच मुद्यावर असंग विशेष जोर देतात. भदन्त अश्वघोषांनीं परमाणु-सिद्धान्त व्यवहाराच्या स्वरूपांत मान्य केला; परमार्थाच्या ( वास्तविक ) स्वरूपांत त्यांनीं विज्ञान-प्रवाह हेंच मूलतत्व मानलें. असंगांनीं त्याच विज्ञान-दर्शनाचा आणखी स्पष्ट स्वरूपांत प्रचार सुरू केला. "

" अन् सुक्रात, अरिस्तात, यांचं काय ? "

" सुक्रातचे सिद्धांत आपल्याला त्याचा शिष्य प्लातो याच्या ग्रंथांतूनच माहीत करून घ्यावे लागतात; त्यानं कसलंच पुस्तक लिहिलेलं नाहीं. तथागतांनींहि कसलंच पुस्तक लिहिलेलं नाहीं. त्यांच्या मुखांतून निघालेल्या गाथा तोंडपाठ करून लोकांनीं शेंकडों वर्षंपर्यंत त्यांचे उपदेश राखले. "

" म्हणजे हे जे दीर्घ-आगम, मध्यम आगम, इत्यादि ग्रन्थ आढळतात, ते बुद्धानं लिहिलेले नव्हेत ?"

" बुद्धानं कोणताहि ग्रंथ लिहिलेला नाहीं."

" म्हणजे पुष्कळशा नंतरच्या गोष्टीहि त्याच्या नांवानं या ग्रंथांत आलेल्या असणार ?"

" हें तर नक्कीच. अजूनहि विनय--भिक्षु-भिक्षुणींचे आचारनियम--तोंडींच पढविले जातात."

" बुद्धाच्या काळीं हे ग्रंथ लिहिले गेले नाहींत ?"

" त्या काळीं ग्रंथ फारच थोडे लिहिले जात होते. अन् तुला ठाऊक आहे ? बुद्ध ठीक दृष्टि ( दर्शन ) देऊं इच्छीत होते. म्हणून त्यांनीं असंहि सांगितलं कीं ' माझं बोलणं माझा गौरव करायच्या भावनेनं मानूं नका; जें तुमच्या अनुभवाच्या व बुद्धीच्या कसोटीवर खरं ठरेल तेंच माना.' मग वयाच्या ४४ व्या वर्षापर्यंत ते यौधेय भूमीहून अंगभूमीपर्यंत दौरे करीत राहिले, लोकांच्या प्रश्नांचीं उत्तरं देत व शंकांचं समाधान करीत राहिले; हें सगळं लिहून कसं होणार होतं ?"

" म्हणजे त्यांचं जीवन हाच ग्रंथ होता."

" त्यांचा ४४ वर्षांचा जीवन-ग्रन्थच आम्हांला या सूत्र-विनय व अभिधर्म-पिटकांच्या रूपानं दिसतोय."

" अन् हेच ग्रंथ शेंकडों वर्षेपर्यंत तालपत्रावर अगर भोजपत्रावर लिहिलेलेच नव्हते."

" होय ना. म्हणून तर आपल्या समोरच्या पिटकांतलं प्रत्येक अक्षर बुद्धाच्या मुखांतूनच निघालेलं आहे असं आपल्याला हमखास सांगतां येत नाहीं. त्याच बरोबर बुद्धाचीं वचनं हे ग्रंथ सोडून इतरत्र कुठं मिळालींच नसतीं हेंहि तितकंच खरं आहे."

" त्या काळीं भाषा देखील निराळीच असेल ?"

" अशोकाच्या लेखांची भाषा तूं वाचली आहेस; ती सुमारें पांचशें वर्षांपूर्वीची आहे. भगवान बुद्ध त्याच्याहि अडीचशें वर्षे अगोदर होऊन गेले. म्हणून तिच्यांत आणखी कांहींतरी वेगळेपणा असणार असं आपल्याला अनुमान करतां येतं."

" परंतु भन्ते ! आज जो पिटक ग्रंथ आहे, त्याची भाषा तर गांवठी संस्कृत सारखी आहे !"

" होय. सर्वास्तिवादींच्या पिटकांची भाषा संस्कृत आहे. आणखीहि कितीतरी बौद्ध निकाय ( संप्रदाय ) असे आहेत कीं त्यांच्या पिटकांची भाषा संस्कृतच आहे.

परंतु सिंहलद्वीपांतल्या बौद्धनिकायाच्या पिटकाची भाषा प्राचीन कोसली ( पाली ) आहे. "

" म्हणजे ज्या भाषेंत बुद्धानं उपदेश दिलेला होता तीच भाषा त्यांनीं संभाळून ठेवली, असंच ना ? "

" जशीच्या तशी संभाळून ठेवणं तर शक्यच नाहीं; कारण त्यांच्या देशांतहि शेकडों वर्षेपर्यंत पिटक तोंडपाठच ठेवीत असत; परंतु मला वाटतं ती भाषा बुद्धाच्या भाषेला पुष्कळच जवळची आहे आणि त्यांचे पिटक बुद्धवचनाशीं पुष्कळच जुळणारे आहेत. "

" म्हणजे अशाच तऱ्हेनं सुक्रातच्या उपदेशांचाहि संग्रह करण्यांत आला ? "

" सुक्रातला तर विष प्यायला लावून त्याचा जीव घेण्यांत आला हें तुला ठाऊकच आहे. राज्य त्याचा शत्रु झालं होतं. "

" आचार्य ! त्या वेळीं राजा कोण होता ? "

" अजून अथेन्स नगरींत राजतन्त्र यायला अर्ध्या शतकाचा अवधि होता. "

" म्हणजे गणतन्त्रवाल्यांनीं सुक्रातचा खून केला ? "

" हा दोष गणतन्त्राचा नव्हता; त्यांतल्या धनिक सत्ताधाऱ्यांचा दोष होता हा. "

" होय आचार्य. गणतन्त्रांत धनिकांचं प्रस्थ वाढणं म्हणजे त्याला धोका हा ठेवलेलाच. "

" सुक्रातच्या काळांत देवी-देवता व धर्माच्या नांवावर ज्या शेंकडों कहाण्या व मिथ्या-विश्वास ( लोकभ्रम ) पसरविले जात होते त्यांना त्यानं बालिश बडबड असं नांव दिलं आणि लोकांना बुद्धिवादाचा मार्ग दाखविण्याची इच्छा धरली. अथेन्सच्या धनिकांनीं व त्यांच्या धनानं खरीदलेल्या गणसदस्यांनीं ही धोक्याची गोष्ट आहे अशी समजूत करून घेतली; कारण अथेन्समध्येंहि धनी कोण व गरीब कोण याची व्याख्या देवतांच्या न्यायानुसार केली जात असे. "

" अर्थात त्यांना असं वाटूं लागलं कीं जर देवतांवरचा लोकांचा विश्वास उडाला तर थंडी उन्हाळ्यांत रक्ताचं पाणी करून धनाची पैदास करणारे दास कर्मकर व किसान-शिल्पी उपाशी राहून हे राजप्रासाद, पुरोहितप्रासाद, श्रेष्ठिप्रासाद जाग्यावर राहूंच देणार नाहींत. "

" मात्र ही गोष्ट त्यांना स्पष्टपणानं सांगतां येत नव्हती. लोकांच्या हृदयांत देवतांविषयीं अंधश्रद्धा होती. त्यांनीं सांगून टाकलं -- ' सुक्रातनं आमच्या देवतांचा अपमान केला. तो अधर्मी आहे, तो आमच्या साऱ्या तरुणांना अधर्मी बनवून ठेवील' . "

" अन् मग सुक्रातला विषाचा कडू प्याला देण्यांत आला ? "

" सुक्रातनं मोठ्या प्रसन्न मुद्रेनं तो कडू प्याला पिऊन टाकला. "

" परंतु सुक्रातच्या खुनाचा बदला घेण्यांत आला नाहीं ही अत्यंत लज्जास्पद गोष्ट म्हटली पाहिजे. "

" अजून बदला घ्यायचा राहिलेलाच आहे. "

" परंतु विष पाजणारे तर आतां हयात नाहींत. "

" तूं असं समजतोस कीं गणसंस्थेच्या अमुक अमुक सदस्यांनीं सुक्रातची हत्या केली. सुक्रातच्या प्रमाणं समज आमच्या इथंहि कोणी असं सांगूं लागला-- ' या साऱ्या देवी-देवता खोट्याच आहेत, त्यांच्या न्यायाचं नांव सांगायचं अन् मेहेनत करणाऱ्यांची कमाई लुटून धनी बनायचं. हा घोर अन्याय आहे. याच्या ऐवजीं आपण असा गण स्थापन करायला पाहिजे कीं ज्यांत हा श्रीमंत हा गरीब असा भेदच नाहीं. सगळ्यांनीं आपल्या योग्यतेनुसार काम करायचं अन् खाणं-कपडा व इतर आणखी गोष्टी जेवढ्या आवश्यक असतील तेवढ्या त्यांना मिळायच्या. "

" सुक्रातचं सांगणं असं होतं म्हणतां ? "

" सुक्रातनं कोणताच ग्रंथ लिहिलेला नाहीं हें तर मी सांगितलेलंच आहे. परंतु त्याचा शिष्य प्लातो यानं 'गण' [ ' रिपब्लिक ' = ' आदर्श राज्यघटना ' ] या नांवाचं एक पुस्तक लिहिलं आहे अन् त्यांत आपल्या गुरूचे हे विचार मांडलेले आहेत. "

" गणांचे दोष सुक्रातला माहित होते. मलाहि यौधेयांमध्यें असले दोष दिसतात. मीहि जर अग्रोदकाचा सुक्रात व्हायला लागलों तर सुक्रातची जी गत झाली तीच माझी होणार. "

" याला कारण हें धन आहे. हें जमा करण्यासाठीं माणूस सगळं कांहीं करतो. शिल्पी, किसान व कमकरांची कमाई लुटणं म्हणजेच धर्म असं गण देखील मानतो. राजतंत्र तर त्याच्याहि दहा पावलं पुढंच आहे. सुक्रातनं सांगितलं कीं ज्यांच्या जवळ स्वतःची कसलीहि संपत्ति नसेल, ज्यांना स्वतःची अशी कुणी स्त्रीहि नसेल, अशाच लोकांना गणसंस्थेचे सदस्य होऊं यावं, अशांच्याच हातीं राजकाजाचा लगाम सोंपवावा."

" भन्ते ! स्त्रीहि नसावी याचा मतलब काय आहे बरं ? राजकाज चालवायची कामगिरी भिक्षूंच्या हातीं सोंपवावी अशी का सुक्रातची इच्छा होती ? "

" नाहीं, कुणाला भिक्षु करायची त्याची इच्छा नव्हती. तो अलग स्त्री ठेवायच्या विरुद्ध होता. त्याचं म्हणणं असं होतं कीं अलग स्त्री आली कीं अलग मुलं आलींच, अन् त्यांच्यासाठीं बाप पक्षपात करणार अन् आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करणार. म्हणूनच त्यानं असं सांगितलं कीं गणसंचालकांचं सारं कांहीं समाइक असावं; घरदार अन् पत्नी देखील. "

" म्हणजे सुक्रातचेहि असे विचार होते ! मीहि आत्तां येवढ्यांतच उत्सवसंकेतांत समाईक पत्नी पाहून आलोंय. "

" उत्सवसंकेतांतले लोक अजून बरेच मागासलेले आहेत. ते जर यौधेय गण अगर पाटलिपुत्राइतक्या दर्जाला पोंचले व त्यांनाहि जर धन जमा करायचा मोका मिळाला, तर तिथंहि ही गोष्ट अशीच चालू नाहीं राहणार. "

" म्हणजे सुक्रात दुनियेला चांगली करूं इच्छीत होता, स्वार्थी लोकांना ही गोष्ट स्वतःच्या दृष्टीनं हानिकारक वाटत होती, अन् म्हणून त्यांनी त्याला या दुनियेंतून नाहींसा केला असंच यावरून दिसून येतं. "

" परलोकाला चांगला करायचा प्रयत्न करा, पुढचा जन्म चांगला मिळेल अशी खटपट करा; म्हणजे गणाचे धनिक प्रमुख, राज्याचे परमभट्टारक, ब्राम्हण व श्रेष्ठी तुमच्यावर दीनारांचा वर्षाव करतील; परंतु जर का तुम्ही हीच दुनिया चांगली करायची खटपट केलीत तर मात्र जी गत सुक्रातची झाली तीच तुमची होणार. "

" परंतु भन्ते ! जेवढे दीनार ते दान-पुण्यांत खर्च करतात, तेवढ्यांनींच दुनिया चांगली करायची खटपट ते कां नाहीं करीत ? "

" तेवढ्यानं कांहीं जमण्याजोगं नसतं. असं समज कीं परमभट्टारकाची प्रजा तीन कोटि आहे. तीन कोटि दीनार वांटून टाकले तर एकेक दीनार हातीं येईल, तेवढ्यांत एका माणसाचं काय भागणार ? अन् तीन कोटि प्रजेला धन वांटून द्यायसाठीं राजाला हस्तिदताच्या व पाचूच्या सिंहासनाऐवजीं चटईवर बसावं लागेल; अन्तःपुर व त्यांतले सगळे विलास बंद करावे लागतील; शेंकडों सूपकारांना व त्यांच्या विविध प्रकारच्या भोजनांना कायमची रजा द्यावी लागेल. तीन कोटि दीनार जमा करून वांटायसाठीं केवढी तरी तपस्या करावी लागते, अन् तिचं फळहि तितकं स्पष्ट दृष्टीस पडत नाहीं; यापेक्षां तीन कोटि नव्याण्णव लक्ष आपल्या कामासाठीं राखून ठेवावेत अन् शतसहस्त्र ( एक लक्ष ) दीनार खर्चून देवालय, चैत्य, बांधावेत, ब्राम्हणांना दानं द्यावींत, यज्ञ करावेत, हें जास्त बरं नव्हे का ? मग हे सगळे लोक परमभट्टारकाचा जयजयकार करतील. हरिषेण लांबलचक प्रशस्ति लिहील व ती पाषाणस्तंभांवर कोरवून घेऊन शिलालेख उभारील. "

" अन् परमभट्टारकाला धर्मराज ह्मणूं लागतील. "

" दुनिया चांगली करणं अगर परलोक चांगला करणं या दोहोंपैकीं जास्त सोपं काम कोणतं हें तूं पाहिलंसच आतां. "

" अन् ज्या श्रमण-ब्राह्मणांच्या पदरांत दान-पुण्य पडेल ते तर 'परमभट्टारकांना आपल्या तपस्येचं फळ भोगायला मिळत आहे 'असं नक्कीच सांगून मोकळे होतील; अन् दरिद्री प्रजा अन्न-धन पैदा करूनहि आपल्या पूर्वकर्मामुळं दुःख भोगत आहे

असंहि सांगायची त्यांना दिक्कत वाटणार नाहीं. लाठीहि नाहीं चिंबली अन् सापहि मेला. "

आचार्य गालांतल्या गालांत हंसून म्हणाले—"वत्स जय ! तुला माझं बोलणं चांगलं समजेल. मला म्हतारपणीं तूंच तेवढा एक चांगला विद्यार्थी मिळालास. मी गंधारहून निघालों होतों तो या उद्देशानं कीं एखादं राजकुल हातीं धरावं. कुणातरी होतकरू राजकुमाराला शिकवून तयार करावं; अन् मग तो सारी शक्ति खर्चून ही दुनिया चांगली करील. माझ्या सहाशें वर्षं अगोदर अरिस्तातनं अशा प्रयत्नांत अपेश पदरीं घेतलं हें मला ठाऊक होतं; परंतु दुनियेंत लोक पुन्हां पुन्हां त्याच चुका करतात. "

" अरिस्तातनं काय केलं होतं ? "

" अरिस्तात हा प्लातोचा शिष्य. प्लातोनं आपल्या डोळ्यांदेखत आपल्या गुरूचा खून झालेला पाहिला होता. त्याला गुरूच्या खुनाचा बदला घ्यायला हवा होता. "

" खुनाचा बदला खून ? "

" खुनाचा बदला खून ही अदूरदर्शी लोकांची रीत झाली. मी तुला आधींच नाहीं कां सांगितलं ? सुक्रातप्रमाणं जर तूं यौधेयांमध्यें जाऊन दुनिया चांगली करायच्या उद्योगाला लागलास अन असं जर सांगूं लागलास कीं ' इतरांच्या कमाईचं गांठोडं बांधून त्याच्यावर ऐटींत बसलेल्या धनिकांना खालीं ओढा,' तर तुलाहि विषाचा प्याला प्यावा लागेल. अन् जर कुणा परमभट्टारकाच्या राज्यांत तूं तोच उद्योग करूं लागलास तर तो तुला इतकं सुखाचं मरण मिळूं देणार नाहीं; तो तुझ्या अंगाचे एकेका अंगळायेवढे तुकडे काढकाढून वर मीठ चोळचोळून तुला मारील. "

" हें मान्य आहे मला. "

" प्लातोनं या धनाच्या विषमतेचे एकेक परिणाम पाहिले; धनामुळं प्रभुता येते, प्रभुता आली कीं तिच्या जोरावर अधिक धन लुटायला अवसर मिळतो; अन् त्यांच्या मार्गांत अडथळा आणणारांच्या माथ्यावर वज्रपात. या सर्वांवर औषध एकच–तें म्हणजे संपत्तीच्या बाबतींत तुझं-माझं हा भेदभाव ठेवायचाच नाहीं. त्यानं आपली सारी हयातभर याच्यासाठीं खटपट केली, याच्याचसाठीं त्यानं आपला ' गण ' हा ग्रंथ लिहिला. सुक्रातच्या खुनाबद्दल पुष्कळशा लोकांना पश्चाताप झालेला होता; कारण गणसंस्थेचे सगळेच सदस्य कांहीं धनिक नव्हते. म्हणूनच प्लातोवर विष प्यायचा प्रसंग आला नाहीं. अरिस्तातनं आपल्या गुरूचा व परात्परगुरूचा उद्देश पूर्ण करायसाठीं असा विचार केला-- ' कुणातरी होतकरू राजकुमाराला शिक्षण देऊन मी असा तयार करीन कीं तो आमचं काम पार पाडील; हें जर साधलं तर आमचं काम अगदीं सहज होऊन जाईल. ' हाच उद्देश मनांत धरून तो फिलिप राजाचा मुलगा अलिक सुन्दर ( सिकन्दर=अलेक्झांडर ) याचा गुरू झाला. परंतु

अलिकसुन्दर दुनिया चांगली कसची करतो ! त्यानं दुनियेचा फार मोठा भाग रक्तानं रंगवून ठेवला. "

" म्हणजे भन्ते ! गणसन्तानाच्या बाबतींत थोडीतरी आशा धरतां येईल; परंतु राजकुमाराच्या बाबतींत कसची आशा धरणार ? राजान्तःपुर व राजे लोकांचं स्वार्थ-पूर्ण नीच जीवन जो लक्षांत घेत नसेल त्यानंच ही आशा धरावी. "

" माझ्याप्रमाणंच अरिस्तातलाहि या जीवनाचा परिचय नसेल असंहि शक्य आहे. "

" भन्ते ! मला वाटतं खुनाचा बदला खुनानं घेणं ही सोपी गोष्ट होती. परंतु सारं जाळं तोडून फेंकून देणं हें एका व्यक्तीच्या आवांक्यांतलं काम नव्हे; अन् पुष्कळशा व्यक्तींनीं एकजूट करूनहि एका पिढींत हें काम होण्याजोगं नाहीं. "

" तरी सुद्धां आपण जें उचित आहे तेंच करायला हवं. "

" अर्थात् बहुजनहिताय. "

" होय. जे बहुजनहिताय बहुजनसुखाय असेल तेंच. तुला ठाऊक आहे ना ? तथागतांनीं आपल्या प्रथम शिष्यांना हाच संदेश देऊन दुनियेंत रवाना केलं होतं— ' चरथ भिक्खवे चारिकं बहुजनहिताय बहुजनसुखाय.' "

" परंतु भन्ते ! त्यांचा उद्देश सफल कां बरं झाला नाहीं ? "

" सगळींच कारणं कांहीं मला सांगतां येत नाहींत. परंतु प्रकार असा झाला: तथागतांनीं भिक्षुसंघांतली अंतर्गत ' माझं-तुझं ' ही भावना काढून टाकायसाठीं खूप कडक नियम केले. ते नियम आतांहि विनय-पिटकांत दिलेले आढळतात; परंतु तथागतांच्या निर्वाणाला शंभर वर्षं झालीं असतील नसतील येवढ्यांतच भिक्षुसंघांत ' माझं-तुझं'ची भावना पुन्हां घुसली. जिथं तथागतांनीं फक्त अंगावरचे कपडे व सुई, वस्तरा, भिक्षपात्र, इत्यादि दोन चार वस्तू सोडून बाकीची भिक्षूंची सारी संपत्ति ही संघाची समाईक मालमत्ता असावी असा आदेश दिला, तिथं आतां भिक्षु लोक सुवर्ण व पण जमा करून आपसांत वांटून घेऊं लागले. जोंपर्यंत आसपासची दुनिया ' माझं-तुझं ' च्या भावनेंत रुतून बसली आहे तोंपर्यंत तींतूनच आलेल्या मूठभर भिक्षूंना या भावनेपासून अलिप्त कसं राहतां येणार ? "

" भन्ते ! आतां तर भिक्षूंमध्यें श्रीमंत-गरीब हा भेदहि दिसूं लागला आहे. "

" होय. भिक्षुसंघाच्या बाबतींत तथागतांनीं जी आशा धरली होती ती फळाला आली नाहीं. "

" म्हणजे भन्ते ! दुनियेच्या बाबतींत आतां कसलीच आशा राहिली नाहीं म्हणायची ! "

" निराशा हें जिवंतपणाचं लक्षण नव्हे. अपयश हेंच दर्शवतं कीं या कामा-साठीं आणखी पिढ्या खर्ची पडायची आवश्यकता आहे, आणखी साधनांची आव-श्यकता आहे. "

पुढच्या अडीच वर्षांत मी आपल्या अभ्यासांत अधिक तत्परता दाखवीत होतों इतकेंच नव्हे तर आचार्यहि आपलें हृदय उघडें करून दाखवायला केव्हांहि तयार असत. अशानें आपल्या हृदयावरचा भार हलका होईल असें त्यांना वाटत असावेंसें दिसत होतें. त्यांचा सर्वांत जास्त वेळ मीच घेत होतों. कितीतरी वेळां ते पाटलि-पुत्राहून मला बरोबर घेऊन राजगृहाला जात असत. तिथें आम्ही गृध्रकूटावर राहत असूं. एके दिवशीं आचार्य गृध्रकूटाच्या मोठ्या शिलेवर उभे होते. त्यांच्या सुगौर देहावर एकांस ( डावा हात खुला ठेवून ) अरुण चीवर विराजत होतें. त्यांच्या डोळ्यांमध्यें करुणा व चिन्ता, आशा व वेदना या भावनांची अद्‌भुत छाप दिसत होती. त्यांनीं उजवा हात लांब करून पांच पहाडांनीं वेढलेली ओसाड भूमि दाखवीत सांगितलें --" वत्स ! हीच ती जागा; इथं एका काळीं एक महानगरी वसलेली होती. कितीतरी बाजार पेठा, चौक व वीथि इथं होत्या; धनिकांचे सुन्दर सुन्दर महाल, त्यांचे सजवलेले वाडे इथं होते. त्यांमध्यें साजशृंगार केलेल्या कामिनी कोकिल-आलाप करीत असत. इथंच या दक्षिणेकडल्या टोकांला राजा बिम्बसारचं अन्तःपुर होतं; जसं पाटलिपुत्रांत परमभट्टारकाचं, पुरुषपुरांत देवपुत्रशाहीचं, तसंच हेंहि होतं. आज यांपैकीं कशाची कांहीं खूण तरी जाग्यावर आहे का ? "

" नाहीं आचार्य. कामिनींच्या कोकिल कंठाऐवजीं इथं संध्याकाळ पासूनच कोल्हेकुई ऐकायला मिळते. "

" याच बिम्बसारला त्याचा पुत्र अजातशत्रु यानं तुरुंगांत घातलं अन् त्याला हाल हाल करून मारलं. कां ? राज्यासाठीं, भोगासाठीं. त्यानं परलोकाची, पुनर्ज-न्माची, कसलीच पर्वा नाहीं केली. "

" धनिकांच्या व प्रभूंच्या बाबतींत परलोकवाद, पुनर्जन्मवाद, हे हत्तीच्या दांतांसारखे ठरतात; दाखवायचे निराळे अन् खायचे निराळे. भन्ते ! बौद्ध लोक देखील परलोक व पुनर्जन्म मानतात. परंतु मला तर असं वाटतं कीं परलोकवाद व बहुजनहिताय या दोहोंची सांगड जमायची नाहीं. "

" म्हणजे वत्स ! तुझा परलोकावर विश्वास नाहीं ? "

" मी तर परलोकवाद व पुनर्जन्मवाद हे विश्वास व अविश्वास या दोहोंच्या पलीकडचे आहेत असं मानतों. "

" तसं नको जय ! निःसंकोच सांग बरं ? "

" भन्ते ! आपल्यापुढं मी संकोच नाहीं धरत. आपण माझा संकोच काढून टाकलेला आहे. परलोकवादाच्या विचारांत एक क्षणहि खर्च करणं हा मी आयुष्याचा अपव्यय समजतों; अन् जो कोणी असा अपव्यय करीत असेल त्याला मी अडाणी, धूर्त अगर वेडा समजतों. "

" फारच कठोर शब्द वापरतो आहेस जय ! "

" आचार्य ! परलोकवाद म्हणजे एक धोकेबाज पडदा आहे. याच्याच आड राहून बहुजनांच्या जीवनाला नरकाची कळा आणण्यांत आली आहे; हजारांतल्या नऊशें नव्याण्णव लोकांना मेंढरं बनविण्यांत आलंय, अन् राहिलेला एक हा सगळयांचं रक्त शोषण करणारा वाघ झालाय. मी केवळ बहुजनहिताय असंच काम मान्य करतों. परलोकवाद हा एक रूप या नात्यानंच तेवढा मला मान्य आहे. "

" हें रूप काय आहे, वत्स जय ? " हा प्रश्न विचारून आचार्य गालांतल्या गालांत हंसले.

" पुत्र हा पित्याचा परलोक; पुत्र हा पित्याचा पुनर्जन्म. पिता हा मरायच्या अगोदर आपल्या शरीरांतून आपल्या मानसिक व शारीरिक संस्काराचा एक अंश मातेच्या शरीरांत स्थापित करतो. माता त्यांत आपला अंश भरीला घालते व नऊ महिने त्याला गर्भाशयांत ठेवून त्याला शिशूच्या रूपानं पुढच्या लोकाच्या, पुढच्या पिढीच्या स्वाधीन करते. यातलाच मी परलोक मानतों. या परलोकाचा मी पक्षपाती आहें. "

" अन् या परलोकासाठीं आपल्याला मेल्यानंतर येणाऱ्या आणखी कसल्या तरी परलोकाकडे लक्ष द्यायची जरूर नाहीं, असंच कीं नाहीं ? "

" होय भन्ते ! असा परलोक पतकरण्यांत कुणाला धोका द्यायची जरूर नसते. असा परलोक मान्य करून आम्ही याच दुनियेला चांगली करूं. "

" जय ! तुझे विचार सुन्दर आहेत. मी माझ्या अभिधर्मकोषांत ब्राह्मणांच्या आत्मवादाचं--आत्मा ही नित्य सनातन वस्तु आहे या मताचं--खंडन करतांना लिहिलं आहे कीं आत्मा नित्य असावा ही लालसा मरणाला भिण्याच्या प्रवृत्तींतून निर्माण झाली आहे; ही प्रवृत्ति अत्यंत हीन स्वार्थान्धतेची व भेकडपणाची निदर्शक आहे. जो क्षुद्र लोभांत व भेकडपणांत रुतून बसला, त्याला मुक्ति कसची मिळवितां येणार ? त्याला निर्वाण कसचं प्राप्त करून घेतां येणार ? "

" आपण बरोबर सांगितलंत, आचार्य ! मीहि परलोकवाद व पुनर्जन्मवाद हेहि असल्याच क्षुद्र स्वार्थान्धतेचे व भेकडपणाचे निदर्शक समजतों. मी कधींच मरूं नये, अन् या मरणाच्या भयानं, मेल्यानंतरहि मी जिवंतच राहीन अशी कल्पना करून घ्यावी, हा केवढा महाग सौदा आहे बरं ? जर पुनर्जन्मावरच्या या विश्वासानं

लोकांचे हात-पाय व मनं जखडून ठेवलेलीं नसतीं तर हजारांतली नऊशें नव्याण्णव जनता आपल्यापुढं वाढून ठेवलेलं ताट एकाच माणसापुढं सारून स्वतः उपाशी मेली नसती; अन् भुकेकंगाल व उघड्या वाघड्या लोकांच्या मेहनतीनं, त्यांचं रक्त सांडून व त्यांचीं हाडं पिसून निघून मोठमोठे प्रासाद तयार झाले नसते. ”

“ साधु ! वत्स ! साधु ! मीं बुद्धाच्या तत्वज्ञानांत भर घालायसाठीं पुष्कळसं लिहिलं आहे. परंतु परलोकवाद व निर्वाणवाद यांच्या समर्थनार्थ मी जो युक्तिवाद केलाय तो माझा मलाच अत्यंत लेचापेचा वाटत होता. जर कोणताहि नित्य सनातन आत्माच तथागतांनीं मानला नसता तर निर्वाण कशाचं होणार ? आतां दीप-निर्वाणाप्रमाणं जीवन-निर्वाण म्हणजे जीवन-ज्योत विझून जाणं असाच जर अर्थ घेतला, तर मग आम्हांला निर्वाणाकडे व त्या नंतरच्या गोष्टीकडे काडीइतकंहि लक्ष द्यायची आवश्यकता नाहीं; लक्ष जर द्यायचंच असलं तर निर्वाणाच्या अगोदर अस्तित्वांत असलेल्या जीवनाकडेच लक्ष दिलं पाहिजे. ”

“ भन्ते ! पुनर्जन्म या देहावरूनच सिद्ध होतो हें आम्हां सगळ्यांना ठाऊक आहे. जे आम्ही शैशवांत होतों तेच आतां तारुण्यांत राहिलेलों नाहीं. मनुष्य दर क्षणाला मरतो व नवा जन्म घेतो. दुनियेंतल्या हरएक वस्तूप्रमाणं मनुष्य ज्या मन व शरीर या दोन वस्तूंपासून तयार झालेला आहे ती प्रत्येक वस्तुहि एक प्रवाहच आहे. क्षणाक्षणाला मरून ती नवं रूप धारण करीत आहे. जें जिवंत मन-शरीर या क्षणीं अस्तित्वांत आहे तोच इहलोक होय; अन् जें दुसऱ्या क्षणीं, तिसऱ्या क्षणीं... अस्तित्वांत येणारं मन-शरीर असतं त्यालाच परलोक म्हणावं. याच्या पली-कडला परलोक म्हणजे ज्याचा प्रवाह अनंत काळ चालू राहिलेला तो—म्हणजे संतान—पुत्र, पौत्र, प्रपौत्र ... ...”

“ तुझा हा परलोकवाद श्रमण-ब्राह्मणांच्या परलोकवादापेक्षां जास्त चांगला आहे हें मी मान्य करतों; कारण बहुजनहिताय हाच असूं शकतो. श्रमण-ब्राह्मणांचा परलोकवाद मात्र एकहिताय असतो--त्याच्यामुळं नऊशें नव्याण्णवांच्या कमाईवर डाका घालून मौज करणाऱ्या एका माणसाला प्रोत्साहन मिळतं. ”

“ नुसतं प्रोत्साहनच नव्हे. वास्तविक त्या चोरडाकूचं स्थान सुळावर अगर वधस्तंभावर असायला पाहिजे; त्या ऐवजीं त्याला सिंहासनावर बसविण्यांत येतं, त्याच्यावर छत्रचामरं डुलत असतात, त्याला धर्मराज ही पदवी मिळते. भन्ते ! मी श्रमण-ब्राह्मणांच्या परलोकवादाला चोर-डाकूंचा परलोकवाद समजतों; हा परलोकवाद बहुजनहिताय होणं अशक्य आहे. ”

“ म्हणजे जय ! तूं सगळया गोष्टींचा अभ्यास, परिशीलन करून हा निष्कर्ष काढलास ? ”

" माझ्या बुद्धीनं व माझ्या अनुभवानं मला हाच निष्कर्ष काढून दिला. तथागतांचा अनित्यवाद, क्षणिकवाद--दुनियेंतलीं प्रत्येक वस्तु बदलत असते हेंच परम सत्य होय--हा मला मान्य आहे. बदल होणं हा विश्वाचा स्वाभाविक गुण आहे; यासाठीं हा बदल घडवून आणणाऱ्या कर्त्याची वा ईश्वराची आवश्यकता नसते. मला वाटतं ईश्वरासंबंधींच्या विचारांचा फैलाव करण्यांत राजे लोकांचा सर्वांत मोठा हात आहे. पृथ्वीचा परमेश्वर ( राजा ) पाहूनच आकाशींच्या परमेश्वराची कल्पना करण्यांत आली. आकाशींच्या परमेश्वराची निरंकुशता दाखल्यादाखल घेऊन पृथ्वीचा परमेश्वर निरंकुश असला पाहिजे असं प्रतिपादन करण्यांत आलं. 'सर्व कांहीं सोडून देऊन आपण परमेश्वराला शरण जावं' हा सिद्धान्त काल्पनिक परमेश्वराच्या फायद्यासाठीं नसून राजाच्या फायद्यासाठीं आहे."

" वत्स जय! माझ्या मनांत असा विचार येऊं लागतो : ज्या लोकांनीं एका काळीं या ओसाड भूमीला सुपीक केलं त्यांनीं जर तुझ्या परलोकाचा विचार केला असता तर दुनिया कशी झाली असती ? "

" भन्ते! मला वाटतं ही दुनिया फार चांगली झाली असती. राजगृहाच्या त्या काळच्या करोडपति श्रेष्ठींच्या वंशजांना आज आपण ओळखूं शकत नाहीं. ओळखूं शकत नाहीं याचा अर्थ येवढाच कीं आतां ते नऊशेंनव्याण्णवांचं रक्त शोषण करणारी एकटी व्यक्ति या स्वरूपांत राहिलेले नाहींत. अजातशत्रूनं आपल्या बापाची पर्वा ठेवली नाहीं, आपल्या मातुलकुलाची पर्वा केली नाहीं; आणि त्यानं सर्व प्रकारांनीं केवळ स्वतःची पर्वा केली; त्याचे वंशज आज नऊशेंनव्याण्णवांत जमा झाले आहेत. भन्ते! मला तर असं वाटतं कीं जोंपर्यंत एका बाजूला नऊशेंनव्याण्णव व दुसऱ्या बाजूला एक हा भेद नष्ट केला जाणार नाहीं, तोंपर्यंत ही दुनिया चांगली करतांच येणार नाहीं, तोंपर्यंत ही अशीच नरक होऊन राहील अन् लोकांना एका काल्पनिक स्वर्गाच्या आशेवरच मरावं लागणार."

*　　*　　*　　*

मी आतां वीस वर्षांचा झालों होतों. आचार्य वसुबन्धु गंधारला जाण्याच्या तयारींत होते. आणि कदाचित मी जर त्यांचा विद्यार्थी नसतों, व अज्जुकाच्या भक्तिभावाची व आदराची त्यांना पर्वा नसती, तर ते पाटलिपुत्राहून केव्हांच निघून गेले असते. मी आचार्यांजवळचें सारें ज्ञानभांडार हस्तगत करून घेतलें होतें अशांतला प्रकार तर अर्थातच नव्हता; असें असूनहि आचार्यांनीं मात्र आपणहून सांगितलें—
" वत्स! तूं माझा योग्यतम शिष्य आहेस." आतां मींहि जे प्रासाद व जें राजसी जीवन गेलीं एकोणीस वर्षें सतत पाहत आलेलों होतों, तें सोडून देऊन विस्तृत दुनियेंत उडी मारूं इच्छित होतों. आचार्यांनीं सांगितलें होतें कीं सिंहलद्वीपांत तथागतांचा

उपदेश शुद्ध स्वरूपांत सांपडतो. परमभट्टारकांच्या संमतीनुसार कांहीं वर्षांपूर्वींच वज्रासनांत (बुद्धगयेंत) सिंहली भिक्षूंसाठीं तिथल्या राजानें एक विहार बांधविलेला होता. मी अनेक वेळां तिथल्या भिक्षूंना भेटलों. त्यांनीं त्या प्राचीन भाषेंत लिहिलेलीं कांहीं सूत्रें मला दिलीं. परंतु तेंवढ्या ज्ञानानें तृप्ति झाली नाहीं. म्हणूनहि मी सिंहलद्वीपाला जाण्याचा निश्चय केला.

प्रश्न असा होता कीं सिंहलद्वीपाला जावयाचें कसें? दहावीस हजार दीनार खर्च करावयाची मला कांहींच दिक्कत नव्हती. परंतु दीनारांच्या भरंवशावर यात्रा करणें मला पसंत नव्हतें. परमभट्टारकांतर्फेचा खास दूत बनवून अज्जुका माझी रवानगी करवूं शकत होती, परंतु राज-संबंधाचा कसलाहि फायदा घेण्याची माझी इच्छा नव्हती. मी विद्या शिकलों असलों तरी नवतरुण होतों आणि आजकाल कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारें प्रभूंची कृपादृष्टि आपल्याकडे वळली तरच विद्येचा फायदा मिळूं शकतो. मला स्वच्छन्द-विहारी यात्री व्हावयाचें होतें परंतु मला भिक्षा-जिवी व्हावयास नको होतें. एका काळीं मी मूर्तिकलेचें शिक्षण घेतलेलें होतें व तींत प्रावीण्य संपादन केलेलें होतें. हल्लींहि मी कधीं-कधीं वीणा वाजवीत असे व गातहि असे. ज्यांच्या मदतीवर मला स्वच्छन्दयात्री होतां येईल अशा याच दोन कला आहेत असा विचार मी केला. मी अभ्यासाच्या शेवटच्या वर्षीं या कलांकडे विशेष लक्ष दिलें आणि आपलीं हत्यारें ठाकठीक ठेवलीं. परंतु सगळ्यांत अवघड गोष्ट ही होती कीं अज्जुकाचा निरोप कसा घ्यावयाचा? गेल्या वर्षीं बाबा वारले तेव्हांपासून अज्जुकानें माझ्यावर जास्तच जीव लावला होता. एक दिवस जर मी तिच्याकडे गेलों नाहीं तर ती स्वतः माझ्याकडे येत असे. चन्द्र आतां बराचसा स्वच्छन्द झालेला होता. स्वच्छन्द अशा अर्थानें कीं त्यानें आपलें एक वेगळेंच जग निर्माण केलेलें होतें आणि त्यांतच तो आपला सारा वेळ घालवीत असे. मी पुढचा बेत काय योजिलेला आहे या विषयीं अज्जुका कधीं कधीं चौकशी करीत असे. मी तिला सांगें—"अज्जुका! अजून तरी मी विद्यार्थीच राहूं इच्छितों."

"परंतु बाळ! आचार्य तुझ्या विद्येची मोठी प्रशंसा करीत होते."

"आचार्यांची मोठी कृपा होती माझ्यावर. त्यांच्याजवळ जें विद्याभांडार होतं त्यांतलं शिकण्याजोगं बरंचसं राहून गेलं, परंतु आचार्य आतां थांबायला तयार नाहींत. मला तर आणखी कांहीं वर्षं विद्यार्जनांत घालवायला हवीं आहेत."

मी पाटलिपुत्रांतील इतर कांहीं विद्वानांकडेहि कधीं मधीं जाऊं लागलों होतों. मी पाटलिपुत्रांतच राहून आणखी विद्या शिकूं इच्छितों हें अज्जुकाला दाखविण्यासाठीं हा उपक्रम चालू केला होता. परंतु अज्जुकाला यांत संतोष वाटत नव्हता; मी तरुणीं-मध्यें मिळून मिसळून वागत नाहीं अशी बातमी माझ्या बाबतींत ऐकल्यावर तर ती जास्तच काळजी करूं लागली. मी तरुणींचा द्वेष करीत होतों, अगर त्यांच्या सौंदर्याची

प्रशंसा करीत नव्हतों, किंवा त्यांच्या नृत्यगाण्यांचा आनंद उपभोगत नव्हतों, अशांतला कांहींच प्रकार नव्हता. परंतु, कां कुणास ठाऊक, मला कांहीं चन्द्राप्रमाणें प्रणयाचें प्रदर्शन करतां येत नव्हतें. त्या प्रणयाचा विचार मनांत येतांक्षणीं माझ्या हृदयांत जणूं हिमालयाची थंड हवा चालू होई. परंतु मला जीवन नीरस मुळींच वाटत नव्हतें. तें सरस करण्यासाठीं तरुणींचा प्रणय सोडून इतरहि गोष्टी मला उपलब्ध होत्या; त्यांत विद्या-व्यसन, व्यायाम, संगीत व मूर्तिकलेच्या अभ्यासाचा प्रामुख्यानें समावेश होत होता. तरीसुद्धां एका विशिष्ट मर्यादेपर्यंत मी कुणातरी तरुणीशीं घसट ठेवण्याचा प्रयत्न करीत असेच. यांत हेतू येवढाच होता कीं अज्जुकानें माझ्या बाबतींत निश्चित व्हावें. आचार्य वसुबन्धूंच्या संगतींत राहून मी आतां संसाराचा त्याग करावयाचा विचार करीत आहे ही तिची समजूत दूर व्हावी हाच यांत माझा हेतु होता.

दक्षिणापथाकडील कितीतरी राजांचे कुमार अगर अमात्य पाटलिपुत्रांत राहत होते; त्यांच्याजवळ मी तिकडच्या बाबतींत अधिक चौकशी करीत होतों.

## (९)

## जहाज फुटलें

एके दिवशीं स्त्रुघ्नाला जाणाऱ्या नावेंतून आचार्य निघाले. पुष्कळसे लोक त्यांना निरोप देण्यासाठीं नावेपर्यंत गेले. मी तर त्यांच्याबरोबर शरयू-गंगा-संगमापर्यंत गेलों. अखेरची वन्दना करतांना माझे डोळे ओले झाले. आचार्यांनीं सांगितलें-- " स्नेह वाईट नसतो; कारण तो माणसाला त्याग करायला शिकवतो, संकुचित नात्याची सीमा तोडायची शक्ति देतो; परंतु आपण चालत्या जगांतले चालते प्रवासी आहोंत हें लक्षांत घेतलं पाहिजे; या प्रवासांत संयोग-वियोग अवश्यंभावी असतात. आतां हें खरं कीं मी जून झालेलं फळ आहे; तें केव्हां देठ सोडेल याचा नेम नाहीं. परंतु वत्स! जें अवश्यंभावी असतं त्याची काळजी करूं नये; काळजी करावी आपल्या ध्येयाची. मी जीवनभर तुझ्याकडे आशेनं डोळे लावून बसेन. जीवनाचा ग्रंथ आटोपल्यानंतर देखील दिव्यावर दिवा लागतोच. "

मी आचार्यांना अखेरची वन्दना करून आपल्या छोट्या नावेंत उडी घेतली आणि चित्ताची विषण्णता दूर करण्यासाठीं नाविकांसमवेत सुकाणूं चालवूं लागलों.

अज्जुकाची परवानगी मिळविणें ही फारच कठीण गोष्ट होती. तिच्या विखुरलेल्या प्रेमाचा बराच मोठा अंश आतां माझ्यावर केन्द्रित झालेला होता. अज्जुका असामान्य स्त्री नसली तरी तिच्या अंगीं धैर्य होतें, दूरवर विचार करण्याची शक्ति होती, उदारता होती. परंतु पहिल्याप्रथम जेव्हां मी जाण्याची गोष्ट काढली तेव्हां ती आपल्या मनावर ताबा ठेवण्याची खूप कसोशी करीत आहे असें मला दिसून आलें. डोळे सताड उघडे ठेवून तिनें अश्रु आंवरण्याचा प्रयत्न केला, पण त्यांत तिला यश आलें नाहीं. तिचे टपोरे डोळे आसवांनीं भरून आले आणि पापण्या मिटतांच तिच्या दोन्ही गालांवर दोन रुपेरी धारा वाहूं लागल्या. तिला कांहींतरी सांगावयाचें होतें परंतु तें ओठांच्या हालचालींतच अडकून राहिलें. मी जास्त कांहीं बोललोंच नाहीं; त्या दिवशीं येवढेंच सांगून निघून आलों-- " अज्जुका ! माझ्या ध्येयाच्या पूर्तीसाठीं मला परदेशीं जाणं आवश्यक आहे. मला कांहीं तरी बहाणा करून पळूनहि जातां येईल. परंतु मी असा निश्चय केला आहे कीं जोंपर्यंत अज्जुका मला या कामासाठीं आज्ञा देत नाहीं तोंपर्यंत जाण्याचं नांव देखील काढायचं नाहीं. "

अज्जुका आतां रोज एकदां मला आपल्या हातानें खाऊं घालूं लागली. ती माझ्या निवासस्थानीं रोज येते हें पाहून मीहि तिजकडे रोज जाऊं लागलों. रोज भेटत असूनहि ही गोष्ट पुन्हां तिच्यासमोर काढण्याची मला कांहीं हिम्मत होईना. एके दिवशीं ती आपणहूनच म्हणाली—" बाळ! तुझं माझ्यावर फार प्रेम आहे. "

" कारण अज्जुका ! तूं माझी आईहि आहेस नि बहीणहि. "

" परंतु बाळ ! मी पाटलिपुत्राच्या प्रासादांत जलमलेली नाहीं, हें मी विसरूनच गेल्यें होत्यें. मी जलमल्यें आहे यौधेयांच्या अग्रोदका नगरींत, यौधेयिका आपल्या स्वामीच्या कमरेला खड्ग बांधून त्याला समरभूमीवर रवाना करत्ये, त्या वेळीं देखील डोळ्यांत अश्रु आणणं तिला माहीत नसतं. तुझ्यावर मोठी जबाबदारी आहे; तुझ्यासारखा भाऊ असलेली बहीण, तुझ्यासारखा पुत्र असलेली आई, खरोखरी धन्य होय. "

एके दिवशीं अज्जुकानें मला हृदयाशीं धरून पाटलिपुत्राहून निरोप दिला. मी सिंहलद्वीपाच्या दिशेनें प्रस्थान ठेवलें होतें. परंतु मला थेट जावयाला नको होतें. दक्षिणापथाकडील देश बघण्याचा माझा विचार होता. मला पाटलिपुत्रांतच अशी माहिती कळलेली होती कीं सुह्माची हद्द ओलांडल्यानंतरच अशा भाषांशीं गांठ पडेल कीं त्या समजणें मला सोपें नाहीं जाणार; परंतु त्याचबरोबर अशीहि माहिती मिळालेली होती कीं तिकडच्या राजकुलांमध्यें व ब्राह्मणांच्या घरीं जी भाषा बोलली

जाते ती मागधीसारखींच आहे. माझ्यासमोर दोन मार्ग होते. एक म्हणजे गंगेमधून नावेतून सागरापर्यंत पोंचावयाच्या अगोदरच कांहीं काळ पायीं चालत जाऊन पुन्हां नावेनें ताम्रलिप्ताला पोंचावयाचें आणि मग तिथून एखाद्या गलबतावर चढून पुढचा रस्ता धरावयाचा. दुसरा रस्ता होता जंगलांतला; त्यांत संकटें फार होतीं. सुदैवानें मला सिंहवर्म्यासारखा जोडीदार मिळाला. तोहि माझ्याप्रमाणेंच संकटाला आव्हान देण्यास तयार असे आणि त्याचबरोबर चित्र-तूलिका चालविण्यांतच नव्हे तर खड्ग चालविण्यांतहि तो वाकबगार होता. आम्ही जंगलांतल्या रस्त्यानेंच जावयाचें ठरविलें. आम्ही गयेहून पुढच्या मार्गाला लागलों. इकडून कलिंग देशाकडे रस्ता गेलेला होता. आम्ही वाटेंत कधीं पांथशालेंत उतरत असूं आणि कधीं कोणत्या तरी गांवांत मुक्काम करीत असूं. परमभट्टारकांचें परिचय-पत्र मी बरोबर घेतलेलें असलें तरी मामुली परिस्थितींत त्याचा उपयोग करण्याची माझी इच्छा नव्हती. वाटेंत आम्हांला कांहीं सार्थ भेटले. परंतु कोणत्याहि सार्थाचे बांधील राहण्यास आम्ही कबूल नव्हतों. जंगलाला सुरवात होईपर्यंत आम्ही आपल्याबरोबर एक ओझेवाला घेतलेला होता. परंतु आतां आम्ही आमचें बरेंचसें सामान वाटेंतच सोडून दिलें आणि कामासाठीं अगदीं आवश्यक अशाच वस्तु स्वतःच घेऊन निघालों. सिंहवर्मानें सांगितलें कीं सुह्मापर्यंतच आम्हांला थोडीबहुत थंडी वाटेल, आणि त्यानंतर गरम कपड्यांची आवश्यकता नाहीं राहणार. आम्हीं आपल्या जवळ एक मोठें खरखरीत लोकरीचें कांबळें ठेवून घेतलें. तें आम्हांला केव्हांहि आंथरतां येत होतें. अंगावर घेण्यासाठीं वस्त्रांचे एकदोन फालतू जोड होते. परंतु ते क्षौम अगर दुकूल नसून साधे सुती कपडे होते. आम्ही साध्यासुध्या यात्रेकरूंचें रूप धारण केलेलें होतें. खड्ग हें आमच्या देहाचें अभिन्न अंग होतें आणि जंगलांत शिकार करण्यासाठीं आम्ही एक धनुष्य बरोबर घेतलेलें होतें व भात्यांत कांहीं बाण ठेवून दिलेले होते. या सगळ्या वस्तूंच्या जोडीला माझ्याजवळ थोडेसे दीनारहि होते.

जंगलांतून आम्ही कांहीं दिवस चाललों, आमच्याबरोबर वीस माणसांचा एक लहानसा सार्थ होता. दुपारची वेळ होती. आम्ही वृक्षाच्या छायेंत बसून विश्रांति घेत होतों. त्याच वेळीं वीसपंचवीस लोक पळत पळत आले. त्यांच्यापैकीं कित्येकांच्या कपड्यांवर रक्ताचे डाग होते. अंगावरचीं वस्त्रें व खड्ग यांच्या शिवाय त्यांच्याजवळ आणखी कसलीच चीजवस्त नव्हती. त्यांनीं सांगितलें-- "आमचा सत्तर माणसांचा सार्थ होता; वीस गाड्या होत्या; त्यांत दक्षिणापथाकडील कितीतरी पण्य ( विक्रीच्या ) वस्तु होत्या. इथून एका योजनावर आम्ही रात्रीं विश्रांति घेत होतों. सकाळीं आम्ही निघायच्या तयारींत गुंतलों होतों येवढ्यांत शेंकडों शबरांनीं आमच्यावर एकाएकीं हल्ला चढविला. आम्ही कांहीं वेळ सामना दिला. आमचे तीसपस्तीस लोक हत-आहत होऊन

जमिनीवर कोसळले. शबरांचें बळ जास्त आहेसं पाहून आपला जीव वांचवायसाठीं आम्ही जंगलांत जागा मिळेल तिथं लपून राहिलों. शबरांनीं आमची चीजवस्तू, आमच्या गाड्या, लूटून फस्त केल्या अन् कितीतरी लोकांना पकडून नेलें. आमचे कितीतरी लोक अजूनहि जंगलांत लपून राहिले आहेत, अन् आमचे सार्थवाह विष्णुदास यांच्यावर काय प्रसंग बेतलाय तें आम्हांला ठाऊकच नाहीं. ''

आम्ही त्यांचें बोलणें लक्षपूर्वक ऐकलें. आम्हांला त्याच रस्त्यानें जावयाचें होतें आणि तिथें शबर हजर होते. प्रश्न असा होता कीं पुढें जावें का मागें परतावें ? लोक कांकूं करीत होते; परंतु मी व सिंहवर्मानें सांगितलें-- '' मागं परतणंहि सुरक्षित नाहीं. शबर आपसांत एकमेकांना बातम्या फार लवकर पोंचवतात. पुढं जायचा चार दिवसांचा रस्ता जितका संकटमय आहे तितकाच परत जायचा रस्ताहि संकटमय आहे. कदाचित असाहि संभव आहे कीं पुढं भेटणाऱ्या शबरांना इतका माल मिळालेला असल्यामुळं ते आक्रमण करूं इच्छींत नसतील. अन् आपण पस्तीस लोक आहोंत. जंगलांत लपून राहिलेले लोकहि आपल्याला येऊन मिळतील. म्हणून पुढं जाणंच चांगलं. ''

कांहीं वेळ मागचापुढचा विचार करून लोक आमच्या विचाराशीं सहमत झाले आणि आम्ही पुढच्या मार्गाला लागलों. अगोदरच्या सार्थातले पस्तीस लोक दोन दोन चार चार असे गटगटानें आम्हांला येऊन मिळाले. आतां आमचा सत्तर माणसांचा जमाव झाला. सर्वांच्या हातीं खड्ग व कांहीं जणांच्या हातीं धनुष्यबाणहि होते. अगोदर आलेले लोक आपला सगळा माल घालवून बसले होते; म्हणून त्यांना मगधाला जाण्याची जरूर नव्हती; आणि आमच्या सार्थांतले जे थोडेफार लोक कांकूं करीत होते तेहि आतां अगदीं मनापासून पुढें जाण्यास तयार झालेले होते. जिथें आज सकाळीं चकमक झाली त्या जागीं आम्ही प्रहरभर दिवस असतांनाच पोंचलों. तिथें फक्त दोन इसम हुंदके देत असलेले आढळले. अठ्ठावीस लोक मरून पडलेले होते. त्यांना अग्नि देण्याचा विचार आम्हांला सोडून द्यावा लागला; कारण आगीच्या धुरामुळें शबरांना आमचा सुगावा लागला असता. तिथें फक्त एक गाडी व कांहीं खाण्यापिण्याच्या चिजा तेवढ्या शिल्लक राहिलेल्या होत्या. जखमी लोक तहानेनें तडफडत होते. आम्ही ओढ्यांतून पाणी आणून त्यांना पाजलें. त्यांनीं बातमी सांगितली कीं '' विष्णुदासहि जखमी झाले आहेत; शबरांनीं त्यांच्या मांडींत भाला मारून त्यांना खालीं पाडेपर्यंत ते शौर्यानें लढत होते; त्यांना शबरांनीं आपल्या बरोबर गाडींत घालून नेलें आहे. '' त्यांच्या सांगण्यावरून हेंहि कळलें कीं शबरांची संख्या पन्नासपेक्षां जास्त नव्हती. आक्रमण अचानक झालें म्हणून त्यांची गाळण उडाली व त्यांना एकजुटीनें लढतां आलें नाहीं. आम्ही जखमी लोकांना मलमपट्ट्या लावून त्यांना गाडींत बसवून पुढें चालूं लागलों. मी सिंहवर्माला म्हणालों—'' वयस्य सिंह ! विष्णुदासानं खंबीरपणानं सामना केलेला

आहे. शबर त्याला हालहाल करून ठार मारतील. ते गाडी आपल्याबरोबर घेऊन गेलेले आहेत म्हणून त्यांचा माग सांपडणें कठीण नाहीं. आपण पांचसहा लोकांना गाडीबरोबर ठेऊन देऊं या आणि बाकीचे लगोलग पाठलाग करूं या. "

सिंहवर्मा माझ्याशीं सहमत होता. कांहीं लोक काचकूच करीत होते. यावर आम्ही सांगितलें कीं जे लोक गाडीबरोबर येऊं इच्छित असतील, त्यांनीं गाडीबरोबर यावें आणि बाकीच्यांनीं आमच्याबरोबर विष्णुदासाला वांचविण्यासाठीं निघावें. आमच्या बरोबर आलेल्या सार्थांतल्या कित्येक लोकांना आमचें बोलणें गैर वाटलें. आणि हें होतेंहि मृत्युला आमंत्रणच. परंतु जेव्हां एकेक एकेक करीत करीत पुष्कळसे लोक आमच्या बाजूला आले तेव्हां बाकीचेहि शरमिंदे होऊं लागले. आणि मग तर आम्हांला आपणहूनच सहा माणसांना त्यांच्या इच्छेविरूद्ध गाडीबरोबर यावयाला भाग पाडावें लागलें. आम्ही त्वरेनें पुढें निघालों. सूर्यास्ताला एक घटका अवकाश असतांना आम्ही मुख्य रस्त्याला मिळणाऱ्या एका आडवाटेच्या नाक्यावर आलों. इथून गाड्या मुख्य रस्ता सोडून या आडवाटेला वळलेल्या होत्या. आम्ही या नव्या वाटेच्या कडेला एका झाडाला एक लाल फडकें लटकावून ठेवलें. आम्ही तसेच पुढें चाललों. दुरून आम्हांला एक आगटी पेटलेली दिसली. आणखी पुढें गेल्यावर बोलण्याचे आवाजहि ऐकूं येऊं लागले. मी इतर लोकांना तिथेंच थांबावयास सांगून जंगलांत घुसलों. अगदीं चोरपावलांनीं चक्कर मारून आगटीच्या जवळ पोंचलों. अजून झाडांची पानें गळावयास सुरवात झालेली नव्हती हें आमचें सुदैवच म्हटलें पाहिजे; नाहींतर पावलांचा आवाज होऊं न देणें मुष्किलीचें झालें असतें. मी पाहिलें तों गाड्या कोंडाळें करून सोडलेल्या आहेत व बैल कोंडाळयांत बांधून ठेवले आहेत आणि बाजूला लाकडांचा एक भला मोठा ढीग धगधगून जळत आहे. तिथें सुमारें तीस शबर होते. अंधार पडावयालाच झालेला होता आणि थोड्याच वेळांत शबरांचे काळे देह ओळखूं येण्याची मुष्किल झाली असती. त्यांच्या अंगावर लंगोटीशिवाय कांहीं नव्हतें; मात्र डोक्यावरील केंसांत त्यांनीं तऱ्हेतऱ्हेचे पंख खोंचले होते. त्यांच्यापैकीं बहुतेकजण आमच्यापेक्षां उंचीला कमी असले तरी त्यांचे आटीवघोटीव देह पाहून मला त्यांचा हेवा वाटत होता. बारीक कमरेवरील विशाल छाती, रुंद खांदे व वळणदार दंड त्यांच्या अंगच्या जबरदस्त शक्तीची ग्वाही देत होते. मी विष्णुदासाच्या शोधार्थ चारी दिशांना नजर टाकीत होतों. मग एका गाडीवर कसली तरी बांधून ठेवल्यासारखी एक चीज दिसली. मला खात्री करून घेतां आली नाहीं, परंतु माझें मन मला सांगूं लागलें कीं जखमी विष्णुदासाला यांनीं एखाद्या गाडींतच बांधून ठेवलें असलें पाहिजे. मी चोरपावलांनीं परत आलों. कांहीं अंशीं खुणांनीं व कांहीं अंशीं दबलेल्या आवाजांत मी सारी हकीकत सांगितली आणि मग सिंहवर्माशीं वाटाघाट केली. शेवटीं तीस माणसें घेऊन

सिंहवर्मा पुढच्या बाजूनें घेरण्यासाठीं डावीकडील जंगलांत घुसला आणि बाकीचीं माणसें घेऊन मी उजवीकडील जंगलांत शिरलों. आम्ही हल्ला करण्याचा संकेत ठरवून ठेवला. अंधार पडूं लागलेला होता म्हणून आम्हांला घाई झालेली होती. आम्ही सर्वत्र पांगलों व एका झाडाआडून दुसऱ्या झाडाआड लपत छपत गाड्यांजवळ पोंचलों. आम्ही खूपच सावधगिरी ठेवलेली होती. परंतु शबरहि कांहीं गाफिल नव्हते. आम्ही रणगर्जना करून हल्ल्याचा हुकूम दिला, त्या वेळीं ते आमचा प्रतिकार करण्यास तयारच होते. त्यांच्यावर दोन्हीं बाजूंनीं एकाच वेळीं हल्ला झाला. त्यांना बाणांचा पुरता उपयोग करतां आला नाहीं, नाहींतर आमची अधिक हानि झाली असती. खड्ग व भाला चालविण्यांत आम्ही त्यांच्याहून अधिक वाकबगार होतों. खड्गें खणाखण चालत होतीं आणि कधीं कधीं आपसांत टकरा खात होतीं. आमचे साथीदार भाले चालवीत होते. अर्धे शबर हताहत झाले आणि कांहीं जंगलाच्या दिशेनें पळून गेले. आम्ही गाड्या धुंडाळल्या. विष्णुदास एका गाडींत अर्धमेल्या स्थितींत दोरानें जखडून पडलेले होते. सिंहवर्मानें त्यांचा दोर खुला केला. त्यांच्या घशाला कोरड पडलेली होती. म्हणून त्यांनीं नुसत्या हातानें खूण करून पाणी मागितलें. पखालीतून त्यांना पाणी पाजल्यावर त्यांच्याकडून कळलें कीं कांहीं शबर गाडींतील कित्येक बहुमूल्य चिजा घेऊन आपल्या पल्लीच्या दिशेनें रवाना झाले आहेत. आम्हांला आतां इथून झटपट निघणें जरुरीचें होतें; शबर आणखी माणसें घेऊन केव्हां परत येतील त्याचा नेम नव्हता.

आम्ही गाड्या जोडल्या व परत फिरून जिथें आम्ही लाल कापड लटकावून ठेवलेले होतें तिथें पोंचलों. तिथें आमचे बाकीचे सहा साथीदार गाडी घेऊन अगोदरच पोंचलेले होते. विष्णुदासांसमोर प्रश्न असा होता : " मगधाकडे जावें का स्वदेशीं परतावें ? " परंतु त्यांनीं सांगितलें–" बहुमोल विक्रीचा माल तर लुटला गेला आहे. बाकीचा घेऊन पुढें जाण्यांत अर्थ नाहीं. याशिवाय सार्थाचेहि बरेचसे लोक ठार झाले आहेत. त्यांत सगळ्यांत लढवय्या योध्यांचीच संख्या जास्त होती. " अखेरीस त्यांनीं परत जाण्याचा निश्चय केला.

जंगलांत केवळ शबरांचाच धोका होता अशांतला प्रकार नव्हता. तशा रात्रीं चालूं लागावयाचें म्हणजे हत्तींच्या झुंडीच्या तावडींत सांपडणें व वाघाच्या जबड्यांत उडी घेणें असा त्याचा अर्थ होत होता. परंतु आम्ही हेंहि जाणून होतो कीं शबर लोक मार खाऊन चुपचाप बसून राहणार नाहींत. सार्थाचा वाटाड्या पुढच्या गाडींत बसला आणि आम्ही सारे त्याच्या पाठोपाठ चालूं लागलों.

त्या दिवशीं आम्ही सारी रात्र चाललों. सकाळीं आम्ही एका जलाशयापाशीं येऊन पोंचलों. तिथें एक लहानसें चंडिकेचें स्थान होतें. मंदिर नव्हतें तें; एका

वृक्षाच्या पायथ्याशीं एक चुबतरा व त्याच्यावर शेंदूर फांसलेला एक ओबडधोबड दगड होता. यालाच लोक चंडिका-स्थान म्हणत होते. पुजारी भट्ट स्वतःला ब्राह्मण म्हणवून घेत होता, परंतु त्याच्या कोळशासारख्या काळ्या चेहऱ्यावरील लालभडक डोळे त्याचें हें म्हणणें खोटें ठरवीत होते. तो आणि एक मध्यम वयाची परिव्राजिका ( जोगीण ) इथें राहात होती. परिव्राजिकेचा रंग गोरा होता; यौवनाच्या वसंतकाळीं तिच्या ठिकाणीं सौंदर्याचाहि सुवास दरवळलेला असावा; परंतु आतां मात्र ती वठलेली वेली होती. तिच्या अंगावर काषायवस्त्र, गळ्यांत अक्षमाला आणि मस्तकावर पिंगल जटांचा बुचडा बांधलेला होता. परिव्राजिका बोलण्या चालण्यांत विशेष हुशार होती. तिनें सस्मित वदनानें आमचें स्वागत केलें. विष्णुदासांनीं दोन दिवसांपूर्वी इथें मुक्काम केलेला होता आणि त्यांनीं परिव्राजिकेला शकुन विचारलेला होता. परिव्राजिकेनें सर्व कांहीं ठीक होईल असें सांगितलें होतें परंतु त्याचबरोबर वाटेंत थोडासा धोका असल्याचें दर्शविलें होतें. विष्णुदासाला जखमी झालेला पाहून तिनें अत्यंत सहानुभुतिपूर्वक विचारपूस केली. तिला आठवण करून देण्याची जरुर नव्हतीच. विष्णुदासानें आपणहूनच सांगितलें–" आर्या ! आपलं भविष्य बरोबर ठरलं. धोका तर फारच मोठा आला होता, परंतु आपल्या कृपेनं मी कसाबसा वांचलों. " परिव्राजिकेनें विष्णुदासाची जखम पाहिली. तिनें कोळसा व इतर कांहीं वस्तू कुटून त्यांची पूड जखमांत भरून वर पट्टी बांधली आणि पुढें निश्चिन्त राहा असें भविष्य सांगून धीर दिला.

आम्हांला थकवा तर आलेला होताच आणि वर भुकेनें सतावून सोडलें होतें. लोक स्वयंपाकाच्या तयारीला लागले. भटजीला विचारतां असें कळलें कीं इथेंहि शबरांचें भय आहेच. मला तर असें वाटत होतें कीं तो स्वतः देखील शबरांच्या लूटमारींत सामील असावा; नाहींतर या जंगलांत अशा प्रकारच्या तपस्येची जरूरच काय होती ? सिंहवर्मानें सांगितलें–" तपस्या कसली आली आहे ? तारुण्य सरलेल्या परिव्राजिकेला कुणातरी पुरुषाची जरुर होतीच आणि या भट्टोजी कावळ्याला हिच्याहून अधिक सुन्दर स्त्री मिळणार होती कुठून ? " परिव्राजिकेचें प्रसवाचें वय टळलेलें आहे; म्हणून आतां दोघांचीं तीन होण्याची धास्ती नाहीं. भट्टोजी जरासा इकडे तिकडे गेला कीं आम्ही दचकून कान टवकारत असूं. आम्हांला वाटे कीं हा शबरांना बातमी द्यावयाला तर गेला नसेल ? आम्हीं हें स्थान शक्य तितक्या लवकर सोडून जाण्याचा बेत ठरविला.

भोजन झाल्यावर आम्ही थोडीशी विश्रांति घेतली. विष्णुदासानें चंडिकेला व परिव्राजिकेला देणग्या दिल्या व दोन प्रहरानंतर आम्ही तिथून पुढें निघालों. जंगल चार दिवसांत सरलें नाहीं. पुरे दहा दिवस वाटचाल केल्यानंतरच जंगल सरलें.

त्यांत फक्त एकदांच हत्तींच्या झुंडीचा उपद्रव आला. परंतु आम्ही आमच्या भोंव-तालीं खूप मोठ्या आगट्या पेटवून ठेवलेल्या होत्या. जंगली जनावर आगीजवळ फिरकत नाहीं ही आमची खात्री होती.

आम्ही सुह्म देशांतील पहिल्या नगरांत पोंचलों. विष्णुदासाची जखम आतां बहुतेक बरी झालेली होती. परंतु अजूनहि त्याच्या अंगांत अशक्तता होती. इथें त्याच्या सोयऱ्यांपैकीं एक सार्थवाह राहत होता. आम्हां दोघांना विष्णुदास आपले प्राण-रक्षक समजत होता; आणि मला तर साऱ्या सार्थाचा पुढारी मानत होते. विष्णुदासानें दुसऱ्या सार्थवाहाजवळ आमची खूप प्रशंसा केली. त्यानें आपल्या नगराकडे येण्यासाठीं आम्हांला खूप आग्रह केला; परंतु तें वाटेंत नव्हतें म्हणून आम्हांला तिकडे जावेसें वाटलें नाहीं. सुह्म, उत्कल व कलिङ्ग देशांतील कित्येक सार्थवाहांशीं त्याचा संबंध होता; त्यानें आम्हांला कांहीं ओळखपत्रें लिहून दिलीं. दहा पत्रें लिहून झाल्यावर आतां आणखी लिहूं नका म्हणून आम्ही त्याची प्रार्थना केली. याच पत्रांचा तर केवढा मोठा गठ्ठा झालेला होता; दोन हात लांबीचें ताल-पत्र भरेल इतकी आमची प्रशंसा केल्याशिवाय त्याचें समाधानच होत नव्हतें. मग एकेकाची घडी करून त्याच्यावर दोरी बांधावयाची व मग तिच्यावर चिकणमाती चिकटवून आपल्या नांवाची मोहोर करावयाची !

एक महिनापर्यंत आमचा नागरिक जीवनाशीं कांहींएक संबंध राहिलेला नव्हता; खाण्यापिण्याचीहि कांहीं नीट सोय नव्हती, ना आंघोळीचीहि. पुढें शबरांचें आक्र-मण झाल्यानंतर तर आम्हांला आमची गति आणखी वाढवावी लागली आणि निम्मे बैल व गाड्या वाटेंत सोडून द्याव्या लागल्या. सुम्ह नगरांतील सार्थवाहाच्या घरांत पाटलिपुत्रांतील कुणा श्रेष्ठीच्या घरांतल्याप्रमाणें पुष्कळशा वस्तू उपलब्ध होत्या. पाटलिपुत्राचें नागरिकजीवन अगोदरपासूनच या देशांना अनुकरणाचा विषय झालेलें होतें. परमभट्टारकाच्या दिग्विजयानंतर तर त्याचा प्रभाव आणखीच द्विगुणित झाला. वाटेंतल्या उन्हानें व श्रमानें आम्ही वाळलों होतों व आमच्या चेहऱ्याचा रंगहि बदललेला होता. परंतु सार्थवाह आमच्या आदरसत्कारांत कोणताहि शब्द खालीं म्हणून पडूं देत नव्हता. आतां आम्ही अभ्यंगस्नान करीत होतों, सुस्वादु आहार ग्रहण करीत होतों. शुभ्र धुतलेलीं वस्त्रें वापरीत होतों. सार्थवाहाच्या तरुण दासी आमचे पाय चेपावयाला व आमची सेवा करावयाला हजर होत्या. इतकें करूनहि आमच्या तब्येती पाटलिपुत्रांत जशा होत्या तशा व्हावयाला एक आठवडा लागला. आमच्या मनोरंजनासाठीं नगरांत पुष्कळशा गोष्टी होत्या परंतु आम्ही फक्त नाच-गाणींच पसंत करीत होतों.

सिंहवर्मानें आपली तूलिका सरसावली व पहिलें चित्र तयार केलें. पाटलिपुत्राच्या या विख्यात चित्रकाराची ख्याति नगरांतील श्रेष्ठी, सार्थवाह व कुलिक (महाजन) या सर्वांमध्यें फैलावली आणि त्याचा सारा वेळ चित्रें काढण्यांत खर्च होऊं लागला. आमचा नवा मित्र झालेल्या सार्थवाहाच्या कन्येनें आपलें चित्र काढण्याची विनंति आपल्या दासीमार्फत अनेकदां केली. सिंहवर्मा नाहीं कसा म्हणणार ? त्यानें चित्र काढण्याची खटपट केली; परंतु तो होता भारतीय चित्रकलेचा मर्मज्ञ; आपल्या कल्पनेनें त्याला सुंदर चित्र तयार करतां येत होतें, परंतु सजीव मूर्ति पाहून तिच्या बरहुकुम चित्र काढणें त्याला फार जड जात होतें. कांहीं दिवस प्रयत्न करूनहि त्याला हें साधत नाहीं असें पाहून मी एक पट तयार केला व ज्या ज्या वेळीं सार्थवाह-कन्या खिडकींत बसत असे त्या त्या वेळीं मी तूलिका चालवीत राहिलों. चार दिवस परिश्रम केल्यानंतर मी माझें चित्र सिंहवर्मासमोर ठेवलें. त्यानेंहि आपलें चित्र पुरें केलेलें होतें; परंतु तें सार्थवाह-कन्येचें नव्हतें; एका कल्पित सुंदरीचें चित्र होतें तें. मी त्याला म्हणालों—" हें चित्र तूं सार्थवाह-कन्येला दे. पण एक अट आहे. हें तूं आपण काढलेलं म्हणून दिलं पाहिजेस. "

" पण मित्रा ! हें तर तूं काढलेलं आहेस. "

" पण आपण दोघांनींहि चित्रकार म्हणूनच प्रसिद्धीला येतां उपयोगी नाहीं. मला आपला खड्ग चालविणारा योद्धा राहूं दे अन् तूं हो कलाकार. "

श्रेष्ठि-कन्या चित्र काढून घेण्यासाठीं सिंहवर्मासमोर जेव्हां बसत असे तेव्हां तिचे डोळे सिंहवर्माच्या तरुण मुखावर एकाग्रपणें खिळलेले असत व मी कसल्यातरी कामासाठीं आंत आलों कीं ती नजर दुसरीकडे वळवी. हा प्रकार माझ्या लक्षांत आलेला होता. सिंहवर्मानें दोन्ही चित्रें तरुणीसमोर ठेवून सांगितलें—" सुन्दरी ! हें आहे तुझं वास्तविक चित्र अन् हें आहे काल्पनिक. "

तरुणीनें त्याचे फारफार आभार मानले. पण मग सिंहवर्मानें प्रस्थान करण्याची गोष्ट काढली तेव्हां मात्र तिचा चेहरा एकदम खिन्न झाला आणि तिनें डोळ्यांतलीं आंसवें लपविण्यासाठीं तोंड दुसरीकडे फिरविलें. पुन्हां सिंहवर्मा तिच्याकडे पाहतो तों तिचे डोळे पाण्यानें डबडबलेले होते. तरुणी येवढेंच म्हणाली—" इतक्या जलदीनं जायची काय जरूर आहे ? आणखी कांहीं दिवस राहा ना. "

सिंहवर्मानें मला सगळा प्रकार सांगितला. मी बुचकळ्यांत पडलों. इतक्या लवकर निघण्याला स्वतः सिंहवर्माहि तितकासा अनुकूल नव्हता हें मला दिसत होतें; परंतु माझ्या इच्छेला प्रतिकूल असें कोणतेंहि काम त्याला करवत नव्हतें. आम्ही आणखी कांहीं दिवस मुक्काम वाढविण्याचें ठरविलें; परंतु सार्थवाहाचे पाहुणे म्हणून नव्हे. पहिल्यांदां सार्थवाहानें आम्हांला आपल्या घरीं राहण्याचा खूप आग्रह केला.

परंतु सुह्म नगरांत जास्त दिवस राहावयाचें तर आम्हांला आमच्या कलेच्या साम-र्थ्यावर भिस्त ठेवून राहूं या असें आम्ही सांगितल्यावर सार्थवाहानें तें मान्य केलें आणि नगराच्या बाहेर स्वतःच्या उद्यानांत त्यानें आमची राहण्याची व्यवस्था करून दिली.

उद्यान मोठ्या रमणीय स्थानीं होतें. चतुर माळ्यानें त्यांत तऱ्हेतऱ्हेचीं फुलझाडें लावलेलीं होतीं; तीं वसंत ऋतूच्या आगमनाची सूचना देत होतीं. बागेच्या मधोमध एक छोटासा पण फारच स्वच्छ सौध होता. उद्यानापासून थोड्या अंतरावर सुवर्णरेखे-सारखी नदीची धार वाहत होती. आम्हांला हें उद्यान फारच पसंत पडलें. सिंह-वर्माच्या कामाला तर इतकी मागणी होती कीं त्यांतून त्याची सुटकाच होत नव्हती. परंतु मला वेळ घालविण्यासाठीं कसल्या तरी कामांत गुंतणें आवश्यक होतें. मी मूर्ति घडविण्याचें काम हातीं घेऊं शकलों असतों; परंतु आम्ही दोघांनींहि रूपकार म्हणूनच प्रसिद्ध व्हावें हें मला नको होतें. सिंहवर्माचें म्हणणें असें कीं मीहि चित्रें काढण्याचेंच काम करावें व नांव त्याचें द्यावें. विद्याव्यासंग व तरवारबहादुरीच्या बाबतींत आम्हांला प्रसिद्ध होण्याची इच्छा नव्हती; कारण त्यांत राजकुलापर्यंत आमचा लौकिक पोंचण्याची धास्ती होती. शेवटीं मी संगीताचार्य होण्याचें ठरविलें. मी वीणा व इतर वाद्यें खरेदी केलीं. दोन-तीन संगीत-गोष्ठींमध्यें (गाण्याच्या बैठकींमध्यें) मला कौशल्य दाखवावें लागलें; मग माझ्या गुणाला मागणी येऊं लागली. परमभट्टारक समुद्रगुप्ताच्या संगीतप्रेमामुळे पाटलिपुत्रामध्यें संगीताकडे लोकांचा ओढा वाढला आहे इतकेंच नव्हे तर दीनाराच्या नाण्यावर वीणेसह समुद्रगुप्ताचें चित्र कोरलेलें पाहून दूरदूरच्या नगरांमध्येंहि लोक संगीताचा विशेष सन्मान ठेवूं लागले आहेत. विशेषतः पाटलिपुत्रीय राग व लय हरएक ठिकाणीं लोकांना हवीहवीशी वाटूं लागली आहे. अशा रीतीनें आम्हां दोघांची ख्याति पाटलिपुत्राचे चतुर चित्रकार व संगीताचार्य या नात्यानें वाढत चालली. मला कांहीं कुलांमध्यें मुलींना संगीत व नृत्य शिकविण्या-साठीं जावें लागत असे.

सार्थवाह-कन्येचें सिंहवर्म्यावरील प्रेम आणखीच वाढत चाललें. वसंत ऋतूचे दिवस होते. आंब्याच्या मोहोरामध्यें भुंग्यांचा कलरव ऐकूं येत होता. दिशा सुगंधानें कोंदाट-लेल्या होत्या. जागोजाग वसंतोत्सव साजरे होत होते. सार्थवाह-कन्या हंमेशा उद्यानांत येत असे. आतां दोघांमध्यें इतकी घसट वाढलेली पाहून काळजी वाटणें आवश्यक होतें. सिंहवर्मा एके दिवशीं आपल्या प्रेयसीला म्हणाला –"प्रिये! आतां आपण इतकी मजल गांठलेली आहे कीं आपल्याला कांहींतरी निर्णय घेतला पाहिजे."

कुमारी मिस्किलपणें म्हणाली—"अजून आमचं एकमत झालेलं नाहीं कीं काय?"

आपला दोघांचा संबंध आहे येवढ्यापुरता आपण निर्णय घेतलेला आहेच; परंतु आतां या निर्णयावर तुझ्या वडिल माणसांचेंहि शिक्कामोर्तब व्हायला पाहिजे. ”

“ जर वडिलमाणसांची संमति नाहीं मिळाली तर ? ”

“ तर याच्या आधींच तूं त्यांचं मत घ्यायला हवंस. ”

“ नाहींतर काय होईल ? ” हें बोलतांना तरुणीचा स्वर कंपित झाला.

सिंहवर्मानें कुमारीच्या केंसांवरुन हलकेंच हात फिरवीत तिच्या डोळ्यांकडे पाहिलें आणि मग तो बोलूं लागला—“ तूं घाबरूं नकोस; माझा मित्र कांहींतरी मार्ग काढील. ”

परंतु मार्ग काढणें ही कठीण गोष्ट होती थोडीच ? सार्थवाहाची आमच्याशीं दिवसेंदिवस घसट वाढत चाललेली आहे, तो आम्हांला चांगल्या कुळांतले समजत आहे. हें तर मला दिसतच होतें. जेव्हांजेव्हां आम्ही पुढें चालण्याची गोष्ट काढावी तेव्हां तेव्हां त्यानें नको म्हणावें, असा प्रकार चाललेला होता.

मी एके दिवशीं पुन्हां प्रस्थान करण्याची गोष्ट काढली. सार्थवाह म्हणाला—“ तुम्हांला कलिंगपट्टणलाच जायचं आहे ना ? मी स्वतःच कलिंग येथील जैन-मूर्तींच्या दर्शनासाठीं जाणारच आहे. तुम्ही माझ्याबरोबरच चला. ”

“ पण आम्हांला तर जंगलांतल्या दुर्गम वाटेनं जायला हवंय. ”

“ इथून ताम्रलिप्तीला जातांनाहि दुर्गम जंगल लागेल. त्यांतहि हत्ती व वाघ आहेत; तुम्हांला जंगलांतल्या यात्रेचाहि आनंद मिळेल अन् समुद्र-यात्रेचाहि. ”

मी त्या दिवशीं ‘ होय ’ अगर ‘ नाहीं ’ कांहींच सांगितलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं सिंहवर्मानें सांगितलें कीं सार्थवाह आपल्या परिवारासह जैनमूर्तींच्या दर्शनासाठीं कलिंगपट्टणला जाण्याच्या तयारींत आहे.

* * * *

आमची यात्रा निर्विघ्नपणें होत आलेली होती. म्हणून आम्ही निश्चिन्तपणें झोंपलेलों होतों. निळ्या आकाशांत पांढऱ्या फुलांप्रमाणें विखुरलेल्या ताऱ्यांकडे पाहात नाविक गलबत चालवीत होते. कांहीं नाविक सोडून बाकीचे सगळे गंभीर निद्रेंत निमग्न झालेले होते. गलबत एकाएकीं जोरानें हेलकावूं लागले व निश्चिन्तपणें झोंपलेले लोक गलबताच्या एका अंगाला कलंडले. जागे होऊन पहातों तों जोराचें तुफान झालेलें आहे व प्रचंड लाटा उसळून गलबताच्या काष्ठ-तलावर आदळत आहेत. सगळे लोक घाबरले होते. शिडाची एका बाजूची दोरी तुटलेली होती व तें जहाजाला उलट दिशेनें खेंचून घेऊन चाललें होतें. नावि-कांनीं गलबत सांवरण्याची कसोशी केली; परंतु त्या अंधारांत लाटांचा मारा चाललेला, लोकांची घाबरगुंडी उडालेली व जहाज एका बाजूला कलंडलेलें, अशा परिस्थितींत

त्यांना कांहींच करतां येत नव्हतें. ते लोकांना जहाजाच्या दुसऱ्या अंगाला जा म्हणून ओरडून सांगत होते परंतु उतारूंचा स्वतःचाच येवढा मोठा ओरडाआरडा चाललेला होता कीं कोण कुणाचें ऐकणार ? सगळ्याच गोष्टी अति वेगानें होत होत्या; आमच्या मनांत याबाबत जे विचार येत होते त्यांच्यापेक्षांहि जास्त वेगानें साऱ्या गोष्टी घडत होत्या. आमचें जहाज एका खडकाच्या दिशेनें वेगानें चाललें आहे हें नाविकांनाहि ठाऊक नव्हतें, ना आम्हांलाहि. एकाएकीं भयंकर आवाज झाला. त्यावेळीं मी जहाजाच्या छतावर होतों. आवाजाबरोबर असा जबरदस्त धक्का बसला कीं मला वाटलें कुणी तरी मला उचलून समुद्रांत फेंकून दिलें. मी पोहूं लागलों. कांहीं वेळ आवाज ऐकूं येत होते आणि मग चारी दिशांना निःस्तब्धता पसरली. मी कुठें आहे याचा मला कांहींच पत्ता नव्हता. जवळ किनारा नाहीं व कसलेंहि बेट नाही अशा स्थितींत भर समुद्रांत मी तरंगत आहे असें मला वाटलें. मग इथें पोहण्यांत काय फायदा ? परंतु जगण्याची इच्छा इतक्या लवकर सोडून देणें म्हणजे सुद्धां भेकडपणाच होय असें मला वाटत होतें. शेवटच्या क्षणापर्यंत प्रयत्न करणें व सर्व बाजूंनीं असमर्थ झाल्यानंतरच पराजय मान्य करणें हेच आमच्या जीवनाचें ध्येय असलें पाहिजे; म्हणून मी पोहतच राहिलों. दिशेचा कांहीं थांगपत्ताच नाहीं अशा वेळीं हातांपायांची जास्त हालचाल करणें निरर्थक आहे असा विचार मनांत आला. आसपास कांही दिसूं लागेपर्यंत मला माझी शक्ति राखून ठेवणें जरूरीचें होतें. उत्तर दिशेला ध्रुव ताऱ्यालगत सप्तर्षींच्या सात ताऱ्यांपैकीं चारांचा चौकडा समुद्रांत अस्ताला चालला होता. सूर्योदय व्हावयाला आणखी तीन तारे अस्ताला जाण्याइतका अवकाश होता. आतां तुफान ओसरलेलें होतें. उंच उसळून खालीं आदळणाऱ्या लाटा आतां बंद झाल्या होत्या. मी पाण्यावर उताणा तरंगत होतों. एखाद्या शांत सरोवरांत मी शव-प्लवन ( शवासारखें तरंगणें ) करीत आहे असें वाटत होतें. येवढ्यांत माझ्या पायांना कसली तरी टणक वस्तु लागली. पाहतों तों ती एक मोठी लांकडी फळी होती. तिच्यावर पाय पसरून पडून राहतां येण्याजोगें होतें. मी विचार करूं लागलों, जहाज जर किनाऱ्यापासून फार दूर अंतरावर बुडालें असेल तर या फळीचा केवढा तरी उपयोग होईल. भुकेल्या-तहानेल्या अवस्थेंत आपल्याला आणखी कांहीं दिवस जिवंत राहूं देण्याला हिची मदत होऊं शकेल. मी डोळे मिटून घेतले. मला झोंप आलीशी वाटूं लागली. मग डोळे मिटलेले असतांनाच आंतल्या आंत एक दृश्य दिसूं लागलें-- कित्येक वर्षें मी त्याच फळीवर तसाच मुकाट्यानें पडून तरंगत राहिलों; मग माझा प्राण तिळा तिळाच्या हिशेबानें शरीर सोडून जाऊं लागला. प्रथम पायांची, नंतर कमरेची, मग हृदयाची गति बंद होऊं लागली. मग या चित्रपटावर जणूं काळी शाई फांसली गेली. मग असें दिसूं लागलें

कीं त्या शवावर कावळे बसलेले आहेत व ते अधून मधून चोंचाहि मारताहेत व कावकावहि करीत आहेत.

मला झोंप नक्कीच लागली असावी; कारण या गोष्टीशिवाय दुसरी कसलीच आठवण मला येत नाहीं.

मी जागा झालों; परंतु बराच वेळपर्यंत मी डोळे उघडावयाला कचरत होतों. मनांत विचार असा येत होता कीं अजून रात्रच आहे; अगर दिगन्त-व्याप्त समुद्राकडे पाहून फायदा काय ? परंतु आतां उषेचा प्रकाश पापण्यांचीं दारें ठोठावून आंत प्रवेश करूं लागलेला होता. डोळे उघडून पाहिलें तों आकाशांत ताऱ्यांचा कुठें पत्ताच नव्हता. मी उठून बसलों. पूर्वदिशेला समुद्राच्या पोटांतून लाल किरणें वर येत होतीं. मग उभा राहून पाहिलें तों पश्चिम दिशेला तालवृक्षांची निळी रांग लागलेली दिसत होती. माझ्या शरीरांत उत्साह संचारूं लागला; रोमरोमांत आशा भरून राहिली. समुद्रांत चारी दिशांना नजर टाकली तों कुठेंहि कसलीच हालचाल दिसत नव्हती. इतक्या प्राणांचा बळी घेऊन समुद्र शांत झालेला होता.

मी पाण्यांत उतरलों व डाव्या हातांत फळी धरून उजव्या हातानें व पायांनीं पोहत किनाऱ्याकडे जाण्याच्या खटपटीला लागलों.

किनाऱ्याच्या वाळूवर पाय टेंकून उभा राहिलों; मग माझ्या लांब केसांतलें पाणी पिळून काढलें. त्या वेळीं माझ्या अंगावर एक कंचुक व अन्तरवासक ( धोतर ) याच्याशिवाय कसलीहि वस्तु नव्हती. कमरेला चाचपून पाहिलें तों शंभर दीनारांची हमिणी बांधलेली आहे. मला आणखीच संतोष झाला. आतां मला काळजी पडली माझ्या बरोबरच्या उतारूंची. किनाऱ्या किनाऱ्यानें दक्षिणेला जावें का उत्तरेला, याचा मला कोणत्याच बाजूनें निर्णय करतां येईना. मी उत्तरेला तोंड करून चालूं लागलों. कोसभर चालल्यावर एक फळी किनाऱ्याला लागलेली दिसली. फळी एखाद्या जहाजाची होती याबद्दल संशयाला जागाच नव्हता; परंतु ती आमच्याच जहाजाची असेल याला आधार काय ? तरीहि माझ्या मृत-आशेंत परत थोडी थोडी धुगधुगी येऊं लागली. मी त्याच दिशेनें आणखी पुढें चाललों. आणखी फळ्या सांपडल्या; जहाजावरून वाहून आलेल्या आणखी कांहीं वस्तु दिसल्या. माणसाची खूण म्हणजे एक प्रेत समोर दिसलें. माझ्या हृदयाचा थरकांप झाला. मी झपाझप जवळ जाऊन प्रेताचें तोंड पाहिलें. तो आमचा मित्र सार्थवाह होता. तो जास्त वेळ पोहत राहील अशी आशा वाटण्याजोगी नव्हती. त्याचें शरीरहि खूपच स्थूल होतें आणि आतां तर पाणी शिरल्यामुळें पोट आणखीच फुगलें होतें. मला वाईट वाटलें. परंतु त्याचबरोबर सिंहवर्माविषयीं आशा अजून शिल्लक राहिली. पुढें फुटलेल्या गलबताचे आणखीहि कित्येक अवशेष मिळाले. उतारूंचीं पांचसहा

प्रेतेंहि दिसलीं. परंतु त्यांमध्यें सार्थवाहाच्या पत्नीशिवाय माझ्या ओळखीचें आणखी कुणी नव्हतें. प्रहरभर चालल्यानंतर जेव्हां आणखी कसली फळी अगर जहाजाची खूण दिसली नाहीं तेव्हां मी हताश झालों. किनाऱ्यापासून दूर अंतरावर पुष्कळशीं ताडाचीं झाडें होती. मी त्यांच्याजवळ गेलों परंतु तिथें कसलीच वस्ती नव्हती. मी ताडावर चढावयाला शिकलों नव्हतों म्हणून मला वाईट वाटलें. तिथें अधूनमधून बाभळीचीं झाडें होतीं व निवडुंग नि इतर कांटेरी झुडपेंहि होतीं. तिथून अनवाणी जाणें बरोबर नव्हतें म्हणून किनाऱ्यावरील वाळूवरूनच चालूं लागलों. पुढें मला एक वडाचें झाड दिसलें. विचार केला, याच्यावर चढून पहावें कुठें आसपास मानवी वस्तीची खूण दिसते कीं नाहीं तें. परंतु वडाजवळ जाऊन पाहतों तों त्याच्या आडोशाला ताडाच्या झावळ्यांनीं शाकारलेलीं लहानलहान घरें दिसलीं. मी जवळ जाऊन पोंचलों तों कुत्रीं भों भों करीत धांवत आलीं.

माझे कपडे बरेचसे सुकले होते. तरीहि मी ज्या अवस्थेंत होतों तीवरून मी कसल्या तरी संकटांत सांपडलेलों आहे हें पाहणाराला समजण्याजोगं होतें. कुत्र्यांचें भुंकणें ऐकून दोन तीन स्त्रिया धांवत आल्या. त्यांनीं कुत्र्यांना हांकलून लावलें. त्या कांहींतरी बोलत होत्या परंतु मला एक शब्दहि समजत नव्हता. मी विचार करूं लागलों, मी कुठल्या तरी निराळ्याच द्वीपांत तर पोंचलों नाहीं ? परंतु तुफानाच्या अगोदर नाविकांना जहाजाच्या दिशेसंबंधीं पक्की खात्री होती; आम्ही किनाऱ्यापासून फारसे दूर गेलेलोंच नव्हतों. मग वेगळ्या द्वीपांत कसे पोंचलों ? त्या स्त्रियांचा वर्ण जांभळा होता. त्यांनीं परिधान केलेलें निळ्या रंगाचें अंतरवासक फक्त कमरे-खालच्या भागापुरतेंच होतें. कमरेच्या वरचें शरीर सगळें उघडें; फक्त डोकें तेवढें काळ्याभोर केंसानीं झाकलेले होतें व त्यांचा बुचडा मानेवर रुळत होता. गळ्यांत शिंपा, दगड व कवड्यांच्या माळा होत्या. हातांत एकेक कांशाची बांगडी; कानांतहि कांहींतरी लटकावलेलें होतें; त्याच्या वजनामुळें कानाचे चोबे सुतासारखे ताणून खांद्याला चिकटावयास येऊं पाहत होते. मी द्वीपांच्या अनेक कथा ऐकलेल्या होत्या. लहानपणीं कुलूपाच्या तोंडून राक्षसिणींच्या एका द्वीपाची कथा मी ऐकलेली होती. फुटलेल्या जहाजांतले उतारू किनाऱ्याला लागल्याबरोबर पांचशें राक्षसिणींनीं त्यांना चहूं बाजूंनीं घेरलें व ते त्यांचे कायमचे कैदी झाले, अशी ती कथा होती. मला वाटूं लागलें, तशाच प्रकारचें तर हें द्वीप नसेल ना ? परंतु इथें पांचशें नव्हत्या, फक्त तिघीच होत्या.

त्यांनीं मला येण्याबद्दल हातानें खूण केली. मग मला माणसाजवळच्या आणखी एका भाषेची आठवण झाली. मी समुद्राच्या दिशेनें हात लांब केला, मग छातीवर हात ठेवला; आणखीहि अशाच खुणा केल्या. परंतु मी येत आहे असें पाहून त्या तिघी

मला हातांनीं खुणावून घराकडे चालूं लागल्या. घरें फारच लहान होतीं. छप्परच नव्हे तर भिंती देखील झावळयांच्याच होत्या. एका घराच्या दाराशीं जाऊन त्यांनीं आंत येण्याची खूण केली. माझ्या अंगावर कांटा उभा राहिला. त्या राक्षसिणी नव्हत्या याबद्दल तर मला खात्रीच होती; परंतु त्याचबरोबर माणूस हा राक्षसापेक्षांहि क्रूर असूं शकतो हेंहि चांगलें ठाऊक होतें. मी खोलींत गेलों आणि यांनीं दरवाजा बंद केला, तर समुद्रांतून वांचलेला माझा प्राण यांच्या हातीं लागावयाचा. मी दरवाजा-पाशीं जरा घुटमळलों. मग उजवा हात तोंडावर ठेऊन खूण केली. खाण्यापिण्याची खूण साऱ्या जगभर एकच असावीसें वाटतें. त्या तिघींपैकीं दोघी प्रौढ स्त्रिया आपसांत कांहीं तरी बोलत दुसऱ्या घराकडे गेल्या. आतां त्या झोंपडींत राहिली एकटी एक षोडशीच. त्या जम्बूश्यामा (जांभळासारख्या श्यामलवर्णी) तरुणीचे सगळे अवयव अत्यंत रेखीव होते. उघडे गोल गोल स्तन श्रीफलाशीं स्पर्धा करीत होते. टपोऱ्या विस्फारलेल्या डोळयांतील शुभ्र श्वेतिमा अत्यंत मोहक दिसत होता. त्याचबरोबर कथेंतल्या राक्षसिणींचें एकहि लक्षण तिच्या ठायीं दिसत नव्हतें. मी विचार केला, हिच्या ताब्यांतला कैदी होणें अपायकारक ठरणार नाहीं. मी मान वांकवून दारांतून आंत गेलों. प्रथम माझा स्वतःच्या डोळयांवर विश्वासच बसेना. तिथें ताडाच्या चटईवर सिंहवर्मा व त्याची प्रियतमा वासन्ती हीं दोघें गाढ झोंपलेलीं होतीं. छाती खालींवर होण्यापलीकडे त्यांची कसलीहि हालचाल होत नव्हती. मी इतर विचार मनांतल्या मनांत दाबून टाकले. पाटलिपुत्राहून निघाल्यापासून येथें येईपर्यंत घडलेल्या साऱ्याच घटना स्वप्नवत् होत्या काय ? मग हें सारें जीवनच स्वप्न म्हटलें पाहिजे. मी त्यांच्याजवळ जमिनीवर बसलों. जम्बूश्यामा तरुणीहि आंत येऊन एका कोंपऱ्यांत बसली. थोड्या अवकाशानें त्या दोघी प्रौढाहि आल्या. खापराच्या भांड्यांत भाताचें दाट आटवल व आणखी एका खापराच्या जलपात्रांतून पाणी भरून आणून तिनें माझ्यापुढें ठेवलें. मला भूक लागलेली होती. म्हणून अन्नाला नकार तर देववत नव्हता. परंतु त्याच्यासाठीं पोट हपापलेलें मात्र नव्हतें. मी दाट आटवलाचा एक घांस घेतला. त्यांत मीठहि होतें व मासेहि होते. सारा भात खाऊन वर जलपात्रांतलें सगळें पाणी मी प्यालों. दोन्ही रिकामीं भांडीं दोघी प्रौढांच्या समोर ठेवलीं. तरुणीला कांहींतरी सांगून त्या दोघी निघून गेल्या.

मी आतां सर्व प्रकारें निश्चिन्त होतों. माझा मित्र व त्याची प्रेयसी जिवंत असून दोघें माझ्या समोर हजर होतीं. मला तहानभुकेची कांहींच पीडा नव्हती. आतां या उच्छ्वसित परंतु निश्चल मूर्तींकडे बघत बघत मला प्रलयकालापर्यंत वाट पाहावयाला प्रत्यवाय नव्हता. मला कसलेंच काम नव्हतें; आणखी कशाचाहि विचार करण्याची

जरूर नव्हती. माझी नजर श्यामा तरुणीकडे वळली. परंतु एकमेकांची भाषा समजन नसतांना आम्ही बोलणार काय ? मी एक क्षणभर तिच्या चेहऱ्याकडे टक लावून बघितलें आणि मग संकोच वाटल्यामुळें नजर दुसरीकडे वळविली. परंतु ती निःसंकोचपणें माझ्याकडे बघत आहे हें मला दिसतच होतें. माझ्या कंचुकावर हंस-मिथुनाची आकृति काढलेली होती. षोडशीची नजर त्याच्याकडे गेली. ती मला अगदीं खेटून बसून हंस-मिथुनाकडे अत्यंत लक्षपूर्वक पाहूं लागली. ती हातवारे करीत कांहीं तरी बोलली व हंसली. थोड्याच वेळांत माझाहि संकोच गेला. तीहि माझें कंचुक व अंतरवासक हातानें चुरगळून पाहात होती. आणि मी तिचें अंबाडीच्या वाकाचें अंतरवासक किती खरखरीत लागतें हें हात लावून बघत होतों. इतर कोणत्याहि बाबतींत मला तिचें अनुकरण जमणें शक्य असलें तरी तिच्या अव्याज हंसण्याचें व संकोचशून्य निर्मळ नजरेचें अनुकरण करणें ही माझ्या आवांक्याबाहेरची गोष्ट होती.

अशा प्रकारें आम्ही दोघें मूकवाणीनें एकमेकांच्या अंतरंगांत प्रवेश करण्याचा प्रयत्न करीत एकमेकांजवळ एक युगभर बसून राहिलों असूं कदाचित; तेवढ्यांत सिंहवर्म्यानें आळस दिला. त्यानें डोळे उघडले. मी झेंप घेऊन त्याच्याजवळ गेलों. तो उठून उभा राहिला आणि कितीतरी वेळ कांहींएक न बोलतांच आम्ही दोघे एकमेकांना आलिंगन-प्रत्यालिंगन देत राहिलों. मग प्रथम मीच बोललों–" मित्रा सिंहा ! आपला हा पुनर्जन्मच नव्हे का ? "

" अन् किती सुन्दर जन्म ! यांत जन्माला आल्याबरोबर तारुण्य मिळालं, जन्माला येतांक्षणीं प्राणांबरोबर मित्राची गांठ पडली. " आमची हालचाल व उद्गार श्यामा षोडशी सस्मित वदनानें व विस्फारित नयनांनीं बघत होती. आमच्या आवाजानें वासन्तीलाहि जाग आली. ती संकोचानें आपल्या परकराच्या पदरानें अंग झांकून घेऊं लागली. मी म्हणालों--" वासन्ती वहिनी ! आतांपर्यंत जें शिकली होतीस तें विसरून जा. समुद्राच्या इतक्या लाटांनी तें धुतलं गेलं असं समज. आतां तुझ्यासमोर बसलेल्या या षोडशीजवळून कांहींतरी शिकून घे. "

वासन्ती गालांतल्या गालांत हंसली. तरीपण पदर सांवरण्याचें काम तिनें चालूच ठेवलें. माझ्याप्रमाणें त्या दोघांचेंहि फक्त अंगावरचे कपडेच तेवढे राहिलेले होते. या वेळीं सार्थवाहाच्या मृत्यूसंबंधानं कांहीं सांगणें मला प्रशस्त वाटलें नाहीं.

आतां आम्हांला अनेक समस्या सोडवावयाच्या होत्या. आम्ही आहोंत कुठें याची माहिती सगळ्या आधीं मिळविणें जरूरीचें होते. परंतु हें समजणार कसें ? त्यांच्या भाषेंतला एक शब्दहि आम्हांला कळत नव्हता; आमची भाषाहि त्यांना आम्ही समजावूं शकत नव्हतों.

पहिल्या प्रथम मी विचारलें— " सिंह ! आधीं मला हें सांग, तुम्ही कांहींतरी खाल्लं आहे का ?

" नाहीं, खाल्लं तर नाहीं; परंतु आतां भूक लागली आहे. "

आम्ही हें बोलणें बोलत होतों येवढ्यांतच त्याच मातीच्या भांड्यांतून लाल पातळ भात व दुसऱ्या भांड्यांतून पाणी येऊन हजर झालें. मी वासंतीकडे वळून म्हणालों—" वासन्ती राणी ! लाजूं नकोस हो ! आपल्या अंगांत येवढे तरी कपडे शिल्लक राहिले हें सुदैवच म्हटलं पाहिजे. नाहींतर आपणांला तिघांनाहि गर्भांतून ज्या अवस्थेंत बाहेर यावं लागलं त्याच अवस्थेंत समुद्राच्या गर्भांतून बाहेर यावं लागलं असतं. ठीक. तुला ही श्यामा सुन्दरी शिकवील सगळं कांहीं. "

वासंती नुसतीच गालांतल्या गालांत हंसली. श्यामाच्या ओठांवर हंसूं नाचूं लागलें.

मग मी म्हणालों—" मित्र सिंह ! आतां सगळ्या गोष्टी बाजूला सारून पहिल्या प्रथम या समोर आलेल्या अन्नदेवतेची पूजा करा बरं. यांत मीठ, भात, मासे व पाणी यांच्याशिवाय दुसरं कांहींहि नाहीं. परंतु कुणाहि परमभट्टारकाच्या मुदपाकखान्यांत देखील इतकं मधुर भोजन मला खायला मिळालेलं नाहीं हें मी शपथेवर सांगतो. "

खापराची थाळी सिंहवर्मापुढें ठेवण्यांत आली. ती वासन्तीपासून दूर नव्हती परंतु तिचा हात अजूनहि जागचा हललेला नव्हता. मला पुन्हां सांगावें लागलें— " वहिनी ! भायर सिंह माझ्यापेक्षां पांच वर्षांनीं वडील आहे म्हणून माझं तुझं हेंच नातं आहे. जर माझ्या तोंडून एखादी अनुचित गोष्ट निघाली तर भावजया-दिराचं बोलणं ज्या दृष्टीनं विचारांत घेतात त्याच दृष्टीनं ती विचारांत घे. आणि आतां या दास भाऊजीला परमभट्टारिका वहिनीसमोर अशी प्रार्थना करावयाची आहे कीं आपण आमची वहिनी होण्याच्या अगोदरच वहिनींचे भट्टारक सिंहवर्मा यांच्या महादेवी झालेल्याच होतां आणि हें आपणां तिघांनाहि ठाऊक आहे. ही श्यामा व या गांवांतल्या इतर स्त्रियाहि याखेरीज दुसरी कसलीच समजूत करून घेणार नाहींत. मग हात लांब करायला संकोच कां वाटावा बरं ? या गांवांत दोन दोन थाळ्या मिळायची आशा धरूं नका. "

सिंहानें वासन्तीचा हात धरून भातांत घातला. तिनें पहिला घांस घेतांना मान मुरडून दोन्ही डोळे मोठे करून माझ्याकडे पाहिलें. मी चित्र काढतांना व इतर वेळींहि वासन्तीला अनेक वेळां पाहिलें होतें. या वेळीं तिचे डोळे लाल झालेले होते, तिच्या चेहऱ्यावर थकव्याची लक्षणें दिसत होतीं, तरीहि ती या प्रसंगा-इतकी सुन्दर कधींहि दिसली नाहीं. मी म्हणालों—" बस्स ! वहिनी ! तूं आपले

मधुर कटाक्ष अशा रीतीनं या दासावर अधून मधून फेंकत जा, म्हणजे मग हा लक्ष्मण आपल्या दादा-वहिनींसह चौदा वर्षंच काय, सारा जन्म वनवासांत घालवायला तयार आहे. ''

सिंह मध्येंच म्हणाला--'' फार पुढं जाऊं नकोस जय! तुझी वहिनी अशीच मुकी राहील असं नको समजूंस. अन् ती जर का एकदां बोलायला लागली कीं मग तुला जबाब नाहीं सुचायचा. ''

वासन्तीनें मान हलवून सिंहाच्या बोलण्याला अनुमोदन दिलें.

## ( १० )

## मानवतेच्या बाल्यावस्थेंत

भोजनानंतर सिंहानें स्वतःची हकीकत सांगितली. ज्या वेळीं गलबत खडकावर आपटलें व सर्वत्र मृत्यूची छाया पसरून साऱ्यांच्या तोंडचें पाणी पळालेलें दिसलें, त्याच वेळीं त्यानें भयभीत वासंतीचा हात पकडून ठेवला. समुद्रांत बुडावयाच्या अगोदरच जणूं ती बुडूं लागलेली होती आणि सिंहाचा हात हा तिला मोठाच आधार मिळाला. आपल्या जीवनाचा हा अंतिम क्षण आहे हें दोघांनाहि क्षणार्धांत कळून चुकलें. रात्रीची वेळ. अंधारांत कुणाच कुणाला पाहूं शकत नव्हतें. आम्ही एकाच ठिकाणीं झोंपलों होतों, म्हणून हातानें चांचपडूनहि त्याला वासंती मिळूं शकली असती. परंतु ती दिवसाउजेडींची वेळ असती तरी देखील या प्रणयी जोडप्यानें आपला अखेरचा क्षण लाज-संकोचांत नसता दवडला. सिंहानें आपल्या दोन्ही बाहूंनीं वासंतीला वेंगेत घेतलें आणि दोघांचीं शरीरें एकजीव झालीं. या सगळया गोष्टी एका क्षणाच्या अवधींत झाल्या आणि दुसऱ्याच क्षणीं त्याच अवस्थेंत आपण समुद्राच्या पाण्यांत आहोंत असें दोघांना दिसलें. दोघांना पोहतां येत नसतें तर त्यांचे जीव कदाचित वांचलेहि नसते. सिंह सांगत होता--'' जय! पाण्यांत पडतांक्षणीं एका क्षणांत सारा घाबरटपणा नाहींसा झाला. एकमेकांच्या गळ्यांत गळे घातलेले असतांनाच आम्ही पाण्यांत पडलों याची मला आठवण आहे. परंतु लगच्या लगेच हात सोडून आम्ही पोहूं लागलों. वासंती थोडा वेळ अलग झालेली होती. मी हांक

मारल्यावर ती माझ्या जवळ आली. मी तिला डाव्या हातानें माझा कटिबंध धरून ठेवावयास सांगितलें. अशा तऱ्हेनें आम्ही कितीतरी वेळ पोहत राहिलों. मग निराशा व थकवा येऊं लागला. मी शवासन करून पाण्यांत उताणा झालों व वासंतीलाहि मी तसेंच करण्यास सांगितलें. अपघातानंतर लगेच समुद्रांत जी भीषण शांतता प्रस्थापित झाली, तिच्यामुळें आम्हांला एक लाभ अवश्य झाला: आम्हांला एकमेकांचे श्वास देखील ऐकूं येऊं लागले, आणि हालचाल अर्धी करूनहि आम्हांला पोहतां येऊं लागलें. आम्हांला फार पोहावें लागलें. अर्थात आमचे हातपाय दमूं लागले यांत शंकाच नव्हती. "

वासन्ती चुपचाप बसलेली पाहून मी तिला म्हणालों—" वहिनी ! पाहिलंस ना ! मृत्यूच्या जबड्यांतून बाहेर पडावयाचा प्रयत्न सिंहदादानंच केला असं दिसतंय ! " वासन्ती हंसली. तिनें आतां तोंडाचें कुलुप काढलें : " पुरुषांचा तर हा स्वभाव-धर्मच आहे. "

" परंतु वहिनी ! स्त्रीनं पुरुषाला हें करायचं स्वातंत्र्य दिलं तेव्हांच त्याचा हा स्वभाव बनला. "

" जय ! या बाबतींत माझा मतभेद आहे. परंतु अगोदर मला माझी हकीकत पुरती सांगूं दे. त्या वेळीं वासंती मला बिलगलेली पाहून माझ्या शरीरांत व मनांत जीवनसंग्रामासाठीं दुप्पट शक्ति आलेली होती हें मी अनुभवानं सांगतों. आम्ही अधूनमधून थांबत थांबत पहाटेपर्यंत पोहत राहिलों. शरीरांतलें त्राण नाहींसें होत चाललें, तरी आमचा उत्साह मात्र कमी नाहीं झाला. याच सुमारास माझे पाय जमिनीला लागले. मी गळ्याइतक्या पाण्यांत उभा राहिलो आणि अजून पोहत असलेल्या वासंतीचा डावा हात धरून म्हणालों–सुन्दरि ! आतां तूंहि माझ्या खांद्यावर बैस. "

" ओहो ! भायर सिंह ! म्हणजे तूं भीम झालास म्हणायचा. पण छे ! तुझ्यासाठीं आणखी कुणाची तरी उपमा शोधली पाहिजे. तूं कदाचित कुंभकर्ण असावास. साता समुद्रांचं पाणी म्हणे त्याच्या गुडघ्यापर्यंतच पोंचत असे. अन् द्रौपदीनं तुझ्यावर विश्वास ठेवला. "

" नाहीं भा...... " वासन्ती बोलतां बोलतां मध्येंच थबकली. मी म्हणालों– " वहिनी ! अडखळूं नकोस. मी तर भाऊजीच आहे तुझा. "

" ठीक आहे. भाऊजी ! आम्ही कांठालगतच्या उथळ पाण्यांत येऊन पोंचलों हें मला समजून आलं खरं, पण मी पाय जमिनीला लावूं लागल्यें तों नाक बुडूं लागलं. "

" म्हणून द्रौपदीनं भीमाच्या खांद्याचा आश्रय घेतला म्हणायचा. "

" असं नव्हे हं. मी हाताला धरून पोहायला मागत होतें; पण सिंहांनीं जबर-दस्तीनं मला आपल्या खांद्यावर बसवून घेतलं."

" अस्सं! भायर भट्टारक जबरदस्तीनं भीम होऊं पाहत होता म्हणायचा!

त्या वेळीं मी हजर नव्हतों. नाहींतर द्रौपदीला भीमानं समुद्रांतून वर कसं काढलं तें मला बघायला मिळालं असतं. मला वाटतं तुला भीमापेक्षां जास्त चांगली उपमा शोभते महावराहाची. कारण विष्णूनं महावराहाचा अवतार धारण करून पृथ्वीचा उद्धार केला होता तो बहुधा समुद्रांतूनच असावा. मात्र असली उपमा मला आवडत नाहीं हं."

" होय हो भाऊजी! हे भीम अगर महावराहाची भूमिका करायला त्या वेळीं फारच उतावीळ झालेले होते. यांचा सगळा थकवा त्या वेळीं कुठं गेला होता कोण जाणे. अन् भलतेच विनोद-प्रिय बनले होते हे त्या वेळीं."

" जय! विनोदप्रिय कां होऊं नये मी? कुणी तुझ्यासारखे स्वभावतःच विनोद-प्रिय असतात अन् कुणी हर्षातिरेकाच्या भरांत थोड्या वेळापुरते तसे होतात. मला जर एकट्यालाच समुद्रांतून बाहेर यावं लागलं असतं तर माझी दशा काय झाली असती याची बरोबर कल्पना तुला आहेच. मी माझ्या उमेला माझं अभिन्न अंग बनवून मृत्यूच्या मुखांत उडी घेतलेली होती. अन् आतां त्याच अवस्थेंत आम्ही दोघं जीवनांत प्रवेश करीत होतों. मनुष्य वेदनांचा ( सुख-दुःखाचा ) अनुभव प्रथम घेतो अन् त्या व्यक्त करायसाठीं शब्द मागाहून शोधून काढतो."

" वहिनी! भायर भीमानं तुला आपल्या खांद्यावर घेऊन समुद्रांत अवगाहन केलं तेव्हां तुला काय वाटत होतं?"

" मी पूर्व दिशेच्या अरुणाचं दर्शन घेत होत्यें."

" अर्थात् तूं जीवनप्रभात व तिचा अपार आनंद बघत होतीस."

सिंहवर्मानें आपल्या हकीकतीचा समारोप असा केला-" आम्ही वाळूवर उभे राहिलों तेव्हां पूर्व दिशेला किंचित लाली दिसूं लागली. अजूनहि आम्हांला धांप लागलेलीच होती. आम्हांला हे ताड दिसले, परंतु आतां आम्ही इकडे तिकडे भटकायच्या ऐवजीं थोडी विश्रांति घ्यायचा निश्चय केला. याच्या पुढची कथा मोठी नाहीं. आम्ही विश्रांति घेत होतों त्याच वेळीं कांहीं पुरुष जाळं घेऊन किनाऱ्याकडे आले अन् त्यांच्या पैकीं एक जण आम्हांला इथं पोंचवून गेला."

" अन् मी इथं येऊन पोंचलों तेव्हां तुम्ही दोघं या चटईवर गाढ झोंपलेले होतां."

" भाऊजी! आतां तुम्ही तुमची कहाणी सांगा."

" वहिनी ! तुझे हे उद्गार किती गोड लागतात म्हणून सांगूं ! मलाहि तुमच्या बरोबरच समुद्रांत उडी मारावी लागली असती. मग भायर सिंहाला युधिष्ठिरच राहण्यावर संतुष्ट व्हावं लागलं असतं. माझी कथा तुमच्या नेमकी उलट आहे. तुम्ही तुमची झोंप या झोंपडींत पुरी केलीत अन् मी क्षीरसागरांतला शेषशायी झालों. "

वासंतीच्या ओठांवर व डोळ्यांत हंसूं विलसलें. सिंहवर्मा म्हणाला–" अर्थात् तुला एखादी मोठी फळी हातीं लागली असेल व पोहण्या ऐवजीं तूं तिच्यावर झोंपला असशील. "

" मला इतका खालीं ओढूं नकोस हं सिंह भायर. "

" वहिनीच्या देखत का ? मी तर भीमच राहिलों अन् तूं झालास शेषशायी भगवान्. खरं म्हटलं म्हणजे तूं हातपाय सैल सोडलेस अन् पराक्रम करायच्या ऐवजीं आपला जीव निर्जीव फळीच्या व समुद्राच्या लाटांच्या हातीं देऊन टाकलास. "

" सिंहभय्या ! वहिनीच्या देखत माझी इतकी बेअब्रू नको करूंस. "

" जय भाऊजी ! तुमच्या भावाचं बोलणं खरं मानण्या इतकी का तुमची वहिनी निर्बुद्ध आहे ? तिनं आपल्या सार्थवाह मामाच्या तोंडून सगळं कांहीं ऐक-लंय. जंगलांत शबरांशीं लढतांना तुम्हीं जो पराक्रम दाखविलांत तो माझ्यापासून लपून राहिलेला नाहीं. "

" परंतु वहिनी ! त्या पराक्रमांत माझ्या भय्याचीहि निम्मी वांटणी होती. "

" तुमच्या भय्याला मी पराक्रमहीन म्हणत नाहीं. परंतु तुम्ही कांहीं केवळ शेषशायी नाहीं हें मला ठाऊक आहे. तसंच कांहीं तरी कारण असेल म्हणूनच तुम्ही असं केलं असेल. "

" भट्टारिका वहिनी ! धन्य आहे तुमची ! भाऊजींच्या गुळचट थापा ऐकून दोनच तासांत त्याची बाजू घेऊं लागलीस. "

" तसं नव्हे सिंह भय्या ! वहिनींचं म्हणणं बरोबर आहे. ऐक काय कारण होतं तें. मला दिशांचा कांहीं पत्ताच लागेना; त्या तसल्या अंधारांत किनारा किती दूर आहे याचा मला अंदाज येईना. भय असं वाटूं लागलं कीं मी जर हातपाय हालवूं लागलों अन् माझं तोंड किनाऱ्याच्या उलट दिशेला असलं तर माझा पराक्रम जगायच्या कारणीं लागण्याऐवजीं मरायच्या कारणीं लागायचा. तुम्ही मात्र पराक्रम केलांत खराच. किनाऱ्याची दिशा मिळाली हा एक योगायोगच होता. "

" अन् माझ्या भाऊजींनीं योगायोगावर भिस्त नाहीं ठेवली. "

" आतां माझी कथा थोडक्यांत सांगतोंः मी फळीवर शेषशायी भगवाना-सारखा दुनियेची बिलकुल पर्वा न करतां मनमुराद झोंपून राहिलों. पहाटे डोळे उघडून पाहिलं तेव्हां किनारा अगदीं नजीक दिसला. मग किनाऱ्याला लागलों. कडे कडेनं

उत्तरेकडे चाललों. फुटलेल्या गलबताचे कित्येक अवशेष व कित्येक प्रेतं मिळालीं. शेवटीं या वडावर चढून चहूं बाजूला बघावं म्हणून इथं आलों तों या झोंपड्या दिसल्या. श्यामा तरुणी व तिच्या दोघी सहचरींनीं कुत्र्यांच्या तावडींतून वांचवलं. इथं आल्यावर वहिनी व भय्या गोड निद्रेंत मग्न झालेलीं पाहिलीं. ''

मी त्या प्रसंगीं सार्थवाह व त्याची पत्नी यांच्या बाबतींत कांहींच सांगितलें नाहीं. ही दुःखद बातमी ऐकण्यासाठीं वहिनींचें मन तयार करण्यांत मला कांहीं दिवस घालवावे लागले. आणि तिला हें कळल्यावर कांहीं दिवस तिच्या डोळ्यांचें पाणी खळलें नाहीं. तिचे कोमेजलेलें मुख पुन्हां टवटवीत करण्यासाठीं आम्हांला महिनेच्या महिने खटपटावें लागलें.

* * * * *

आम्ही आहोंत कुठें, हें समजून घेण्याची आम्हांला फार उत्कंठा लागली. परंतु भाषा समजत नसल्यामुळें आम्हांला तिथल्या लोकांजवळ कांहीं विचारपूस करतां येईना. त्या दिवशीं संध्याकाळीं गांवच्या साऱ्या नरनारी शिकारीहून व शेतां-वरून परत आल्या आणि त्या निःशब्द झोंपड्यांमध्यें पुन्हां जागृति आली. वृद्ध प्रमुखानें आम्हांला आपल्या घरीं बोलावलें. तिथें आणखी कित्येक स्त्रीपुरुष होते. एकमेकांचें बोलणें समजत नसल्यामुळें त्यांना आमच्याशीं कांहीं बोलतां येईना. परंतु तांदुळाच्या मेरयाचा ( कच्च्या दारूचा ) खूप आग्रह झाला. खापराच्या घागरी भरून मेरय ठेवलेलें होतें आणि सर्वांपुढें तालपत्राचे चषक ( प्याले ) होते. श्यामा तरुणी वासन्तीला आपल्या सहचरींच्या मेळाव्यांत बसवून तिला मेरय पाजण्याची खटपट करीत असलेली मला दिसली. वासन्तीहि शहाणी होती. आपली परिस्थिति ती ओळखून होती. किती महिने व किती वर्षें पर्यंत याच अर्धनग्न तरुणी आपल्या सहचरी राहतील कोण जाणे, हाहि मुद्दा तिनें लक्षांत घेतलेला होता. पेयाबरोबर खावयाला आगीवर भाजलेलें मांस होतें. आम्ही खूप चवीनें खाल्लें-प्यालों. अंधार पडल्यावर ढोल व बांसरीवादन सुरू झालें. गांवच्या तरुण-तरुणी रात्रीं उशीर पर्यंत नाचत राहिल्या. त्यांचा नाच अगदीं साधा होता. परंतु पाहिल्या बरोबर लगेच नृत्यांगणांत उतरण्याची माझी तयारी नव्हती. श्यामा तरुणी माझी गुरु झाली आणि नृत्याच्या साऱ्या मुद्रा शिकावयाला मला कांहीं दिवस लागले. बांसरी मात्र मी दुसऱ्याच दिवसापासून वाजवायला लागलों. बांसरीच्या द्वारां दोनच दिवसांत मी त्यांना कितीतरी हवाहवासा वाटूं लागलों हें मला दिसलें. ज्या दिवशीं मी नृत्यां-गणांत उतरून सराइतासारखा नाचूं लागलों, त्या दिवसापासून तर माझ्या गोऱ्या चामडीचा वायलेपणा कोठल्या कोठें लोपून गेला.

तिसऱ्या दिवशीं मी श्यामा तरुणीजवळून वाकाच्या कापडाचा एक लहानसा तुकडा घेतला व कमरेला करगोटा बांधून तिथल्या लोकांप्रमाणें लंगोटी घालूं लागलों. कंचुक व अंतरवासकाचें गाठोडें बांधून मी अकस्मात् वहिनीसमोर उभा राहिलों. माझ्याकडे पाहतांना तिच्या डोळ्यांत हास्याबरोबर आश्चर्याची छाया दिसत होती. मी गांठोडें तिच्या पुढ्यांत ठेवलें; शंभर दीनार काढून तिच्या हातीं दिले आणि म्हणालों–" वहिनी ! तुला वाटत असलेल्या आश्चर्याचं समाधान मी मागाहून करतों. अगोदर हे दीनार कुठंतरी जमिनींत पुरून ठेव; एखादवेळ कदाचित उपयोगी पडतील. तूं आपली निष्कमाला ( पुतळ्यांची माळ ) परवां संध्याकाळींच काढून ठेवलीस हें चांगलं केलंस. "

कोरड्या वाळूपाशीं पोंचतांक्षणीं मी वासंतीला अंगावरचे दागिने काढून द्यावयास सांगितलें. तसे बहुतेक दागिने तर पेटींतच होते आणि त्यांनीं पेटीसकट समुद्राचा तळ गांठला असल्यामुळें ते आतां नागलोकांतील कुणातरी अप्सरेला मिळाले असा-वेत. परंतु जे दागिने अंगावर राहिले होते ते काढण्याचा वासंतीला संकोच वाटत होता. दागिन्यांपायीं प्राणहि ज्याण्याची पाळी येते हें मी तिला दाखवून दिलें व म्हणालों —

" असो. दागिन्यांच्या तावडींतून तर वहिनीची सुटका झाली. परंतु अजून बऱ्याचशा गोष्टींपासून तिला सुटका करून घ्यायची आहे. "

" कोणकोणत्या गोष्टी म्हणतांय भाऊजी ? "

" पहा ना तुझा भाऊजी कशा रीतीनं मुक्त होऊन तुझ्यापुढं उभा आहे तो. "

" साधु-साधु जय ! हं ! वासन्ती भट्टारिका ! आतां घे कीं दिराचा पक्ष ! घे घे ! "

" मी भाऊजींची कोणतीच गोष्ट निरर्थक समजत नाहीं. तिच्यांतला मतलब समजायला जरा वेळ लागेल, नाहीं असं नाहीं, परंतु माझे भाऊजी जें जें कांहीं सांगतात, त्यांत कांहींतरी गंभीर अर्थ भरलेला असतो. "

" चांगली गोष्ट आहे. भट्टारिकेचा भाऊजी जर शुक्र व बृहस्पतीच आहे तर मग आतां उशीर कशाला ? भट्टारिकेनंहि अशाच तऱ्हेनं मुक्त व्हावं म्हणजे मग या दासालाहि दुसरा कांहीं मार्गच राहणार नाहीं. "

" भैय्या माझं बोलणं असं थट्टेवारी नको नेऊंस. आपल्याला आतां इथं किती महिने राहावं लागेल याचा कांहींच नेम नाहीं. आजू बाजूच्या स्थळांच्या बाबतींत कांहीं माहिती मिळाल्याशिवाय या अपरिचित बांधवांचा आश्रय आपल्याला सोडतां येणार नाहीं. भय्या ! तूं भट्टारिका वहिनीचा हितेच्छू नाहींस एकूण. "

" मी कसचा हितेच्छू असणार ? हितेच्छू तर वहिनीचा दीरच असतो. चारी युगांचे कवि तर दीर-भावजयींचेंच गाणीं गात आलेले आहेत. "

" ऐक वहिनी ! भय्या तसा कांहीं भोळा माणूस नव्हे. यानं मनांत दूरवरचा विचार करून माझं बोलणं थट्टेवारी नेऊन आपल्या मताचं घोडं पुढं दामटायचा बेत चालवलाय. याची इच्छा अशी आहे कीं भट्टारिकेवर जेव्हां आपल्या लोकां-समोर जायची पाळी येईल तेव्हां तिनं त्या श्याम तरुणीच्या वेशांतच जावं अन् माझी इच्छा अशी आहे कीं माझ्या वहिनीनं आपल्या स्वतःच्याच वेशांत आपल्या लोकांसमोर जावं. "

" जय ! तूं मोठा धूर्त आहेस हं ! "

" वहिनी ! मी धूर्त का माझा भय्या धूर्त याचा येवढ्यांतच पत्ता लागतोय बघ. तूंच सांग बरं, तुझी ही कंचुकी व शाटी रात्रंदिवस वापरल्यावर किती दिवस टिकेल ? "

" पांच नाहींतर सहा महिने. " हें सांगतांना वासंतीचा चेहरा थोडासा गंभीर झाला.

" अन् भय्या भट्टारक ! इथून निघून आपल्या लोकांत पोंचायचा योग किती दिवसांनीं येईल तें तरी सांग जरा. "

" तुला ज्योतिष येतं; तूंच सांग. "

" मला तर ज्योतिष नाहीं येत. परंतु सहा आठ महिने अगर वर्षाच्या अव-धींत सुद्धां आपण इथून निघून जायची कांहीं आशा आहे असा मला तर मुळींच भरंवसा वाटत नाहीं. अन् भय्या भट्टारक ! तोंपर्यंत वहिनीचे कपडे जर टिकले नाहींत तर मग तूं तिला काय अंगांत घालायचा सल्ला देशील ? "

सिंह चुपचाप बसलेला होता. अन् वहिनी कसल्या तरी विचारांत गुंग झालेली होती. मी पुन्हां म्हणालों– " वहिनी ! तूं आजच्या आजच वाकाचं अन्तरवासक ( लुंगी ) नेसून श्यामा तरुणी सारखी हो असं नाहीं माझं म्हणणं. मात्र तुला हे कपडे सांभाळून ठेवावे लागतील. गुरवातीला नहायच्या वेळेला अन्तरवासक नेसायची संवय कर अन् मग धीरे धीरे त्यांच्या सारखाच पोशाक करायला लाग. "

" भाऊजी ! तुमच्या बोलण्यांत पुष्कळ तथ्य आहे, पण...... "

" तसा ' पण ' फारच मोठा आहे. पन्नास पिढ्यांपासून लागलेली संवय एका दिवसांत नाहीं सुटायची. परंतु एका महिन्याच्या आंतच अगदीं जुन्या संवयी देखील क्षुल्लक वाटूं लागतील. तोंपर्यंत माझी वहिनी आपल्या मनाची तेवढी तयारी करील असं वाटतं मला. "

" अन् तुमच्या भय्या भट्टारकाचं काय होणार ? "

" भय्याला तर उद्यांच ठाकठीक करणार आहे. "

" जय ! तुझा आत्मविश्वास जबरदस्त आहे म्हणायचा. "

" भय्या ! इथं आतां हातीं तूलिका धरायची आशा मनांत ठेवूं नकोस. आपण आपल्या नवपरिचित मित्रांच्या दातृत्वावर जगायचं नाहीं. पाहुणेपणा दोन चार दिवसांचाच असतो. दीनारांमुळं इथं संकट येईल का सुख मिळेल हें समजायचा उपाय आपल्या जवळ कसलाच नाहीं. म्हणून आपल्याला त्यांच्याचसारखं काम करावं लागेल. इथं नांगर चालत नाहीं; गाई बैलांचीहि जरूर नाहीं लागत. परंतु आपल्यालाहि शेतांत कुदळ चालवतां येते. दहा दिवस पर्यंत या श्रमामुळं कदाचित आपले हात दुखतील, तळहातांना फोड येतील; परंतु आपल्या अंगीं इथल्या कुणा-पेक्षांहि कमी शक्ति नाहीं; म्हणून दहा दिवसांनंतर आपल्याला त्यांच्या इतकं काम करतां येईल. दुसरं काम आहे मासे पकडणं; तेंहि आपण यांच्या बरोबर राहून शिकून घेऊं. "

सिंहवर्मानें माझा हात आपल्या दोन्ही हातांत घेतला व पुलकित होऊन वासंतीकडे वळून तो म्हणाला-"पाहिलंस ? मी माझ्या भावाची खोटी तारीफ नव्हतों करीत. तुझ्या समोर मीं त्याची जेवढी प्रशंसा केली तिच्या पेक्षांहि जास्त प्रशंसेला तो पात्र आहे हें तुला पटलं ना आतां ? "

" समजा मला हें पटतच नव्हतं. पण भाऊजींचा अभिमान तुमच्यापेक्षां मलाच जास्त वाटतो. "

" अभिमान आहे तर दिराच्या पावलावर पाऊल टाकायला तयार हो. "

" तुम्ही उपदेश करायची जरूर नाहीं. मी उद्यांपासूनच श्यामा तरुणीचीं कामं बघून कांहींतरी काम करीन. दुसरं कांहीं नाहीं तरी मला भात तर शिजवतां येतो, पाणी तर आणतां येतं. "

" अन् मग शाटी-कंचुकीच्या बाबतींत काय विचार आहे ? "

" भाऊजींचा विचार बरोबर आहे. कांहीं दिवसांच्या अवधींत मी तेंहि काम उरकून घेईन. परंतु, अहो तुम्ही नागरिक चित्रकार ! तुमचं काय ठरवलंयत तें तरी सांगा. "

" नागरिक चित्रकाराला पुष्कळ दिवसांपासून आपल्या धाकट्या भावाच्या पावलावर पाऊल टाकून चालायची संवय आहेच. अन् आज सूर्यास्तानंतर आम्ही दोघे सारखाच वेश करून नृत्यांगणांत उतरूं. "

* * *

त्या पल्लीमध्ये आम्हांला एक वर्षाहून अधिक काळ राहावें लागलें. आम्हांला आमचा रंग तेवढा बदलतां आला नाहीं; नाहींतर आम्ही त्यांच्यातच जमा झालेलों

होतों. शेतावर व शिकारींत आम्ही त्यांच्याहूनहि अधिक मेहनत करीत होतों. पान-गोष्टींच्या वेळीं आम्ही त्यांच्या बैठकींत बसून सहपान करीत होतों. नृत्यांगणांत तर मी सर्वांत कुशल नर्तक ठरलों होतों. आजारपणांत, सुखदुःखांत, आमच्याबद्दल सर्वांना आपलेपणा वाटत होता. वहिनी तर रोग्यांची शुश्रूषा करतांना रात्र-रात्रभर जागून सर्वांच्या प्रेमाचा विषय झालेली होती. आमचें ज्ञान व आमचे संस्कार त्यांच्याच दर्जाचे असते तर त्या वेळचें आमचें जीवन सर्वश्रेष्ठ सुखमय झालें असतें. परंतु आम्हांला रोजच्या रोज कोणत्या ना कोणत्या तरी निमित्तानें आमच्या दुनियेची आठवण होत होती. काम नसलें म्हणजे फावल्या वेळांत आम्ही घटकाघटका समुद्राकडे टक लावून बघत किनाऱ्यावर फेऱ्या घालीत असूं. या किनाऱ्यालगत पाण्याखालीं लपलेले व वर आलेले धोकेबाज खडक खूप आहेत आणि कोणीहि नाविक याच्या आसपास कित्येक योजनांपर्यंत येण्याची हिंमत करीत नाहीं हें आम्हांला मुळीं ठाऊकच नव्हतें. आम्ही लांकडें तोडावयाला दूर अंतरापर्यंत जात असूं आणि पहाडांच्या शिखरावर चढून चारी दिशांकडे नजर टाकीत असूं; परंतु कुठूनहि कसलाहि आशेचा किरण आम्हांला दिसत नव्हता. आम्ही पल्लीला उपयोगी पडणारीं माणसें आहोंत याचा आम्हांला संतोष अर्थातच वाटत होता. सिंहवर्मा व वासन्ती पतिपत्नी असल्यामुळें त्यांची स्वतंत्र झोंपडी तयार झाली. परंतु मी होतों अविवाहित. पल्लीतील रहिवाशांच्या धर्मानुसार अविवाहित तरुण-तरुणींसाठीं एक बरीच मोठी अलग झोंपडी होती. दिवसभर आम्ही कामाला जात असूं; संध्याकाळीं भोजना-नंतर नृत्यांगणांत उशीरपर्यंत नाचगाणें होई. मी त्यांचीं कांहीं गाणीं शिकून घेत-लेलीं होतीं हें सांगावयास नकोच. हे सगळे कार्यक्रम झाल्यावर मग आम्हांला झोंपण्यासाठीं हीच झोंपडी. तरुण-तरुणींमध्यें अंतर येवढेंच ठेवलेलें होतें कीं याच झोंपडींत एका बाजूला मुली झोंपत असत व दुसऱ्या बाजूला मुलगे. सातव्या-आठव्या वर्षापासून चोवीस-पंचवीस वर्षें वयापर्यंतच्या वियांहून अधिक मुलांमुलींसाठीं हें समाईक शयनागार होतें. त्यांना एकमेकांची भेट घेण्याला कसलीहि आडकाठी नव्हती. झोंपडींत आल्यावर मुलगेच नव्हेत तर मुलीहि बहुतेक संपूर्ण नग्नच असत. या परिस्थितीची मी कधींकधीं पाटलिपुत्रांतील अंतःपुराशीं तुलना करीत असे. केवढा तरी मोठा फरक होता दोहोंमध्यें! पाटलिपुत्राच्या अंतःपुरांतल्या नरनारींना सारा वेळ कामुक (आणि त्याहूनहि बीभत्स स्वरूपाच्या) गोष्टींचा विचार-उच्चार-आचार करण्यापलीकडे दुसरें कांहीं कामच नव्हतें. आणि इथें त्या गोष्टींकडे कुणाचें लक्षहि जात नव्हतें. मात्र इथल्या तरुणतरुणींपैकीं कुणालाहि कुणाविषयींहि आकर्षण वाटत नव्हतें असा याचा अर्थ नव्हे. परंतु हें आकर्षण निरोगी मानवाला भोजना-

विषयीं जेवढें असेल तेवढेंच होतें. ते सारा दिवस भोजनाच्याच गप्पा मारीत बसत नव्हते. माझ्या मनांत विचार येई: हें असें कां असावें ? इथली कुमारी तितकी परतंत्र नाहीं हें उत्तर मला पहिल्या प्रथमच सुचलें. कुणाहि तरुणाला आपला प्रियकर म्हणून पतकरणें ही तिच्या हातची गोष्ट आहे. ना तिथें आईकडून आडकाठी, ना बापाकडून, ना गांवाकडून. जबरदस्तीनें प्रेम करण्याचा विचार तरुणाच्या मनांतहि येणें शक्य नाहीं. तरुणाजवळ तरुणीला आकर्षित करण्यासाठीं प्रासाद, दासदासी, यान-शिबिका व वस्त्र-आभूषण यांपैकीं कसलेंहि प्रलोभन नसतें. तरुणी त्याच्या घरीं दुसऱ्याची कमाई खाण्यासाठीं आलेली नसते; ती काम करण्यांत पुरुषाला मुळींच हार जात नाहीं. मग तरुणतरुणींजवळ एकमेकांना आकर्षिक करण्याजोग्या गोष्टी तरी आहेत कोणत्या ? या गोष्टी म्हणजे आरोग्य, सौन्दर्य, कार्यनिपुणता आणि गाण्यानाचण्यांतलें कौशल्य. त्यांतल्यात्यांत नृत्य तर आरोग्य मिळविण्याचें एक मोठें साधन आहे. नृत्य हा एक मनोरंजक व्यायाम आहे. मल्लांच्या इतर व्यायामामुळें माणसाचें मन एखादवेळ कंटाळतें; परंतु बांसरी व इतर वाद्यांचे मनोरम स्वर, तरुणतरुणींच्या मधुर कंठांतून निघणारे मादक गीतांचे आलाप, यांसमवेत प्रहरप्रहरभर साऱ्या गात्रांची हालचाल चालू ठेवण्याचा कंटाळा कधींच येत नाहीं. या व्यायामामुळें पल्लींतले सारेच पुरुष एकजात क्षीणकटि, विशाल-वक्ष व वृषभस्कंध असे झाले होते. त्यांच्या अंगावर चबीऐवजी पुष्ट पेशीच दिसत होत्या. स्त्रिया देखील नुसत्याच गोल गरगरीत नव्हत्या; त्यांच्याहि पेशी व नसा धष्टपुष्ट होत्या. सिद्धहस्त यवन कलाकारानें तयार केलेल्या श्यामा मूर्तीसारख्या दिसत होत्या त्या.

कुमार-कुमारींच्या झोंपडीचा मी सर्वमान्य पुढारी होतों. पल्लीच्या मोठ्या नृत्यांगणांत नाचगाणें चालू नसेल तर आम्ही आमच्या नृत्यांगणांत नाच करीत असूं. रोज रोज नाच करून कंटाळा आला म्हणजे मीं त्यांना मनोरंजक गोष्टी सांगत असें. कुलूपा आजीच्या तोंडून ऐकलेल्या गोष्टींचा मी या वेळीं खूप उपयोग करून घेतला. ज्ञान विज्ञानाची माहिती देणाऱ्या कहाण्या ऐकतां ऐकतांच त्यांना झोंप येऊं लागे. परंतु मी राक्षस, अप्सरा, देवता यांच्या मनोरंजक कहाण्या सांगूं लागलों कीं सारी जणें प्रसन्न मनानें ऐकत असत; मग त्यांना झोंप आणण्यासाठीं मला एक प्रकारची जबरदस्ती करावी लागत असे. तरुणांना प्रेमाच्या व वीररसात्मक कहाण्या सगळ्यांत जास्त आवडत असत; मुलांना भयंकर व भुतांखेतांच्या गोष्टीहि आवडत असत; तशाच भय नाहींसे करणाऱ्या गोष्टीहि त्यांना आवडत असत. मी एके दिवशीं अरियों व दोल्फी यांची कहाणी सांगत होतों—अरियों आपल्या देशांतला सर्वश्रेष्ठ गायक होता. त्याच्या मधुर कंठापुढे कोकिळेचा स्वर फिका पडत असे. त्याच्या बांसरीची तान ऐकून पशुपक्षीसुद्धां डोलूं लागत. ( तंतुवाद्यांशीं या लोकांचा

परिचय नव्हता म्हणून मी यांच्यापुढें अरियोंचें वर्णन 'तंतुवाद्यवादक' असें करण्या-ऐवजीं ' बांसरीवादक ' असें केलें.) तो फारच सुंदर गाणीं रचीत असे. या गाण्यांचे शब्द ऐकून रुष्ट प्रणयीजनांचीं हृदयें विरघळून जात असत. एकदां दुसऱ्या कुठल्या तरी टापूंमध्यें नृत्य-गीत-वाद्याचा महोत्सव होता. अरियों तिथें गेला. आपला व आपल्या पत्नीचा गौरव वाढवावा येवढ्याच उद्देशानें तो तिथें गेला होता. तिथें त्यानें आपल्या वाद्यानें--आपल्या बांसरीनें--आणि आपल्या संगीतानें लोकांना मोहित केलें.

बक्षीस म्हणून पैसे दिल्याची गोष्ट या लोकांना समजावून सांगणें कठीण आहे हें माझ्या लक्षांत आलें. कारण या लोकांच्या जवळ मला सोन्याच्या लगडींचें धन दिसलें नाहीं. म्हणून मी अरियोंच्या कथेला तिथोनृच्या कथेचें वळण दिलें. मी पुढची कथा सांगूं लागलों--"सुंदरी दोलफीनें आपल्या जवळ प्रशंसेचा एक शब्दहि काढला नाहीं हें पाहून अरियोंला लोकांच्या तोंडची प्रशंसा ऐकून प्रसन्नता नाहीं वाटली. तिची पिकलेल्या जांभळासारखी तजेलदार श्यामल अंगकांति, तिचे लांब-सडक काळे भोर केंस, तिचे टपोरे डोळे, अरियों एकाग्रतेनें बघत होता आणि त्यांचें वर्णन आपल्या छन्दामध्यें करून तो तन्मयतेनें गात होता. त्या सुंदरीच्या तोंडांतून शब्दहि निघत नाहीं हें पाहून त्याचें मन उदास झालें. त्याच्या डोळ्यांपुढें अंधारी आली, त्याची बांसरी हातांतून गळून पडली.

" कार्यक्रम समाप्त झाला. अरियों आपल्या मुक्कामाच्या जागीं गेला. आपल्या देशाला जाण्याचें त्यानें नांवच काढलें नाहीं. तो आजारी पडला. त्याचा चेहरा सुकूं लागला. बांसरी तोंडाला लावतांना ती जणूं साप आहे असें त्याला भय वाटे. ज्या लोकांनीं त्या दिवशीं त्याची प्रशंसा केली होती ते सारे स्त्रीपुरुष त्याच्या समाचाराला आले. अरियोंचे डोळे खूप खोल गेलेले होते. तो डोळे मिटून पडलेला असे. मात्र कुणी नवा माणूस आला कीं मग तो डोळे उघडून त्याच्याकडे बघत असे. सगळे लोक आले; परंतु जिनें अरियोंला आजारी पाडलें होतें ती तरुणी मात्र आली नाहीं. अरियों आतां जगेल अशी आशा राहिलेली नव्हती. कुणीतरी त्या तरुणीसमोर ही हकीकत सांगितली. शेवटीं तीहि अरियोंकडे आली. आतां अरियों म्हणजे नुसता हाडां-कातड्याचा सांपळा राहिलेला होता. परंतु त्यानें तरुणीला पाहिलें मात्र, त्याच्या डोळ्यांत तेज चमकूं लागलें, त्याच्या सुरकुतलेल्या गालांवर टवटवी आली, आणि मग त्यानें कायमचे डोळे मिटून घेतले. "

श्यामा सुन्दरीहि कुमारी असल्यामुळें अजून या समाईक झोंपडींतच राहत होती. ती इतरांपेक्षां जास्त बडबडी होती आणि गेले आठ-नऊ महिने मला भाषा शिक-विण्याची मेहनत सगळ्यांत जास्त तिनेच केलेली होती. तिला वाईट वाटलें. ती एकदम म्हणाली-" असल्या तरुणीचं हृदय दगडाचं असलं पाहिजे. "

मी म्हणालों–" कुणी सांगावं ? कोमल शरीरांत जशीं दगडासारखी हाडं दडून राहिलेलीं असतात, तसाच कदाचित हृदयाच्या जागीं दगड असेलहि. "

वहिनीनें आतां आपली सहचरी श्यामा हिच्याप्रमाणेंच राहणी पतकरलेली होती. या दोघी सौन्दर्याच्या साकार मूर्ति होत्या. एक शुभ्र संगमरवराची व दुसरी काळ्या संगमरवराची. एके दिवशीं आम्ही नजीकच्या डोंगरांत लांकडें तोडावयास गेलों. महिना कोणता चालूं आहे हें समजण्याचें कसलेंच साधन आमच्याजवळ नव्हतें. परंतु रात्रीं चन्द्राच्या आसपासची नक्षत्रें पाहून त्यांवरून कांहीं तरी अंदाज काढावयाची खटपट मी करीत असे. तो वसंतांतला एखादा महिना असावा. चहूंकडे रंगीबेरंगी फुलें फुललेलीं होतीं. आमचीं लांकडें तोडून झालेलीं होतीं आणि त्या वनांतल्या निसर्गाचा आनंद व विश्राम घेण्यासाठीं आम्ही एका झाडाखालीं बसलों होतों. सिंहाच्या मनांत एक विचार आला. तो फुलें गोळा करूं लागला; मीहि त्याला मदत केली. परत आल्यावर सिंह म्हणाला–" भट्टारिका ! आज मी तुला फुलांचा शृंगारसाज चढवूं इच्छितों. "

" अन् वहिनी ! मी तर असं म्हणेन की ज्याला कृत्रिम फुलांनीं चित्राची इतकी उत्तम सजावट करतां येते, तो नैसर्गिक फुलांच्या सजावटींत तर जास्तच कौशल्य दाखवील. "

वहिनी सस्मित वदनानें म्हणाली– " म्हणजे हा वनकुसुमांचा शृंगारसाज होणार तर ? "

" होय ग माझी वनदेवी. "

" अन् मला अशी इच्छा होऊं लागली आहे कीं या वनदेवीची सजावट पूर्ण झाल्यावर तिची एक मूर्ति बनवावी. "

" मूर्ति ? जय ! मलाहि कधीं कधीं माझ्या तूलिकेची आठवण होते. ही कला मी विसरून तर नाहीं ना जाणार, असं मला भय पडतं बघ. " सिंह म्हणाला.

" सिंह भय्या ! मला तर याचं जास्तच भय पडतं. परंतु माझं काम तुझ्यापेक्षां सोपं आहे. मी लोखंडाच्या दोन तीन छिन्न्या तयार करून घेतल्या आहेत. अन् दगड इथं आसपास आहेतच. "

" अन् मग ? " वहिनी माझ्याकडे पाहूं लागली.

" अन् मग आतां काय पाहिजे ? "

" वहिनीची आज्ञा. "

" सुम्ह नगरांत तें चित्र तयार करतांना तूं जशी कांहीं वहिनीची आज्ञाच घेतली होतीस नव्हे का ! "

" त्या वेळीं ती वहिनी नव्हतीच मुळीं. "

वहिनी मध्येंच म्हणाली–" तुम्ही कोणत्या चित्राबद्दल बोलतां आहांत ? मलाहि सांगा ना जरा त्यांतलं. "

" अग ! मी तुझीं दोन चित्रं तयार केलीं नव्हती का, तींच. त्यांतलं एक होतं वास्तविक अन् दुसरं होतं काल्पनिक. "

" अन् मग ? "

" वास्तविक चित्र होतं तुझ्या भाऊजींच्या हातचं अन् काल्पनिक होतं मी काढलेलं. "

" अन् तुम्ही झाले होतां दोन्ही चित्रांचे चित्रकार, होय ना ? "

" कारण मला जयची आज्ञा पाळणं भाग होतं. "

" आतां आलं लक्षांत. परंतु भाऊजी ! तुम्हांला कशासाठीं आज्ञा हवी ? "

" वनदेवीची मूर्ति घडवूं इच्छितों मी. हीच आज्ञा हवी. "

" परंतु जय ! माझी हरकत होईल त्याला. "

" भय्या ! हरकत कसली ? "

" हरकत हीच कीं तूं एखादवेळ या वनदेवीलाच शिला नाहीं ना बनवणार ! तुझा नेम काय सांगावा ! पल्लींत जाऊन सांगून देशील कीं आमची वहिनी वनस्पतीच्या स्पर्शानं शिला झाली. अन् लोक तेंच खरं मानूं लागतील. "

" परंतु मी तर समक्ष जिवंत हजर असेन ना. "

" जयचा नेम काय सांगावा ? तो सांगून देईल कीं ती ही नव्हे, दुसरीच आहे."

" तरी पण तुमचं नुकसान तर नाहींच होणार. "

" माझं नुकसान नाहीं होणार, पण तुझं नुकसान नक्कीच होईल. लक्षांत आलं का तुझ्या ? या पोशाकांत तुझा एकेक अवयव तो मूर्तीमध्यें जसाचा तसा घडवील अन् मग काय होईल ? सध्यां तर तूं वर्ष-सहा महिन्यांसाठीं हें वाकाचं अन्तरवासक नेसली आहेस, परंतु त्या मूर्तींत तें कायमचं होऊन बसेल ! "

" वहिनी ! माझंहि म्हणणं ऐक ना. हें तर बरोबरच आहे; वनदेवीला मी याच स्वरूपांत घडविणार. असेच फुलं गुंफलेले भुंग्यासारखे काळे कुळकुळीत केंस, अशींच कर्णपूरविहीन अनुपम श्रवणपुटं, असेच डौलदार गाल, असाच शंखाकृति गळा, असेच लतांसारखे बाहु........... "

" असेच उन्नत श्रीफलसदृश उरोज, अशीच बारीक कमर, अशाच वाकाच्या वस्त्राआड दडलेल्या केळीसारख्या मोठ्या मांड्या— सगळं कांहीं सांगून टाक. मला तर असं वाटतंय कीं वहिनीकडे अधून मधून पाहून तुझी तृप्ति होत नाहीं आणि म्हणूनच आतां तिचं नग्न सौन्दर्य एकाग्र नजरेनं तुला बघायला हवंय अन् अनन्त काळपर्यंत इतरांनाहि दाखवायला हवंय. "

" मला तर यांत कांहींच गैर दिसत नाहीं. "

" जर भावजय-दीर राजी तर मी कोण पाजी ? "

" भय्या ! मी वहिनीच्या मूर्तीजवळ या पाजीचीहि मूर्ति कोरूं इच्छितों. काळ्या पाषाणावर कोरलेली ही मूर्ति कुणाची आहे हें आणखी कुणाला कळतंय कशाला ? "

" मी एका अटीवर हें मान्य करायला तयार आहे. आमच्या जवळ तूं आपली मूर्तीहि कोरली पाहिजेस. "

" पण मला स्वतःलाच स्वतःची मूर्ति पाहतां कशी येईल ? "

" पाण्यांत बघावं.---" वहिनी म्हणाली.

" वहिनींची आज्ञा पाळायची खटपट करीन मी. अन् लोकांना असं वाटेल कीं राम-लक्ष्मण-सीतेनं या जंगलांत वनवास केला होता. "

मी त्यांना समोर बसवूनहि सरळ दगडावर मूर्ति कोरूं लागलों असतों तर तेंहि कदाचित मला साधलें असतें; परंतु चारचार महिनेपर्यंत त्यांना तिथें बसवून ठेवावयाचें आणि मग इतर प्रेक्षकांनाहि तिकडे यावयाला वाव द्यावयाचा हें मला बरें नाहीं वाटलें. मी अगोदर मातीच्या प्रतिमा बनविल्या आणि मग जेव्हांजेव्हां वेळ मिळे तेव्हांतेव्हां आपली छिन्नी व कुऱ्हाड घेऊन इकडे येऊं लागलों.

वहिनीची मूर्ति तयार झालेलीच होती आणि भय्याचा कमरेखालचा भाग तेवढा राहिलेला होता. त्या सुमारास एके दिवशीं झाडीच्या आडून दोन डोळे लुकलुकत असलेले मला दिसले. माझी नजर जातांच हे डोळे माघारी फिरूं पाहात होते, परंतु ते माझ्या परिचयाचे असल्यामुळें मी हांक दिली—" श्यामा ! " जबाब मिळाला—" ओ. "

मी तिला बोलावून घेतलें. मी रोज कुठें जात असतों हें समजून घेण्याची फिकिर श्यामाला कित्येक दिवसांपासून पडलेली होती. शेवटीं तिनें माझें रहस्य शोधून तर काढलेंच. श्यामा बराच वेळ वहिनीचें रूप पहात राहिली. मी विचारलें–" ही कोण आहे ? "

" वासन्तीताई. परंतु रंग तर तिच्यासारखा नाहीं. "

" श्यामा ! मला रंग तसा करतां येत नाहीं. मला केवळ रूप तयार करतां येतं. रंगहि तयार करतां आला असता तर मी देवच झालों असतों. पण, तूं आणखी कुणाला नाहीं ना दाखवलीस ही जागा ? "

" छेः ! मी कुण्णाला नाहीं दाखविली. एकटीला करमेना म्हणून मी तुम्हांला शोधत होत्यें.

" अन् आतां मी सांपडलों. आतां काय हवंय तुला ? "

" तुम्ही दगडापासून माणूस कसा बनवतां हें पहायचंय मला. "

" दगडांपासून माणूस नव्हे, माणसापासून दगड. माणूस नष्ट झाला तरीहि हा दगड शिल्लक राहील. श्यामा! मी तुझीहि मूर्ति इथं कोरली तर कसं काय?"

" माझीहि मूर्ति बनवणार! पण मी तर श्यामा आहे."

" हा दगड हि श्याम आहे. म्हणून तुझी मूर्ति आणखीच चांगली बनेल. पण तुला मग रोज इथं यावं लागेल."

श्यामा रोज माझ्याबरोबर येऊं लागली. मी तिची सरळ पाहणी करून प्रथम रेखा अङ्कित केल्या; मग उतारचढावांची आंखणी सुरू केली. श्यामाकडे मी रोजच बघत होतो परंतु आतां मला असें आढळून आलें कीं रोज पाहत असूनहि पूर्वी मला तिचें सौन्दर्य पुरतेपणीं पाहतांच आलें नाहीं. मी श्यामाचें मुख पाहून मग दगडावर काम करण्यांत गुंतून राही, परंतु श्यामा एकसारखी माझ्या चेहऱ्याकडे टक लावून बघत बसे. श्यामाचे डोळे दगडावर कोरतांना कांहीं अंशीं मी संपादन केलेलें यश व बहुतांशीं तिचें सौन्दर्य या दोहोंमुळें माझा स्वतःवरचा ताबा सुटला. मीं म्हणालों–" श्यामा! तुझे डोळे फारच सुन्दर आहेत."

" मला तर ते दिसतच नाहींत."

" अन् मला ते दिसतात अन् ते फारच सुन्दर आहेत! मी त्यांचं चुंबन घ्यावं म्हणतों."

तिनें आपले डोळे माझ्या मुखाजवळ आणले. मी त्यांचं चुंबन घेतलें. तिनें माझ्या डोळ्यांचें चुंबन घेताघेतां सांगितलें–" जय! तुम्ही किती सुन्दर आहांत! कितीतरी दिवसांपासून माझं मन तुमच्यावर जडलं आहे."

" पण श्यामा! तूं कधीं सांगितलं नाहींस तें?"

" आमच्या पल्लींत मुली आपणहून सांगत नाहींत."

" म्हणजे अपराध मीच केला."

" सांगायला संकोच करणारे असेहि कांहीं मुलगे असतातच."

" आतां नाहीं मी संकोच करणार."

तीन मूर्ति तयार झाल्यावर मगच मी तुम्हांला त्या पाहावयास बोलावीन असें सांगून सिंहाला व वहिनीला मी इकडे येऊं दिलें नव्हतें. परंतु दरम्यान श्यामाची व माझी घसट इतकी वाढली कीं वहिनीपासून ती लपविणें अशक्य झालें. एके दिवशी वहिनी म्हणाली–" भाऊजी! मला जाऊ बघायला मिळाली तर आनंद होईल मला."

" वहिनी! इथं या पल्लींत जाऊ बघायचा विचार तुझ्या मनांत कां बरं आला?"

" कारण भाऊजी प्रसन्न असलेले मला बघावेसे वाटतात. आजकाल भाऊजी फारच प्रसन्न दिसतात."

" तूं आपला दीर कधीं अप्रसन्न असलेला पाहिला तरी होतास का ? "

" अप्रसन्न तर नव्हते पाहिले. सदा प्रसन्नच असलेले पाहिलेत मी. परंतु आतां ते पूर्वीपेक्षांहि अधिक प्रसन्न आहेत. अन् मी एक जाऊहि शोधून काढलेली आहे. "

" तुलाच शोधावी लागेल ती. नाहींतर जावांजावांच्या भांडणाचं महाभारत ठाऊक आहेच ना तुला ? "

" त्या पाटलिपुत्रांतल्या नाहीं तर सुम्हनगरांतल्या जावाजावा असतील. मी अशी जाऊ निवडून काढली आहे कीं ती मलाहि पसंत आहे व माझ्या दिरालाहि पसंत आहे. "

" याचा मतलब काय ? "

" मतलब हाच कीं आतां तुम्हांला समाईक झोंपडी सोडावी लागेल व इथं आमच्या झोंपडीलगत घर करावं लागेल. "

" म्हणजे गृहस्थाश्रम. पण वहिनी ! आपण इतर जातीच्या लोकांमध्यें राहात आहोंत हें तर तुला ठाऊक आहेच. हे लोक काळे असले तरी दास नव्हेत. कुणाहि मानवाला हे आपल्यापेक्षां मोठा मानायला कबूल नाहींत, म्हणून हे लोक जें कांहीं करतील तें आपल्या मनाला आलं तरच करतील. "

" भाऊजी ! याची नको तुम्हांला काळजी. मी श्यामाच्या आईलाहि राजी करून घेतली आहे अन् माझ्या सहचरी— गांवच्या साऱ्या तरुणी—– तर विवाह-नृत्य केव्हां होतंय याचीच मोठ्या उत्सुकतेनं वाट पाहताहेत. "

" परंतु अखेरचा निर्णय केवळ स्त्रियांच्या हातीं तर नाहीं ना ? "

" श्यामाचा बाप व म्हातारा पल्ली-ज्येष्ठक याचीहि संमति आहे. तुमच्या तरुण मंडळींना तर विचारायची जरूरच नाहीं. "

" तर मग तुझा सल्ला काय आहे ? "

" बस्स. आतां पौर्णिमेला. "

गेल्या दोन पिढ्यांपर्यंत पल्लींतील रहिवाशांचा गौरवर्णीयांशीं कसलाच संबंध नव्हता. परंतु त्यांच्या अंतःकरणांत थोडासा परकेपणा घर करून होताच. जंगलांत दूरदूर अंतरावर अधून मधून श्यामवर्णीयांच्या पल्ली आहेत. तरीहि त्यांचें आपसांत दळणवळण चालू असतेंच. गौरवर्णीयांचे दोष असेच सांगीवांगीनें या लोकांच्या कानींहि थोडेफार आले असावेत. गौरवर्णीयांच्या हद्दीला लागून असलेल्या श्यामवर्णीयांच्या एखाद्या पल्लींत आम्ही आलों नाहीं हें नशीबच म्हणावयाचें. नाहींतर आमचें स्वागत निराळ्याच तऱ्हेनें झालें असतें.

ज्या दिवशीं आम्ही दोघांनीं आतां आम्ही पतिपत्नी आहोंत असें जाहिर केलें त्या दिवशीं ग्रामज्येष्ठक व साऱ्या नरनारींनीं मोठा उत्सव साजरा केला. त्या दिवशीं पल्लीचे सगळेच लोक मोठ्या आनंदांत होते. सारी रात्रभर मद्यपान व नृत्य चालू होतें.

विवाहित जोडप्यासाठीं वेगळी झोंपडी बांधून देण्याच्या कामांत पल्लीचे सारे लोक मदत करतात; आणि या कामाला अवघा एक दिवस लागतो. आमची झोंपडी सिंहवर्माच्या झोंपडीला लागून होती. श्यामा व मी पति-पत्नीच्या नात्यानें तींत प्रवेश केला. वहिनी थट्टेनें म्हणाली—" आम्हो जर एखाद्या नगरांत असतों तर नववधूच्या शयनमंदिरांत दिराला पाठवायचं काम मलाच मिळालं असतं. "

" परंतु वहिनी ! इथं तर साऱ्या विवाहाचाच अधिकार तूं आपल्या हातांत घेऊन ठेवला आहेस. "

" आमच्या नगरांमध्यें विवाहांत निराळ्याच प्रकारचा आनंद असतो. "

" अन् आपण दीर-भावजय दोघंहि या आनंदाला पारखे झालों ! तुझा विवाह समुद्रानं घडवून आणला अन् माझा या ताडाच्या झावळ्यांनीं. परंतु नगरांतल्या विवाहापेक्षां इथं प्रेम अगर आनन्दाचं प्रमाण कमी मुळींच नाहीं असं वाटतं मला. त्यांत पुन्हां इथलं प्रेम मला जास्तच मधुर वाटतं. हें दिलखुलास अकृत्रिम प्रेम आहे. नगरांतल्या अनेक स्त्रियांनीं मला भुरळ घालायचा बेत केला, परंतु त्यांच्या प्रेमाचा धागा मला अगदींच कच्चा दिसला. तीच इथली ही तुझी श्यामा बघ बरं. तिनं कधीं ते नगरांतल्या तरुणींचे नखरे नाहीं केले. तिच्या निर्मळ नजरेंत साधं सरळ प्रेम भरलेलं होतं; तिच्या मंदस्मितयुक्त चेहऱ्यांत एक प्रकारचं मधुर आकर्षण होतं; या गुणांच्या जोरावरच तिनं मला जिंकलं. "

" अन् भाऊजी ! तुम्हीहि तिला जिंकलंत. ती तुमच्यावर अगदीं जीव लावून असते. "

" वहिनी ! मला असं वाटतं कीं आमच्या इकडील जीवनांत जी विषमता माणसा-माणसांत, स्त्रीपुरुषांत, जाती-जातींत व वर्गा-वर्गांत आलेली आहे, ती जर नसती तर आमच्या समाजाचं जीवनहि अधिक शुद्ध राहिलं असतं. "

" म्हणजे सुम्हनगरांत मी अशीच अर्धनग्न अन् तुम्ही दोघे असेच दिगंबर असायला पाहिजे होतां असं का तुमचं म्हणणं ? "

" छे ग वहिनी ! आम्ही जें ज्ञान संपादन केलंय, ज्या कला शिकून घेतल्या आहेत, तें सारं विसरून जावं असं मी कसं म्हणेन ? मूर्ति, चित्र, काव्य, या किती आनन्ददायक कला आहेत ! प्रासाद, घर, तडाग, कालवे इत्यादि निर्माण करण्याची कला मनुष्य जीवनाला उपयुक्त अशा कितीतरी गोष्टी प्राप्त करून देते ! ग्रन्थ व लेखनकलेनं पन्नास पिढ्यांचा अनुभव व संपादित ज्ञान आम्हांला उपलब्ध करून

दिलं आहे. या सगळया गोष्टी विसरणं म्हणजे प्रौढावस्थेपासून मागं हटून अबोध असहाय बालक होण्यासारखंच आहे. परंतु आमच्या या पल्लीचे रहिवासी त्याच अबोध असहाय्य अवस्थेंत आहेत. अन् मला ही अबोध असहाय्य अवस्था पसंत नाहीं. यांच्या जीवनांतला जो मधुर अंश आहे तेवढाच मला पसंत आहे. हे लोक आपसांत किती निष्कपट भावनेनं वागतात बरं! एकमेकांना सहाय्य करायला सगळे कसे अगदीं तयार असतात. सगळे सुखदुःखाचे सहभागी. कुणी मोठा नाहीं, कुणी लहान नाहीं. सगळे एका परिवारांतले वाटतात. ''

" मला हें पसंत आहे. आमचं ज्ञान-विज्ञान, आमची कला, आमची इतर सुखसामुग्री एकीकडून हाताशीं यावी आणि दुसरीकडून हें निष्कपट जीवन लाभावं. ''

" म्हणजे यांची अबोधता, असहायता नाहींशी करायसाठीं यांना आम्हीं कलाविज्ञान शिकवायचं, अन् कलाविज्ञान शिकल्यावर हेहि आम्हां नगरवासी लोकांसारखेच कशावरून होणार नाहींत ? ''

" हा संभव तर नक्कीच आहे. परंतु राजा, राणीवसा, त्याच्या सामन्तांपुढं नाक घांसणं व अपमान करून घेणं, त्याच्या आनन्दाप्रीत्यर्थ लाखों दीनार प्रजेच्या मुखांतून हिसकून घेणं, या गोष्टी करण्याची आवश्यकता सहकारी राज्यपद्धतीमुळं आम्हांला आमच्या गणतन्त्रांमध्यें नसते ना ? त्याच धर्तीवर जर आपण आपली शेती, बाग-बगीचे, शिल्पव्यापार हीं सहकारी पद्धतीनं केलीं असतीं तर गरीब-श्रीमंत हा भेद निर्माणच होऊं दिला नसता. इतरांची कमाई लुटून त्यांना गरीब करून कुणालाच श्रीमंत होतां आलं नसतं. ''

" परंतु जय भाऊजी! गरीब-श्रीमंत हा भेद सतत चालत आलेला आहे असं ऐकलंय आम्ही ? ''

" मगधांतहि लोक सांगतात कीं राजाची सत्ता सतत चालत आलेली आहे; परंतु आठशेंच वर्षांपूर्वी वैशालींत लिच्छवींचं बलिष्ठ राज्य होतं; तिथं कुणी राजा नव्हता; लोक पंचायतीच्या मार्फत आपलं राज्य चालवीत होते. ''

" म्हणजे धर्म-पुण्य, तीर्थ-व्रतं करून माणूस धनवान्-रूपवान होतो हें म्हणणं खोटं ठरलं तर ? ''

" खोटं आहे यांत तर संशयच नाहीं. ज्या ज्या ग्रंथांत हें लिहिलेलं आहे त्या ग्रंथांच्या लेखकांना एकतर धनवानांचा कुटिलपणा समजला तरी नसेल, किंवा त्यांच्या फायद्यासाठीं या गोष्टी लिहिल्या गेल्या असतील. याच पल्लींत पहा ना. इथं कुणाला-तरी धनवान होतां येईल का ? यांचीं शेतं असली तरी साऱ्या शेतीवर मालकी आहे पल्लीची. पल्लीमार्फत लोकांना कसायला शेतं मिळतात. जर कुणाला काम करूनहि

आपल्या घरीं खायला पुरेसं आणतां आलं नाहीं, तर शेजाऱ्याच्या घरचं अन्न त्याच्यासाठीं हजर आहे. ''

'' भाऊजी ! तुम्ही सांगतां तसं असतं तर फार चांगलं झालं असतं. मी इथलं जीवन बघलें आहे; तें मला बऱ्याचशा बाबतींत स्वच्छन्द व आनन्ददायक दिसतंय. परंतु ही अबोध, असहाय अवस्था मला बरी नाहीं वाटत. ''

'' मलाहि पटतं तुझं म्हणणं. ''

* * * *

वर्षभरानें पल्लीची भाषा आम्ही चांगली समजूं व बोलूं लागलों होतों. या लोकांच्या सरळ स्वभावाप्रमाणेंच यांची भाषाहि अगदीं साधी आहे. आम्ही आहोंत कोणत्या प्रदेशांत, हें समजून घेण्याची आम्ही खूप खटपट करीत होतों. परंतु इथले लोक जें नांव सांगत होते तें आम्ही कोणत्याहि ग्रंथांत वाचलें नव्हतें अगर कुणाकडून ऐकलेंहि नव्हतें. लोखंड ही एकच वस्तु अशी होती कीं ती हे लोक कुठल्या तरी ठिकाणाहून आणीत असत. परंतु ज्या लोकांजवळून ते ही घेत असत, तेहि श्यामल वर्णाच होते. त्यांना विचारल्यावरहि त्यांनीं आपल्यासारखेच लोक लोखंड आणतात असें सांगितलें. जहाजें फुटल्यावर कधीं कधीं त्यांना गौरवर्ण माणसांचीं प्रेतेंहि दिसलीं होतीं; परंतु अशी संधि त्यांना फारच थोड्या वेळां मिळालेली होती. गांवच्या सर्वांत वृद्ध लोकांनाहि आपल्या हयातींत प्रथमच आमच्या गलबतावरचीं प्रेतें पाहावयास मिळालेलीं होतीं. आम्ही कुठें आहोंत याचा आम्हांला कधींतरी पत्ता लागूं शकेल का ? आम्ही तर या बाबतींत निराश होत चाललों होतों. मी किंवा सिंहानें लोखंड विकणाऱ्यांच्या बरोबर त्यांच्या मूळस्थानीं जावें असा विचार आम्ही कधीं कधीं आपसांत करीत असूं. परंतु एकदां विखुरल्यावर तिथें परत एकत्र येऊं शकतील का नाहीं याची आम्हांला शंका वाटे. आम्ही साऱ्यांनीं एकदम जावें तर पल्लीवाल्यांना वाईट वाटणार; श्यामाला तर आणखीच वाईट वाटणार. परंतु या खेरीज आम्हांला दुसरा कोणताच मार्ग दिसत नव्हता.

## ( ११ )

## पुन्हां नागरिकांच्या दुनियेंत

कधीं कधीं जुन्या जीवनाच्या आठवणी तर होत होत्याच; परंतु तसें पाहिलें तर आम्ही मोठ्या आनंदांत कालक्रमणा करीत होतों. मी व सिंह मासे पकडावयास

अगर शेतांवर काम करावयास जात असूं. वासंती व श्यामा पल्लीमध्यें काम करींत असत. वासंतीनें वाकाचें कापड विणण्याची कला शिकून घेतलेली होती. आणि अगोदर शिकलेल्या कलेचा प्रयोग करून ती या कापडांत फुलें-पानें व हंसमिथुनांच्या आकृतीहि विणीत होती. श्यामानें व इतर कांहीं तरुणींनींहि तिच्यापासून हें काम शिकून घेतलें. आम्ही कामांतून मोकळे झालों कीं इरतहि कित्येक तरुण जोडपीं आमच्या बरोबर जंगलांत अगर समुद्र किनाऱ्यावर फिरावयास येत असत. आम्ही आपल्या प्रेमिकांना कधीं फुलांनीं तर कधीं छोट्या छोट्या शंख-शिपांच्या माळांनीं सजवीत असूं. माझी बांसरी तर माझ्याबरोबर हमखास असावयाचीच. मला आतां भाषेची अडचण मुळींच नव्हती. मी संस्कृत व मागधी भाषेंतील अनेक सरस काव्यांचा आनंद घेतलेला होता. त्या भाषांशीं तुलना करतां या भाषेंत फारच कमी शब्द व धातु होते; वाक्यरचना वेडीवांकडी नसून सरळ होती. परंतु मनुष्याच्या अन्तर्वेदना प्रकट करण्यासाठीं अगदीं साधी सरळ भाषा देखील पुरेशी असते असें दिसतें. कुणी तरुण एखादी घडलेली गोष्ट कुणा अज्ञात कवीनें रचलेल्या छंदांत तन्मय होऊन गाऊं लागला कीं अश्रु आंवरण्याची मुष्किल होत होती. कुणी एक तरुण समुद्रांत मासे पकडावयास गेला होता. वादळांत त्याची छोटी फळी-तिचा नावे-. सारखा उपयोग होत असे-- खोल पाण्याच्या दिशेनें वाहत चालली. तरुणाच्या चेहऱ्यावर भीतीचें कसलेंच चिन्ह नव्हतें. परंतु त्याला कसलीतरी एक आठवण राहून राहून विकल करीत होती. हीच भावना कुणा अज्ञात कवीनें छन्दरूपांत वर्णन केलेली होती— " सागरा ! मी मृत्यूला नाहीं डरत. वायुदेवते ! तुझ्या कोपानं विकल होऊन मी अश्रु ढाळूं लागेन अशी समजूत करून घेऊं नकोस. मात्र मला तिच्या आठवणीनं हुरहुर खासच लागलेली आहे; खांद्यावर जाळं टाकून घरीं आलेल्या तरुणांना ती विचारील--' माझा नाखवा कुठं आहे ? माझा प्रियकर कुठं आहे ? ' तिच्या या प्रश्नाला उत्तर कुणालाच देतां येणार नाहीं. मग समुद्रा ! ती तुझ्या किनाऱ्यावर येईल. तिची नजर तुझ्या हिरव्या निळ्या हेलावत्या लहरींकडे जाईल. मग ती आपल्या आक्रोशानं स्वतःचं हृदय विदीर्ण करील अन् तुलाहि सुखानं झोंप घेऊं देणार नाहीं. "

परंतु हें सुखी जीवन एकाएकींच समाप्त झालें. आम्हांला एक दोन आठवडे अगोदर सूचना नाहीं मिळाली; नाहींतर आम्ही तयारी करून ठेवली असती. एके दिवशीं संध्याकाळ पांच अपरिचित दिसणारे श्यामवर्ण इसम पल्लीकडे येत असलेले दिसले. ते इतरांसारख्याच वाकाच्या लंगोट्या नेसलेले होते, त्यांच्या केसांत रंगी-बेरंगी पंखें खोंचलेलीं होतीं; आणि त्यांच्या हातांत भाला, धनुष्य, आणि पाठींवर

माता अशीं आयुधें होतीं. लोक त्यांच्याकडे टक लावून बघत राहिले. श्यामा माझ्या मांडीवर मस्तक टेंकून आडवी झालेली होती. मी तिचे गाल बोटांनीं कुरवाळत होतों. तिच्या डोळयांतून हास्याचीं किरणें ओसंडत होती. आम्ही भावी काळाचीं स्वप्नें बघत होतों. श्यामाला दिवस गेलेले होते. मी म्हणत होतों, मुलगी होणार आणि श्यामा म्हणत होती--" जय ! मुलगा होणार, अगदीं हुबेहुब तुमच्याच सारखा ! " याच वेळीं लोक कांहीं तरी जोरजोरानें बोलत आहेतसें पाहून माझें लक्ष विचलित झालें आणि मीहि ते पांच लोक जिकडून येत होते तिकडे पाहूं लागलों. लोकांना तशी काळजी नव्हती वाटत. कारण शेजारच्या पल्लीशीं वारंवार युद्ध व्हावयाचा काळ आज ह्यात असलेले लोक समजूं लागण्याइतके मोठे होण्यापूर्वीचा होता. आणि युद्ध करावयाचेंच असतें तर फक्त पांचच लोक कां आले असते ? पांचांपैकीं जो सर्वांच्या पुढें होता त्याच्या केंसांत ज्यास्त पंखें खोंचलेलीं होतीं. त्यानें गांवच्या पहिल्या माणसाजवळ कांहींतरी विचारपूस केली आणि त्याच्याबरोबरच ते सारेजण पल्ली-ज्येष्ठकाच्या दाराशीं जाऊन पोंचले. प्रथम ज्येष्ठक व कांहीं प्रमुख माणसांबरोबरच वाटाघाटी झाल्या; परंतु मग आम्हां दोघांना सोडून सगळ्या पुरुषांना बोलावणें आलें. आमच्याशीं अशा प्रकारचें वर्तन त्यांनीं कधीहि केलें नव्हतें; परंतु तरीहि आम्हांला कसल्याहि अनिष्ट प्रकाराची शंका नाहीं आली. उशीरपर्यंत आमच्या भावी जगाचे आडवेउभे धागे विणीत आम्ही दोघे झोंपून राहिलों होतों. आम्हांला झोंप नीट लागलेली नसावी. म्हणूनच हांक ऐकतांक्षणीं माझी झोंप उडाली. माझे जिव्हाळ्याचे मित्र असे तीन तरुण आले. त्यांनीं मला बाहेर यावयाला सांगितलें. आम्ही बाहेर जाऊन एका जागीं बसलों. ते एक कठोर संदेश सांगत होते. तो सांगतांना त्या तरुणांच्या हृदयांना किती वेदना होत होत्या हें मला दिसत होतें. त्यांनीं सांगितलें--"हे पांच लोक उत्तर दिशेला राहणाऱ्या आमच्या जमातीतर्फे पाठविण्यांत आले आहेत. त्यांनीं उत्तरेकडील साऱ्या श्यामवर्णी लोकांतर्फे आम्हांला असें कळविलें आहे कीं उत्तरेच्या गौरवर्ण सरदारानें आमच्या जमातीवर आक्रमण केलें आहे. गोरे लोक आमच्या पल्लींना आगी लावून पुरुषांना ठार करीत आहे; ते स्त्रिया व मुलें पकडून घेऊन जात आहेत. सारी श्यामवर्णी जमात गोऱ्या लोकांशीं लढत आहे. तुमच्या पल्लींत कांहीं गोरे राहतात अशी बातमी आम्हांला कळली. त्यांना तुम्ही आपल्या पल्लींतून हांकलून द्या. नाहींतर सारी श्यामवर्ण जमात तुमच्या पल्लीला आपल्या शत्रूंची मित्र समजेल. "

साऱ्या पल्लीकरांचा आमच्याशीं इतका घरोबा जमलेला होता कीं ही गोष्ट ऐकून कुणालाहि वाईट वाटल्यावांचून राहिलें नाहीं. तरुणांनीं अडखळत-अडखळत व मधून मधून आपल्या मनाला होत असलेल्या वेदना प्रकट करीतच ही गोष्ट मला सांगितली.

ते म्हणाले--" तुम्हां दोघांना पल्ली-ज्येष्ठकांनीं बोलावलंय. फक्त अखेरचा निर्णय सांगायसाठींच आहे हें बोलावणं. कारण आमच्या पल्लीला साऱ्या श्यामवर्ण जमातीच्या विरुद्ध जातां येत नाहीं. "

मी सिंहाचा पाय हलवून त्याला उठविलें. त्यानें वासन्तीला उठविलें. पुन्हां मी त्याच्या समोर अत्यंत खिन्न मनानें साऱ्या गोष्टी मांडल्या. वासन्तीला निघण्यासाठीं तयार राहवयास सांगितलें. आम्ही दोघें पल्ली-ज्येष्ठकाकडे गेलों. पल्लींतले कांहीं वृद्ध लोक व बाहेरून आलेले पांच इसम तिथें हजर होते. पाहुण्यांचा परिचय पल्लीज्येष्ठकांनें करून दिला. मग पाहुण्यांचा प्रमुख म्हणाला--" तरुणांनो ! तुम्हां दोघांच्या बाबतींत आम्ही या पल्लींत जे कांहीं ऐकलयं त्यावरून तुम्ही गौरवर्ण असलांत तरी भले लोक आहांत अशी आमची खात्री पटली आहे. मात्र ही गोष्ट अगदींच अपवादात्मक आहे. गौरवर्ण आणि भलेपणा हीं एकत्र नांदणं अजिबात शक्य नाहीं. गौरवर्ण लोक इतरांचं धन लुटतात, इतरांचं जंगल लुबाडतात, इतरांच्या बायकामुलांना पशु बनविण्या-साठीं पकडून घेऊन जातात. ते खोटं बोलतात, देवदेवतांचं त्यांना भय नाहीं वाटत. ते पापी असतात, त्यांचं सारं पुण्य धुवून गेलेलं असतं म्हणूनच त्यांचीं शरीरं गोरीं झालेलीं असतात. परंतु तुम्ही निर्दोषी आहांत; तुम्ही त्या गौरवर्णीयांसारखे नाहीं. तरी पण तुम्ही निघे चांगले असूनहि आम्हांला काय करतां येणार ? उत्तरेला गौरवर्ण लोक आमच्या लाखों लोकांची कत्तल करीत आहेत. आमचा सर्वनाश करीत आहेत. त्यांनीं श्यामवर्णीयांचा नष्टांश करायची प्रतिज्ञा केलेली आहे. अशा परिस्थि-तींत श्यामवर्णीयांना स्वस्थ कसं बसवेल ? आम्ही इथल्या पल्लींतील लोकांच्या तोंडून तुमच्या बाबतींतलं सारं कांहीं ऐकून घेतलं. सगळयांना वाईट वाटतंय. आम्हांलाहि वाईट वाटतंय. परंतु तुम्हांला दक्षिणेकडील गौरवर्णीयांच्या देशांत जायची मोकळीक देण्यापलीकडे आम्हांला कांहींच करतां येत नाहीं. एका पल्लीहून दुसऱ्या पल्लीला जाण्यासाठीं तुम्हांला वाटाड्या मिळत जाईल. तुम्ही दक्षिणेकडे जा, समुद्रापासून फार दूर राहूं नका, मग तुम्ही गौरवर्णीयांच्या देशांत नक्कीच पोंचाल. दक्षिणेकडील श्यामवर्णीयांपर्यंत अजून उत्तरेकडच्या युद्धाची खबर पोंचलेली नाहीं. म्हणून तुमच्या-वर संकटं यायचा संभव नाहीं. आतां तुमचं बाईमाणूस बरोबर घेऊन जा. तुम्हांला सोबत करायला माणूस तयार आहे.

मला ही गोष्ट फांशीच्या शिक्षेइतकी दुःखद वाटली. सिंहहि फारच खिन्न झाला. परंतु दुसरा कांहीं इलाजच नव्हता. आम्ही त्यांचीं हृदयें आपलींशीं केलीं, त्यांना आम्हीं आमचीं हृदयें दिलीं. परंतु आम्हांला आमच्या गोऱ्या चामडीला काळा रंग देतां येत नव्हता. वासन्ती उत्सुकतेनें वाट बघत होती. पावलांचा आवाज ऐकतांच ती कपड्यांचें गांठोडें घेऊन बाहेर आली.

मला एकदां माझ्या झोंपडीच्या दाराशीं गेल्यावांचून राहवलें नाहीं. चांद आतां कोठें दोन घटकांपुरता वर आलेला होता. त्याचीं मन्द किरणें श्यामाच्या मुखावर पडलेलीं होतीं. मला तिची चेहेरेपट्टी नीट दिसत नव्हती. ती निश्चिन्तपणें झोंपलेली होती. तिचा धिमा श्वास मला ऐकूं येत होता. तिच्या चेहऱ्यावर कदाचित हसूं विलसत असावें. कदाचित ती स्वप्न बघत असावी—आम्ही दोघांनीं मिळून पाहिलें तसलेंच साधेंसुधें स्वप्न बघत असेल ती. शेवटचें चुम्बन घेण्यासाठीं पुढें जावयाला पाय उत्सुक होते परंतु मीच मन आवरलें. आतां कांहींहि करणें माझ्या आवांक्याबाहेरचें काम होतें. ती जागी व्हावयाची, मग माझ्याबरोबर येण्यासाठीं तिनें हट्ट धरावयाचा, परंतु साऱ्या श्यामवर्ण जातीला या प्रसंगीं तिच्या हृदयवेदनांचा विचारच करणें अशक्य व्हावयाचें. एखादवेळ आम्ही दोघांनीं आमच्या प्रेमाप्रीत्यर्थ आपलें बलिदान केलें असतें. परंतु आम्हांला प्राणांसमान प्रिय असलेल्या दोघां मित्रांनाहि तसेंच करण्यास भाग पाडावयाचा आम्हां दोघांना काय अधिकार होता? नवीन जन्माला येऊं घातलेलें बालक सूर्यप्रकाश बघण्यापूर्वींच मारून टाकण्याचा आम्हांला काय अधिकार होता? मी मनांतल्या मनांत म्हणालों—" श्यामा! साधीभोळी गोड श्यामा! शेवटचा निरोप घेतांना मी हें तुझं मनोमन चुम्बन घेतों. तुला मी सोडून जातोंय, परंतु मला तुझी सदैव आठवण राहील."

ताडाची एक लहानशी झावळी हातांत घेऊन आमचा वाटाड्या पुढें चालला होता. आमच्याजवळ कपड्यांच्या गांठोड्याशिवाय थोडेसे सुकविलेले-भाजलेले मासे व तांदुळ होते, दोन धनुष्यें व बरेचसे बाणहि होते, छिन्न्या व एक सुरीहि मी बरोबर घेतलेली होती. सूर्योदयापर्यंत आम्ही एक योजन चाललों. आम्ही फारच गंभीर व उदास झालेलों होतों. परंतु आमच्या मंडळींना मित्रवियोगाबरोबरच आपल्या जातीच्या नव्या बांधवांची भेट होण्याची आशा होती. माझ्या मनाला विरंगुळा वाटावा म्हणून त्यांची खटपट चाललेली होती. हें दाट जंगल होतें. उजवीकडे जरा अंतरावर कुठें कुठें डोंगरहि होते. त्यांत हत्ती व वाघांचाहि धोका होता. परंतु श्यामवर्ण लोक या धोक्याला आपल्या जीवनाचा अभिन्न अंश मानीत होते; नाहींतरी या अफाट जंगलांतल्या त्यांच्या लहान लहान झोंपड्या म्हणजे समुद्रांतल्या एकेका थेंबासारख्याच आहेत. आगीची भीति नसती तर हत्तींनीं त्यांच्या झोंपड्या ढेंकूण चिरडावा तशा चिरडून टाकल्या असत्या. श्यामवर्णीयांना बुद्धीची व चपळाईची मदत नसती तर त्यांचे तीर, कुऱ्हाडी व भाले वनांतल्या भीषण प्राण्यांचें कांहींच नुकसान करूं शकले नसते. आम्हां तिघांना श्रमाची संवय झालेली होती. आम्ही अनवाणीच चाललों होतों. लवकर थकवा येण्याचा अगर पायांना खडे बोंचण्याचा प्रश्नच नव्हता.

एक प्रहर दिवस आल्यानंतर आम्ही पुढच्या पल्लींत दाखल झालों. वाटाड्यानें

आम्हांला पल्लीज्येष्ठकाकडे नेलें आणि त्या म्हाताऱ्याच्या हातीं ताडाची झावळी दिली. म्हाताऱ्यानें आम्हांला मेरय देऊन आमचे स्वागत केलें आणि भोजन करून मग जा असें सांगितलें.

अशाच प्रकारें एका पल्लीहून दुसऱ्या पल्लीपर्यंत नवनवे वाटाडे घेत घेत आम्ही जंगलाचा शेवट गांठला. एका टेंकडीवर चढून वाटाड्यानें दूर अंतरावर असलेलें गांव दाखविलें. तिथलीं घरें मगधांतल्या ग्रामीण घरांपेक्षां जरा निराळीं होतीं; परंतु त्यांच्या उंच भिंती व त्यांवरील किल्येक कौलारू छपरें आतां पल्लींचा प्रदेश मागें राहिल्याचें दर्शवीत होतीं. वाटाड्यानें आमचा निरोप घेतला. मी पुन्हां एकवार पल्लींच्या प्रदेशांतली श्याम-वनराजी डोळे भरून पाहून घेतली आणि माझ्या डोळ्यां-समोर पुन्हां एकदां श्यामाचा अश्रुपूर्ण चेहरा उभा राहिला. माझे डोळे ओले होऊं लागले. परंतु वासन्तीनें कांहीं सांगावयाच्या अगोदरच मी म्हणालों—

" वहिनी ! गांठोडं सोड. आतां या वेषांत आपण त्या गांवांत जायचं नाहीं. "

वासन्तीनें एक दीर्घश्वास घेतला आणि नजर खालीं वळवून ती गांठोडें सोडावयास लागली. मी आमले कपडे अंगांत घातले व म्हणालों—

" सिंह ! जर आपण हे कपडे घालून तिथं राहिलों असतों व आपले कपडे फाटून गेले असते तर आज आमची काय अवस्था झाली असती ? "

" अवस्था काय व्हायची ? कलावन्ताच्या नजरेला नग्न सौन्दर्यच चांगलं दिसतं ! "

" वहिनी ! तुलाहि भय्याचं बोलणं पटतं ? "

" दोघांचा मतभेद असला कीं मी भाऊजींचंच मत अधिक पसंत करतें. "

" खरं आहे. दिरापुढं पतीचा काय पाड ? "

" आतां मला भाऊजींनाहि जपलं पाहिजे " मग ती माझ्याकडे तोंड वळवून म्हणाली—

"हे लोक अबोध व असहाय आहेत परंतु यांना दैन्य ठाऊक नाहीं. यांचा स्वभाव किती सरळ, यांचं वागणं किती गोड होतं. तिथं राहिली असतांना तर मला माझ्या देशाची आठवण होत होती, परंतु आतां यांच्या गोड स्मृति जन्मभर मला आठवत रहातील. "

मला श्यामाची आठवण येऊं लागली. या वेळीं ती किती दुःखी झालेली असेल ! कोण तिला धीर देत असेल बरें ? तिचे घरचे लोक कदाचित तिला असें सांगत असतील कीं हे कुठें तरी गेले आहेत, थोड्याच दिवसांत परत येतील. परंतु याच्यावर तिचा विश्वास बसेल का ? सिंहानें माझ्या समाधीचा भंग करून सांगितलें— " जय !

जरा जलदी चल. हा अगदींच नवा देश आहे. दिवस बुडायच्या अगोदरच आपल्याला त्या गांवीं पोंचलं पाहिजे. "

आम्ही दिवस बुडावयाच्या कितीतरी अगोदर गांवांत पोंचलों. आमच्या वेषांत फरक तर होताच आणि त्याहूनहि अधिक फरक झालेला होता आम्हां दोघांच्या दाढ्यांमुळें. मी दोन इसमांशीं बोलण्याचा प्रयत्न केला परंतु त्यांना माझें बोलणें समजत नाहीं असें दिसून आलें. सिंह म्हणाला--" मलाहि यांचं बोलणं समजत नाहीं. परंतु एखाद दुसरा शब्द आंध्र भाषेंतला असल्यासारखं वाटतं. " आम्ही एक उंचसा सौध पाहिला. जवळ गेल्यावर तें एक देवालय असल्याचें कळलें. पुजाऱ्याशीं मी बोलूं लागलों तेव्हां माझ्या हृदयांत संदेह निर्माण झाला. त्याच्या खांद्यावरून जानवें लटकत असलें तरी त्याचा रंग माझ्या श्यामाच्या रंगाहून फारच थोडा उजळ होता. पुजाऱ्यानें माझ्या प्रश्नांचीं उत्तरें दिलीं. तीं शुद्ध मागधी भाषेंत नसलीं तरीं संस्कृत व मागधीच्या मदतीनें मला त्यांचा आशय कळला ! पुजाऱ्याच्या सांगण्यावरूनच आम्हांला असें कळलें कीं आम्ही कलिंग देशच्या एका नगरांत आहोंत; ज्या अरण्यांतून आम्ही आलों तें शबरांचें जंगल आहे; इथून दन्तपुर ( पल्लूर ) फारसें दूर नाहीं. आम्हांला उतरण्यासाठीं त्यानें जवळचीच एक धर्मशाळा दाखवून दिली.

खरोखरीच आम्ही एक निराळा लोक सोडून परत मानव लोकांत आलों आहोंत असें आम्हांला वाटूं लागलें. इथें पुन्हां खरें-खोटें, लुच्चेगिरी-कपट, कृत्रिम सौजन्य आम्हांला दिसूं लागलें, आणि कुटिल मार्गानें सावधपणें चालण्यासाठी हृदयाचे सारे स्नायु आम्हांला ताणून ठेवावे लागले. आमच्या जवळ शंभर दीनार होते. म्हणून आम्हांला खर्चाची कांहीं काळजी नव्हती. दन्तपुराचें नांव मी आधींच ऐकलेले होतें; तिथें तथागताची दन्तधातु ( दांत ) आहे; अर्थात तिथें बौद्ध भिक्षुहि पुष्कळ असणार हें सहज लक्षांत येण्याजोगें होतें. त्यांना भेटलें म्हणजे देशोदेशींच्या बातम्या मिळणार हें ओघानेंच आलें. वाटेंत कसलाच धोका नाहीं व प्रवासी जात-येत आहेत अशी माहिती मिळाली. या गांवीं एक पण्यवीथीहि ( बाजार पेठ ) होती. ती या गांवाच्या गरजेच्या मानानें मोठीच दिसत होती. कांहीं दुकानांमध्यें तर केवळ लोखंडाच्या वस्तूच जास्त होत्या. त्यांतल्यात्यांत फरशा-कुऱ्हाडी, भाला व बाणांचीं फळेंच अधिक होतीं. आम्ही दोन तरवारी विकत घेतल्या, कांहीं नवे कपडे घेतले, पिण्याचीं व स्वयंपाकाचीं दोनतीन भांडींहि घेतली. या कामांत पुजाऱ्यानें मदत केली. आमच्यासाठीं स्वयंपाक करण्याची जबाबदारी पतकरून त्यानें आम्हांला जेवणाच्या बाबतींत निश्चित केलें. आम्ही मांस, तांदूळ व इतर खाण्याच्या जिनसांसाठीं त्याला पण ( पैसे ) देऊन ठेवले.

पुजाऱ्याकडून आम्हांला या प्रदेशाच्या बाबतींत पुष्कळशा गोष्टी कळल्या. कलिंग देशाची राजधानी पिष्टपुर ( पिठापूर ) इथून पुष्कळ दूर आहे. तिथला राजा महेन्द्र कांहीं वर्षांपूर्वी मेला; नवा राजाहि चांगला आहे. देशांतले बहुसंख्य लोक निराळी भाषा बोलतात. परंतु राजकुल, ब्राह्मण व इतरहि कित्येक प्रतिष्ठित घरांमध्यें मागधीसारखी एक भाषा प्रचलित आहे. प्राचीन मागधींत लिहिलेलीं जातकें आचार्य वसुबन्धूंनीं मला एकदां दिलेलीं होतीं. तसेंच तींत लिहिलेलीं कित्येक सूत्रें ( बुद्धाचे उपदेश ) मी महाबोधि ( बुद्धगया ) येथील सिंहल-विहारांत पाहिलेलीं होतीं. या प्राचीन मागधीच्या जवळची अशी इथली भाषा आहे असें मला वाटलें. मला ती शुद्ध स्वरूपांत बोलतां येत नव्हती; परंतु मी शब्दांची थोडी मोडतोड करीत असलों तरी माझी भाषा लोकांना समजते असें मला दिसून आलें. पुजाऱ्याची पत्नी वासन्तीसारखी गोरी होती. तिचें वासन्तीशीं फार लवकर सूत जमलें. सगळ्या ब्राह्मण स्त्रियांप्रमाणें तिलाहि दोन्ही भाषा येत होत्या. वासन्तीनें तिला विचारलं —" ताई ! तुमचे यजमान श्यामल कां आहेत बरं ? "

" इथलं ऊन फार वाईट आहे म्हणतात. पुरुषांना उन्हांत जास्त राहावं लागतं म्हणून त्यांचं अंग श्यामल होतें."

वहिनीनें हंसत हंसत भोळ्याभावड्या ब्राह्मणीचें बोलणें मला सांगितलें. मी विचारलें — " अन् वहिनी ! तुझं काय मत आहे ? "

" उन्हानं अंग लाल होतं. तें थोडंसं तांबुस होऊं शकेल, परंतु गोरा रंग सांवळा नाहीं होऊं शकणार. "

" बरोबर सांगितलंस. उत्तरेकडच्या ब्राह्मणांप्रमाणंच हे लोकहि आपलं रक्त शुद्ध आहे असा दावा करीत आहेत. उत्तरेकडे श्यामवर्ण लोक कमी आहेत अन् गौरवर्ण लोक ज्यास्त आहेत, म्हणून तिकडे रंगाची सरमिसळ झाल्यानंतर काळेपणा त्या मानानें कमी आढळतो. या जंगलांत श्यामवर्णीयांपेक्षां गौरवर्णीच फार कमी आहेत, म्हणून यांचा रंग जास्त काळा झाला आहे. "

" परंतु ब्राह्मण तर आमच्या देशांतल्याप्रमाणं इथंहि इतर लोकांशीं विवाह नाहीं करीत. "

" विवाह करीत नसले तरी अन्यवर्णीय स्त्रिया त्यांना रखेल्या म्हणून ठेवतां येतात. "

" ठेवतां येत असल्या तरी त्यांचीं मुलं ब्राह्मण नाहीं होणार. "

" खरं आहे. बापाच्या बाबतींत हें ठीक आहे. परंतु ब्राह्मणीच्या बाबतींत ? "

" ब्राह्मणीच्या बाबतींत काय ? "

" ब्राह्मणांच्या घरांतहि श्यामवर्ण दास व कमकर असतातच ना ! सुस्त,

निर्बल, तुंदिल ब्राह्मणांना विटलेल्या ब्राह्मणींची नजर कधीं कधीं दास-कर्मकरांकडे वळूं शकते. ही गोष्ट संभवनीय आहे का नाहीं ? "

" पुष्कळच संभवनीय आहे. मलाहि आमच्या गांवच्या दोनतीन ब्राह्मणांच्या घरांतले प्रकार ठाऊक आहेत. "

" मग झालं तर. हा पुजारी तशाच प्रकारचा ब्राह्मण आहे असंच समज. याच्या बाबतींत ज्यास्तींत ज्यास्त इतकंच सांगतां येईल कीं आईच्या बाजूनं हा नक्कीच ब्राह्मण आहे. "

इथें राजाच्या वर्तानें जीं आज्ञापत्रें निघतात तीं कलिंग देशाच्या भाषेंत नसतात हें मला अगदीं आवडलें नाहीं. खरें म्हटलें म्हणजे हें पत्र लोकांसाठीं लिहावयाचें, याच्या द्वारां लोकांना शासन अगर आज्ञा मिळते, मग लोकांना जी समजत नाहीं अशा भाषेंत तें कां लिहिलें जावें ? परमभट्टारकाचेहि ताम्रपट-शिलालेख संस्कृतमध्यें असनात. परंतु लोकांची भाषा संस्कृतच्या इतकी जवळची आहे कीं त्यांना थोडेंफार संस्कृत समजतेंहि. तरी पण मला तेंहि पसंत नव्हतें. आमच्या यौधेय गणाच्या एकादुसऱ्या पुरस्कर्त्यानें संस्कृतमध्यें शिलालेख लिहवून घेतले आहेत. परंतु रोजच्या कारभारांत तिचा उपयोग केला जात नाहीं. इथल्या लोकांची भाषा अशी आहे कीं त्यांना संस्कृत अगर प्राचीन मागधी मुळींच समजत नाहीं. तरीसुद्धां उत्तरेकडून इथें आलेले राजे, पुरोहित व सामन्त आपल्या भाषा इथल्या लोकांवर लादूं पाहतात. मागाहून मला दन्तपुरांतहि हाच प्रकार दिसला--कितीतरी शुद्ध कलिंग लोक आपल्या घरीं संस्कृत-मागधी बोलण्याची खटपट करीत आहेत, आपल्या बायका-मुलांनीं कलिंग भाषा सोडून द्यावी अशी त्यांची इच्छा आहे. कित्येकांना तर आपल्याला कलिंग म्हणवून घेण्याची देखील लाज वाटते; आपण मगध, काशी, कोसल, पांचाल या देशांहून आलों असें ते दर्शवीत असतात. परमुलखांतून आलेल्या राजाला मान्यता देण्याचा परिणाम असाच होतो. परंतु त्यांतल्यात्यांत विशेष दुःखाची गोष्ट ही कीं खुद्द इथले सामान्य लोक देखील उत्तरेकडून आलेल्या वंशालाच राजा होण्याची लायकी आहे असें मानतात.

दोन दिवस वाट चालल्यानंतर आम्ही दन्तपुरांत पोंचलों. हें समुद्रकिनाऱ्यावरचें एक चांगलें मोठें नगर आहे. आम्ही दन्तविहाराशीं संबंध असलेल्या एका धर्मशाळेंत उतरलों. आम्ही तिघे तीन धर्म मानीत होतों. सिंहवर्मा अगर त्याचें घराणें ब्राह्मणधर्माचें व शैवपंथाचें अनुयायी होतें. वासन्तीचा जन्म अर्हत् ( जैन ) भक्तांच्या घराण्यांत झालेला होता आणि माझ्या कुळांत कित्येक पिढ्यांपासून बौद्धधर्म चालत आलेला होता. पल्लींतील मुक्कामाच्या अगोदर आम्ही आपापल्या धर्मांचे थोडेफार पक्षपाती असूं कदाचित. परंतु आतां तर आम्ही सारेच असें समजत

होतों कीं मानवजातीच्या अवस्था-क्रमानुसार धर्मंहि बदलत आले आहेत. ब्राह्मण, बौद्ध व जैन हे तीन धर्म तर फारच मागाहून आले. मेल्यानंतर पुन्हां जन्म घेण्याची बात खोटी आहे असें मी वासंतीला जेव्हां पहिल्याप्रथम सांगितलें तेव्हां तिला जरा आश्चर्य वाटलें. परंतु शबरपल्लींत असतांना तिला स्वतःलाच असें दिसून आलें कीं पुनर्जन्माचा सिद्धान्त निसर्गसिद्ध नाहीं; लहानपणापासूनच तो घोकवून घोकवून आपल्या मुलांच्या मनावर ठसवून ठेवलेला असतो. शबरांना या सिद्धान्ताचा मुळींच पत्ता नव्हता. तिनें जेव्हां ही गोष्ट मला सांगितली तेव्हां मी तिला म्हणालो–"शबर जर हा सिद्धान्त मानूं लागले तर त्यांना राजांचे गुलाम सहजासहजीं बनवतां येईल. मग ते धनुष्य सरसावून मरायसाठीं इतके उतावीळ नाहीं होणार; ते समजूं लागतील––"चला. त्यांत काय आहे! पूर्वजन्माच्या फलानुसार कुणी राजा होतो अन् कुणी प्रजा; कुणी श्रीमन्त होतो, अन् कुणी गरीब."

स्वतंत्र शबरांशीं संबंध आल्यामुळें तिला ही गोष्ट माझ्या युक्तिवादापेक्षांहि अधिक चांगल्या रीतीनें प्रत्यक्ष समजून आली. आतां आम्हांला तीन्ही धर्म सारखेच वाटत होते. तीन्ही धर्म पुनर्जन्म मानतात, म्हणून या तीन्ही धर्मांनाहि मानवाची गुलामगिरी व माणसाकडून माणसाचा छळ होणें मान्य आहे.

त्या दिवशीं आम्ही दन्त-विहारांत दन्त-धातूचें दर्शन घेण्यासाठीं गेलों. इथें दूरदूरचे लोक दर्शनासाठीं येतात. जी वस्तु एकाकाळीं तथागताच्या शरीराचा एक अवयव होती, तिचें दर्शन घेण्याची इच्छा कोणत्या बौद्धाला होणार नाहीं बरें? इथल्या विशाल मन्दिराचें बांधकाम दगडाचें आहे. त्यांत शिल्पकारांनीं आपलें कौशल्य सुन्दर रीतीनें प्रकट केलें आहे. कनिष्क विहारासारखी विशालता व तितकी हिरेमोत्यांची सजावट जरी इथें नव्हती, तरीहि भक्तगणानें, विशेषतः सागर-सार्थवाहांनीं, मुक्तहस्तानें इथे संपत्ति ओतलेली आहे. इथें पन्नासअधिक विशाल सुवर्णदीप असून त्यांत तुपाचे नंदादीप अहोरात्र तेवत आहेत. एकेक दीप इतका भारी आहे कीं सशक्त माणसालाहि तो उचलावयाचा नाहीं. मी त्यांवर कोरलेले लेख वाचले. देणगीदारांमध्यें कित्येक अन्य द्वीपांतले रहिवासीहि होते, परंतु त्यांतले बहुसंख्य लोक समुद्रालगतच्या देशांतले सागरवणिक होते. बुद्धाचा दांत एकांत एक अशा अनेक सोन्यारुप्यांच्या मंजूषांमध्यें ठेवलेला होता. या मंजूषांवर तऱ्हेतऱ्हेचीं रत्नें बसविलेलीं होतीं. दन्तधातूचें दर्शन महिन्यांतल्या विशेष मुहूर्तांच्या दिवशीं मिळत असे. त्यावेळीं भक्त लोक हात जोडून उभे होते. भिक्षूनें सगळ्या मंजूषा अलग करून अगदीं आंतल्या मंजूषेंत ठेवलेला दन्तधातु लोकांना दाखविला. मी पाहतांक्षणीं स्तब्ध झालों. तिथें तर कांहीं बोललोंच नाहीं. परंतु आपल्या बिऱ्हाडीं परत आल्यावर मी जोरजोरांत सांगूं लागलों––

" या धर्मवाल्यांचा अधःपात कुठवर होणार कोण जाणे ! मला तर वाटतं कीं यांच्या अधःपाताला कांहीं सीमाच नाही. "

वासंती गालांतल्या गालांत हंसत म्हणाली– " भाऊजी ! यांत तुम्ही नवीन तें काय सांगितलंत ? "

" वहिनी ! गोष्ट जुनी आहे खरीच ! परंतु तूं ती दन्तधातु पाहिलीस ना ? "

" पाहिली. रत्न-जडित सुवर्ण-मंजूषेंत किती सुंदर दिसत होती ती. "

" रत्नजडित सुवर्ण मंजूषेनं खोट्याला सुद्धां उजळपणा येतो, तिच्यामुळं माणसाचे डोळे दिपून जातात. "

" जय ! चतुर शिल्पकाराच्या अद्‌भुत कारागिरीची प्रशंसा केली पाहिजे. "– सिंह म्हणाला.

" चतुर शिल्पकाराच्या शिल्पनैपुण्याची दखल घेणं मान्य आहे मला. परंतु खोट्याच्या खोटेपणाला मान्यता देणं असा याचा अर्थ नव्हे. "

" यांत खोटी बात काय होती ? "

" वा भय्या ! तूंहि कोरा करकरीत कलाकारच राहिलास ? "

" बरोबर बोलल्यांत भाऊजी ! मीहि हेंच सांगत असल्यें यांना. "

" ऐकून तर घे. अगोदरच दीर-भावजयींचा संयुक्त मोर्चा माझ्यावर काय म्हणून चालू केलात ? लागली म्हणायला ' मीहि सांगत असल्यें ' म्हणून ! परंतु जय कोणत्या गोष्टीला अनुलक्षून बोलतोय हें कळलं तरी का तुला ? "

मी मध्येंच तोंड घालून म्हणालों– " भय्या ! दुसरं कांहीं नाहीं रे ! ज्या दांताचं त्या मुण्डकांनीं दर्शन करवलं तो माणसाचा दांत असणं मुळींच शक्यच नाहीं. "

वहिनी डोळे फाडफाडून माझ्याकडे पाहूं लागली– " भाऊजी ! तुमचीं बोलणीं ऐकून माझ्या मनांत तथागताविषयी श्रद्धा निर्माण होऊं लागली होती. "

" वहिनी ! श्रद्धा मोडून द्यायची जरूर नाहीं. परंतु मी तथागतांच्या नांवावर खपणाऱ्या सगळ्याच गोष्टींना नाहीं मान्यता देत. त्यातल्या बऱ्याचशा गोष्टी तर उगीचच त्यांच्या माथीं मारलेल्या आहेत. निर्वाण व पुनर्जन्म यां सारख्या गोष्टी तथागतांनाहि मान्य असतील, नाहीं असं नाहीं; परंतु ते तीर्थंकराप्रमाणं स्वतःला सर्व-दर्शन, सर्वदर्शावी, सर्वज्ञ समजत नव्हते. परंतु इथं तथागताविषयीं श्रद्धा-अश्रद्धेचा प्रश्नच नाहीं; हें तर धर्माचा व्यापार करणाऱ्यांचं कूट-वाणिज्य ( व्यापारी कावा ) आहे. यांत झालंय असं कीं एखाद्या हत्तीचे दांत अगर इतर हाड कुणा तरी अडाणी दन्तकाराला देऊन माणसाच्या दाढेची नक्कल करवायचा यांनीं बेत केला. कुणा चांगल्या दन्तकाराकडं हें काम त्यांनीं दिलं असतं तर त्यानं जराजीर्ण दाताची

हुबेहूब नक्कल उठविली असती. परंतु हें बाजूलाच राहिलं; अन् तूं पाहिला नाहींस का केवढा मोठा होता तो दांत ! येवढा मोठा दांत तर चार दाढा गाळूनहि नसता तयार करतां आला. ''

" भाऊजी ! आतां आलं माझ्या लक्षांत. बुद्धाचं तत्वज्ञान बरोबर नाहीं, बौद्धांचा मार्ग हा पुण्यमार्ग नव्हे, अशी टीका मी घरीं ऐकत असें; म्हणून माझे विचार कांहीं निराळेच झालेले होते. परंतु तुमच्या तोंडून कधींमधीं मी बुद्धाच्या गोष्टी ऐकल्या. त्यांचा परिणाम असा झाला कीं मी आज मोठ्या श्रद्धेनं दन्तधातूला वन्दना केली होती. परंतु तुम्ही माझ्या श्रद्धेवर जबरदस्त प्रहार केलांत. ''

" ऐकलंस जय ! बस्स. या बायका म्हणजे आंधळ्या लता असतात नुसत्या."

" कोणत्याहि झाडावर सोडा की राहिल्या तिथं तशाच पडून ! – असंच म्हणायचं होतं ना भय्या तुला ! तुझीहि पाळी येईल एखाद दिवशीं. ''

वासन्तीचे गाल आरक्त झालेले पाहून सिंहानें तिच्या गळ्यांत हात घालून तिला हृदयाशीं धरलें आणि तिची हनुवटी कुरवाळीत तो म्हणाला—" भट्टारिका ! तसं नव्हे ग. तूं जर लता असशील तर हा सिंह वृक्ष आहे. वृक्षाहून अधिक स्वतंत्रता लतेला नसते. ''

" भय्या ! बरोबर बोललास. जिला आपल्या पायांवर उभंहि राहतां येत नाहीं तिच्यापेक्षां दुनियेंत अधिक स्वतंत्र कोण असणार ? परंतु माझी, वहिनी तशा प्रकारची लता नाहीं हें मी खात्रीपूर्वक सांगतों. पण वहिनी ! तूं आपला चेहरा लाल कां केलास ? भय्याच्या हातांतली तूलिका जशी कौशल्यानं चालूं शकते तशी त्याच्या तोंडांतली जीभ चालूं शकत नाहीं हें नाहीं का तुला ठाऊक ? बिचारा भय्या ! त्याला आपल्या भट्टारिकेला सांगायला हवं असतं एक अन् तोंडांतून निघतं भलतंच. भय्या भट्टारक ! एक गोष्ट सांगूं मी ? विनोदांत सहकार्य न करणं हें तर मित्रधर्माच्या विरुद्ध आहे. परंतु विनोदाचा एकेक शब्द अगदीं तोलून मापून घ्यावा लागतो; तो सुद्धां जवाहिऱ्याच्या ताजव्यापेक्षांहि नाजुक ताजव्यांत घालून तोलावा लागतो. ''

" जय ! तूं अजब माणूस आहेस. तूं जर नसतास तर तुझी वहिनी दर वेळेला उंदीर-मांजर व्हायला तयार झाली असती. ''

" ऐकलंस वहिनी ! यांत उंदीर कोण नि मांजर कोण ? ''

वहिनी हंसली. भय्यानें तिचा गाल आपल्या गालाला लावला.

" बघ मी सांगतों. मांजर म्हणजे हे दुनियेला फसविणारे लोक, ज्यांच्या लुच्चेगिरीला कांहीं सीमाच नाहीं. यांच्या पण्य-शाला सगळ्या जागीं सगळ्या प्रकारच्या स्वरूपांत उघडून ठेवलेल्या आहेत. शिवालय, जिनालय, सुगतालय, नृपालय,

कुठवर गणती करूं यांची ! अन् उंदीर म्हणजे बहुजन—सामान्य जनता. ”

दन्तपुरांत आम्ही कांहीं दिवस मुक्काम केला. भय्यानें नवी तुलिका, नवे पट खरीदले; नवे रंग तयार केले. मीहि छिन्नी व हातोडी घेतली. परंतु आम्हांला इतक्यांत काम सुरू करावयाची इच्छा नव्हती; काम करणें आम्हांला भागहि नव्हतें.

एके दिवशीं मी प्रदोष ( संध्याकाळच्या ) समयीं समुद्रकिनाऱ्यावरून परत येत होतों. वाटेंत एका घरीं फारच सुन्दर वीणा वाजत होती. फारां दिवसांनीं ऐकल्यामुळें मला स्वर फार मधुर लागले. मी सज्जाच्या खांबाला टेंकून उभा राहिलों. एका मागून एक गत वाजत होती. मी कितीवेळ तिथें उभा राहिलों होतों कोण जाणें ! माझी सारी शुद्धबुद्ध नाहींशीच झालेली होती. मग एका स्त्रीच्या तोंडून पुढील उद्गार माझ्या कानीं आले, तेव्हां मी भानावर आलों—“ आर्य ! आपल्याला जर तकलीफ होत नसेल तर कांहीं क्षण आंत येऊन बसावं अन् वीणावादिनीच्या श्रमाचं सार्थक करावं.”

मी तिच्या मधुर स्वरलहरी ऐकून स्वतःला जणूं तिचा ऋणाइत समजूं लागलों होतों, म्हणून मी मुकाट्यानें तिच्या पाठोपाठ आंत गेलों. ती दीपक दाखवीत मला आंतल्या चतुःशालेंत ( चौकांत ) घेऊन गेली. तिथें खालच्या अंगाला गवती चटई आंथरलेली होती. तिच्यावर तीन मोठमोठे तक्के होते. एका कोपऱ्यांत पितळेच्या दीपयष्टीवर पंचमुख दीप तेवत होता. त्याच्या वातींत बहुधा उदबत्तीचें मिश्रण असावें असें तिथें दरवळलेल्या सुगन्धावरून वाटत होतें. एका तक्क्याला टेंकून एक तरुणी बसलेली होती. मी तिथें जातांक्षणीं ही तरुणी उभी राहिली आणि आपल्या दहा कोमल अंगुलि कौशल्यानें वांकवून मला वंदना केल्यावर म्हणाली— “ आर्य ! आस्यताम् ( बसावं ). ”

मी बसलों. ही तरुणी कोण असावी याविषयीं माझा कांहीं निश्चय होईना. ती फार सुन्दर नव्हती; परंतु ती कुरूप आहे असेंहि म्हणतां आलें नसतें. तिच्या अंगावर फारच थोडे अलंकार, आभूषणें होतीं; परंतु तरीहि ते जास्त उठून दिसत होते. गळ्यांत एक सोन्याचा गोफ, कानांत एक लहानसें कर्णपूर, हातांत एक बारीकसें कंकण. आणि वेणींत दोनचार फुलें होतीं. वय असेल वीसच्या आसपास. ती कोण आहे याचा विचार करावयाला देखील मला फुरसत नव्हती; कारण आधीं तिच्या वाद्यकलेची प्रशंसा करणें मला शिष्टाचाराच्या दृष्टीनें भाग होतें. मी कृतज्ञता प्रदर्शित करीत म्हणालों— “ भद्रे ! माफ करा हं; मला तुमच्या वीणेचा स्वर फार मधुर वाटला, म्हणून मी अगांतुकी करून तुमच्या दाराशीं उभा राहिलों अन् तुम्ही आपल्या सौजन्यामुळं मला तुमच्या दर्शनाचा लाभ मिळवून दिलांत. तुम्हांला ही तकलीफ द्यायला मी कारण झालों. ”

" आर्ये! यांत तकलीफ कसची? आपण इथें आलांत याबद्दल मीच आपली उतराई आहे."

" फार दिवसांनंतर मी इतकी सुन्दर वीणा ऐकली; वीणेवर इतक्या कुशलतेनं अंगुलि चाललेली बघायचा हा प्रसंग पाटलिपुत्र सोडल्यानंतर मला पहिलाच लाभला."

" आर्ये! आपण पाटलिपुत्राचे नागरिक आहांत तर!"

" नागरिक कसचा, आतां तर पाचोळ्यासारखा नुसताच भटक्या झालोंय, एका काळीं होतों मी तिथला नागरिक."

" ही वीणेची गत मी पाटलिपुत्रांतच शिकल्यें. मी पिष्टपूरच्या कुमाराची परिचारिका म्हणून तिकडे गेल्यें होत्यें. माझं संगीताविषयींचं प्रेम पाहून त्यांनीं मला उत्तेजन दिलं." हें सांगतांना तरुणीच्या तोंडून दुःखाचा उसासा आला. मी तिचें सांत्वन करण्यासाठीं म्हणालों— " भद्रे! कसल्या तरी गोष्टींची आठवण होऊन तुम्हांला दुःख होतंय. मी तुम्हांला कष्टी करूं इच्छीत नाहीं."

" आर्य! हें दुःख मला जन्मभर सोसावं लागणार. पित्याच्या मागं त्यांना सिंहासन मिळायला पाहिजे होतं. परंतु हरएक राजा मेल्यानंतर अगोदर राजांगणांत भावांबन्दांच्या रक्ताचा सडा शिंपडला जातो अन् मगच सिंहासनाची गोष्ट. माझे कुमार याच हत्याकांडांत बळी पडले. आर्य! आपण पाचोळ्याचा दाखला दिलांत; परंतु तो आपल्याला लागूं पडत नाहीं; तो या दासीलाच बरोबर लागूं पडतो. मी पाचोळा झाल्यें. मी माझ्या दुःखाची कहाणी सांगून आपल्याला दुःख देऊं इच्छीत नाहीं. संधि याल तर पुन्हां कधींतरीं सांगेन. या प्रसंगीं आपला आदर-सत्कार संगीताखेरीज आणखी कशानं मला करतां येईल का?"

" मला तर संगीतच सगळ्यांत जास्त प्रिय वाटतं."

तरुणीनें वीणा डाव्या मांडीवर ठेवली आणि पुन्हां राग छेडावयास सुरवात केली; या वेळीं तिनें वीणेच्या साथीवर गायनहि केलें. मानवी इतिहासांत कितीतरी माणसांच्या जीवनांत करुण प्रसंग कितीतरी वेळां आले आणि ज्ञात-अज्ञात कवींनीं या प्रसंगांची गुंफण चतुर माळ्याप्रमाणें कितीतरी प्रकारांनीं केली. तें असलेंच कसलें तरी गीत होतें. तिच्या कण्ठाची कम्पयुक्त कोमलता जणूं कांहीं याच गीतासाठीं खास तयार केलेली होती. तिच्या वीणेंत अपार वेदना जाणवत होती. ही वेदना या तरुणीच्या हृदयांतून येत जर नसती तर ती अशा रीतीनें तिच्या कंठातून व या वीणेच्या तारेमधून व्यक्त झालीच नसती असें मला वाटलें. गीत समाप्त केल्यानंतर मला प्रशंसा करावयाला अवसर न देतांच तरुणी म्हणाली—

" आर्य! आपणहि संगीताचे भोक्ते आहांत असं दिसतंय. आपल्याला तकलीफ

नसेल होत तर मलाहि आपलं गाणं ऐकायची इच्छा आहे. मी पाटलिपुत्राचं संगीत ऐकल्याला फार दिवस लोटले."

शबरपल्लीहून मी नुकता कुठें बाहेर आलेलों होतों. म्हणून अजून कृत्रिम शिष्टाचार मी पुरते आत्मसात नव्हते केले. मीं सरळ मनानें सांगून टाकलें--

" भोक्ता तर आहेच. नाहीं कसं म्हणूं ? परंतु संगीताचा व्यासंग सुटून फार दिवस झाले. तरी पण मी एक द्विपदी म्हणून दाखवतों." असें सांगून मी वीणा माझ्या हातीं घेतली आणि वसन्ताची द्विपदी म्हणून दाखविली. काय चमत्कार आहे पहा ! आनन्द तर समागमामुळें होतो, परंतु समागमाचें गीत विरहगीताइतकें मधुर नाहीं लागत ! त्यांत पुन्हां विरह जितका लांबावा तितकी त्यांतली गोडी वाढतच जाते. चिर-विरही, अनन्तविरही यांच्याविषयीं श्रोत्याला सहानुभूति देखील अपार वाटते. माझें विरहगीत ऐकतांना तरुणीचे डोळे अनेकदां ओले झाले हें तर मी पाहतच होतों.

गाणें संपल्यावर ती माझ्या पायांशीं आपली अंजलि ठेवून म्हणाली--"आर्य ! फळांनीं बहरलेले वृक्ष विनम्र होत असतात. महापुरुष आपल्या महतीला प्रसिद्धी देत नाहींत. दासीनं जेव्हां बाहेर खांबाला टेंकून उभ्या असलेल्या इसमाची गोष्ट सांगितली तेव्हां मला उपेक्षा करवेना. कुणास ठाऊक ? रस्त्यानं भटकणाऱ्या मूर्तीच्या ठायीं काय-काय प्रकारचे गुण असतील कुणी सांगावं ? मी समजलें कीं कुणी संगीताचा भोक्ता असेल, माझ्या घराबाहेर अंधारांत उभा राहून ऐकत असेल. जवळून ऐकलंन् तर माझं कांहींच नव्हतं बिघडत; म्हणून मी आपल्याला आंत बोलावलं. आपलं प्रतिष्ठित मुखमंडल व नम्र वेश पाहून माझा आदर आणखीच वाढला. परंतु आपण येवढे मोठे कलाकार आहांत असं मात्र मला मुळींच वाटलं नव्हतं."

" सुन्दरी ! तूं भलत्याच जागीं आपलीं प्रशंसेचीं फुलं उधळून देत आहेस असं जर मी म्हणालों तर तुझ्या भावना लक्षांत न घेतां त्यांवर आघात केल्याचा दोष पदरांत घ्यावा लागेल. वीणेवर माझं प्रेम आहे, संगीतावरहि आहे. हा यौवन-सुलभ स्नेह आहे. परंतु पाटलिपुत्रांत कलाकार कुणाला म्हणतात हें तुला ठाऊक आहे का ? मोठ्या कलकाराची तर गोष्टच सोड म्हणा."

तरुणीनें आणखी चौकशी केली. मी येवढेंच सांगितलें कीं आम्ही तिथें दन्त-धातूच्या दर्शनासाठीं आलों आहोंत आणि दन्तविहारालगतच्या धर्मशाळेंत उतरलों आहोंत. माझा भाऊ एक चतुर चित्रकार आहे हेंहि मी सांगितलें. निरोप घ्यायला लागलों तेव्हां तरुणी म्हणाली--

" आर्य ! आपलं दर्शन वारंवार घडेल येवढं माझं भाग्य कुठलं असायला ? आपलं आतिथ्य करायची माझी लायकी आहे असं आपण समजत असाल तर हें घर

आपलंच आहे. परंतु चन्द्राला कलंकित करायचं म्हणजे हृदय फार कठोर करावं लागतं. आपण निष्कलंक आहांत. मी पाचोळयासारखी एक असहाय रमणी आहे. मला माझ्या इच्छेविरुद्धच रूपा-जीवा ( वेश्या ) होण्याशिवाय दुनियेंत कसला आधारच नाहीं मिळाला. मग आपण मला पुन्हां दर्शन द्या असं सांगायला मला तोंड आहे कुठं ? मी आपणहून आपणांकडे आल्यें असत्यें, परंतु मला तोहि अधिकार नाहीं. ''

मी उठून निघालोंच होतों, परंतु तरुणीच्या तोंडचे असले उद्गार ऐकून मी पुन्हां तक्क्याला टेंकून बसून राहिलों. तिच्या चेहऱ्यावर उदासीनतेची छटा आलेली होती ती थोडीशी ओसरल्यासारखी वाटली. मी म्हणालों—

" भद्रे ! एखाद्याला लोक कलंकित अगर अपराधी समजतात म्हणून तो तसा असतोच असं मला नाहीं म्हणतां येत. मला तुमच्या स्त्रीजातीच्या या अवस्थेची कसलीच माहिती नाहीं. परंतु तूंच पहिल्या प्रथम माझी पाचोळ्याची उपमा स्वतःला लावून घेऊन दुःखाचा सुस्कारा सोडला होतास. तुझं सांगणं बरोबर आहे. पाचोळया-ची उपमा पुरुषाला लागू पडत नसून खरोखरी स्त्रीलाच लागू पडते. स्त्री ही पुरुषाच्या हातची बाहुली असते. त्याला हवं तसं तो तिला वागवतो. कधीं सजवतो, कधीं फेंकून देतो. ''

" आर्य ! कुमारांच्या हयातींत मला हें सत्य उमगलं नव्हतं. कुमार होते राजकुमार. म्हणून राजकुलांतल्या बहुतेक गोष्टींच्या बाबतींत ते अपवाद नव्हतेच. तरीपण त्यांच्या ठिकाणीं वैशिष्ट्य होतं. भट्टारिकेवर त्यांचं अपार प्रेम होतं. माझ्यावर कुमार व भट्टारिका या दोघांचीहि मर्जी होती. कुमार वारल्यानंतर भट्टारिका सती गेली. मी विचार केला, इतर कुणाचा तरी आसरा घ्यावा. परंतु कुमाराच्या परिवा-रांतली असल्यामुळं पिष्टपुरांत कुणी माझ्यावर विश्वास ठेवायला तयार नव्हतं. माझ्या-समोर अफाट दुनिया असली तरी मला ती सुनीसुनीच होती. मी जर राजकुलांत गेल्यें नसल्यें, तिथले रीतिरिवाज जर मी शिकल्यें नसल्यें, कलेनं जर माझ्या हृदया-बरोबरच माझे हात व शरीरहि कोमल करून ठेवलं नसतं, तर कदाचित मी कुणा-च्या तरी घरीं साधी परिचारिका होऊन राहिल्यें असल्यें. तशा परिस्थितींत मानाप-मानाचा विचारहि मनांत आला नसता. राजान्तःपुरांत सुद्धां परिचारिकेला मानापमान कसचा असतो म्हणा, परंतु तो तितका असाह्य होत नाहीं. ''

'' कारण तो अपमान भट्टारक व भट्टारिका, भर्तृदारक व भर्तृदारिका, यांच्या-कडून मिळतो. ''

" होय. त्यांच्या हातीं देवांप्रमाणं शाप द्यायची व अनुग्रह करायची अशी दोन्ही प्रकारची पूर्ण सत्ता असते. नागरिक फसवे असतात हें मला अन्तःपुरांतल्या कांहीं अनुभवांवरून ठाऊक झालंय. परंतु इतरांच्या अनुभवांचा फायदा घेणारे फारच थोडे

निघतात. मी नगरोद्यानांतल्या पुष्करिणीच्या घाटावर उदास मनानं बसून भविष्य-काळाची चिंता करीत होत्यें; त्याच वेळीं एक चांगला पोशाक केलेला तरुण नागरिक माझ्याजवळ आला. त्याच्या हृदयांत माझ्याविषयीं सहानुभूति आहे हें त्याच्या चेह-ऱ्याकडे पाहतांच कळून येत होतं. त्यानं खूप गोडगोड गोष्टी सांगितल्या. त्याचे हे उद्गार मनापासूनचे नव्हते हें मला कसं कळणार ? त्यानं सांगितलं —' तुझी जर तशी इच्छा असली तर दुसरी कांहीं वेगळी व्यवस्था होईपर्यंत मी तुझ्या राहण्याची सोय करतों. ' त्यानं पिष्टपुराबाहेर आपल्या उद्यानांत मला ठेवलं. मी त्याचे उपकार मानून संगीतकलेनं त्याची सेवा केली. त्यानं प्रणयाची बतावणी केली. मला वाटलं अशा स्थितींत भटकत राहण्यापेक्षां एकाचाच आश्रय घेणं चांगलं. परंतु त्यानं एकदां माझी लाज लुटल्यावर तो समजूं लागला कीं ही सर्वस्वीं आपल्या आधीन आहे— अन्नवस्त्र , घरदार, या सगळ्या बाबतींत ही आपल्यावर अवलंबून आहे असं वाटूं लागल्याबरोबर त्याची वृत्ति बदलली; तो मला क्रीतदासीसारखी वागवूं लागला. प्रथम तोडून बोलूं लागला, मग शिवीगाळ करूं लागला, अन् शेवटीं अंगावर हात टाकूं लागला. मी जर विरोध केला असता तर येवढ्यावरहि त्याचा संतोष झाला नसता, त्यानं काठीशींच गांठ घातली असती. माझ्या जीवनाचा नरक झाला. त्याच्या एका दोस्तानं मला सहानुभूति दाखवली. दुधानं तोंड तर भाजलं होतंच, पण आम्हां अबलांना जगांत आधार कुठचा ? मला त्या मांगाच्या हातून सुटका करून घ्यायची होती. त्याच्या दोस्तानं मला इथं आणलं. पुढं त्यानंहि पहिल्याच्याच पावलावर पाऊल टाकलं. शेवटीं मला एक वेश्या भेटली. ती म्हणाली —' निराधार स्त्रीला हाच एक मार्ग आहे. प्रत्यक्ष नरकांत काय होत असेल हें मला ठाऊक नाही, परंतु या जगाच्या नरकांतून थोडीशी सुटका हाच मार्ग पतकरल्यानं होईल. ' तेव्हां पासून मी दन्तपुरची रूपाजीवा मधुमती झाल्यें आहे. ''

ती आपल्या साऱ्या कृत्यांची जबाबदारी स्वतःकडेच घेवो बिचारी. परंतु आजच्या समाजाला मी तिच्यापेक्षां जास्त चांगल्या रीतीनं ओळखतो. म्हणून भयंकर शत्रूसमोर आजच्या अबलेला कितीसा टिकाव धरतां येईल याची मला जाणीव होतो. मधुमतीला आत्महत्येशिवाय दुसरा कोणता मार्ग होता ? आत्महत्या म्हणजे भलताच मूर्खपणा होय हें बुद्धाचें वचन मला मान्य आहे. मधुमतीच्या एकेका उद्गारामागें कितीतरी दुःखद घटना आहेत, आणि एकेका घटनेच्या मागें कितीतरी मोठी कारण-परंपरा आहे हें मला ठाऊक असल्यामुळें तिच्या विषयीं माझ्या मनांत तिरस्काराची भावना येणें शक्यच नव्हतें. वेश्या म्हणजे खालच्या कोटींतले प्राणी, हें लोकांचें मत ऐकून ऐकून अजूनपर्यंत मीहि तसेंच समजत होतों. परंतु वेश्या होतात कशा, त्यांना वेश्या कोण बनवतो, याची हकीकत मधुमतीनें माझ्यासमोर स्पष्टपणें मांडली.

मी तिचा निरोप घेतांना म्हणालों— " भद्रे ! मी तुला तिरस्करणीय समजत नाहीं. मी कलाप्रेमी तरुण आहें, तशीच माझ्या हृदयांत मनुष्य प्राण्याविषयीं आपुलकी आहे. मला तुझ्या दुःखपूर्ण जीवनाविषयीं सहानुभूति वाटते. मी दन्तपुरांत जास्त दिवस राहायच्या बेतानं आलेलों नाहीं, परंतु जोंपर्यंत मी इथं राहीन तोंपर्यंत तुझ्या घरीं यायला संकोच नाहीं करणार."

मधुमतीनें हात जोडून दरवाज्यापाशीं येऊन मला निरोप दिला. मी साऱ्या गोष्टी सिंहाला व वहिनीला सांगितल्या आणि म्हणालों— "आजची स्त्री किती अगतिक आहे ! शबरपल्लींत असं व्हायचा संभव तरी होता का ?"

मधुमतीच्या घरीं वारंवार जावयाचें, येवढीच सहानुभूति तिच्या बाबतींत मला दाखवितां येत होती. गेलों म्हणजे तिच्या तोंडून दोन चार गाणीं ऐकावयाचीं व आपण तिला एकदोन गाणीं म्हणून दाखवावयाचीं असा मी परिपाठ ठेवला.

## ( १२ )

# कांची नगरींत

आम्ही दन्तपुर सोडलें त्यावेळीं मधुमतीला दुःख झालें. वस्तुतः तिचा जन्म वेश्या होण्यासाठीं नव्हता. ती रूपाजीवा असली तरी केवळ पोटासाठीं ती आपल्या रूपाची विक्री करीत होती. तिच्या संगीताची कदर कां केली जात नाहीं याचें मला नवल वाटे. कदाचित तें फार वरच्या दर्जाचें असल्यामुळें फारच थोड्या लोकांना आवडत असावें.

पहिल्याच समुद्र-यात्रेंत आमच्या जिवावर संकट ओढवलें असलें तरी वासंतीनें सुद्धां असल्या प्रवासाची धास्ती मुळींच घेतली नाहीं. म्हणून आम्ही दन्तपुराहून गलबतांतूनच कलिंग देशाची राजधानी पिष्टपूर येथें पोचलों.

नव्या नगरांत अपरिचित माणसानें जावयाचें म्हणजे कांहीं अडचणी तर येणारच. त्यांतल्या त्यांत आम्हांला कलिंगी भाषा समजत नव्हती म्हणून तर त्या जास्तच यावयास पाहिजे होत्या. परंतु पिष्टपुरांत पाहावें तों जसें कांहीं मागधी भाषेचेंच राज्य आहे. ज्याला प्राचीन मागधी बोलतां येत नाहीं असा धनिक व सुशिक्षित लोकांत

कुणीहि आढळत नव्हता. राजकुलाची तर ती मातृभाषाच होती. नगरांमध्यें जिथें कुणाची ओळख नसेल तिथें मुक्कामासाठीं पांथशाला तर असतेच. पिष्टपुरांत वेग-वेगळ्या मालासाठीं व कारागिरांसाठीं वेगवेगळ्या वीथि (रस्ते) आहेत. पण्यशाला म्हणजे साऱ्या महाद्वीपांमधील सुन्दर सुन्दर वस्तूंचा संचय-कोष (पदार्थ संग्रहालय) च आहे असें वाटूं लागतें. समुद्रांत धोका तर भरपूर असतोच. परंतु एका जागेयाहून दुसऱ्या जागीं माणसें व माल नेण्याआणण्यासाठीं याच्या पेक्षां जास्त सुगम व जास्त जलदीचा दुसरा रस्ता तर बहुधा नाहींच. कुठें यवद्वीप तर कुठें यवनद्वीप ? कुठें सिंह-लद्वीप तर कुठें चीन ? शूर्पारक व ताम्रलिप्तीची गोष्टच सोडा. पिष्टपुरच्या तीर्थांत (बंदरांत) साऱ्याच ठिकाणच्या वस्तू चालून येतात. हजारों विदेशी नाविक व व्यापारी येथें मुक्काम करतात. आणि इथल्या रस्तोरस्तीं हरएक देशोदेशींच्या बोली ऐकूं येतात, हरएक ठिकाणचे वेश पाहावयास मिळतात. कलिंग देशाच्या राजाला आतां मगधराजाच्या दिग्विजयाची तितकीशी पर्वा नसली तरी इतर क्षेत्रांत मगधाची धास्ती त्याला अजूनहि वाटते. मगधाची भाषा व वेश लोकांच्या दृष्टीनें जास्त आदरणीय ठरलेले आहेत. मगधाच्या कारागिरांना व शिल्पकारांना इथें फार मागणी आहे. शृङ्गार व प्रसाधनाच्या वस्तूंमध्यें मगधाचें अनुकरण केलें जातें. परकीयांशीं व्यापार करतांना खारी, द्रोण, आढक, प्रस्थ व कुडव ही मगधांतलीं वजनेंच वापरांत असतात. कवितेच्या व कलेच्या क्षेत्रात तर मगधाची सत्ता याहून प्रभावी आहे. कलिङ्गाला एक वेळ मगधाच्या हातून सपशेल हार खावी लागली होती. त्या वेळीं कलिङ्ग-पुत्रांनीं मोठ्या शौर्यानें शत्रूचा मुकाबला केला, परंतु मौर्य अशोकानें इतकी जबरदस्त तरवार चालविली कीं त्याच्यापुढें कलिङ्गांना मान वांकविणें भाग पडलें. परंतु कलिङ्ग-विजयानें अशोकाला चण्ड-अशोक राहूं दिलें नाहीं. या वेळीं वाहिलेल्या रक्ताच्या नद्या पाहून त्याच्या अंतःकरणाचें पाणी पाणी झालें. आणि त्यानें कलिंगांशीं लढते वेळीं जितकी क्रूरता दाखविली तितकाच स्नेह त्यानें विजया-नंतर त्यांच्याशीं दाखविला. कलिंगदेशांत आजहि बौद्ध धर्माचा खूपच प्रचार चालू आहे. यालाहि बहुधा अशोकाचाच प्रभाव कारण असावा. तेव्हांपासून कलिंगानें मगधाचा कायमचा विद्यार्थी होण्यांतच धन्यता मानून घेतली.

पिष्टपुरांत भटकलों असतों तर पाटलिपुत्राचे कितीतरी लोक भेटले असते. परंतु पुन्हां ओळख द्यावी लागली असती व तीहि परमभट्टारक व त्यांच्या महादेवीच्या नांवानें. मला हें आवडत नव्हतें. दोन तीन दिवसांनंतर सिंहवर्माचा एक आप्त भेटला. सिंह-वर्माचें कांचीच्या पल्लव-वंशाशीं नातें होतें. तरी पण सध्यांचा कांचीपति पल्लव नरेन्द्र परमभट्टारक सिंहवर्मा याच्याशीं त्याचें जवळचें नातें मुळींच नव्हतें. पल्लव-वंश पुष्कळच जुना झालेला आहे. यामुळें राजवंशीयांची संख्याहि खूपच

मोठी आहे. आणि राजाला आपल्या आसपासच्या दोन एक पिढ्यांचीच फारतर आठवण राहूं शकेल. तरी परंतु दूरच्या नातेवाइकांनाहि इतर तिऱ्हाइतांच्या मानानें जास्त लाभ हा होतोच. शेंदोनशें वर्षांपेक्षां अधिक काळपर्यंत एखादा तरी राजवंश परमभट्टारक अगर महाराजाधिराजाची पदवी चालवीत असेल का नाहीं याची वानवाच. तरी परंतु तो वंश पदच्युत झाला कीं दुसऱ्याच दिवशीं वंशजांना भीक मागावी लागते अशांतला प्रकार मुळींच नसतो. युद्धामध्यें क्रूरतेची परमावधी गांठ ल्यानंतरसुद्धां पराजित शत्रूला भिकेला लावण्याची इच्छा विजेता धरीत नाहीं. फार फार झालें तर त्या वंशाला तो आपला सामन्त करून आपल्यापेक्षां त्याचा दर्जा किंचित कमी करील; परंतु त्याच्या ऐषआरामांत कसलीहि कमतरता पडूं देणार नाहीं. असें कां ? एखाद्या गांवची सामान्य जनता अगर शेतकरी जर कुणा राजाविरुद्ध बंड करून उठले तर सारा गांव जाळून फस्त होईल; लहान मुलें म्हातारीं-कोतारीं यांना देखील क्वचितच दयामाया दाखविली जाईल. जे जीव घेऊन पळून जातील त्यांना दारोदार भटकत फिरावें लागेल. परंतु राजे लोकांशी राजे लोकांचा व्यवहार असा होत नसतो. राजवंश, मग तो शत्रुपक्षाचा असो अगर मित्रपक्षाचा असो, त्याच्या सुख-समृद्धीचें रक्षण करणें हें प्रत्येक राजाचें कर्तव्य आहे याची जाणीव त्यांना बहुतकरून असतेच. कारण आज जी वेळ दुसऱ्यावर आहे तीच उद्यां आपल्यावर येण्याचा संभव असतो. याशिवाय राजवंशांच्या आपसांत सोयरिकीहि झालेल्या असतात. पिष्ठपुरच्या महाराज नरेन्द्राची कन्या समुद्रगुप्ताच्या अन्तःपुरांत आहे. कांचीच्या विष्णुगोपाची पुत्री पाटलिपुत्राच्या राजान्तपुरांत नांदत आहे. राजेलोकांना आपल्यापेक्षां मोठ्या लोकांकडे नजराणे पाठविण्यासाठीं रत्नसुवर्णाचा संचय जसा करून ठेवावा लागतो तसाच कन्यारत्नांचाहि संचय त्यांना करावा लागतो. आणि शेंकडो राण्या असल्या म्हणजे या कामांत त्यांची मोठीच मदत होते हेंहि ते जाणून असतात. वस्तुतः सामन्तांची जात एक, त्यांचा स्वार्थ एक. ते आपसांत लढतातहि; परंतु लढण्याची मर्यादा त्यांनीं ठरविलेली असते. आपल्या भोगविलासांना बाध आणणाऱ्या शत्रूंचा मुकाबला करतांना ते कौरव-पाण्डवांप्रमाणें शंभर आणि पांच न राहतां एकशेंपांच होण्यास चुकत नाहींत.

पिष्ठपुरांत सिंहवर्माचा नातेवाईक एका मोठ्या हुद्यावर होता. हा हुद्दा मिळण्या-साठीं त्याची सर्वांत जास्त लायकी येवढीच होती कीं त्याची बहीण फार सुन्दर होती व यामुळें तरुण राजाची तिच्यावर विशेष मर्जी होती.

सिंहवर्मा व वासन्ती वहिनी या दोघांना अश्व-बलाधिकृत ( रिसालदार ) बलवर्मा याच्या घरी जावें लागलें. मलाहि त्यांच्याबरोबर जाणें भाग पडलें. सिंहानें माझा परिचय संगीताचार्य म्हणून करून दिला. अश्वपतीलाहि संगीत-साहित्य व कलेची

आवड होती. निदान या गोष्टींची आपल्याला आवड आहे अशी बतावणी तरी प्रत्येक नागरिकाला करावीच लागते. आचार्य वसुबन्धूंच्या जवळ इतकी मेहनत करून मी विद्या शिकलों खरा, परंतु मूर्तिकार व संगीताचार्य या नात्यानें जितका फायदा मला होत होता, तितका या विद्येमुळें होत नव्हता हें मला दिसत होतें. म्हणजे रोख पैसे मिळवून देणाऱ्या सार्वदेशिक विद्या अशा याच आहेत असें दिसतें. पाटलिपुत्रांत मला या कलांची गोडी लागली याबद्दल मी स्वतःला भाग्यवान् समजूं लागलों.

सिंहवर्मानें बुडत्या गलबताचें एक सुन्दर चित्र तयार केलें. बलवर्माबरोबर सिंह दरबाराला गेला, नजराणा म्हणून चित्र देण्यांत आलें. आणखी कितीतरी चित्रें तयार करण्याची आज्ञा सिंहाला मिळाली. आतां सिंहाला पिष्टपुरांत कांहीं महिने मुक्काम करणें भाग पडलें. मी माझ्या अंगची दगड फोडावयाची विद्या प्रकट करावयाचीच नाहीं असा बेत केला. सामन्त असो अगर श्रेष्ठी असो, साऱ्या श्रीमंत कुलांमध्यें नृत्य, गीत, वाद्य-वादन, या विद्या शिकणें प्रत्येक कुलकन्येला अत्यावश्यक असतें. यांच्या अभावीं तिचें सारें सौन्दर्य बिनवासाच्या पळसाच्या फुलासारखें नुसतेंच दिखाऊ ठरतें. जरी कुणी सौन्दर्य-तारुण्यामुळें तिच्याशीं लग्नहि केलें तरीपण इतर सवतींच्या पुढें तिचा कांहीं पाड नाहीं लागत. यालाच संगीतकलेची आवड म्हणतात. ज्या कुलांत ही आवड असते, त्या कुलाची कलाप्रेमी म्हणून प्रशंसा होते. कोणत्याहि उपयुक्त कलेविषयीं आवड दर्शविणें मला गैर नाहीं वाटत. परंतु उगीच बतावण्या करून त्याचीं लंबीचवडीं वर्णनें कशाला? आपली पत्नी, बहीण, मुलगी अगर सून गायनकलेंत दक्ष आहे, वाद्यवादनांत प्रवीण आहे, नृत्यकलेंत निष्णात आहे; असें असेल तर फार चांगली गोष्ट आहे. आयुष्यांत गोडी आणण्यासाठीं या गोष्टींची आवश्यकता असते. परंतु त्याचबरोबर हेंहि कबूल केलें पाहिजे कीं जर नृत्यगायनाच्या द्वारां लग्नाच्या बाजारांत मुलींचा भाव वाढला नसता तर मुलींना संगीत शिकविण्याकडे इतकें लक्ष कधींच कुणी दिलें नसतें. असो. संगीताच्या आवडीनें माझा तर फायदाच केला. बलवर्माची एक चौदा वर्षांची कन्या होती. तिला संगीताचें शिक्षण अगोदरपासूनच दिलें जात होतें. परंतु त्यानें माझें वर्णन ऐकल्यावर संगीताची ही शिकवणी पतकरण्याविषयीं मला विनंति केली. प्रथम मी एका घरच्या एका कन्येचा संगीत-शिक्षक झालों. कन्येचा गळा गोड होता आणि संगीताची तिला नैसर्गिक देणगी होती. थोड्याच अवधींत तिच्या आईबापांना कळून आलें कीं मागध तरुण वयानें अगदीं लहान असूनहि फारच गुणी आहे. सहा महिने होतात न होतात तोंच माझी ख्याति या घराच्या बाहेर फैलावूं लागली. बडे बडे राजवल्लभ व अंमलदार यांच्या घरून संगीत शिकविण्यासाठीं मला मागण्या येऊं लागल्या. प्रथम दोनतीन महिने मी एखाददुसऱ्या घरीं जाऊंहि लागलों होतों. परंतु अशा रीतीनें

सर्वांची इच्छा पूर्ण करतां येणार नाहीं हें मला दिसून आलें. पण त्याचबरोबर मला तर कुणालाहि नाराज करावयाचें नव्हतें. सिंहवर्मा व वासन्तीवहिनी यांच्याशीं सल्ला-मसलत झाली. मी एक संगीतशाला चालू केली. मी माझ्या आश्रयदात्यांना माझी अडचण सांगितली. आणि मग कितीतरी कन्या संगीत शिकण्यासाठीं माझ्या पाठ-शालेंत येऊं लागल्या. त्यांची संख्या इतकी वाढली कीं मला आणखी तीनचार अध्यापक ठेवावे लागले. त्यावेळीं मला मधुमतीची आठवण झाली. या कामासाठीं ती खरोखरी लायक होती. परंतु लायक असूनहि मधुमतीला या शालेंत आणण्याची ताकत माझ्या अंगीं नाहीं हें मी जाणून होतों. माझ्या संगीतशालेचा जम फार चांगला बसला. तींत कित्येक राजवंशांतल्या मुलीहि होत्या. त्यांची खबर महाराजांच्या कानावर गेल्याखेरीज कशी राहणार? मी तर केवळ संगीताचार्य. महाराजांचें बोलावणें धुडकावून मला पिष्ठपुरांत राहतां कसें आलें असतें? मला कितीतरी वेळां विद्यार्थिनीं-बरोबर नृत्यसंगीताचें प्रदर्शन करण्यासाठीं महाराजांसमोर जावें लागलें. येथपर्यंत तर माझी कांहीं हरकत असणें शक्य नव्हतें. परंतु महाराजांनीं अनुकूल जागा देण्याच्या मिषानें माझी संगीतशाला राजसंगीतभवनांत आणण्यास सांगितलें. करणार काय? कलिङ्गाच्या बड्या बड्या लोकांमध्यें विचारपूस होऊं लागली. मात्र सेवक या नात्यानेंच ही विचारपूस होत होती. आतां अन्तःपुरिकांनीं माझ्या संगीतशालेवर छापा घातला. आणि सहा महिने होतात न होतात तोंच महाराज माझ्या कित्येक तरुण विद्यार्थिनींना एकांतांत भेटूं लागले आहेत असें मला दिसून आलें! माझ्या इज्जतीची मला धास्ती वाटूं लागली. परंतु मी या गोष्टीची चर्चा बलवर्म्याशीं केली, तेव्हां तो यांत विशेष कांही नाहीं असें सांगून माझी समजूत घालूं लागला. या कुमारिकांचे आई-बाप आपल्या मुली राजाकडे जात असलेल्या पाहून नाराज होण्या-ऐवजीं खूष होतात आणि मला माझ्या गुणांबद्दल धन्यवाद देतात असें मला दिसून आलें. मी शबर-पल्लींत स्वच्छन्द प्रेम पाहिलें होतें, परंतु त्यांत कसल्याहि लाभाचें आमिष नव्हतें; बलात्काराचा तर मुळीं प्रश्नच नव्हता. आणि इथें तर जिच्यामुळें मधुमतींच्या संख्येंत भर पडणार, अशी गोष्ट सर्रास चाललेली होती. मी ही गोष्ट होऊं याव-याला राजी नव्हतों. सिंहवर्माशीं सल्लामसलत केली आणि कांहीं दिवस भटकून येण्याचा बहाणा करून आम्ही तिघें एके दिवशीं पिष्ठपुराहून सटकलों!

आम्ही उरगपुराकडे जाणाऱ्या गलबतांत बसलों होतों. गलबत पल्लवांच्या हद्दींत जाऊन एका तीर्थाला लागलें. तिथून आम्ही खुष्कीचा मार्ग पतकरला. आतां भाषेची अडचण नव्हती. कारण सिंहवर्म्याला द्रविड भाषा येत होती. नगरांमधें कांहीं लोक प्राचीन मागधी बोलणारेहि भेटत असत. परंतु त्यांची संख्या फार थोडी होती. आम्ही एका मोठ्या सुप्रसिद्ध (गुडिमल्लाच्या) शिवालयाचें नांव ऐकलें. सिंह-

बम्र्याला त्याचें नांव लहानपणापासून ऐकावयास मिळालेलें होतें, परंतु अजूनपर्यंत त्याला तिकडे जातां आलें नव्हतें. प्राचीन मन्दिरांमध्यें मूर्तिकलेचे सुन्दर नमुने पाहावयास मिळतील ही लालूच माझ्या मनांत होती. आम्ही त्या वस्तींत पोंचलों. द्रविड देशांतील हें फार मोठें तीर्थ मानलें जातें. हा यात्रोत्सवाचा समय नव्हता तरी स्त्रीपुरुषांची खूप गर्दी होती. आम्ही तिथें फूल-माला घेऊन मन्दिरांत दर्शनासाठीं गेलों. स्त्रीपुरुष मोठ्या भक्तिभावानें पूजा करीत होते आणि कांहीं भक्त तर आसन-मांडी ठोकून मूर्तीकडे एकटक बघत राहिलेले होते. परंतु तिथें मूर्ति होती कसली ? तीन हात उंचीचा एक पाषाणखण्ड होता तो ! कुणा कुशल कारागिरानें, कुणाच्या जबरदस्तीनें असो वा स्वखुषीनें असो, आपल्या कलेचा दुरुपयोग करण्यासाठीं ही कारागिरी केलेली होती. त्यानें पुरुषाच्या जननेन्द्रियाची हुबेहुब नक्कल उठविलेली होती. लिंगाच्या एका अंगाला एक उभी मूर्ति कोरलेली होती; तिचेंहि जननेन्द्रिय उघडें करून दाखविण्यांत आलेलें होतें. मूर्ति सुन्दर तयार केलेली होती, यांत संदेह नाहीं. परंतु कसलें बीभत्स दृश्य होतें तें ! मला तर तिथें अधिक वेळ उभेंसुध्दां राहवेना. वहिनीनें तर एकवेळ नजर टाकतांक्षणीं जी मान खालीं घातली ती वरच केली नाहीं. पांथशालेंत पोंचल्यावर मी म्हणालों— “ माणसाच्या बुध्दीचं फार वाईट वाटतं आपल्याला. ”

“ जय ! मी तर लहानपणापासून या देवालयाची मोठी प्रशंसा ऐकलेली होती. माझ्या परिवारांतले लोक शैव आहेत हें तुला ठाऊक आहेच. इथें येऊन दर्शन घेणें ही त्यांना मोठी भाग्याची गोष्ट वाटते. ”

“ तुला ही गोष्ट भाग्याची वाटली कीं नाहीं ? ”

“ भाऊजी ! खरंच, अशा प्रकारची मूर्ति उभारायची काय जरूर होती हो ? ”

“ असली मूर्ति व येवढं विशाल मन्दिर गरीब माणसाला थोडंच उभारतां येणार आहे ? इथं लाखों दीनारांचा सवाल आहे. ही मूर्ति वस्तुतः धनिक लोकांच्या जीवनाचं प्रतिबिंब आहे. अरे बापरे ! कुणाहि आईबापांना आपल्या तरुण मुलामुलींना बरोबर घेऊन या जननेन्द्रियासमोर उभं कसं राहवत असेल ? उभे राहिल्याबरोबर त्यांच्या मनांत काय विचार येत असतील ? ”

“ जय ! तूं जेव्हां धर्माच्या विरुद्ध बोलत असस, तेव्हां कांहीं कांहीं वेळां मला असं वाटे कीं तुझी दृष्टि एकांगी आहे. परंतु या मूर्तीनं माझे डोळे उघडले. धर्म हा माणसाची उन्नति करायसाठीं नसून त्याचा अधःपात करायसाठींच असतो, असं आतां मला वाटूं लागलंय. असल्या मूर्तींची पूजा केल्यानंतरहि श्रेष्ठि-सामन्त-ब्राह्मण वर्गानं जर पशूपेक्षांहि नीच कोटींतली कामुकता दाखविली नाहीं तर तें एक नवलच ठरेल. अन् ही मूर्ति घडविणारा बेशरम कलाकार कोण असेल बरं ? ”

" कलाकाराला आपल्या स्वामीची आज्ञा पाळणं भाग होतं. त्याला याची मजुरी मिळाली असेल. हें काम त्यानं केलं नसतं तर त्याला कदाचित शिक्षा भोगावी लागली असती. अन् सिंह भय्या ! अशी प्रतिमेची पूजा सपरिवार करणारे लोक जर ब्रह्मचर्याच्या व इंद्रियनिग्रहाच्या गोष्टी सांगूं लागले तर याला तूं निर्लज्जपणाचा परमावधी म्हणशील की नाहीं ? "

" निर्लज्जपणा ! हा आमच्या कलेला कलंक आहे ! "

" तीर्थंकराच्या नग्न मूर्ति आम्ही पाहिलेल्या आहेत. मला त्याहि आवडत नाहींत. परंतु त्यांत कामुकतेचं इतकं नग्न प्रदर्शन नाहीं आढळत. "

वासन्ती बिचारी गप्प बसलेली होती. काय बोलणार ? तीर्थंकराचा विषय निघाल्यावर मात्र तिला बोलणें भाग पडलें—" जय भाऊजी ! आम्ही स्त्रिया तर धर्माच्या बाबतींत आणखीच आंधळ्या असतों ! मीहि तीर्थंकरांच्या नग्न मूर्तींचं दर्शन घ्यायसाठीं नेमानं जात असें. त्यांची मुद्रा लहान मुलासारखी निष्पाप होती, तींत कामुकतेचा गंधहि नव्हता, हें सगळं ठीक आहे. परंतु तरीहि एका मूर्तींत मूर्तिकाराचा हात भलंतीकडे वाहवलेला मी पाहिलेला होता. मात्र इथं आपल्याला दिसली तितकी दूरची मजल त्यानं गांठलेली नव्हती. तिथं या प्रकाराचा आरंभ झाला अन् इथं याचा अगदीं कळस झालाय असं वाटतं मला. "

* * * * *

लिंगालय ( गुडिमल्लम् ) तीर्थाहून निघून आम्ही कांचीस पोंचलों. सिंहवर्म्याच्या आईबापांना इतक्या दिवसांनंतर मुलगा भेटल्यामुळें फार आनंद झाला. आणि त्याच्या बरोबर सूनबाईहि आलेली पाहून या आनंदांत आणखीच भर पडली. वहिनीनें सासूच्या पायांना स्पर्श करून नमस्कार केला व अचल सौभाग्याचा आशीर्वाद मिळविला. सिंहवर्म्याकडून माझी ओळख करून घेऊन या मंडळींनी मला आपला धाकटा मुलगा मानण्याचें ठरविलें. ओळख मात्र पंडित व कलाकार या नात्यानेंच तेवढी करून देण्यांत आली.

सिंह व वासन्ती आपल्या घरीं पोंचली होती, परंतु मी अजून यात्रेचा शेवट गांठलेला नव्हता. कांची फार जुनी राजधानी आहे. म्हणून शेकडों वर्षांपासून इथें नव-नवे प्रासाद व नव-नवीं देवालयें उभारण्यांत आलीं आहेत. दक्षिणेकडील सगळ्यांत बलाढ्य पल्लव राज्याची ही राजधानी. साऱ्या दक्षिणापथांतील इतर राजे पल्लवांना आपले चक्रवर्ती मानत आले आहेत. विष्णुगोपाचा पराभव करून समुद्रगुप्तानें त्याचें महत्व कमी केलें असलें तरी आतां पुन्हां पल्लव राजा सिंह-वर्मा याचा दरारा कलिंग देशापासून दक्षिण समुद्रतटापर्यंत पूर्वीप्रमाणेंच चालू झाला आहे. कांची नगरीला दक्षिणेंतलें पाटलिपुत्र म्हणतां येईल. राजशक्ति व धन-वैभव या बाबतींतच

नव्हे तर विद्या व कलेमध्यें देखील तिला ही पदवी शोभते. द्रविड देशांत इतर ठिकाणीं जरीं आम्हांला मागधी भाषा जाणणारे फारच थोडे लोक आढळले तरी कांची नगरी मात्र या बाबतींतहि जणूं काय पाटलिपुत्राचा एक भागच आहे. अर्थात इथल्या लोकांची मागधी आजकालची मागधी नसून दोनचारशें वर्षांपूर्वीची आहे. द्रविड देशाचे लोक बहुतेक श्यामवर्ण असतात. परंतु पल्लव राजवंशांतील लोकांचा रंग कित्येकदां तर गंधार व शकांच्या इतका गोरा असतो. सिंहवर्मा आपले पूर्वज शक वंशांतलेच होते असें सांगतहि होता. ते परदेशांतून कुठून तरी येऊन अवन्तींच्या शक क्षत्रपांकडे नोकर राहिले; मग त्यांचे आप्तेष्ट शातवाहनांच्या दरबारीं आले. शातवाहनांच्या राज्याचीं शकलें-शकलें होऊं लागल्या बरोबर पल्लव सेनापतीनें कांची नगरींत आपल्या राज्याची घोषणा केली.

कांची नगरी मला घरच्या सारखी वाटली. परंतु घर थाटून राहण्यानें माझें मन स्थिर होण्याजोगें नव्हतें. मी इथें घर करण्यासाठीं नव्हती यौधेयभूमि सोडली. याच्यासाठीं नव्हतें मी पाटलिपुत्राहून प्रस्थान ठेवलें. माझ्या मनांत सिंहलद्वीपाला जाण्याची इच्छा अजूनहि कायम होती. तिथें जाऊन भिक्षूंचे नियम (विनय) समजून घेण्याचा माझा विचार होता. परंतु लगेच कांची सोडून जाण्याची गोष्ट काढणें कठीणच होतें. इथें मी संगीताचार्य होण्याचा विचार मनांत येऊंच दिला नाहीं. कारण पिष्टपुरांत जो प्रकार झाला तोच इथेंहि होण्याची धास्ती होती. मात्र आमच्या मित्रमंडळींत आमच्या संगीताचे कार्यक्रम तसे चाललेलेच होते. इथें प्रथम मी मूर्तिकलेच्या ज्ञानाचा उपयोग करण्याचा बेत ठरविला. मग एका चार्वाक पंडिताचा पत्ता लागला व त्याच्याकडेहि मी जाऊं लागलों. आत्मा-परमात्मा, धर्म व पुनर्जन्म यांपैकीं कशावरच चार्वाकांचा विश्वास नसतो. त्यांच्या तत्वज्ञानाचा थोडासा अभ्यास मी पूर्वीच केलेला होता. परंतु अजूनपर्यंत कुणा चार्वाक पंडिताची भेट होण्याची संधि मिळालेली नव्हती. मी त्याच्याकडे जाऊं लागलों. त्याच्या जवळ बृहस्पति-सूत्र व चार्वाक दर्शनाचे इतरहि कांहीं ग्रन्थ मी पाहिले. आतांपर्यंत मी चार्वाक-दर्शना-वरील इतरांचे ग्रन्थ वाचले होते, परंतु इथें तर खुद्द चार्वाकाचेच स्वतंत्र ग्रंथ उपलब्ध होते. चार्वाक पंडिताच्या जीवनविषयक तत्वज्ञानाशीं मला सहमत होतां येणें शक्य नाहीं. त्याचें म्हणणें असें होतें–"आपल्याला हें जीवन पुन्हां मिळणार नाहीं. म्हणून जितकें शक्य आहे तितकें खा, प्या, मौज करा, कर्ज काढा, तूप प्या, मेल्यानंतर तुम्हांला कोण विचारणार ?"

चार्वाक आचार्यांचा मूळ सिद्धांत हाच आहे असें जरी हा पंडित मला सांगत होता, तरी मला मात्र या बाबतींत जबरदस्त शंका वाटत होती. मी या पंडिताचा शिष्य नव्हतों, मित्राच्या नात्यानेंच अधूनमधून त्याच्याकडे जात होतों. म्हणून

त्याच्या सिद्धान्ताचें खंडन करण्याच्या बाबतींत संकोच करण्याची कांहींच जरूर नव्हती. त्याच्या जवळ वडिलोपार्जित धन होतें, चरितार्थाची त्याला काळजी नव्हती. स्त्रिया व दारू हवी तेव्हां त्याच्या सेवेला हजर होती. मलाहि तो सांगे—"मित्र जय ! तुला किती सुन्दर यौवन मिळालेलं आहे. हें तूं व्यर्थ दवडूं नकोस. वसन्ताचा बहर एकदां हातीं आल्यावर पुन्हां यायचा नसतो."

"मित्रा ! चार्वाक-दर्शनाचा अर्थ मी असा नाहीं करीत ! मनुष्यानं आपलं भवितव्य आपल्या हातांनीं घडवावं, त्यानं कुणाच्या हातचं बाहुलं होऊं नये, याच हेतूनं चार्वाकानं ईश्वराचं अस्तित्व अमान्य केलं. मनुष्याला क्षणोंक्षणीं नव्या परिस्थितीचा अनुभव घेण्याची संधि मिळते म्हणूनच चार्वाकानं जीवन हें एक अजर-अमर स्वतंत्र-तत्व म्हणून मान्य केलं नाहीं. ज्या गोष्टी आपण परलोकांत शोधतों, त्या आपण याच लोकांत पैदा कराव्यात आणि परलोकाची जो कल्पना आपण नुसतीच ऐकतों तसाच इहलोक घडवावा, येवढ्याचसाठीं चार्वाकानं परलोक. व पुनर्जन्म अमान्य केला."

"म्हणजे याचा अर्थ असा झाला कीं आम्ही इहलोकाला स्वर्ग बनवायच्या प्रयत्नांत मरून जावं अन जें कांहीं मिळतंय त्याचाहि उपभोग घेऊं नये ?"

"जें कांहीं मिळतंय त्याचा उपभोग घ्यायचा नाहीं असं नाहीं माझं म्हणणं. माझं म्हणणं येवढंच कीं हें सर्वांच्या सामुदायिक प्रयत्नाचं फळ आहे म्हणून त्याचा उपभोग एकट्यानं घ्यायचा आम्हांला कसलाच हक्क नाहीं. साऱ्यानीं मिळून प्रयत्न केला तरच दुनियेंत साऱ्या सुखसोईंची समृद्धि करतां येईल. इतरांनीं पेरलेल्या शेताची कापणीच तेवढी करायला आपण तयार राहणं हें उचित नव्हे असं मला वाटतं. आजूबाजूच्या लोकांचं जीवनहि ज्यावेळीं सुखी होईल त्याच वेळीं तुमचं आमचं जीवन सुखी होऊं शकेल. तुम्ही तुमचंच उदाहरण घ्या. तुमच्या परिवारांतले लोक जर उपाशी मरत असतील तर आतां तुम्ही खातां-पितां मौज करतां तशी तुम्हांला करतां येईल का ? तुमचा मुलगा भयंकर दुखण्यानं आजारी झाला, तर त्यावेळींहि तुम्ही असेच रंगढंग करीत राहणार ?"

"मित्रा ! कांहीं गोष्टी तर स्वभावसिद्धच असतात. इथं, या लोकांत, आपल्या हयातींत आपल्या साठीं सुखोपभोग उपलब्ध करून घेण हेंच आपलं ध्येय आहे अशी उमेद चार्वक-आचार्यांना कदाचित वाटली असेलहि. परंतु मी स्वतःला तेवढा सामर्थ्यवान समजत नाहीं."

"मानव कधीहि पाषाणहृदयी होऊं शकत नाहीं. त्याचं हृदय कोमल असतं, त्याच्या भावना कोमल असतात, निरपराध्यावर कुणी अन्यायी जुलुम करत असलेला पाहिला कीं मानवाचं हृदय कळवळल्याखेरीज राहत नाहीं."

" पण मी तर कोणत्याच चार्वाक-ग्रन्थांत अशा प्रकारचं जीवनाचं तत्वज्ञान पाहिलेलं नाहीं ! "

" चार्वाकाचं तत्वज्ञान हें पुस्तकी तत्वज्ञान नव्हें. ऋषि-मुनींचं नांव सांगून आमची बुद्धि कुंठित करायची त्याची इच्छा नव्हती. दुसरी गोष्ट अशी कीं तुमच्या समोर पुस्तकरूपानं जे चार्वाक-दर्शन आलेलं आहे तें सामन्तांचं व शेटजींचं तत्वज्ञान आहे. "

" सामन्तांचं व शेटजींचं तत्वज्ञान ! सामन्त व शेटजी यांच्यांत तुम्हांला चार्वाक-मताचे अनुयायी कितीसे आढळतात ? "

" माझ्या म्हणण्याचा आशय असा कीं चार्वाकाच्या नांवानं तुम्ही जें जीव-नाचं तत्वज्ञान आमच्यापुढं ठेवलंय तें सामतांचं, शेटजींचं तत्वज्ञान आहे. ते सगळे सर्रास याच तत्वज्ञानानुसार वागत आलेले आहेत. कुणाचीहि पर्वा करूं नका, तुमच्या खाण्यापिण्यांत, चैनींत जर अडथळा होऊं लागला तर बापाला व भावाला देखील तरवारीचं पाणी दाखवा, त्यांच्यावर विषप्रयोग करा, काय हवं ते करायला जरा सुद्धां मागं पुढं बघूं नका. या खेरीज यांचं जीवनाचं तत्वज्ञान तरी काय राहि-लंय हें तुम्हीच सांगा बरं. "

" पण माझ्या बोलण्याची तर ते टर करतात. "

" पण तुमच्या जीवनाचं ते अनुकरण करतात. त्यांच्या बाबतींत येवढंच म्हणतां येईल की ते तुमच्या तत्वज्ञानाला उघड उघड मान्यता द्यायला तयार नाहींत, कारण त्यांना चोरीच्या मालावर जगायचंय अन् चोराला चांदण्यांत यायची हिंमत नाहीं होत. "

" मित्रा ! फार कठोर आहेत तुझे उद्गार ! "

" खोटं आहे का मी सांगतो तें ? या दुनियेला नरकाची अवकळा कुणी आणली ? जर ते पक्के परलोकवादी असते व या दुनियेंतल्या कोणत्याहि गोष्टींशीं संबंध न ठेवते, हवा-पाणी व जंगली झाडपाल्यावर निर्वाह करीत असते, तर सामान्य जनतेचं जीवन इतकं दुःखमय झालं नसतं, इतका रक्तपात झाला नसता; परंतु लोकांनीं आपल्याला चोर म्हणूं नये व आपण पूर्वजन्मींची आपलीच कमाई खात आहोंत असं त्यांनीं मानावं एवढ्याचसाठीं आपण परलोकवादी असल्याचा देखावा त्यांनीं चालविलेला असतो. "

" हा आक्षेप तर माझ्यावरहि घेतां येईल ! "

" तुम्हीहि त्यांच्याच पंक्तीला आहांत. दोघांचं जिवनाचं तत्वज्ञान एकच आहे. उपभोगाच्या वस्तु तयार करणारे लोक धर्माचं व परलोकाचं आमिष पाहून फसत आहेत हें पाहून मूळ चार्वाक विचारवन्तानं त्यांच्यावर आपलं टीकास्त्र चाल-

वलं. त्याच्या टीकेचा रोख चोरांवर होता. जग सुखी झालेलं पाहावं, मानवा-मान-वांत प्रेमाचा व बंधुभावाचा फैलाव व्हावा हा त्याचा उद्देश होता. ''

'' तुम्ही कोणत्या चार्वाक-मताची हकीकत सांगत आहांत ? ''

'' जें चार्वाक-मत केवळ बुद्धीलाच मार्गदर्शक मानतं, केवळ अनुभव हीच सत्याची कसोटी मानतं, तें. पूर्वी तुम्ही कोणत्या तरी पोथीपुराणाचे व ऋषिमुनींचे वैचारिक गुलाम होतां, अन् आतां चार्वाकाच्या नांवानं आणखी दुसऱ्याच कोणत्या तरी पोथीपुराणाचे व आचार्यांचे गुलाम राहूं इच्छितां. दोहोंमध्यें फरक कांहींच नाहीं. तुम्हीहि ' खा-प्या-मजा करा ' या मार्गाचेच अनुयायी आहांत, अन् पल्लव-कुमारहि याच मार्गाचे अनुयायी आहेत. स्वतःचं जीवन इतक्या निर्दयतापूर्ण रीतीनं जगत असतांना तुम्हांला ईश्वराची अगर परलोकाची कांहीच काळजी नसते; पल्लव-कुमाराकडूनहि तुम्हांला हेंच उत्तर मिळेल. मग दोघांत फरक काय? आपण ईश्वर, परलोक इत्यादि गोष्टी मानत नाहीं येवढ्यावरच गर्वानं फुगून स्वतःला मोठे बुद्धि-वादी म्हणवतां तुम्ही ! ''

'' म्हणजे आम्ही चार्वाक पंथीयांनी बुद्धिवादाचा प्रसार करण्याच्या बाबतींत कांहींच कामगिरी केली नाहीं असं म्हणतां तुम्ही ? ''

'' कांहीं कामगिरी केली कीं नाहीं हा प्रश्नच नाहीं. जी कामगिरी केली ती उलट केली का सरळ केली, हा प्रश्न आहे. ''

'' मित्रा ! आम्ही सरळ कामगिरीच केली. भोगवाद व बुद्धिवाद यांचा मेळ घालून आम्ही दुनियेला अंधारांत भटकायच्या त्रासांतून वांचवायची खटपट केली. ''

'' तुम्हांला लिंगालया ( गुडिमल्लम् ) चं महातीर्थ ठाऊक आहे ? ''

'' कां नाहीं ठाऊक असणार ? तिथं मी कितीदांतरी गेलोंय. ''

'' दर्शन घ्यायला ? पुण्य मिळवायला ? ''

'' भोगवाद हेंच धर्माचं एकमेव सार आहे, भोग-इन्द्रिय हाच देवाधिदेव महादेव आहे, हें आपल्या मित्रांना दाखवायला. ''

'' म्हणजे तुमचे मित्र ही गोष्ट पूर्वी मान्य नव्हते करीत ? ''

'' मान्य करीत होते पण आचरणांत आणीत नव्हते. ''

'' अन् आतां ते आपण ही गोष्ट आचरणांत आणली असल्याची घोषणा करीत हिंडत असतात ! तें तीर्थ येवढंच दर्शवितं कीं परलोक व परमशक्ति या कल्पनांचा उपयोग धार्मिकांना केवळ आडपडदा म्हणून करायचा असतो, त्यांचं ध्येय भोगवाद हेंच असतं. पण ते मानवाला मात्र भोगवादाचा फायदा मिळवून देत नाहींतच, उलटपक्षीं पशूपेक्षांहि निकृष्ट जीवन जगायला त्याला भाग पाडतात. आम्हांलाहि भोगवाद मान्य आहे, पण तो असा भोगवाद कीं जो मानवी हृदयाला पटतो. ज्याचं

मार्गदर्शन मानवी बुद्धि करते. चोरून, लपतछपत, एकट्यानं आचरणांत आणायचा भोगवाद नकोय आम्हांला. ज्या भोगवादाच्या आचरणांत सारी मानवजाति सामील होईल, ज्या भोगवादाचा फायदा भावी पिढ्यांना देखील मिळाल्याखेरीज राहणार नाहीं, असा आहे आमचा भोगवाद. ''

'' कल्पना तर फारच सुन्दर आहे. पण साऱ्या गांवाला खायला घालणं शक्य नाहीं म्हणून काय आपल्या समोरचं ताट फेंकून द्यायला पाहिजे ? ''

'' सारं गांव जर उपाशी असेल तर ताट फेंकून नाहीं द्यायचं, ताट इतरांसमोर ठेवावं लागेल; यालाच मी माणुसकी म्हणेन. सारा गांव उपाशी कां मरतोय, त्याला कसं वांचवितां येईल, याच्यासाठीं प्रयत्न करावा लागेल; यालाच मी मानव-बुद्धि म्हणतों. ''

'' पण तुम्ही जें कांहीं सांगतां आहांत, त्याला अनुसरून वागायला दुनिया तयार आहे का ? ''

'' दुनिया तयार देखील होऊं शकेल. पण दुनियेंतले चोर-भामटे तिला प्रगति करायला मोकळीक देतील का ? ''

'' पण अशा चोरभामट्यांची संख्या केवढी आहे ? ''

'' संख्या किती कां कमी असेना ? त्यांनीं पसरलेलं जाळं तर खूप मोठं आहे; त्यांच्या हातांतली हत्यारं तर खूप मजबूत आहेत; कारण राज्यच त्यांच्या हातीं आहे ना ! ''

'' मग ही फार दूरची गोष्ट आहे म्हणायची. अन् ही लाल द्राक्षी सुरा तर या घटकेला माझ्या हातांत आहे. ? ''

* * * *

पिष्टपुरांतल्याप्रमाणेंच कांची नगरींत देखील विदेशी लोकांची ये-जा फार आहे. माझ्या पाठीमागें कामधामाचें कसलेंच बंधन नव्हतें. सिंहवर्मांच्या आईबापांची स्थिति इतकी चांगली होती कीं त्यांच्या घरीं मी वर्ष दोन वर्षें असाच राहिलों असतों तरीहि त्यांना ओझें नसतें वाटलें. मात्र करमणुकीसाठीं मी पुन्हां छिन्नी हातांत घेतलेली होतीच. आणि मी दासांच्या खरेदी-विक्रीचे देखावे दर्शविणारें शिल्पकाम करीत होतों. हें कसलें तरी कल्पित चित्रण नव्हतें. कांची नगरी जशी दक्षिणपथांतली सर्वांत मोठी राजधानी आहे तशीच ती दासांची सर्वांत मोठी बाजारपेठ आहे. श्रीमंत लोकांना पगारी चाकर ठेवून समाधान नाहीं वाटत. म्हणून त्यांना असे स्त्रीपुरुष हवे असतात कीं, जे गाईबैलांप्रमाणें त्यांचा खुंटा सोडून बाहेर जाऊं शकणार नाहींत. इथें दास घेऊन येणारे सौदागर इतके असत कीं, ते कोणकोणत्या ठिकाणचे आहेत, याचा पत्ताच लागत नसे. कुणा-

कुणाचे चेहेरे यवनांसारखे असत, आणखी कोणी चिनी लोकांसारखे दिसत. कांहीं-कांहींच्या लांब लांब दाढया असत, तर कांहींकांहींनीं दाढीमिशा सफाचट केलेल्या असत. एखादा खाटीक जसा आपल्या शेळ्यामेंढयांना घेरा देऊन हांकलत आणतो, तसे हे लोक आपल्या दास-दासींना समुद्रकांठावरून घेरा देऊन हांकलत आणत असत. दास-वणिकांची स्वतंत्र वीथी होती, त्यांच्या स्वतंत्र पण्यशाला होत्या. या दासांना इतर पण्यवस्तूंप्रमाणें रस्त्याच्या कडेला सजवून उभे करीत नसले तरी पण्यशाळेच्या फाटकांतून आंत शिरतांक्षणीं व्यापाऱ्यांची सारी हातचलाखी दिसूं लागे. अंगणांत अगर खोलींत खरेदीदारांना ते मोठ्या तत्परतेनें ओढून घेऊन जात होते. प्रत्येक सौद्याची चढाओढीनें तारीफ करीत होते. दासी चाळीस वर्षांची असली तरी ती वीस वर्षांची आहे असें दाखवीत होते, ती वांझोटी असली तरी दर वर्षी तिला मूल होतें असें सांगत होते. दास दुर्बल असेल तर तो वाटचालीनें थकल्यामुळें तसा दिसतो ! तो लहान असेल तर अजून त्याचें वाढ व्हावयाचें वय संपलें नाहीं ! दर-दाम देखील इतर पण्यवस्तूप्रमाणेंच ठरत होता. अगोदर दहा दीनार सांगावयाचे आणि सौदा पटावयाचा पांच दीनाराला. दासांमध्येंहि सर्व रंगांचे लोक होते. त्यांत जाड ओठांचे, कुरळया केसांचे काळे लोक ( हबशी ) देखील पुष्कळच असत. समुद्रापलीकडील प्रदेशांतून येणाऱ्या दास-दासींच्या बाबतींतलें हें माझें वर्णन आहे. स्वदेशी दास-दासींना तर मी लहानपणापासूनच पाहात आलेलों आहे. दासांच्या मुलांना दास होऊन कसें राहावें लागतें; स्वतःची व आईबापांची विक्री झाल्यामुळें अगर राजानें दिलेल्या शिक्षेमुळें लोक दास कसे होतात, या साऱ्या गोष्टी मला ठाऊक होत्या. परदेशाहून आलेल्या दासांच्या बाबतींत तिकडे लोक दास कसे होतात ही माहिती मला पाहिजे होती. पाखरांना जसें फसवून पकडतात, तसें दासांना छापा घालून लुटून आणण्यांत येतें हें, जेव्हां मला कळलें, तेव्हां मला त्यांच्याविषयीं आणखी माहिती मिळविण्याची इच्छा झाली. परंतु अड-चण अशी होती कीं दास ज्या भाषा बोलत होते त्यांतली एकही भाषा मला समजत नव्हती. मोठ्या कुलांत जाणाऱ्या दासींच्या पण्यशाळा तर औरच होत्या. पण तिथल्या मालाची विक्री व्हावयाला वेळहि लागत नव्हता. मी ज्या यवनदासी पहिल्या दिवशीं पाहून याव्यात, त्या दुसऱ्या दिवशीं जाऊन पाहावें तर तिथें सांप-डावयाच्याच नाहींत. गौरवर्ण तर त्यांचा सर्रास असावयाचाच; त्याला सौंदर्याची जोड असली कीं अशा दासी महाराजाच्या अन्तःपुरांत खपावयाच्याच. या पण्यशालांमधील दासींना जमिनीवर अर्धनग्न घामट अवस्थेंत बसावें लागत नव्हतें. तसें म्हटलें तर रत्नें-मोतीं लाल चीनांशुकांतच बांधून ठेवतात, आणि मका जमिनीवरच टाकून देतात. अशा प्रकारें मानवी देहाचा येथें क्रूर खेळ करण्यांत येत होता. तरीहि हें

पूर्वकर्मांचें फळ आहे असें सांगणारे कांहीं धर्मात्मे इथें भेटलेच. दासीला चांगली सजवून ठेवावयाची, तिच्या खाण्यापिण्याचीच नव्हे तर श्रृंगारसाजाची व वस्त्रप्रावरणांची नीट बरदास्त ठेवावयाची, आणि इतरांना तसेंच धुळींत लोळत पडूं द्यावयाचें, हें म्हणे पूर्वकर्मांचें फळ ! जास्त भाव मिळविण्यासाठीं व्यापारी आपला माल सजवितो तोसुद्धां पूर्वपुण्याईमुळेंच म्हणावयाचा !

एके दिवशीं मला एक मिसर देशांतला ( ईजिप्तमधला ) दास भेटला. तो लहानपणीं अलसन्दा ( अलेक्झांड्रिया ) येथील एका भारतीय व्यापाऱ्याच्या घरीं होता. तो सांगत होता– " माझं गांव समुद्रकांठीं आहे. एके दिवशीं डाकूंनीं आमच्या गांवावर छापा घातला. आमचे लोक लढले, परंतु डाकूंची संख्या जास्त होती. किती तरी गांववाले मारले गेले, कांहीं पळून गेले, आणि बाकीच्यांना मुसक्या बांधून डाकूंनीं आपल्या जहाजावर नेलं. त्यांनीं आम्हाला दास-वणिकांना ( दासांचा व्यापार करणाऱ्या सौदागरांना ) विकून टाकलं. माझ्या जोडीदारांपैकीं कित्येकांची विक्री वाटेंतल्या पत्तनांमध्यें ( बंदरांमध्यें ) झाली. चौघे सिंहलद्वीपांत विकले गेले अन् मी इथं विकला जायसाठीं आलों आहें. "

गरीब बिचारे हे परदेशीय लोक, आपण दास नाहीं हें कसें सिद्ध करणार ! संध्याकाळच्या वेळीं दासांना कोठडींत कोंडून ठेवण्यांत येतें. जशीं कांहीं तीं माणसें नसून पशूच आहेत. उकाडा जास्त असला म्हणजे कांहींना एकमेकांना बेड्यांनीं जखडून अंगणांत ठेवतात. मी एके दिवशी तीन दास व दोन दासींना अशा प्रकारें बेड्यांनीं जखडून ठेवलेलें पाहिलें होतें. त्यांच्याच मूर्ति मी आतां दगडावर कोरूं लागलों होतों. ' आपण यांना दोन तीन दिवस अंगणांतच ठेवा ' अशी विनंति एक सभ्य गृहस्थ या नात्यानें मी अत्यंत नम्रतेनें दास-वणिकाला केली तेव्हां त्यानें कसलीच हरकत घेतली नाहीं. मी हें कोरीवकाम अगदीं मन लावून केलें. बेड्यांनीं जखडलेल्या दासांच्या बरोबर एका कोंपऱ्यांत लोभी क्रूरमुख वणिकाचीहि मूर्ति मी कोरली आणि खरेदीदार म्हणून माझा मित्र सिंहवर्मा यानें स्वतःची मूर्ति माझ्या-कडून कोरवून घेतली. सगळ्या मूर्ति तयार झाल्यावर मी माझ्या चार्वाक मित्राला बरोबर घेऊन आलों. मी त्याला म्हणालों–– " ही पहा परलोकवादाची सगळ्यांत मोठी देणगी ; तुमच्या भोगवादालाहि हिच्यांतूनच पुष्टी मिळते. " जाड ओंठवाल्या काळ्या दासांच्या बाबतींत मी असें ऐकलें कीं त्या बिचाऱ्यांना घेरून पकडण्यासाठीं दास-वणिकांनीं सैनिक ठेवलेले असतात. यांत सत्याचा अंश किती व असत्याचा किती, हें मला ठाऊक नाहीं. त्या प्रसंगीं माझ्या मनश्चक्षूंसमोर शबरपल्लीचें चित्र उभें राहात होतें. त्यांच्याहि जंगलांत लहान लहान झोंपड्या आहेत, त्यांचीं गांवेंहि लहान लहान असतात, त्यांना हे क्रूर सैनिक घेरा देत असतीलहि, कुणी सांगावें ?

दासतेचा हा सगळ्यांत खालचा थर होता. तसे वरिष्ठ दर्जाचे दास तर राजे लोकांच्या अन्तःपुरांमध्यें हजारों राण्यांच्या रूपानें असतातच. मी आतांपर्यंत ज्या ज्या देशांमध्यें गेलों, तिथें अशा प्रकारें दासांची शिकार केली जात नव्हती याबद्दल मला नक्कीच संतोष वाटला. धनिक वर्गामध्यें भगवन्ताच्या भक्तांची कमतरता नसतेच. माझ्या ओळखीच्या लोकांमध्येंहि असे बरेचसे होते. मी अनीश्वरवादी नास्तिक चार्वाक झालों आहे हें जेव्हां त्यांनीं ऐकलें तेव्हां त्यांनीं मला तर्काच्या आधारें ईश्वराचें अस्तित्व पटवून देण्याची खटपट चालविली--

" प्रत्येक कार्याचं कांहीं ना कांहीं कारण असतंच. घडा बनविणारा जसा कुंभार असतो, तसा ही दुनिया घडविणारा कोणीतरी असायला पाहिजे. "

मी सांगें-- " या दासांना दास करणाराहि कोणी ईश्वर असलाच पाहिजे. अन् किती क्रूर, किती निष्ठुर असला पाहिजे तो ? त्याच्या हातून कसल्या भलाईची अशा धरावी आम्ही ? "

मग ते पूर्वकर्माची गोष्ट काढत असत. मी सांगें-- " बिचाऱ्या चोराचे हात नाहक तोडतात. त्यानं येवढं धाडस केलं, मेहनत घेतली, हें सगळं आपल्या पूर्वकर्माचं फळ ध्यायसाठीं त्यानं केलं, अन् तुम्ही मात्र त्याचे हात तोडवतां, त्याला सुळावर चढवतां, त्याचा कडेलोट करवतां ! "

दक्षिणापथाच्या या भागांत उत्तर भारताशीं तुलना करतां किती तरी प्रकारची भिन्नता आढळून येते. परंतु ही भिन्नता प्रभूंच्या व स्वामींच्या मनोभावांत मात्र आढळत नाही. श्रमण ब्राह्मणांचा इकडे खूप सन्मान होतो. ब्राह्मणांचा तर त्यांतल्या त्यांत अधिक; कारण ब्राह्मणांची संख्या फार थोडी आहे. राजे लोकांवर व सामन्तांवर त्यांचा प्रभावहि अधिक असतो; कारण कुणालाहि उच्च जातींत दाखल करणें त्यांच्याच हातीं असतें. श्रमणांमध्यें-बौद्ध भिक्षूंमध्यें-सगळ्याच जातींचे व वर्गांचे लोक असतात. म्हणून त्यांच्या मोठ्या संख्येंत स्थानिक लोकांचाच भरणा विशेष आहे. भिक्षू लोक आपसांत खाण्यापिण्याच्या बाबतींत कसलाच भेदभाव पाळीत नाहींत. पण बाहेरच्या दुनियेंत लहान-मोठ्या जाती आहेत, आणि तींत भिक्षूंच्या बाबतींतहि जातीचा पूस-तपास होतोच. पल्लव राजांनीं भिक्षूंच्यासाठींहि किती तरी विहार बांधविले आहेत, किती तरी गांवें दान दिलीं आहेत, विद्वान भिक्षूंचा ते सन्मानहि करतात. पण ब्राम्हणांच्या हातून आपलें काम जितकें यशस्वी होत असलेलें त्यांना दिसतें, तितकी भिक्षूंच्या बाबतींत त्यांना आशा राहिलेली नाहीं हें स्पष्टच आहे.

मी कांची नगरींत मुक्काम केल्याला एक वर्ष होऊन गेलें. आपलें खरें नातें प्रकट होण्याचा धोका टाळून जेवढ्या पंडितांना, कलाविदांना व कलाप्रेमी मंडळींना भेटण्याची संधि मिळाली तेवढ्यांना मी भेटलों. या कामासाठीं मला वेळहि भरपूर

होता. संध्याकाळीं वहिनी व सिंह यांच्या सहवासांत एकदोन चषक ( प्याले ) झोंकून वीणावादनाचा व संगीताचा थोडाफार आनंद मी घेत असें. वहिनीच्या कांहीं गप्पाहि ऐकत असें. बाकीचा सारा वेळ गुणीजनांच्या गांठीभेटी घेणें, नगरींतील केरकचरा पाहणें, आणि त्यांच्याविषयी विचार करणें, यांतच जात असे. चार्वाकपंथी मित्राशीं माझी मैत्री टिकून राहिली. चार्वाकाच्या भव्य दर्शनाचा तो जो अर्थ लावीत होता त्याला मी माझा विरोध सडेतोडपणें प्रकट करीत असलों तरी त्यामुळें या मैत्रींत अंतराय आला नाहीं. कांचीच्या महाविहारांतहि मी किती तरी वेळां जात असें. तिथल्या पंडित भिक्षूंच्या बरोबर शास्त्रचर्चा होत असे. बौद्धधर्माविषयीं मला आस्था नव्हती तरी तथागतांना द्विपद-उत्तम ( सर्वश्रेष्ठ पुरुष ) म्हणून मान देण्यांत मी त्यांच्याहि एक पाऊल पुढें जात असे हें त्यांना दिसत होतें. कशामुळें कां होईना, माझ्याशीं त्यांचें वर्तन चांगलें होतें. मी आचार्य वसुबन्धूंचा शिष्य होतों हेंहि याचें एक कारण असूं शकेल. आचार्य वसुबन्धूंची कीर्ति समुद्रापलीकडेपर्यंत पोंचलेली होती. गेल्या सहा महिन्यांत कांचींतील एका तरुण भिक्षूशीं माझी ओळख झाली. त्याची प्रतिभा जेवढी तीक्ष्ण तेवढाच त्याचा अभ्यासाचा हव्यासहि दांडगा होता. त्यानें माझ्या बरोबर आचार्य वसुबन्धूंचे 'वाद-विधान' व आणखी एक दोन इतर ग्रन्थ वाचले. आचार्य वसुबन्धु आधुनिक काळांतले महान् विचारवन्त आहेत हें मी त्याला दाखवून दिलें. तो आचार्यांना भेटावयासाठीं फारच उत्सुक झाला. आचार्य गन्धार देशाला गेले आहेत, त्यांना भेटावयास जावयाचें असेल तर लवकर गेलें पाहिजे असें मी त्याला सांगितलें. तो माझ्या समक्षच उत्तरेकडे रवाना झाला. या ब्राह्मण तरुणानें—याचें नांव दिङ्नाग होतें— आचार्यांच्या ज्ञानाचा खूप लाभ घेतला, आणि पोथी-पत्रवाले ब्राह्मण व इतर धर्मध्वजी त्याचें नांव ऐकतांच चळचळां कांपत असत असें मागाहून माझ्या कानावर आलें.

शेवटीं कांची नगरीला रामराम करण्यासाठीं तयार राहण्याचा तो दिवस एकदांचा आला. तीन वर्षांहून अधिक काळपर्यंत वासन्ती, सिंह व मी एकत्र राहिलों. जीवनाच्या प्रसंगींच नव्हे तर मृत्यूच्या प्रसंगींहि आम्ही एकत्र राहिलों. सुखाच्या प्रसंगींच नव्हे तर दुःखाच्या प्रसंगींहि आम्ही एकत्र राहिलों. अशा मित्रांच्या वियोगाचें दुःख झाल्याखेरीज कसें राहील ? वासंती सांगू लागली—" जयभाऊजी ! आपण आजन्म एकत्र राहूं असं मी समजत होत्यें. आपण शबर-पल्लींतच राहिलों असतों तर किती छान झाल असतं ! "

" वहिनी ! तुला तुझ्या त्या वेळच्या अवताराची आठवण आहे का ? "

" त्या दिवशीं तुम्ही तो पोशाक करायला सांगितलंत, त्यावेळचं तुमचं बोलणं मला किती कडू-गोड लागलं म्हणतां ! "

" गोडहि लागलं ? "

सिंह हंसत हंसत म्हणाला— " कारण ती दिराच्या तोंडून निघालेली गोष्ट होती ना ! "

" होय भाऊजी ! आज मी विचार करतें तेव्हां तें जीवन किती मधुर होतं हें कळूं लागतं. हें जीवन भोग-सुलभ जीवन असलं तरी याची दुसरी बाजू किती क्रूर आहे ! तुम्ही कोरलेलं हें चित्र मर्मावर केवढा आघात करतं बरं ! शबरपल्लीच्या लोकांना असहाय-अबोध-जंगली ही विशेषणं खुशाल लावावींत हवीं तर, पण तिथं इथल्यासारखं दासजीवन असणं तर शक्य नाहीं ना ? अन् भाऊजी ! मला श्यामाची आठवण येते. किती सरळ, किती निर्भय होती ती ! आणखीहि सख्या-मैत्रिणी पाहिल्या मी, पण तशी सखी पुन्हां नाहीं मिळायची. "

" न मिळायला काय झालं ! पुन्हां तशाच तऱ्हेनं एक जहाज फुटून आपण तिथं पोंचूं या ! खरं कीं नाहीं, जय ? "

" एकदां विखुरलेले पुन्हां कसचे एकत्र होतात ! परंतु आपलं जीवन असं विखुरलेलंच असलं पाहिजे. नाहींतर आपण माणसं होण्याऐवजीं झाडं होऊं. बरोबर उगवायचं, बरोबर वाढायचं, बरोबरच वारापाणी सोसायचं. "

वासन्ती व सिंहाला सोडतांना मला फार दुःख झालें.

# ( १३ )

# सिंहल-द्वीपांत

मी मनांत आणलें असतें तर खुष्कीच्या मार्गानेंहि मला खूप दूरपर्यंत जातां आलें असतें. जिथें सिंहलद्वीप व भारत एकमेकांच्या अगदीं जवळ येतात तिथल्या पांचसहा योजनांच्या खाडीपर्यंत मी खुष्कीच्या मार्गाने गेलों असतों. मग अगदींच थोडें अंतर गलबतांतून जावें लागलें असतें. तसें केलें असतें तर पांड्य देशाची राजधानी मधुरा ( मदुरा ) हीहि मी पाहून घेतली असती. परंतु इकडचे रस्ते फार धोक्याचे आहेत. जंगल व जंगली पशूंचा धोका तर आहेच आणि शिवाय चोर-डाकूंचाहि धोका आहे. म्हणून मी कावेरीपट्टणापर्यंत खुष्कीच्या मार्गानें गेलों आणि तिथून सिंहलद्वीपाला जाणारें गलबत पकडलें. जहाजावर एकट्यानें दिवस काढणें मुष्किलीचें

होतें. परंतु दोस्ती करणें हा मनुष्यस्वभावच असतो. एकमेकांची भाषा समजत नसली तरी माणसांमाणसांमध्यें एक प्रकारचा मूक-स्नेह निर्माण होतोच. या जहाजांतून पुष्कळसे सिंहली लोकच चालले होते. मी असें समजत होतों कीं पल्ल-वांच्या राज्यांत आल्यानंतर भाषेची अडचण आणखी वाढली तशीच यापुढेंहि ती अधिकाधिक वाढतच जाणार. त्यांत पुन्हां सिंहलद्वीपाच्या बाबतींत तर किती तरी कथा मी ऐकलेल्या होत्या. तो राक्षसिणींचा देश आहे, वाट चुकलेल्या गलबतवाल्यांना त्या आपल्या जादुगिरीनें मोहित करतात आणि त्यांना पशूचें रूप देऊन आपल्या-जवळ कायमचें ठेवून घेतात, अशा कथा मी ऐकलेल्या होत्या. पण जसजसें माझें वय व ज्ञान वाढत गेलें, जसजसे मी अनेक देश पाहत गेलों, तसतशा अशा प्रकारच्या कहाण्या केवळ करमणुकीचा विषय म्हणूनच माझ्या आठवणींत शिल्लक राहिल्या. जहाजांतले लोक जी सिंहली भाषा बोलत होते ती मला चांगली समजत असल्याचें मला आढळून आलें. मात्र जे पाण्ड्य व पल्लव राज्याचे रहिवासी होते, त्यांची भाषा मला नव्हती समजत–कांची नगरींत जरी मी एक वर्ष राहिलों तरी द्रविड भाषा बोलणारांच्या सहवासांत मी राहिलों नव्हतों. उत्तरेकडून आलेल्या राज-वंशीय अगर ब्राह्मण मंडळींतच माझें वास्तव्य होतें. म्हणून मला द्रविड भाषा शिकतां आली नाहीं. जहाजावर केवळ सिंहल व भारतांचेच लोक होते असें नसून इतरहि अनेक द्वीप-द्वीपान्तरांचे लोक होते. ज्यांचीं नांवेंहि मी आतांपर्यंत ऐकलेलीं नव्हतीं अशा द्वीपांचे लोक या जहाजावर होते. यवद्वीपाचा एक तरुण ब्राह्मण या वेळीं माझा मित्र झाला. आणखी एका सिंहल तरुणाशींहि माझी दोस्ती झाली. सिंहल तरुणाचें नांव होतें रोहण आणि यवद्वीपवासी ब्राह्मणाचें नांव होतें अर्जुन. यवद्वीपानंतर इथें कांची नगरींतहि कितीतरी विचित्र-विचित्र कथा ऐकल्या. मात्र सिंहलद्वीपाच्या फारच जवळ आलेलों असल्यामुळें आतां पहिल्याइतक्या अद्‌भुत कथा ऐकावयाला नव्हत्या मिळत. या कथांच्या मदतीनें सत्य शोधून काढावयाचें म्हणजे किती कठीण काम आहे बरें ! दुरून ऐकलें म्हणजे पांच योजनांचा प्रदेश पांचशें योजनांचा होतो; काळे पिवळे लोक अक्राळविक्राळ राक्षस होतात; आणि रस्ते म्हणजे दैत्यांचे व पिशाच्यांचे अड्डे बनतात. या सगळ्या संकटांना तोंड देऊन येवढी मोठी मजल गांठावयाची आशाच राहात नाहीं. रोहण व अर्जुनाशीं गप्पागोष्टी करतांना अशा कथा कितीदां तरी ऐका-वयास मिळत असत. मी रोहणला विचारलें–– "वडवानल तुमच्या इथून किती दूर आहे ? — वडवानल ठाऊक आहे ना ? समुद्राच्या पोटांत भडकून राहिलेली आग असते ती."

रोहणनें सांगितलें– "सिंहलद्वीपाच्या उत्तर भागांतून ती दिसत नाहीं. या द्वीपाच्या दक्षिण भागाचं नांव आहे रोहण. रोहणच्या दक्षिण किनाऱ्यावरून पाहिलें

कीं वडवानल दिसतो. परंतु तो पाहण्यासाठीं रात्रीच्या वेळीं एखाद्या चांगल्या वृक्षावर अगर उंच टेंकडीवर चढावं लागतं. आपण वडवानल बघत असतांना जर कुणा देवतेच्या दृष्टीस पडलों तर तिथल्या तिथं आपला प्राण गेलाच म्हणून समजावं असंहि लोक सांगतात. ”

“ रोहण ! अशा कथा सान्याच ठिकाणीं रूढ आहेत. आमच्या यवद्वीपांत असं सांगतात कीं वडवानल आमच्या द्वीपाच्याहि आणखी दक्षिणेला आहे. तिथूनहि तो रात्रींच दृष्टीस पडतो, पण कुणाला तो पाहण्याची इच्छा नाहीं होत; कारण पाहिल्याबरोबर म्हणे वडवानल माणसाला आपल्याकडे खेंचून घेतो. लोक अशा कथा आपल्या अज्ञानामुळं रचतात असं वाटतं मला. माझं राहायचं ठिकाण यवद्वीपाच्या दक्षिण किनाऱ्यावर आहे. ”

मी विचारलें—“ यवद्वीपांत लोक कसले असतात ? ”

“ कसले म्हणजे काय ? मी जसा दिसतोंय तसेच असतात ते. ”

“ आमच्यांत व त्यांच्यांत कांहींच फरक नसतो ? ”

“ फरक खूपच आहे. यवद्वीपांत भारतीय लोकांशिवाय इतरांमध्यें जातीपातीचा मागमूसहि नाहीं. ”

“ म्हणजे तिथं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, असे भेद नाहींत ? ”

“ सांगितलं नाहीं का मी ? भारताहून तिकडे गेलेल्या लोकांमध्यें तेवढा जातिभेद आहे. पण अशांची संख्या फार थोडी आहे. ”

“ मित्र अर्जुन ! माफ करा हं. तुमचा चेहरा इतर यावीं ( जावानिवासी ) सारखाच दिसतोय मला. दाढीमिशा मुळींच नाहींत, अन् गालांचीं हाडं तशींच वर आलेलीं. ”

“ ब्राम्हणांनीं यवद्वीपांत जाऊन जराशी उदारता दाखविली आहे. माझे पणजोबा कांचीहून तिकडे गेले होते. आपल्या पूर्वजांचा देश व परिवार एकदां बघून यावा अशी मला फार इच्छा झाली. म्हणून मी कांचीला आलों. परंतु तिथं पोंचल्यावर कळलं कीं आतां मी म्लेच्छ झालोंय अन् पूर्वजांच्या परिवाराशीं माझा कांहीच संबंध नाहीं. याचं कारण हा माझा चेहराच. भारतीयांपेक्षां चिनी लोकांशीं तो अधिक जुळतोय. ”

रोहण—“ पण असं व्हावंच कां ? आम्ही सिंहली लोक हजार वर्षांपूर्वी उत्तर भारताहून इकडे आलों. आतां जी भाषा मी तुमच्यासमोर बोलतोंय, तीच भाषा आम्ही अजूनहि आमच्या घरीं बोलतों. ही भाषा आतांहि मगधांतल्या लोकांना कळते हें तुम्हांला मित्र जय दाखवून देतील. आमच्या चेहरेपट्टींतहि फरक नाहीं झालेला. ”

अर्जुन-- " रोहण ! आमच्या इकडे फार फरक आहे. यवद्वीप फार मोठा देश आहे. तिथल्या लोकांची चेहरेपट्टी माझ्यासारखीच आहे. सिंहलद्वीपांत तुमचे पूर्वज फार मोठ्या संख्येनिशीं आले असतील, अगर इतर कोणत्या तरी कारणामुळं त्यांच्या चेहरेपट्टींत बदल झाला नसेल. परंतु यवद्वीपांत तर ब्राम्हण, राजवंशी अगर कुणी-कुणी सार्थवाह भारतातून आले. त्यांची संख्या यवद्वीपवासींच्या समुद्रांत एका थेंबा-येवढी होती. त्यांत पुन्हां बरेच जण माझ्या पणजोबांप्रमाणं आपल्या बरोबर आपल्या जातीची स्त्री न घेतांच गेलेले होते. माझे पणजोबा भानुदत्त शर्मा मोठे साहसी तरुण होते; चांगले पंडित होते. एका जहाजावर बसून ते यवद्वीपाला आले. तिथल्या राजाला एक यज्ञ करायचा होता. कर्मकांडी ब्राह्मणांची जरूर होती. भानुदत्त शर्मा सर्वांत जास्त विद्वान होते. यवद्वीपांत त्या काळीं ब्राह्मणांची घरंहि फार नव्हतीं. यज्ञाच्या समाप्तीनंतर भानुदत्त शर्मांना मोठी दक्षिणा नाहीं मिळाली. परंतु राजा महेन्द्र वर्मांचे जांवई होण्याचं भाग्य त्यांना लाभलं. ',

जय--" यवद्वीपवासीयांचीं नांवं देखील आमच्याच सारखीं असतात ? "

अर्जुन--" ब्राम्हणांत व क्षत्रियांत बरींचशीं नांवं आमच्या सारखीं असतात. पण ते सगळेच भारतातून तिकडे गेलेले आहेत अशांतला प्रकार नाहीं. कांहींचे पूर्वज भारतातून गेले असतीलहि. तिथले राजेहि आपला संबंध भारतांतल्या कोणत्या-तरी राजवंशाशीं जोडतात. परंतु मी पल्लव राजवंशांतले लोक पाहिले; दोघांच्या चेहरेपट्टींत कांहींच मेळ नाहीं. मी आईच्या बाजूनं तीन पिढ्यांपासून राजकन्यांचं अपत्य आहें. भानुदत्तांच्या चेहऱ्याचा मागमूस जर माझ्यांत राहिला नसेल तर त्याचं कारण या राजकन्याच होत. "

जय--" याचा अर्थ असा कीं भारतीयांचं रक्त यवद्वीपवासीयांच्या रक्तांत मिस-ळलं आहे. यांत यवद्वीपवासीयांचं रक्त जरी अधिक असलं तरी राजवंश व ब्राह्म-णवंश ताकाचे दोन थेंब घालून साऱ्या दह्यावर आपला हक्क सांगताहेत. "

रोहण--" आमच्या सिंहलवासी ब्राह्मणांच्या बाबतींत तर हा प्रश्न उद्भवत नाहीं. ते पाटलिपुत्र व उज्जयिनीपर्यंत अभ्यासासाठीं जातात अन् तिथून चांगल्या चांगल्या कुळांतल्या ब्राह्मणकन्यांशीं विवाह करून त्यांना बरोबर घेऊन परत येतात. त्यांच्या पूर्वजांच्या कुळांतहि त्यांचा मान ठेवला जातो. "

जय--" अर्जुन ! तुम्ही पाहतां आहांतच. आम्हां दोघांच्या चेहरेपट्टींत कांहीं फरक आहे का ? "

अर्जुन--" तसा तर माणसामाणसांत फरक हा असतोच. परंतु वंशदृष्ट्या कांहींच फरक दिसत नाहीं. तुमचा रंग तेवढा अधिक उजळ आहे. "

जय—" जी गोष्ट आम्हां दोघां क्षत्रिय कुमारांची, तीच ब्राह्मणांचीहि. सिंहल-द्वीपांतल्या ब्राह्मणांचीहि भाषा तीच असते येवढयावर नाहीं भागत. मित्र जय! चेहरेपट्टींत जर तुमच्याइतका फरक झाला असता तर सिंहल ब्राह्मण मागध ब्राह्मणांच्या मुली आणतात कशा हें तुम्हांला दिसलं असतं."

अर्जुन—" यवद्वीपांत तर मी स्वतःच्या ब्राह्मण्याची फारच घमेंड मारीत होतों. आपला वेद तोंडपाठ केला, पुष्कळशा ब्राह्मण शास्त्रांचा अभ्यास केला. तारुमा नगरींत राजाधिराज पूर्णवर्माची त्रैलोक्यसुन्दरी कन्या अजूनहि माझी वाट बघत आहे. मला माझ्या पूर्वजांचं कुल बघायची फार इच्छा झाली. तिकडे जाऊन ब्राह्मणकन्येशीं लग्न करून तिलाहि घेऊन यावं अशी अभिलाषाहि मनांत धरून मी आलों होतों."

जय—" मग अर्जुन! तुमची ती पत्नी कुठं आहे?"

अर्जुन—" पत्नी! ब्राह्मण तर मला आपल्या घरांत येऊं द्यायला तयार नाहींत. मी घडाघड संस्कृत बोलतों, पायघोळ धोतर नेसतों, अन् मोठं जानवं घालतों, तरीहि माझा चेहरा बघतांक्षणीं ब्राह्मणांच्या कपाळाला आंठ्या चढतात हें मला कांची नगरींत प्रवेश करायच्या अगोदरच कळलं होतं म्हणून बरं झालं. एखाद-दुसऱ्या ठिकाणीं मी जर चुकून जरा पुढं गेलों कीं लगेच " म्लेच्छ! म्लेच्छ!" असा गिल्ला करून मला त्यांनीं धुडकावून लावलं. म्हणूनच कांची नगरींत गेल्यावर प्रत्येक पावलागणीक विचार करावा लागत होता. भानुदत्त शर्मांच्या गोत्रांतल्या व कुलांतल्या लोकांचा पत्ता लागला. त्यांच्या भाऊबंदांची मुलंबाळं मी पाहिलीं."

रोहण—" मग त्यांनीं तुमचं कसं काय स्वागत केलं?"

अर्जुन—" स्वागत! मी माझी ओळखच दिली नाहीं. मी त्यांना येवढंच सांगितलं कीं " तुमच्या कुलांतल्या भानुदत्त शर्मांनीं यवद्वीपांत जाऊन मोठी कीर्ति मिळविली आहे. त्यांचे वंशज तिथं आतांहि हयात आहेत."

जय—" अर्जुन! तुम्ही योग्य तेंच केलंत. तुम्ही भानुदत्तांचे वंशज आहांत असं सांगून कांहींच फायदा झाला नसता. भानुदत्तांचे वंशज यवद्वीपांत कितीहि ऐट मिरवोत, इथल्या लोकांच्या दृष्टीनें मात्र ते आतां भ्रष्टच झालेले आहेत."

अर्जुन—" जय! माझी सारी ऐट आतां साफ जिरली! आतां मी स्वतःला यवद्वीपाचा एक सामान्य नागरिकच समजत जाईन. जे भारतीय आमच्या द्वीपांत येऊन अशा प्रकारच्या भेदभावाचं बीज पेरतात त्यांच्याविषयीं मात्र मला भयंकर चीड वाटते. जावानिवासी लोकांत लहान मोठ्या जाती होऊं शकतात हें आमच्या लोकांना ठाऊक सुद्धां नव्हतं.

जय—" ब्राह्मणांचा मेवा चाखून पाहिलांत ना तुम्ही! किती गोड आहे बरं तो?"

रोहण—" जातीचे तुकडे तुकडे करायच्या बाबतींत त्याचा कसा हातखंडा आहे बघा ना ! "

अर्जुन—" आमच्या जातीचे तुकडे-तुकडे करून आम्ही आमचा अपमान करायला व आम्हांला लांछन लावायला आपणहून इतरांना वाव दिला हें आतां मला समजतंय. हें आमच्या ब्राह्मणांपुढं मला मांडतां येईल, पण त्यांना कांचीचा कडू-गोड अनुभव नाहीं ना ! त्यांत पुन्हां ते इतरांच्या दृष्टीनं मोठे होऊं इच्छितात. हा मोठेपणा असल्यामुळंच त्यांना मोठी दक्षिणा मिळत असते. "

जय— " एक गोष्ट सांगूं ? तुम्ही बुद्धधर्माचा फैलाव करा. त्यांत जात-पात नाहीं; अन् भारतांतली जात-पातीची प्रथा इतर देशांत फैलावायची इच्छाहि बौद्धांना नाहीं. "

अर्जुन—" पण भारतांतले बौद्ध बघावेत तर ते जात-पातीनं जखडलेले आहेतच. "

जय—" इथं जात-पात हजारों वर्षांपासून चालत आलेली असल्यामुळं ती इतकी मजबूत झालेली आहे कीं बौद्धांना तिचा उच्छेद करतां आला नाहीं. त्यांनीं नऊशें वर्षं लढा केल्यावर आतां आपलीं हत्यारं खालीं ठेवलीं याचं मला वाईट वाटतं. ते निराश झाले असावेत हेंच याचं कारण असावं. पण त्यांचा प्रयत्न अगदींच निष्फळ नाहीं ठरला. "

रोहण—" जय ! तुमचं म्हणणं बरोबर आहे. सिंहलद्वीपांत आम्हांला जात-पात अजिबात नष्ट करतां आली नसली तरीहि भारतांत तिचं जितकं क्रूर स्वरूप दिसतं तितकं आमच्याकडे नाहीं. याचं बरंचसं श्रेय बौद्धांना दिलं पाहिजे. "

जय—" तुम्ही जर आपलीं हत्यारं खालीं न ठेवतां असाच लढा चालू ठेवलांत तर तुम्हांला आणखी यश मिळेल. "

रोहण—" अन् यांत आम्हांला एका गोष्टीची चांगली अनुकूलताहि आहे: आमच्या समाजाला समजूं लागल्यापासूनच बुद्ध हेच आमचं मार्गदर्शन करीत आहेत; म्हणूनच आम्ही इतरांच्या भुलावणीला बळी नाहीं पडणार. "

अर्जुन—" मला वाटतं आतां ब्राह्मणांचा धर्म समाजाच्या अभ्युदयाला पोषक होऊं शकत नाहीं. भारताबाहेरच्या समाजांना तर तो हलाहल विषासमान ठरतो. "

जय—" अन् जर का त्याच्याच बरोबर भारतीय राजांचे दोन चार धागेहि तिकडे पोंचले तर मग तुमच्या उपदेशाची कांहीं धडगत राहणार नाहीं. "

आम्हांला जहाजांतून पांच दिवस प्रवास करावा लागला. स्वयंपाकाची तज-बीज जहाजावरच केलेली होती. कावेरी पट्टणचे कांहीं ब्राह्मणहि त्यांतून चालले होते. त्यांनीं स्वतः स्वयंपाक करण्यावर विशेष कटाक्ष ठेवलेला होता. आम्ही त्यांच्यावर

एकसारखी टीका करीत होतों. ब्राह्मण सांगत होते कीं नौकेमध्यें काष्ठ ( लाकूड ) हे मातीसमान असतें. नाहीं तरी ब्राह्मणांचेंच शास्त्र तें. त्यांतून त्यांच्या मतलबाची कोणतीहि गोष्ट निघाल्याखेरीज राहते थोडीच !

ताम्रलिप्तीहून ज्या दिवशीं आम्ही निघालों, त्या दिवसाची आठवण आम्हांला एकसारखी आल्याखेरीज राहात नव्हती. आजहि आम्हांला समुद्र शांत दिसत होता. परंतु त्या दिवशींहि तो फारच शांत होता. त्या दिवशीं तो अपघात नसता झाला तर कदाचित् मी अगोदरच सिंहलद्वीपांत पोंचलों असतों. मात्र शबर-पल्लींत घालविलेलें दीड वर्ष फुकट गेलें असें मला नाहीं वाटत. आज मी आणखी चांगला अनुभव गांठीं बांधून सिंहलद्वीपांत जात आहे. आमचें उतरण्याचें ठिकाण व त्याच्या पिछाडीला उभे असलेले हजारों ताडवृक्ष दिसूं लागले तेव्हां दुपारची वेळ झालेली होती. आमचे पाय सिंहलभूमीला लागले त्यावेळीं एक प्रहर दिवस राहिलेला होता.

उकाडा फार होत होता. ताड आणि कांहीं जंगली वृक्ष सोडल्यास या बेटावर जिकडे तिकडे वाळू व गोटेच दिसत होते. स्त्रियांचा पोशाख म्हणजे कमरेला गुंडाळलेलें एक अंतरवासक. उच्च कुळांतल्या स्त्रियांमध्येंहि उत्तरासंग ( चादर ) अंगावर घेण्याची प्रथा अगदींच कमी प्रमाणांत आढळते. परंतु आतां त्यांचीं अर्धनग्न शरीरें पाहून मला आश्चर्य वाटणें शक्य नव्हतें. वस्तीच्या पलीकडे एक चांगला विहार होता. तिथें दोनशें भिक्षु रहात होते. परंतु आम्हांला तिथे जाण्याजोगें कसलेंच आकर्षण नव्हतें. प्रवासी लोकांना राहण्यासाठीं इथें किती तरी पांथशाला व आहार-गृहेंहि होतीं. त्याच दिवशीं आम्हांला सिंहलद्वीपाची राजधानी अनुराधपुर येथें पोंचणें शक्य नसलें तरी दिवस मावळावयाला इतका अवकाश असतांना आम्हांला इथेंच थांबावयाला नको होतें. अर्जुनला यवद्वीपाला परत जावयाचें होतें. परंतु आम्हां दोघांची दोस्ती इतकी वाढलेली होती कीं त्यानेंहि अनुराधपुर पाहण्याची इच्छा दर्शविली.

रोहणची तर ही जन्मभूमीच होती. मला इथें भाषेची अडचण जाणवत नव्हती. मी पाटलिपुत्राच्या धर्तीचा पोशाक केलेला होता. लोक या पोशाकाला विशेष मान देतात असें इथें दिसून आलें. सिंहली लोक मगध लोकांसारखेच वाटत होते. कुठें कुठें द्रविड लोकहि दिसत होते; ते बहुतेक व्यापारी व शिल्पी होते. त्या दिवशीं रात्रीं आम्ही वाटेवरच्या पांथशालेंत मुक्काम केला. प्रवासी लोकांना कसलाहि त्रास पडूं नये म्हणून राजवंशीयांनीं व श्रेष्ठींनीं वाटेवर अशा अनेक पांथशाला बांधविलेल्या आहेत. दुसऱ्या दिवशीं आम्ही अनुराधपुरला पोंचलों.

अनुराधपुर हें सिंहलद्वीपांतलें सर्वांत मोठें व प्राचीन नगर. कांची नगरीशीं तुलना करतां याचें वैशिष्ट हें कीं इथें बुद्धमंदिरांची संख्या खूपच जास्त आहे. सडका-

चांगल्या व स्वच्छ आहेत. चौकांचौकांत धर्मोपदेशासाठीं धर्मशाला बांधलेल्या आहेत. दर अष्टमी, अमावास्या व पौर्णिमेला या धर्मशालांमध्यें भिक्षु प्रवचनें सांगतात. इथल्या स्त्रीपुरुषांमध्यें बौध्दधर्माविषयीं अगाध श्रद्धा आहे. परंतु इथला प्रभुवर्ग सामान्य जनतेच्या हिताकडे फार लक्ष देतो असा याचा अर्थ नव्हे. राजा व परिवाराचीं विलास व्यसनें भारतांतल्याप्रमाणेच इथेंहि चालतात. म्हणूनच पुष्कळसे लोक अत्यंत गरीब आहेत. रोहणगिरीमध्यें पद्मराग, पुष्पराग इत्यादि रत्नांच्या खाणी आहेत असें सांगतात. पण तीं रत्नें शेठजी व सामन्त यांच्याच कानांना शोभा आणताहेत. इथल्या राजांनीं शेतीच्या सोईसाठीं मोठमोठे जलाशय ( तलाव ) बांधविलेले आहेत म्हणून मी त्याची तारीफ जरूर करीन. यौधेय भूमींत कदाचित असे तलाव बांधावयाची सोय नसेल. कारण तिथें इथल्यासारखी उंचसखल पहाडी भूमि आहे कुठें? अनुराधपुरच्या आसपास अनेक जलाशय आहेत. त्यांना वापी म्हणतात. वापीचें पाणी कालव्यांच्या द्वारां नगरामध्येंहि खेळविलेलें आहे. इथें विहार व चैत्य इतके आहेत कीं इतर कोणत्याहि नगरीच्या आसपास तितके क्वचितच असतील. रत्नमाल्य व अभयगिरीचे चैत्य तर छोटे छोटे पहाडच आहेत असें वाटत होतें. ते सजविण्यासाठीं मुक्तहस्तानें दीनार खर्च करण्यांत आलेले आहेत. सकाळ संध्याकाळ या चैत्यांची पूजा करण्यासाठीं हजारों नर-नारी हातीं फुलांच्या माळा घेऊन जात असतात.

रोहणच्या घरीं आम्ही दोघांनीहि मुक्काम केला. इथें आम्हांला पांथशालेंत जाण्याची जरूर नव्हती. मी सिंहलद्वीपाला कां आलों हें विसरूनच गेलों होतों. कधीं कधीं आचार्य वसुबन्धूचें बोलणें ऐकतांना सिंहलद्वीपाला जाण्याचा विचार मनांत येत असे. परंतु त्या गोष्टीला आतां कितीतरी युगें लोटलीं. मीहि पूर्वीचा राहिलों नाहीं. मग मी सिंहलद्वीपाला आलों कशाला? एकामागून एक पावलें पडत गेलीं आणि मी इथें येऊन पोंचलों. बस्स येवढेंच मला या बाबतींत सांगतां येतें. कदाचित माझ्या हृदयाच्या खोल गाभ्यांत यायावराची ( भटकण्याची ) अतृप्त इच्छा दडून राहिली असावी आणि या इच्छेनेंच मला इथें पकडून आणलें असावें. मला वाटतें ही दुसरी गोष्टच मला बरोबर लागू पडते. जर इतर इच्छांच्या मी आधीन झालों नसतों तर कुलूपानें आपल्या कथा-नायकाच्या जेवढ्या यात्रांचें वर्णन केलें होतें तेवढ्या साऱ्या ठिकाणीं मी गेलों असतों. मी इतरत्र पाहिलेल्या नगरांप्रमाणेंच अनुराधपुर हेंहि नगर होतें. त्याच्या नजीकच्या विशाल वापी, मोठे-मोठे चैत्य व इतर कित्येक बाबतींत त्याचें वैशिष्ट्य असलें तरी बाकीच्या बाबतींत मात्र हें नगर म्हणजे पाटलिपुत्र अगर कांची नगरीचाच एक भाग होतें. इथेंहि सुगंधी सामानाच्या व्यापाऱ्यांच्या तशाच वीथि होत्या. जवाहिरे,

शिल्पी, वेश्या, यांच्या वीथीहि इथें होत्याच. या वीथींमधून भटकतांना मला कांहीं विशेष समाधान जाणवत नव्हतें. तरीपण मी या वीथींमधून जात नव्हतों असा मात्र याचा अर्थ नव्हे.

आठवड्यानंतर अर्जुन इथून रवाना झाला. आतां मी आणि रोहण या दोघांचीच जोडी राहिली. रोहण फारच साधाभोळा तरुण होता. त्याला कोणत्या एका गोष्टीची विशेष आवड आहे हें सांगणें कठीणच. परंतु मी कुठेंहि निघालों कीं तो माझ्या बरोबर जाण्यास सदा तयार असे. नाहीं म्हणावयाला आपल्या पूर्वजांच्या कथा पुन्हां पुन्हां सांगण्याची मात्र त्याला मनापासून आवड दिसली. त्याचे पूर्वज एका गलबतांत बसून भटकत भटकत ताम्रपर्णी ( सिंहलद्वीप ) च्या किनाऱ्याला लागले. त्या काळीं या द्वीपाचे रहिवासी व मालक होते श्यामवर्ण जातीचे लोक. या गलबत-वाल्यांच्या प्रमुखाच्या प्रेमपाशांत एक श्यामवर्णा सांपडली. तिनें फितुरी केली. पाहुण्यांनीं मूळ रहिवाशांचा पराजय केला आणि हें द्वीप सिंहली लोकांच्या हातीं गेलें. श्यामाच्या प्रणयाचा मी दुरुपयोग केला नाहीं या बद्दल मी माझ्या नशिबाची तारीफ केली. त्या स्वतंत्र श्यामवर्णीय लोकांचे वंशज आपण दाखवूं असें मला रोहण कितीदां तरी म्हणाला. हे लोक आजहि दक्षिण भागांतल्या जंगलांत राहतात. हत्ती-वाघांच्या प्रहारांपेक्षांहि जबरदस्त असे माणसांचे प्रहार झाले असतांना देखील त्यांतून हे लोक वांचले म्हणून मी आनंद प्रदर्शित केला. परंतु या बाबतींत सिंहली लोकांच्या दयेचा अगर श्यामवर्णीयांच्या बुद्धीचा प्रश्नच नव्हता. सिंहलद्वीपच येवढें मोठें आहे कीं अजून त्याचा बराचसा भाग लोकांना ठाऊकहि नाहीं.

## ( १४ )

# प्रेम कीं त्याग

महाविहार व अभयगिरीच्या पंडित भिक्षूंना भेटून मी कधीं कधीं विद्याप्रेमाचा आनंद घेत असे. त्या वेळीं मला एक आठवण झाली—आचार्यांनीं सांगितलें होतें कीं तथागतांनीं आपल्या भिक्षुसंघाची संघटना लिच्छविगणाचा कित्ता पुढें ठेवून केली आणि तो चालविण्यासाठीं जे नियम तयार केले, त्यांमध्यें सुद्धां गणव्यवस्थेचेंच

अनुकरण करण्यांत आलें आहे. लिच्छविगण आतां अस्तित्वांत नाहीं म्हणून आतां त्या गोष्टी समजून घेण्याचें कसलेंच साधन उरलें नाहीं. माझ्या मनांत विचार आला कीं भिक्षुसंघाचे नियम समजून घ्यावेत. मग असें कळलें कीं जो भिक्षु-वेष स्वीकारतो त्यालाच हे नियम सांगण्यांत येतात. मी एक दिवस या बाबतींत मनाची तयारी केली आणि महाविहाराचे महानायक स्थविर सुमन यांच्याकडे जाऊन माझी इच्छा प्रकट केली. स्थविरांनीं कुल-गोत्र वगैरेची विचारपूस केल्यानंतर सांगितलें—" तूं यौधेयगणाचा कुलपुत्र आहेस हें ऐकून मला फार आनंद झाला. परंतु भिक्षु होण्यासाठीं आई-बापांची आज्ञा मिळाली पाहिजे. "

" भन्ते ! आई तर मी एक वर्षाचाहि झालों नव्हतों तेव्हांच निधन पावली. परंतु वडिलांची आज्ञा मी घेतलेली आहे. "

" पण आयुष्मान् ! भिक्षूची दीक्षा देणं एका माणसाच्या हातीं नसतं. भिक्षूची दीक्षा देण्याचा अधिकार संघाचा आहे. तुझ्याकडून ज्या गोष्टी कळल्या त्यांवरून तुला भिक्षूची दीक्षा देण्याच्या बाबतींत संघाची कांहीं हरकत येणार नाहीं असं वाटतं. "

" पण भन्ते ! आपण तर सिंहलद्वीपांतल्या पन्नास हजार भिक्षूंचे महानायक आहांत. "

" महानायक आहें, पण मी संघाचा महाराजा नाहीं. संघ जेवढं करायची मला आज्ञा देतो तेवढंच करायचा मला अधिकार आहे. भिक्षु होणं याचा अर्थ संघाचा सदस्य होणं असा आहे. अन् अगोदरच्या भिक्षूंना जे हक्क व जीं कर्तव्यं असतात तीच प्रत्येक भिक्षूला सदस्य झाल्याबरोबर असतात. आयुष्मान् ! तूं बौद्धधर्माहून भिन्न अशा एकाद्या धर्माचा अनुयायी तर नाहींस ना ? "

" नाहीं भन्ते ! माझं कुल पहिल्यापासून भगवान् बुद्धाचीच भक्ती करीत आलं आहे. "

" तर आयुष्मान् ! मी संघाचा सन्निपात ( बैठक ) भरवीन. संघ तुझी परीक्षा घेऊन तुला भिक्षूची दीक्षा देईल. "

कांहीं दिवसांनीं संघाचा सन्निपात भरला. माझा मित्र रोहण यानें माझ्या उपयोगाचे आठहि परिष्कार ( सामुग्री ) दान दिले. तीन चीवर ( वस्त्र ), लोखंडाचें भिक्षापात्र, वस्तरा, सुई, परिस्रावण (गाळणें) आणि कमरबन्द घेऊन मी महाविहारांत गेलों. भिक्षुसंघ समोर बसलेला होता. महानायक सुमन यांनीं अध्यक्षस्थान ग्रहण केलेलं होतें. मला संघासमोर हजर करण्यांत आलें. संघाच्या वतीनें एका भिक्षूनें मला विचारलें—" आयुष्मान् ! तुम्हांला कोड वगैरे सारखा आनुवंशिक रोग तर नाहीं ना ? "

मी उत्तर दिलें--" नाहीं भन्ते ! "

" तुम्ही पुरुष आहांत ? "

" होय भन्ते ! "

" तुम्ही दास ( गुलाम ) तर नाहीं ना ? "

" नाहीं भन्ते ! "

" तुम्ही कर्जबाजारी तर नाहीं ना ? "

" नाहीं भन्ते ! "

" तुम्ही राज-सैनिक तर नाहीं ना ? "

" नाहीं भन्ते ! "

" तुम्हांला आईनं अगर वडिलांनीं भिक्षु व्हायला परवानगी दिली आहे ? "

" होय भन्ते ! "

" तुमच्या जवळ पात्र-चीवरांचा पूर्ण संच आहे ? "

" होय भन्ते ! "

यानंतर याच अनुशासक भिक्षूनें मला संघाच्या पुढच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यासाठीं कितीतरी गोष्टी सांगितल्या. मग त्यानें मला संघासमोर वन्दना करावयाला सांगितलें—

" आयुष्मान् जय ! ऐकतां आहांत ना ? ही तुमची खरं सांगायची वेळ आहे. जें ठाऊक असेल तें संघामध्यें विचारल्यावर " होय " असेल तर " होय " सांगा, " नाहीं " असेल तर " नाहीं " सांगा. "

मग संघाला उद्देशून तो म्हणाला--" भन्ते संघ ! माझं म्हणणं ऐका. हा आयुष्मान् जय भिक्षु होऊं इच्छितो. "

मी संघाला वंदना करून म्हणालों--" भन्ते ! संघाजवळ मी उपसम्पदा ( भिक्षुत्व ) मागतोंय. पूज्य संघानं माझ्यावर दया करून माझा उद्धार करावा. "

मी तीन वेळां या शब्दांचा उच्चार केला. यानंतर आणखीहि प्रश्नोत्तरें झालीं. संघातर्फे असें सांगण्यांत आलें कीं मला चरितार्थासाठीं फक्त चारच गोष्टी करतां येतील-- " ( १ ) भिक्षा मागून जेवावें. याच्या जोडीला कुणी भोजनाचें आमन्त्रण दिल्यास तें स्वीकारतां येतें; फाटक्या तुटक्या रद्दी चिंध्या एकत्र शिवून अगर दान म्हणून मिळालेल्या कपड्यांचें चीवर तयार करावें; वस्त्रें जवस, अंबाडी, यांच्या सालीपासून तयार करतां येतात; ( २ ) कापूस, लोंकर व रेशमाचीं वस्त्रेंहि वापरतां येतात.; ( ३ ) राहण्यासाठीं झाडाची सांवली; जागा मिळाल्यास संघाच्या विहारांत राहतां येतें; ( ४ ) आजारी पडलांत तर गोमूत्र हेंच तुमचें औषध; या शिवाय तप. लोणी, तेल, मध व साखर मिळाल्यास घेतां येते. "

भिक्षुसंघ ही एक वेगळ्यांच तऱ्हेची संस्था आहे व तिच्यांतल्या बऱ्याचशा गोष्टी आमच्या यौधेयगणांत अजूनहि रूढ आहेत हें मला त्या वेळीं दिसून आलें. मी भिक्षूंच्या नियमांचा (विनयांचा) अभ्यास कसोशीनें करूं लागलों. कुणाहि एका माणसाच्या हातीं सारी सत्ता जाऊं नये अशी या नियमांत विशेष खबरदारी घेतलेली मला आढळून आली. उपरोक्त आठ परिष्कार सोडून कुणाहि भिक्षूला स्वतःची पौद्गलिक (व्यक्तिगत) संपत्ति ठेवतां येत नाहीं. संघाच्या ताब्यांत मोठमोठीं घरें, शेतें व केवढी तरी जंगम संपत्ति होती, परंतु ती सध्यांच्या व भावी काळांतल्या साऱ्या संघाची समाइक संपत्ति समजत असत. या नियमाची अंमलबजावणी कडकपणें होत नाहीं हें पाहून मला वाईट वाटलें. कितीतरी भिक्षु–त्यांतल्या त्यांत जास्त प्रमाणांत अभयगिरि विहारांतलेच स्वतःची वेगळी संपत्ति राखून ठेवतात. भदन्त सुमन अशा प्रकारचे भिक्षू नव्हते. मी या बाबतींत जेव्हां त्यांना विचारलें तेव्हां ते म्हणाले—" आयुष्मान् जय ! फार वाईट आहे ही गोष्ट. भगवानांनीं सांगितलंय कीं पात्र चोपडण्याइतकी जरी एखादी वस्तु मिळाली तरी भिक्षूंनीं ती आपसांत वांटून घेऊन खावी. पण करायचं काय ? राजा साऱ्यांचं धन ओरबाडून आपली तिजोरी भरूं पाहतोय अन् लोकांवर भूमिकर (शेतसारा) लवणकर (मिठावरचा कर) पण्यकर (विक्रीकर) असे कितीतरी कर लादतोय. श्रेष्ठी-सार्थ-वाहहि अनेक प्रकारांनीं आपलं धन वाढवूं पाहताहेत. हेच लोक आम्हांला दानं देणारे. अन् कितीतरी वेळां आगत-अनागत (सध्यांच्या व भावी काळांतल्या) भिक्षु-संघाला न देतां ते आपला मित्र असलेल्या कुणातरी एका भिक्षूला देतात. संघाचा इलाज नाहीं चालत यावर. "

" अर्थात् भन्ते ! संघाचे नियम आपल्या सभासदांना मान्य करायला भाग पाडायची राजकीय सत्ता संघाच्या हातीं नाहीं. ".

भिक्षू झाल्यावर मी असा नियम केला कीं केवळ भिक्षा मागूनच खावयाचें. पहिल्या दिवशीं मी काषाय चीवर नीट रीतीनें नेसून उजव्या हातीं पात्र घेऊन पहिल्या घराकडे जाऊं लागलों तेव्हां मला फार संकोच वाटत होता. मी आजपर्यंत कधींहि भीक नव्हती मागितली. परंतु माझ्या समोरून भदन्त सुमनहि चालले होतें. म्हणून मीहि दोरीनें बांधल्यासारखा त्यांच्या मागोमाग चालू लागलों. पहिल्या घरीं जेव्हां भिक्षा घेण्याची माझी पाळी आली तेव्हां गृहपत्नीनें भात, मासे व भाजी माझ्या भिक्षापात्रांत घालून मान लववून वन्दना केली. हाच प्रकार इतर ठिकाणींहि झाला. आम्हांला पुरेसें भोजन मिळाल्यावर आम्ही विहारांत (मठांत) परत आलों. मी व इतर सहकारी भिक्षूंनीं आपलीं भिक्षापात्रें भदन्त सुमनांसमोर ठेवलीं. भदन्तांनीं प्रथम आजारी व वृद्ध भिक्षूंकडे भोजन पाठविलें, मग आम्ही सर्वांनीं एकमेकांची

भिक्षा वांटून घेऊन भोजन केलें. भोजनाची ही वांटणी मला एकदम पसंत पडली.

मी विहारांत राहिल्याला एक महिनाहि झाला नाहीं तोंच पाटलिपुत्राच्या कुणा सार्थवाहानें अनुराधपुरांत येऊन अशी बातमी दिली कीं महादेवी निधन पावली. अज्जुकाच्या मृत्यूची वार्ता ऐकून माझें हृदय व्याकूळ झालें. मी माझ्या मनाची समजूत घालण्याचा परोपरीनें प्रयत्न केला परंतु माझे अश्रु थांबेनात आणि भिक्षूंसमोर जाण्याची मला मुष्कील होऊं लागली. मी महानायक सुमन यांची आज्ञा घेऊन चैत्य पर्वतावर ( मिहित्तले ) निघून गेलों. अनुराधपुराहून एक योजनापेक्षां अधिक अंतरावर आहे हा पर्वत. याच्यावरच अशोकाचा भिक्षू झालेला मुलगा महेन्द्र राहात होता. आज इथें शेंकडों भिक्षू राहात असल्यामुळें ह्या पर्वतावर एकान्ताला तितकासा वाव नसला तरीहि एकान्तप्रेमी भिक्षूंना महाविहार व अभयगिरीपेक्षां कितीतरी चांगलें आहे हें स्थान. मी सकाळीं भिक्षेसाठीं जात असें आणि नंतर सारा वेळ माझ्या लेण्यांत (गुहेंत) घालवीत असें. मी योग-ध्यान करण्यांत गुंतलों आहे असें इतर भिक्षू कदाचित समजत असतील; परंतु मी माझीं आंसवें लपविण्यासाठींच हा कार्यक्रम करीत असें.

आईची तर मला आठवणच नाहीं. वडिलांच्या निधनामुळें मला दुःख झालें होतें; परंतु अज्जुका माझें सर्वस्व होती. मी तिच्या पोटीं जन्मलों नसलों तरी आतां अज्जुकाचें आपल्या सख्ख्या भावावर जेवढें प्रेम होतें तेवढें स्वतःच्या मुलांवरहि नव्हतें. आतां अज्जुकाची प्रसन्न मुद्रा मला पुन्हां पहावयास मिळणार नाहीं हा विचार मनांत आला कीं काळजाचा थरकांप होई आणि डोळ्यांतून अश्रूंचा पाऊस सुरू होई. एक महिनाभर माझी हीच अवस्था होती. मग शोकाचा जोर जरा कमी होऊं लागला आणि मी पुन्हां अनुराधपुराला परत आलों.

माझ्या डोक्याचें मुंडन केलेलें होतें, अंगावर जुन्या कापडाचें विटकें चीवर होतें. आणि पाय अनवाणी होते. माणसाचें शरीर कुरूप करण्यासाठीं जी जी सजावट करणें शक्य होतें, ती ती सारी माझ्या बाबतींत केलेली होती. पण माझ्या मूळच्या रूपावर माझा तरी काय इलाज चालणार ? इतके इलाज करूनहि त्यांच्यामुळें माझ्या तारुण्यांत व सौन्दर्यांत उणेपणा येण्याऐवजीं तें अधिकच खुलून दिसतें असें आढळून येत होतें. मी ज्या वीथीमध्यें भिक्षा मागावयास जात असें, तीमध्यें इतरहि कुणी भिक्षु जात. परंतु आम्ही परत आल्यावर आपापलीं भिक्षापात्रें पाहावीत तों माझ्या भिक्षापात्रांत सगळ्यांत जास्त व अनेक प्रकारचे खाद्यपदार्थ असत. त्यांत तूप, मसाला घालून शिजवलेलें डुकराचें मांस, मोदक, अपूप ( मालपुवा ) असे पदार्थ असत. आणि इतरां-च्या भिक्षापात्रांत नुसताच भात व भाजी असे. नव्या ओळखीच्या तरी लोकांचें लक्ष माझ्याकडे कमी वेधलें जाईल असा विचार करून मी वीथी बदलत राहिलों. परंतु दुसऱ्या दिवशीं नव्या वीथीमध्येंहि तोच प्रकार होऊं लागला.

नाहींतरी मी असा बीथी कुठवर बदलत राहिलों असतों ?

*　　　*　　　*　　　*

दुसरें वर्ष संपतांसंपतांच मला सिंहलद्वीप सोडावें लागलें. परंतु याचें कारण समुद्रगुप्ताचा मृत्यू व रामगुप्ताचा खून करून चन्द्रगुप्तानें गादी बळकावल्याची बातमी हेंच तेवढें नव्हतें. तथापि चन्द्रगुप्त गादीवर आल्यामुळें मला फार दूरवरचा विचार करणें भाग पडलें हें मात्र निःसंशय. चन्द्रगुप्ताला मी बाळपणापासून तरुणवयापर्यंत फार जवळून पाहिलेला होता. तो स्वतःला चाणक्य व चन्द्रगुप्त मौर्याचा अनुयायी म्हणवून घेत असे. या त्याच्या उद्गारांची मला आठवण झाली. रामगुप्ताला मारून त्याची पत्नी ध्रुवदेवी हिच्याशीं चन्द्रगुप्तानें विवाह केला आणि या साऱ्या घटनेच्या मागें जें नाटक घडलें त्याच्या फारच अतिरंजित बातम्या अनुराधपुरांत ऐकावयास मिळालेल्या होत्या. ध्रुवदेवीला तर मी पाहिलेलीच नव्हती. कारण मी पाटलिपुत्र सोडण्याच्या वेळेपर्यंत युवराज भट्टारक रामगुप्तानें त्या नांवाच्या कुणा राजकन्येशीं विवाह केलेलाच नव्हता. कुणी सांगत कीं ध्रुवस्वामिनी ही नागकन्या आहे; कुणी तिला गंधर्वी अगर अप्सरा समजून तिचें वर्णन करीत; तिच्या रूपाला रंभा, तिलोत्तमा व उर्वशीची उपमा दिली जाई. मला त्या नाटकाचें वर्णन इथें करण्याची इच्छा नाहीं. मी चन्द्रगुप्ताच्या तोंडून समक्ष ऐकून व स्वतः ध्रुवदेवीला पाहून मगच या बाबतींत कांहींतरी लिहीन. मनांत अगोदरच करून ठेवलेला निश्चय चन्द्रगुप्ताच्या राज्यरोहणाच्या बातमीमुळें पक्का झाला येवढें मात्र खरें.

भिक्षुवेषामुळें माझ्या तारुण्यांत व सौन्दर्यात उणेपणा आणण्याच्या कामीं थोडीशी सुद्धां मदत झाली नाहीं हें मी अगोदरच सांगितलेलें आहे. मी ज्या गल्ल्यांमध्यें भिक्षा मागावयास जात असें तिथें भिक्षा घालणाऱ्या बहुतेक तरुणीच असत. त्यांतल्या त्यांत ज्या तरुणींना आपल्या सौन्दर्याचा व तारुण्याचा जास्त अभिमान वाटे अशाच तरुणी मुद्दाम मला भिक्षा घालावयास येत असत. मी खालीं मान घालून फक्त चार हात अंतरावरचेंच दिसेल अशी नजर ठेवून चालत असें; परंतु माझ्यावर रोंखलेल्या इतरांच्या नजरांना मला कसा अटकाव करतां येणार ? कधीं कधीं असेंहि होई कीं मला समोर पाहावें लागे आणि तरुणींची मदाविह्वल नजर आतुरतेनें माझ्यावर खिळलेली असे. मी पंडित आहे हें इतर भिक्षूंना ठाऊक होतें. अनुराधपुरांत राजान्तःपुर धरून चौकां-चौकांत ठराविक दिवशीं धर्मोपदेश चालतो. मलाहि संघातर्फे हें काम करण्याची आज्ञा झाली. मला अन्तःपुरांत जाण्यास सांगण्यांत आलें होतें, परंतु मी रदबदली करून एका चौकांतल्या धर्मशाळेंतच उपदेश करण्याची अनुमती मिळवून घेतली. या चौकाचें नांव होतें श्रेष्ठिचत्वर ( शेटजींचा चबुतरा ). हा चत्वर ( चबुतरा ) केव्हांपासूनचा का बांधलेला असेना, आज मात्र अनुराधपुरची सर्वांत सुन्दर धर्मशाला ( उपदेशगृह )

हीच आहे. हिच्या खांबांवर मोठ्या सुन्दर मूर्ति कोरलेल्या आहेत. छत आहे सोन्याचें पाणी दिलेल्या तांब्याच्या पत्र्याचें. धर्मासन आहे सुवर्णजडित चन्दनी लांकडाचें. याच्यावर उपदेशाचे वेळीं महार्घ आसन घालतात व वर मोत्याची झालर असलेला रेशमी चांदवा टांगतात. हा धर्मोपदेश रात्रीच्या पहिल्या प्रहरानंतर सुरू होत असे आणि कधीं कधीं तो पहाटेपर्यंतहि चाले. मलाहि धर्मासनावर बसून एकेक प्रहरपर्यंत उपदेश द्यावा लागत असे. बऱ्याचशा गोष्टी तर मी पोपटपंचीप्रमाणें घोकलेल्याच सांगत असें. परंतु कधीं कधीं त्यांत माझ्या भावनाहि व्यक्त होत असाव्यात. प्रौढ शेटाणी व तरुण श्रेष्ठिकुमारी माझा उपदेश फार लक्षपूर्वक ऐकतात असें मला दिसूं लागलें. इतर धर्मोपदेशकांच्या वेळीं एका घटकेच्या आंतच अर्धे श्रोते पेंगूं लागत असत. परंतु माझ्या उपदेशाच्या वेळीं मात्र त्यांच्यांतली एखादीच व्यक्ती कदाचित पेंगत असेल. कितीतरी दिवसपर्यंत मी याबद्दल खुशींत असे. तिथें स्त्रिया उपोसथ व्रत घेऊन येत असत. म्हणून केंसांत फुलें अगर जास्त शृंगार साज करून त्यांना येतां येत नसे. परंतु जातीच्या सुंदरींना यांत कसलीच गैरसोय नसते. शेटाणींमध्यें श्यामांपेक्षां गौरींची संख्या अधिक होती, आणि कांहीं जणी तर यवनींसारख्या महाश्वेता दिसत होत्या. उपोसथ व्रत घेतलेलें असल्यामुळें त्या आपल्या ऊर्ध्व शरीरा-भोंवतीं उत्तरासंग ( चादर ) लपेटून येत असल्या तरी तरुणी या गोष्टीची विशेष पर्वा करीत नव्हत्या. उपदेशकाला आपल्या श्रोत्यांवर एकसारखी नजर टाकतां येत नाहीं. कधीं कधीं त्याची नजर एका जागीं स्थिर राहूं पाहात असते. कांहीं उपदे-शकांच्या बाबतींत तर ही दृष्टि स्थिर करण्याची जागा एका विशिष्ट दिशेला व विशिष्ट अंतरावर निश्चित झालेली असते. माझ्या बाबतींत ही जागा म्हणजे उजव्या कोपऱ्यांतल्या एका खांबाचा तळखडा होता. माझी नजर तेथवर जाऊन स्थिर होत असे. प्रथम माझी अशी समजूत होती कीं या जागीं रोजच्यारोज नवेनवे चेहरे येत आहेत. परंतु या निश्चित स्थळीं तेच ते ठराविक चेहेरे दरवेळीं दृष्टीस पडतात हें थोड्याच दिवसांत मला कळून आलें. उपदेश चालू असेपर्यंत वक्त्याच्या मुखाकडे एकाग्रतेनें पाहात राहणें हा प्रत्येक श्रोत्याचा हक्कच असतो. म्हणून त्या नजरांमध्यें काय भावना भरलेल्या आहेत हें समजून घेण्याची मला मुष्किल झालेली होती. या ठराविक व्यक्तींमध्यें एकत्र तरुणीहि होती. तिच्या गोऱ्यापान चेहऱ्यावरील काळ्याभोर केसांचा भार खरोखरी चन्द्राला झांकणाऱ्या काळ्या ढगांसारखा वाटत होता. तिच्या दोन्ही भुंवया एकत्र येऊन त्यांना एका विशाल धनुष्याचें रूप मिळालेलें होतें. तिच्या गोल चेहऱ्यावरील टपोरे डोळे; पातळ ओंठ व स्फटिकासारखे टवटवीत गाल तिच्या सौंदर्यांत आणखीच भर घालीत होते. तरुणीचें वय वीस वर्षांच्या आसपास असेल. मी जोंपर्यंत धर्मासनावर बसलेलों आहे तों पर्यंत तिची दृष्टि दुसरीकडे

कुठेंहि जात नाहीं हें मला सात आठ उपदेशांनंतर कळून चुकलें. तिला मांईयां उपदेशाचें मर्म चांगलें समजतें असें मला वाटे. तिचें सारें लक्ष माझ्या काषाय प्रतिबिंबित मुखावर केन्द्रित झालेलें असावयाचें. प्रत्येक अष्टमी, अमावास्या व पौर्णिमेला उपोसथ व्रत पाळणें व विहारांत पूजा व त्रिशरण ( बुद्ध, धर्म व संघ यांना शरण ) ग्रहण करण्यासाठीं जाणें हें प्रत्येक बौद्ध गृहस्थाचें कर्तव्यच असतें. ती तरुणी होती अनुराधपुरच्या एका बड्या सार्थवाहाची पत्नी. ती नेमानें त्या दिवशीं विहारांत येत असे व बरोबर खाण्यापिण्याच्या जिनसाहि आणवीत असे. मजविषयीं ती फार भक्ति प्रदर्शित करी; परंतु उपासिका ( बौद्ध स्त्री ) धर्मकथिक जय याजवर धर्मश्रद्धेच्या भावनेनेंच अत्यंत खूष झालेली आहे असेंच मी अगर इतर भिक्षु समजत होते. चांगल्या धर्मकथिकाचा सत्कार-सन्मान होणें स्वाभाविकच आहे.

कांहीं महिन्यांनंतर एके दिवशी सार्थवाह-पत्नीच्या दासीनें येऊन सांगितलें कीं उपासिका फारच आजारी आहे आणि तिनें तुम्हाला परित्राण ( बुद्धाच्या सूत्रांचा पाठ ) देशना करण्यासाठीं आणखी चार भिक्षु बरोबर घेऊन येण्याची विनंति केली आहे. विहार-नायकाची परवानगी घेऊन आम्ही उपासिकेच्या घरीं गेलों. तिथें मंगलकलश ठेवण्यांत आला. उपासिकेच्या बैठकीच्या जागीं सुताचे ताणे बांधण्यांत आले आणि मग आम्ही पांचहि भिक्षु बुद्ध सूत्रांचा पाठ म्हणूं लागलों. तीन-चार दिवसांनीं उपासिकेनें आपली प्रकृति जरा बरी झाली असल्याचें सांगितलें. परित्राण देशना महिनाभर चालू राहिली. उपासिकेच्या स्वयंपाकघरांत मासे, मांस व तऱ्हे-तऱ्हेच्या तोंडी लावण्यासह चविष्ट भोजन तयार होत असे. उपासिका आपल्या हातानें आम्हांला जेवावयास वाढीत असे. रात्र पडल्यावर आमची देशना समाप्त होई आणि आम्ही विहारांत परत येत असूं. दुसरे दिवशी सकाळीं पुन्हां जात असूं. अशा तऱ्हेनें देशना एक महिनाभर चालू राहिली. उपासिका चांगलीच माहितगार असून तिनें बौद्ध-सूत्रांचा उत्तम प्रकारे अभ्यास केलेला आहे असें तिच्या प्रश्नांवरून समजून येई. तिचे प्रश्न शील–सदाचारासंबंधीं नसत. कधीं कधीं ती स्मृति-प्रस्थाना-सारख्या योगक्रियांविषयीं प्रश्न विचारी. आणि कधीं कधीं प्रतीत्य समुत्पाद ( एक नष्ट झाल्यानंतर दुसऱ्याची उत्पत्ति ), अनात्मवाद ( ' आत्मा नाहीं ' असा सिद्धान्त ), निर्वाण, यांविषयीं तिचे प्रश्न असत. माझ्या मूळ मतांमध्यें परिवर्तन झालेलें नव्हतें. परंतु मला सर्वसाधारणपणें एक भिक्षु या नात्यानेंच उत्तरें द्यावीं लागत असत. निर्वाणासंबंधांत तिनें सांगितलें––" भन्ते ! आत्मा या नांवाची कसलीहि नित्य वस्तु अस्तित्वांत नाहीं याबद्दल मला जरा देखील संदेह नाहीं. आत्मा हा आत्मा नसून चेतनेचा एक प्रवाह आहे. हा प्रवाह म्हणजे सदा नष्ट होणाऱ्या व नवीन निर्माण

होणाऱ्या चेतना-बिन्दूंचा ओघ आहे. ओघामध्यें एकत्वाची जाणीव होऊं शकते. परंतु हा चेतनाप्रवाह अडविला गेला कीं त्या अवस्थेलाच निर्वाण असं म्हणतात. भन्ते ! माझं सांगणं बरोबर आहे ना ? ”

“ होय उपासिका. असंच असतं हें. ”

“ मग निर्वाणानंतर कांहीं करायचं-सवरायचं नसतं, कसलाच हानि-लाभ नसतो. तरी पण निर्वाणाच्या अगोदरचा हा जो आपला जीवन-प्रवाह, त्याची काळजी तर आपण केलीच पाहिजे. ”

“ उपासिका ! असंच असतं हें. ”

“ भन्ते ! हें जें दुःख-दुःख असं सारखं म्हणत असतात, त्यावरून असं का समजायचं कीं जगांत केवळ दुःखच आहे अन् दुसरं कांहींच नाहीं ? ”

“ उपासिका ! भगवानांनीं एकदां स्वतःच सांगितलं होतं कीं जर जीवन हें केवळ दुःखच असतं तर मनुष्यानं एक क्षणभरहि जगायची इच्छा धरली नसती. ”

उपासिका हंसत मुखानें माझ्यावर डोळ्यांवर नजर रोंखून म्हणाली--“ भन्ते ! इतर भिक्षु तर अशा प्रकारचे प्रश्न विचारायला अनुमतीहि देत नाहींत. आपण जम्बुद्वीपाचे ( भारताचे ) भदन्त आहांत; आपण माझ्या प्रश्नांना अशीं उत्तरं देतां कीं त्यांच्या योगानं साऱ्या शंका दूर होतात. ”

“ उपासिका ! प्रश्नांना प्रतिबंध करणं बरं नसतं. बुद्धाचा धर्म हा मूढ श्रद्धेचा पंथ नाहीं. ”

“ भन्ते ! मी बाळपणापासूनच भगवानांच्या सूत्रांचा अभ्यास करीत आलेयें आहे. मलाहि त्यांवरून हीच गोष्ट समजून येते. जीवन केवळ दुःखमय नाहीं, हें आपल्याला स्वतःच्या अनुभवावरून कळतं अन् बुद्धांलाहि हीच गोष्ट पटते. आम्ही जीवनाकडे याच दृष्टीनं पाहिलं पाहिजे. काय, मी सांगतें तें बरोबर आहे ना ? ”

“ उपासिका ! बरोबर आहे हें. ”

उपासिकेची भक्ति आणखीच वाढत गेली. सार्थवाह आपल्या सामुद्रिक सार्थांच्या व्यवहारांत निपुण होता. दीनारांचे ढीग जमविण्याची कला त्याला अवगत होती. परंतु इतर बाबतींत मात्र तो अगदीं कोराकरकरीत होता. उपासिकेच्या निमित्तानें तोहि माझ्याकडे अधून-मधून येऊं लागला. आमच्या बोलण्यांतलें त्याला कितीसें समजत असेल हें मला कांहीं सांगतां येणार नाहीं; परंतु भदन्त जय मोठे ज्ञानी आहेत, असें मात्र त्याला वाटूं लागलें. आणि योग-समाधीच्या चर्चेमुळें कदाचित त्याला असेंहि वाटत असावें कीं जय हे मोठे योगशास्त्र पारंगत आहेत. सार्थवाह-पत्नी उपासिका तिच्या ज्ञानामुळें व धर्मभक्तीमुळें अनेक श्रेष्ठि-सार्थवाहांच्या बायकामंडळींत मोठ्या आदराचा विषय झालेली होती. अन्तःपुरांतल्या कांहीं राण्याहि

तिच्या मैत्रिणी झालेल्या होत्या. या सगळ्या गोष्टींचा परिणाम असा झाला कीं एक वर्ष संपावयाच्या आंतच माझी गणना अनुराधपुरांतल्या सर्वांत अधिक पूज्य भिक्षूं-मध्यें होऊं लागली. चीवर आणि इतर भेटीच्या वस्तूंचा माझ्याजवळ ढीग जमत असे. मी त्या वस्तू संघाच्या भांडारांत रवाना करीत असें. सार्थवाहपत्नी एकदां फार सुन्दर चीनांशुकाचें चीवर येऊन मजकडे आली. तें शेंदरी रंगाचें अत्यंत सुंदर चीवर होतें. उपासिका हात जोडून म्हणाली--

"भन्ते ! हें बहुमूल्य चीनांशुक आतां इतक्यांतच उपासकांकडे चीनहून आलंय. मी हें माझ्या हातांनीं कापून शिवलंय. भन्ते ! मजवर दया करून या चीवराचा स्वीकार करावा."

मी म्हणालों--"उपासिका ! मला पांसुकूलिक व्हायचंय. म्हणून रस्त्यांतल्या फाटक्या चिंध्या जमा करून मी स्वतःसाठीं चीवर तयार करीत असतों."

उपासिकेनें पुन्हां पुन्हां आग्रह केला. मी अगदींच ऐकत नाहीं असें पाहिल्यावर ती म्हणाली--" निदान एक वेळ तरी हें चीवर धारण करा. मी एक क्षणभर डोळे भरून पाहीन अन् कृतकृत्य होईन." मला उपासिकेचें मन मोडवेना. तिथल्या तिथें खोलींत जाऊन चीवर धारण करून बाहेर आलों. उपासिका विस्फारित नयनांनीं माझ्याकडे बघत राहिली. तिच्या साऱ्या मुखमंडलावर प्रसन्नतेचीं किरणें झळकत होतीं. तिनें हात जोडून सांगितलें--" भन्ते ! बस्स ! मला येवढंच साधायचं होतं. चीवर धारण केल्यानंतर भगवान कसे दिसत असतील हें बघायचं होतं मला. आज माझ्या डोळ्यांचं पारणं फिटलं."

हा प्रकार मला स्वतःला जरी पसंत पडला नाहीं तरी भक्तांच्या भक्तीचा विचार करतां ही गोष्ट अगदीं स्वाभाविक होय हें मी जाणून होतों. नवीं चीवरें परिधान करावयाला मी कधींच तयार झालों नाहीं खरा, पण तिच्या घरीं मी भोजन करावें या गोष्टीला तिनं मला धीरेधीरे राजी करून घेतलें. विहाराला ती येवढ्या मोठमोठ्या देणग्या देत होती कीं सारे भिक्षु तिची विनंति मान्य करायला एका पायावर तयार असत. मी जेव्हां पहिल्या प्रथम तिची विनंति अमान्य केली तेव्हां माझे सहकारी मला सांगूं लागले--" श्रद्धाप्रसन्न उपासिकेचं मन असं मोडूं नये. अशानं संघाची आवक घटते."

संघाच्या उत्पन्नांत बाध आणणें म्हणजे भिक्षु या नात्यानें गुन्हा ठरतो हें मला ठाऊक होतें. आणि या बाबतींत मी स्वतः भोजनाचें आमंत्रण न स्वीकारल्यामुळें संघाच्या उत्पन्नाचें नुकसान करीत होतों कीं नाहीं त्यासंबंधीं वाद घालावयाची माझी तयारी नव्हती. म्हणून अखेरीस मी उपासिकेचं निमंत्रण स्वीकारलें. मी रोज दुपारच्या भोजनासाठीं तिच्या घरीं जाऊं लागलों.

आरंभीं आरंभीं उपासिकेच्या भक्तींत दुसरी कसलीहि भावना नव्हती असें मला वाटतें. तशी ती जरा विशेष माहितगार अशी धर्मप्रेमी स्त्री होती. माझ्या विद्येनें व प्रतिभेनें ती जितकी प्रभावित झाली त्याहूनहि ती माझ्या साध्या राहणीनें व निस्पृहतेनें अधिक प्रभावित झाली. परंतु आम्ही दोघें जसजशीं अधिकाधिक जवळ जवळ येऊं लागलों तसतशी ती निःसंकोचपणें माझ्या तोंडाकडे तासचे तास टक लावून बघत राहूं लागली. तिचें धार्मिक प्रेम वेगळ्या स्वरूपांत केव्हां परिणत झालें कोण जाणे. परंतु तिनें स्वतःवर ताबा ठेवण्याचा खूप प्रयत्न केला हें मला अवश्य नमूद केलें पाहिजे. याचा एक परिणाम असा झाला कीं आतां ती पूर्वी इतके प्रश्न विचारीनाशी झाली. ती बोले फारच थोडें, परंतु मी हजर होतांक्षणीं आसन मांडून मला बसवून ठेवी, नवे नवे पदार्थ आपल्या हातानें मला वाढी. अनुराधपुरांत—आणि हीच गोष्ट साऱ्या सिंहलद्वीपालाहि लागू पडते—थंडी तर कधी पडतच नाहीं. बारा महिने उन्हाळाच असतो. पावसाळ्याच्या दिवसांत उकाडा थोडासा कमी होतो इतकेंच काय तें. पदार्थ वाढून झाल्यावर उपासिका मला पंख्यानें वारा घालूं लागे आणि तिची दृष्टि माझ्या चेहऱ्यावर लागून राही. मीहि आतां तिच्या-कडे पाहण्याच्या बाबतींत आढेवेढे कमी घेत असे. मला तिच्या टपोऱ्या डोळ्यां-मध्यें एक विशेष प्रकारचें अन्तर्लीन सौंदर्य दिसत असे. मला वाटे धर्मांत तन्मय झालेल्या लोकांची अशीच स्थिति होत असावी.

त्या वेळीं सार्थवाह चम्पक ( चम्पा ) द्वीपाकडे कांहीं गलबतांचा सार्थ ( काफिला ) घेऊन गेला होता. मी आतांहि पूर्वप्रमाणेंच उपासिकेच्या घरीं भोजन करण्यास जात असे. एके दिवशीं दुपारच्या भोजनानंतर मी जावयास निघालों तेव्हां उपासिकेनें थोडीशीं विश्रांति घ्यावयास सांगितलें. असें ती कधीं कधीं मला सांगतहि असे. कधीं मधीं अशी विश्रांति घेण्यासाठीं मी जर थांबलों तर घरांतला कुणीतरी दास पंखा चालवावयास येई. परंतु आज उपासिकेनें स्वतःच आपल्या हातीं पंखा घेतला होता. मी तिला पाहून आसनावर उठून बसलों. उपासिकेच्या चेहऱ्यावर विषादाची छटा उमटून गेली आणि तिच्या डोळ्यांतून आसवांची धार लागली. मी घाबरून विचारलें " उपासिका ! हें काय ? तुम्ही तर मोठ्या धीराच्या म्हणतां ना ? "

" भन्ते ! मी धीराची तर आहेच; म्हणूनच कित्येक महिन्यांपासून मला मन आंवरून धरतां आलं. स्त्रियांच्या प्रेमाचा वेग पुरुषांच्या पेक्षां पुष्कळच अधिक असतो, परंतु संकोचहि त्याच प्रमाणांत असतो. केव्हां पासून प्रारंभ झाला हें कांहीं मला सांगतां येत नाहीं; परंतु आज कित्येक महिने झाले मी आपल्या प्रेमानं वेडी झाल्यें आहे. "

योग-वैराग्य, धर्म-दर्शन इत्यादिकांचा माझ्या मनावर कधींच प्रभाव पडला नाहीं. परंतु मी स्वतःच्या जीवनाच्या बाबतींत कांहीं नियम ठरविलेले होते आणि त्यांचें पालन निर्धारानें करण्याची मी खटपट करीत असे. तरुणींचे कटाक्ष माझे हृदय विद्ध करीत नाहींत, अशांतला प्रकार नव्हता. मला कधीं कामवासना सतावत नसेल अशांतलाहि प्रकार नव्हता. परंतु आंत एक व बाहेर इतरांना दाखवावयाला एक, असे माझ्या जीवनाचे दोन पैलू ठेवावयाला मला नको होते. मी उपासिकेला म्हणालों--" भद्रे ! मला योग-वैराग्य, ब्रह्मचर्य-निर्वाण इत्यादि गोष्टींविषयीं तितकीशी आस्था नाहीं वाटत. आमच्या कर्माचं मोल तोल करून न्याय निवाडा देणारी आणखी एखादी देवता कुठं बसलेली आहे, अशीहि माझी श्रद्धा नाहीं. मेल्या नंतर दुसरा जन्म मिळतो यावरहि माझा विश्वास नाहीं. अशी माझी मतं असूनहि मी तुला सांगतो कीं आपल्याला प्रेम करायचा अधिकार नाहीं. "

उपासिका माझे सुरवातीचे उद्गार ऐकत होती त्या वेळीं तिच्या चेहऱ्यावर प्रसन्नता झळकूं लागली व तिचे अश्रूहि थांबले होते. शेवटचें वाक्य ऐकल्यावर तिच्या चेहऱ्यावर निराशेची छाया नक्कीच दिसूं लागली, परंतु डोळयांत अश्रू आणूं न देतां ती म्हणाली--" मी बुद्धीला पटवून घेऊनच कोणतीहि गोष्ट मान्य करतें. मी समाजाच्या सदाचाराचं पालन अत्यंत कठीण परिस्थितींत केलंय. माझं वय किती आहे ठाऊक आहे तुम्हांला ? "

" तसं नुसतं तुझ्याकडे बघूनच सांगायचं असतं तर तूं सोळा सतरा वर्षांची आहेस असं म्हणालों असतों. परंतु तुझं ज्ञान, तूं विचारलेले प्रश्न, या गोष्टी लक्षांत घेतां तूं वीस वर्षांची आहेस असं म्हणेन मी. "

" नाहीं. माझं वय पंचवीस वर्षं आहे. अन् माझ्या सौन्दर्याच्या बाबतींत आपलं काय मत आहे ? "

" कोणत्याही देशांत तुझी गणना अत्यंत सुन्दर स्त्रियांमध्यें होईल. "

" भरुकच्छ ( भडोच ) नगरांत एकीहून एक सुन्दर अशा शक, यवन कुमारी आहेत. मला माझ्या नगरांतली सर्वश्रेष्ठ सुंदरी समजत असत. सार्थवाहाचा कारभार भरुकच्छांतहि आहे. माझे वडील सामान्य श्रेष्ठी होते. सार्थवाहानं माझ्याशी विवाह करायची इच्छा प्रदर्शित केल्या बरोबर ते राजी झाले. मुलींना तर आपल्या लग्नाच्या बाबतींत कांहीं सांगायचा अधिकार नसतोच. अन् जरी अधिकार असता तरीहि मी नकार नसता दिला. सार्थवाह माझ्यापेक्षां वयानं बारा चौदा वर्षांनीं वडील नक्कीच असेल. परंतु त्याची शरीरप्रकृति चांगली होती, अन् अजून तो म्हातारा झालेला नव्हता. मी त्या वेळीं होत्यें सोळा सतरा वर्षांची. मी पती बरोबर

अनुराधपुरला आल्यें. ज्या घरांत लक्ष्मी नांदते तिथं कोणत्याही गोष्टीची कमतरता नसते. परंतु तरुणीचं समाधान तेवढ्यांत नाहीं होत. मी पतिसुखाला पारखी होत्यें."

" पण तुझा पति तुझ्या जवळ होता ना ? "

" पति जवळ होताच. अन् पहिल्या पहिल्यांदा मी असं समजत होत्यें कीं यानं उपासव्रत घेतलेलं असावं. कुणा सिद्धपुरुषानं निपुत्रिकपणाचा संभव टाळायसाठीं कांहीं विशेष नियमांचं पालन करायला सांगितलंय असं पतीनं माझ्या जवळ बोलूनहि ठेवलेलं होतं. किती तरी दिवसपर्यंत मी याच भ्रमांत राहिल्यें. सार्थवाहाचे दोन तीन तरुण मित्र आमच्या घरीं येत असत. त्यांना माझी भेट घ्यायचं पूर्ण स्वातंत्र्य होतं. कधीं कधीं सार्थवाह दूरच्या प्रवासाला जात असे, त्या वेळीं तो नसतानांहि हे तरुण मित्र घरीं येत असत. सार्थवाहाची तशी आज्ञा होती म्हणून मी सुरा-कुतुप त्यांच्यापुढें ठेवीत असें. ते गाणं म्हणायचा आग्रह करीत तेव्हां एकदोन वेळां मी गातहि असें. परंतु त्या तरुणांपैकीं एकानं मला त्रास द्यायला सुरवात केली. तसा तो अधिक सुन्दर व अधिक सुदृढ तर होताच. पण मी त्या दिवसापासून त्याला घरीं यायची बंदी केली. सार्थवाह परत आल्यावर मी तक्रार केली. परंतु रागावयाच्या ऐवजीं तो हंसला हें पाहून मला आश्चर्य वाटलं. "

" हा कसचा पति ! " मी म्हणालों.

" मी जेव्हां जरा जास्त जोरानं सांगूं लागल्यें तेव्हां सार्थवाह अगदीं शांत-पणानं म्हणाला— ' भद्रे ! रागावूं नकोस. मी तुझ्याशीं लग्न केलं तें माझा वंश वाढवायसाठीं केलं. नाहींतर ही लाखों दीनारांची संपत्ति राजाच्या हातीं जाईल. ' मी चिडून म्हणाल्यें— ' मग तुम्ही दूर-दूर कां पळतां ? वंश काय अशानं वाढेल ? ' यावर त्यानं कबूल केलं कीं आपल्या अंगीं पुरुषत्व नाहीं. माझ्या हृदयाला जोराचा धक्का बसला. मनांत इतका संताप आला कीं कांहीं पुसूंच नये. असं वाटलं कीं याचा गळा दाबून खून करावा. परंतु मला माझं मन ताब्यांत ठेवतां येतं. अशा परिस्थितींत कायद्यानुसार सार्थवाहाला सोडचिठ्ठी देऊन मला दुसऱ्याशीं लग्न करतां येत होतं; परंतु करावंसं वाटलं नाहीं. "

" तेंच चांगलं झालं असतं. "

" वाईट नसतं झालं हें कबूल आहे मला. पण भिक्षुणींचं जीवन मी मोठ्या कौतुकानं बघत होत्यें. मी त्या वेळीं विचार केला कीं याच वेशांत भिक्षुणीचं जीवन जगावं. लग्न होऊन आठ वर्षं झालीं, पण याच्या अगोदर मी कधीहि माझं मन माझ्या तावडींतून जाऊं नाहीं दिलं. "

" आजहि तोच संकल्प दृढनिश्चियानं कायम कां नाहीं ठेवीत ! "

" आतां माझ्या संकल्पांत तेवढी शक्ति राहिलेली नाहीं. मी अगदींच दुबळी झाल्यें आहे असं वाटतंय मला. मी आपल्या धर्मदेशनेला गेल्यें नसल्यें तर फार बरं झालं असतं. आपलं पुन्हांपुन्हां दर्शन घ्यायसाठीं माझ्या मनाला उत्सुकता लागून राही. अन् मी महिनेन् महिने ती तृप्त करून घेत असें. त्यावेळीं मला वाटे, माझ्या भावना फार उच्च आहेत. त्यांत कसल्याहि प्रकारचा गढूळपणा नाहीं. परंतु माणसाच्या अंगीं स्वतःला भ्रमांत ठेवायची अमर्याद शक्ति नसतें हें आतां कळतंय मला. "

मी हंसत म्हणालों—" फार वेळ स्वतःची फसवणूक चालू ठेवतां येत नाहीं."

" बरोबर बोललांत. आत्मवंचना कसची करणार मी! माझ्या हृदयांत काय चाललंय तें माझं मला ठाऊक. वर्षांनुवर्षं सांठवून ठेवलेलं प्रेम माझ्या हृदयाची आतां काय अवस्था करीत असेल हें माझ्या आविर्भावावरून आपल्या अगोदरच लक्षांत आलं असेल. चीनांशुकाचं चीवर आपण अंगांत घातलेलं पाहून माझ्या डोळ्यां-तून आसवं आलीं होतीं, त्याचा अर्थ आपण केव्हांच समजले असाल नाहीं का?"

" मी समजून घ्यायची खटपट नाहीं केली. अन् आम्हां लोकांमध्यें ज्या रीतीनं धर्मचर्चा चालू असे ती लक्षांत घेतां असला विचार मनांत यायची आशाहि मला नव्हती. "

" म्हणजे आपण मला पतिता स्त्री मानूं लागले असाल, होय ना?"

" मी कोणत्याहि स्त्रीला पतिता समजत नाहीं. पुरुषाला मी पतित समजतों."

" पुरुषाविषयीं असं आपलं वाईट मत कां आहे?"

" कारण आजच्या स्त्रीची ही अशी अवस्था करायला पुरुषच मुख्यतः जबाबदार आहे. स्त्रीच्या भाग्याचा विधाता पुरुषच. दुसरा कोणीहि नाहीं. तुला हातपाय बांधून इथं कुणी आणून टाकलं?"

" पुरुषानं. "

" प्राचीन युगापासून चालत आलेल्या कसल्यातरी प्रथेनुसार तुला नपुंसक पति सोडून देतां येईल. परंतु तूं आपल्या तारुण्याची आठ वर्षं इथंच घालवलीस. आतां दुसरा पुरुष पतकरायचा म्हणजे ही आठ वर्षं तुझ्याबरोबर कलंकाच्या रूपानं येणारच. तुला पतिता म्हणायचा विचारहि मला माझ्या मनांत आणतां येत नाहीं."

" माझ्या या आठ वर्षांच्या जीवनांत, आजची ही दुर्बलता सोडल्यास, मला लाज वाटण्याजोगी एकहि घटना घडलेली मला तरी आठवत नाहीं."

" मी याला दुर्बलता नाहीं म्हणत. "

तरुणीच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. माझे पाय आपल्या मांडीवर घेऊन ती म्हणाली—

" प्रियतम!"

मी बेताबेतानें माझे पाय सोडवून घेतले आणि अगदीं शान्तपणानें म्हणालों—
" सुमुखि ! येवढी उतावीळ होऊं नकोस. अगोदर माझं म्हणणं तर ऐक."

तिचा चेहरा जरा उदासला आणि ती माझ्या मुखाकडे टक लावून बघत राहिली. मी म्हणालों– " मी विवाह-संस्थेवर देखील विश्वास ठेवीत नाहीं. देव-कन्यां प्रमाणंच एका काळीं मानवकन्यांमध्यें विवाहाची प्रथा नव्हती असं माझं मत आहे. कदाचित पुढंहि असा एक काळ येईल कीं ज्यावेळीं तिची आवश्यकता राहणार नाहीं."

" म्हणजे स्वैर प्रेम."

" होय. स्वैर प्रेम मी गैर समजत नाहीं."

" आपल्याला तें चांगलं आहे असं वाटतं ?"

" होय. स्वैर प्रेम चांगलं आहे असं वाटतं मला. परंतु स्वैर प्रेमासाठीं समाज स्वतन्त्र असावा लागतो. आजचा बहुजन समाज स्वतन्त्र आहे असं म्हणतां येत नाहीं. म्हणूनच सध्यां मी स्वैर प्रेमाला गैर समजेन."

"गैर ?"

" राजे लोकांचं प्रेम स्वैर प्रेमच नसतं का ? राजा कुणाहि श्रेष्ठि-सार्थवाह अगर सामन्त- पुरोहिताची लग्नाची बायको एका रात्रीसाठीं आपली प्रेयसी करूं शकतो. त्याला नाहीं म्हणायची कुणाची छाती आहे ?"

" नाहीं म्हणतां येतच नाहीं. उलट हो म्हटलं कीं धन-लाभ होतो."

" अन् नाहीं म्हटलं कीं सर्वनाश ठेवलेलाच. मग नाहीं-होय हा प्रश्नच नसतो."

" या बाबतींत पडद्याच्या आंत या गोष्टी अगदीं उघड उघड चालतात. राजा व त्याच्या कृपेला पात्र असलेलीं माणसं कसल्याहि प्रकारचं विवाहबन्धन मानीत नाहींत. पण मी ज्याला चांगलं म्हटलं तशा प्रकारचं हें स्वैर प्रेम आहे असं म्हणतां येईल का ?"

" म्हणजे... ..." असे म्हणतां म्हणतां तिनें सुस्कारा सोडला.

" स्वैरप्रेमाचं युग असतं तर मी तुला निराश केलं नसतं."

" म्हणजे आपण मला ठोकरून लावणार ?"

" ठोकरणं हा शब्द वापरून तूं माझ्यावर स्त्रीच्या अपमानाचा गुन्हा लादत्ये आहेस."

" गुन्हा टाळणं आपल्या हातीं आहे. आपण मला निराश करूं नका."

" निराश करावं लागतंय याबद्दल मी दिलगीर आहें. मी कितीजणींची आशा पूर्ण करणार ? अन् त्यांत पुन्हां मी स्वतःवर एक निर्बंध घालून घेतलेला आहे. तुझ्यावर

याची कल्पना येते. मला आतां उत्तरेला जावयाचें होतें, म्हणून वाकडा-तिकडा रस्ता पतकरावा लागला. तीन योजनें दक्षिणेला गेल्यावर मी एका विहारांत ( कनेरींत) पोंचलों. या विहारांत पन्नासांवर कोठड्या व एक विशाल उपोसथ-आगार (संघ-गृह) आहे. आणि या साऱ्या पहाड खोदून बनविलेल्या आहेत. उपोसथ-घर म्हणजे तर हजार माणसें बसूं शकतील येवढी मोठी विशाल शाला आहे. अशाच विशाल शाला पहाडांतून खोदून काढलेल्या पाहून लोक आपल्या मनानें कांहींतरी कल्पना करूं लागले आणि या कल्पना जसजशा दूरदूर फैलावत चालल्या तसतशीं त्यांना विचित्र रूपें मिळत गेलीं. असुरांनीं पहाड खोदून प्रासाद तयार केले आहेत, मयासुरानें स्वतः आपल्या हातांनीं हे महाल बांधले, अशा स्वरूपांत या कल्पना प्रसृत झाल्या. राजेलोक या विहारांतील भिक्षूंचा मोठा मानमरातब सतत राखत आले आहेत, आणि श्रेष्ठि सार्थवाहांची तर यांच्यावर अगाध श्रध्दा पूर्वीपासूनच आहे. याचाच परिणाम म्हणजे हे पहाड खोदखोदून बांधलेले येवढे प्रासाद व महाल होत. चैत्यशालेच्या बाहेरच्या अंगाला देणगीदारांच्या चार मूर्ति खोदलेल्या आहेत. त्यांपैकीं दोन पुरुष आहेत आणि दोन स्त्रिया आहेत. अजून ही चैत्यशाला खोदल्याला दोनशेंहून अधिक वर्षे झालेली नाहींत. लोकांना या राजेराण्यांची चांगली माहिती आहे. परंतु हीच गोष्ट सिंहल व गंधार देशांत पोंचतांच तिला मयासुराच्या कथेचें रूप मिळालें आहे. सगळयांत महत्वाची गोष्ट या गुहांच्या बाबतींत ही आहे कीं प्रत्येक गुहेच्या खालीं पाणी सांठविण्यासाठीं तळघर खोदलेलें आहे. या तळघरांमध्यें पावसाचें पाणी डोंगरावरून झिरपत येऊन सांठून राहतें आणि वर्षभर शीतल व मधुर पाणी लोकांना आपल्या पायाशीं ठेवलेलें मिळत राहतें. जर ही पाण्याची सोय नसती तर कुणी या विहारांत राहिलेंहि नसतें. कारण खालच्या ओढ्यांत पाणी राहात नाहीं. इथल्या गुहांमध्यें जागोजाग मूर्ति कोरलेल्या आहेत. त्यांतल्या कांहीं तर फारच सुन्दर आहेत. इथले भिक्षू विद्याप्रेमी आहेत आणि विनय-अनुपालनाबद्दल यांची ख्याति आहे. या विहाराविषयींची आख्यायिका अशी सांगतातः बोधिसत्वांनीं ( पूर्वजन्मींच्या बुद्धांनीं ) त्यावेळीं नागकुमाराच्या रूपांत जन्म घेतला होता. त्यांनीं इतरांचे प्राण वांचविण्यासाठीं आपलें शरीर भक्ष्य म्हणून गरूडाला अर्पण केलें. ज्या ठिकाणीं नागकुमारानें आपलें शरीर दान दिलें होतें ती जागा याच पर्वताच्या आसपास होती.

सिंहलद्वीप सोडल्यानंतर प्रतिष्ठान ( झूंसी ) नगरीला पोंचावयास मला दोन वर्षांपेक्षां अधिक काळ लागला. यांतला बहुतेक वेळ वाकाटक ( विदर्भराजाचा वंश ) आणि महाक्षत्रप ( मालवराज ) यांच्या अमलाखालील देशांमध्यें भटकण्यांत खर्च झाला होता. क्षत्रप आणि वाकाटक या दोघांहि राजांचा समुद्रगुप्तानें पराभव केला होता आणि वाकाटक राजा रुद्रसेन तर लढाईंतच मारला गेला होता. परंतु समुद्र-

गुप्तानें या राजवंशाचा उच्छेद नाहीं केला. त्याचा अंमल जेव्हां म्हातारपणामुळें जरासा ढिला झाला तेव्हां हे राजे पुन्हां स्वतंत्र झाले. वाकाटकांचें राज्य खूप बलाढ्य आहे. त्याचा विस्तार नर्मदेपासून कृष्णेपर्यंत आहे. त्याच्या दक्षिणेला कांचीच्या पल्लवांची सत्ता आहे. उत्तरापथांत ( पंजाबांत ) अजूनहि देवपुत्रशाही कुषाण हाच राज्य करीत आहे. पूर्वेला गुप्तांचें राज्य आहे. आणि मालव-गुजरातेंत आहे शक महाक्षत्रप. या पांच बड्या राजांच्या दरम्यान एकट्या यौधेयांनींच काय ती गणराज्याची प्रथा कायम ठेवलेली आहे. वाटेंत मी आन्ध्रराजांच्या आमदानींत बांधलेले पुष्कळसे गुहाविहार पाहिले. कित्येकांमध्यें तर अजूनहि वाशिष्ठीपुत्र पुलुमावी ( इ. स. १५४ ), यज्ञ शातकर्णी इत्यादि आन्ध्रराजांचे शिलालेख आहेत. हे विहार बांधून चारपांचशेंच वर्षें झालीं आहेत, तरीहि त्या माणसांच्या कृति नसून देवतांच्या व असुरांच्या कृती आहेत असा समज दूरदूरच्या ठिकाणीं प्रचलित आहे. आज जर ही स्थिति तर हजार दोन हजार वर्षांनीं त्यांच्या बाबतींत किती गप्पा प्रसृत होतील कोण जाणे.

वाटेंत मी उज्जयिनींत कांहीं महिने मुक्काम केला. शकांनीं ही नगरी सजविण्याच्या कामांत कसलीहि कसूर ठेवलेली नाहीं. समुद्रगुप्तानें आधींच्या महाक्षत्रपाला आपलें अधिराज्य मान्य करावयास भाग पाडलें होतें परंतु समुद्रगुप्ताचा अंमल ढिला होतांक्षणीं महाक्षत्रप रुद्रसिंहानें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. चन्द्रगुप्तानें देवपुत्रशाहीला ठार करून पुन्हां गुप्तवंशाच्या राज्यलक्ष्मीची प्रतिष्ठा वाढविली तेव्हांपासूनच महाक्षत्रपालाहि धास्ती वाटूं लागली आणि तो आपली सेना व खजिना वाढवीत आहे इतकेंच नव्हे तर प्रजेलाहि संतुष्ट ठेवण्याचा प्रयत्न करीत आहे. अवन्तिपुरीचें अन्तःपुर महाक्षत्रप रुद्रसिंहाच्या अन्तःपुरा इतकें लहान कधींच झालें नसेल. उत्तरेला मालवगणाशीं क्षत्रपांचा झगडा सतत चालूच होता. क्षत्रप मालवांना दडपून टाकूं इच्छीत होते आणि क्षत्रप विलासांत मग्न झालेले पाहतांक्षणीं मालव त्यांचें जोखड झुगारून देत होते. आजकाल रुद्रसिंह मालवांना मोठें औदार्य दाखवूं लागला आहे. वाकाटक पृथ्वीषेणानें क्षत्रपाचा कांहीं मुलुख बळकावला आहे. म्हणून त्या दोघांचें वैमनस्य वाढतच आहे. चन्द्रगुप्त झोंपलेला नाहीं, तो योग्य संधी शोधतो आहे आणि वाकाटक व क्षत्रप यांच्यांतील वैमनस्य ही त्याला सर्वांत उत्तम संधी आहे हें क्षत्रपानें ओळखलेलें आहे.

मला येवढ्यांत यौधेयभूमीला परत जाण्याची घाई नव्हती. कारण आमच्या शेजाऱ्यांचें तानमान काय आहे हें अगोदर पाहून ठेवणें जरूरीचें होतें. पल्लव देश आमच्यापासून पुष्कळ दूर होता. आणि चंद्रगुप्ताशीं आतां त्याचा कांहीं संबंध राहिलेला नव्हता. म्हणून आम्हांला बाकीची बाह्य व अंतर्गत परिस्थितीच तेवढी समजून घ्यावयाची होती. बौद्ध भिक्षूंना राजकारणापासून अलग राहावेसें वाटतें. राज-

वंशांच्या उगवत्या-मावळत्या ताऱ्यांशीं स्वतःला निगडित करून घेणें ही नुकसानीची गोष्ट असते हें त्यांना शेंकडों वर्षांच्या अनुभवानें दाखवून दिलें आहे. असें असलें तरीहि देशोदेशींच्या भिक्षूंचा सहवास बौद्ध-विहारांमध्येंच घडतो. मी उज्जयिनी-च्या ज्या विहारांत राहात होतों तेथें तुषार, कुस्तन ( खोतन ), पारस्य या देशां-पासून तों तहत सिंहलद्वीप, यवद्वीप व चीनपर्यंतचें भिक्षू होते. त्यांमध्यें कित्येकजण पदच्युत राजवंशांचे कुमारहि होते. आणखी कित्येकजण राजांच्या कोपापासून बचाव करून घेण्यासाठीं आश्रयार्थहि आलेले होते. विहारांमधील ही सारी जमावट राजे लोकांच्या नुकसानीचीहि गोष्ट होती. तरी पण ते सावधगिरी बाळगीत असत. त्यांचे किती तरी गुप्त हेरहि भिक्षूंच्या वेषांत तिथें राहात असत. सिंहलद्वीप सोडल्या नंतर माझ्या अंगावरचें चीवर आतां केवळ राजकीय उद्देशानेंच मी कायम ठेवलेलें होतें. किती तरी वेळ पर्यंत मी आपले विचार मनांतल्या मनांत ठेवून साऱ्या गोष्टी डोळे उघडे ठेवून न्याहाळीत होतों. मी सिंहलद्वीपाच्या विहारांतला भिक्षु होतों. भिक्षु-नियम-पालनांत कडकपणा राखणारे अशी या भिक्षूंची ख्याति आहे म्हणूनहि लोक माझ्याकडे जरा अधिक आदराच्या दृष्टीनें पाहात होते. कित्येक जणांचा तर असा समज होता कीं मी परद्वीपांतला आहे. म्हणून गुप्त हेरांची कृपादृष्टि माझ्याकडे फारशी वळलेली नव्हती. भिक्षु जय विद्वान आहे हेंहि त्यांना ठाऊक होतें. मी वसु-बन्धूंनीं शिकविलेल्या शास्त्रांच्या ज्ञानाचें प्रदर्शन करणें मला इष्ट वाटलें नाहीं. परंतु विनयपिटका संबंधींचें माझें पांडित्य प्रदर्शित होऊं देण्यांत मी अडथळा आणला नाहीं. माझ्या जवळ कित्येक भिक्षु विनय शिकण्यासाठीं येऊं लागले. त्यांतला एक होता माधवसेन.

माधवसेन मालव गणांतला क्षत्रिय होता. अत्यंत आरोग्य संपन्न, खूप ताकतवान आणि चलाख बुद्धीची होती ही स्वारी. तीव्र वैराग्य आल्यामुळें तो भिक्षु झालेला होता आणि तथागतांचे एकेक नियम आपण पालन करावेत असें त्याला मनापासून वाटे. अवन्तीच्या विहारांतले भिक्षु बहुतांशीं महायान पंथाचे होते. यामुळें विनय पिटका-तील अनेक नियमांची तेथें अवहेलना होत होती. आस्ते आस्ते माधवाची व माझी मैत्री बरीच दाट होत गेली. तसें नसतें तर मला माझें हृदय त्याच्या समोर खुलें करून दाखविण्याची हिंमत झाली नसती आणि त्याच्या वैराग्यामुळें त्याला माझ्या संसारी गोष्टी ऐकाव्याशाहि वाटल्या नसत्या. परंतु भिक्षुसंघ व त्याचे विनय यांजमध्यें जागोजाग गणतंत्रांची छाप आढळून येत होती. मी ते शिकवितांना विद्यार्थ्यांच्या मनांत खूप जिज्ञासा जागृत करीत असें आणि ते आणखी माहिती घेण्यासाठीं उत्सुक होत असत. मग मला विनय पिटकावरील टीकांमधून आढळणाऱ्या आणखी कांहीं गोष्टी सांगाव्या लागत. मात्र त्या विचारांचा संबंध प्रचलित राजकारणाशीं जोडला

जाऊं नये याची मी खबरदारी घेई. तरी पण माधवसेन मागाहून एका प्रसंगीं सांगूं लागला—" भायर जय ! त्यावेळी तूं निर्वाणाप्रमाणंच गग नांवाच्या एका लोकोत्तर समाजव्यवस्थेचं वर्णन करीत आहेस असं आढळून येई. अन् हें करतांना तूं आपलं यौधेय हें नांव किती तत्परतेनं छपवून ठेवलं होतंस, नाहीं का ? "

" माधव ! आपल्या विहारांत क्षत्रपाचे व वाकाटकाचेच नव्हेत तर देवपुत्र-शाहीचे देखील गुप्त हेर राहात होते हें ठाऊक नव्हतं का तुला ? येवढ्याचकरतां मला फार सावधागिरी बाळगावी लागत होती. यौधेय हा प्राण जाईपर्यंत यौधेयच राहणार हें सगळ्यांना माहित आहे. अन् मी जर निर्वाण, त्रायस्त्रिंश ( स्वर्ग ) लोक यांच्या-पेक्षां जरा खालची गोष्ट बोलूं लागलों असतों तर तूं दोनच दिवसांत पळ काढला असतास हेंहि लक्षांत घेतलं पाहिजेस तूं. "

" बरोबर आहे हें तुझं म्हणणं. वैराग्याचं मला वेड लागलेलं होतं खरंच. याचं कारण आतां आलंय माझ्या लक्षांत. मालव गणाच्या प्रमुखांचा नादान स्वार्थीपणा व अधःपात अन् त्यामुळं माझ्या मनांत गणाविषयीं निर्माण झालेली निराशा हेंच या माझ्या वैराग्याचें कारण होतं. इहलोकाविषयीं मी निराश व बेचैन झालों होतों म्हणून कसल्या तरी लोकोत्तर वस्तूंत मी मनःशांतीचा शोध करीत होतों. "

" कबूतर कसं जीव वांचवायचा प्रयत्न न करतां बोक्यासमोर डोळे मिटून घेऊन बसतं ? तशांतलाच प्रकार आहे हा. डोळे मिटून घेऊन मरणं चांगलं का जीव वांचवायचा प्रयत्न करतां करतां कांहीं तरी करून मरणं चांगलं ? "

" कांहीं तरी करून मरणंच चांगलं. "

" प्रत्येक पिढींत हजारों कर्तबगार लोक कबूतराच्या उदाहरणानुसार वागत आले आहेत. त्या ऐवजीं त्यांनीं जर परिस्थितींत बदल घडवून आणायची खटपट केली असती तर दुनिया नक्कीच किती तरी चांगली झाली असती. "

" दुनियेंत बदल घडवून आणायची तरतूद करण्यापेक्षां लोकोत्तर साधना त्यांना अधिक सोपी वाटली. पण भायर जय ! तूं मात्र माझं आयुष्य फुकट जाणार होतं तें वांचवलंस. "

अवन्तिपुरींत वर्षभर मुक्काम केला त्याचा एक फायदा झाला तो म्हणजे राज-कीय परिस्थितीची थोडीशी माहिती मिळाली. आणि दुसरा फायदा म्हणजे माधवसेन.

चन्द्रगुप्ताच्या मनसुब्याची थोडी थोडी कुणकुण आम्हांला कळूं लागलेली होती. तो प्रथम आर्यावर्तांत ( संयुक्तप्रांत–बिहारमध्यें ) आपलें आसन मजबूत करण्यांत गढलेला होता. त्यानें टाकलेलें पहिलें पाऊल पाहतांक्षणींच आपली कशा प्रकारच्या माणसाशीं गांठ आहे हें शेजाऱ्यांना कळून चुकलें. घराची मजबुती केल्यावर चन्द्र-

गुप्ताची नजर पुन्हां एकदां वर डोकें काढणाऱ्या बाहेरच्या सामन्तांकडे वळणार असा मला भास होऊं लागला. यौधेयांच्या बाबतींत त्याची वृत्ति काय आहे हेंहि मला समजून घ्यावयाचें होतें. म्हणूनच त्याची एकवार भेट व्हावी असें मला फार फार वाटूं लागलें.

आतां माधवसेन माझा सहकारी झालेला होता. आम्हां दोघांचें उद्दिष्ट एकच होतें आणि वर्षभर एकत्र राहिल्यामुळें आम्ही एकमेकांच्या आणखी जवळ आलों होतों. अवन्तिपुरीहून आम्ही काकनादबोट ( सांची ) येथील महाविहारांत गेलों. तिथले सुन्दर चैत्य आणि त्यांच्यावरील मनोहर तोरण पाहून कलावंताचें हृदय आनंदानें उचंबळून आलेंच पाहिजे. आज देखील ज्या मूर्ति अगर चित्रें तयार होत आहेत त्यांच्या बाबतींत आमच्या पिढीला भविष्यकाळीं कमीपणा येईल असें मानण्याचें बिलकुल कारण नाहीं. तरी सुद्धां काकनादबोटच्या कलाकारांनीं मूर्तिकलेच्या कौशल्याची कमाल केली आहे असेंच मी म्हणेन. विदिशा ( भेलसा ) नगरी इथून जवळच आहे. तिथें किती तरी दन्तकार अजूनहि आहेत. परंतु त्यांच्या पूर्वजांनीं पांचशें वर्षांपूर्वी जें एक• तोरण बनविलें, तें तत्कालीनच नव्हे तर आमच्या आजच्या कलाकारांचीहि एक अनुपम व अमर कृति आहे. विशेषतः स्त्रियांच्या मूर्ति तयार करण्याच्या बाबतींत तर त्यांनीं कमालच केलीं आहे. मूर्ती अगदीं हुबेहूब आहेत. त्या पाहतांना मला किती तरी वेळां यवन कलाकारांची आठवण होत होती. माधवसेन सांगूं लागला—" हें चैत्य व भिक्षूंचे विहार निर्वाणाचा व वैराग्याचा संदेश देतात ना ? मग इथं स्त्रियांचं इतकं मादक सौन्दर्य मूर्तिकारांनीं या मूर्तींत का अंकित केलं. "

" तुझी कल्पना काय आहे ? "

" हे लोक पृथ्वी सोडून हवेंत भराऱ्या मारूं पाहताहेत, पण पृथ्वी त्यांना खेंचून धरणीवर आणते आहे असं वाटतं मला. "

" हें सौन्दर्य त्यांच्या निर्वाणापेक्षां कितीतरी चांगलं व अधिक ठाशीव आहे. आणखी एक गोष्ट त्यांत बघण्यासारखी आहे. आज जें स्त्रियांचं रूप मूर्तींमध्यें अंकित होतं त्यांत त्यांचं सौन्दर्य अधिक नाजुक आहे असं दर्शवतात. परंतु पांचशें वर्षांपूर्वीच्या या चित्रांमध्यें स्त्रीच्या मुखमंडलावर सौन्दर्य झळकतं आहे इतकंच नव्हे तर त्यांत एक प्रकारचा रुबाब, एक प्रकारची स्वतंत्र वृत्ति प्रत्ययाला येते. "

" अन् वेशभूषेंत केवढं परिवर्तन झालंय ! त्या काळीं स्त्रिया देखील उष्णीष ( पगडी ) घालत असत ? "

" समोरच दिसतंय तुला काय तें. हातांत बघ केवढे तरी मोठे चुडे आहेत. कमरेला रसनादाम ( कमरपट्टा ) बघ केवढा मोठा आहे तो. "

" पायांत सुद्धां इतके जास्त वाळे घालायला आजची कुणीच स्त्री कबूल नाहीं होणार. पुरुष देखील त्या काळीं केवढींतरी जड-जड कुण्डलं घालीत असत. त्यांचे कान पहा, खांद्यापर्यंत लोंबत असत, अशानं त्यांच्या सौन्दर्याला कसला उठाव येत असेल बरं ? "

" दागिने अशाच रीतीनं लहानाचे मोठे होत जातात अन् शेवटीं लोकांना कळूं लागतं कीं यांच्यामुळं सौन्दर्यांत भर तर पडत नाहींच, उलट भार मात्र वाढतो. मग लोक ते घालीनासे होतात. परिवर्तनाचा हाच नियम आहे. हा असाच चालू राहतो. आजच्या दशार्ण ( बुन्देल खंड ) देशांतल्या स्त्रिया याच मूर्तींत दर्शविलेल्या स्त्रियांच्या वंशज आहेत. परंतु आतां त्यांनीं आपल्या पूर्वजांच्या किती तरी गोष्टी सोडून दिल्या आहेत. अनेक पिढयांनंतर कितीतरी बाबतींत आमूलाग्र परिवर्तन होत असतं. "

आम्ही काकनादबोटहून विदिशेला ( भेलशाला ) गेलों. मग एरिकन ( एरन ) वरून पूर्वेला चाललों. मणिधर ( मैहर ) नजीक आम्हांला आणखी एक सुन्दर चैत्य आढळला. येथें देखील काकनादबोट प्रमाणेंच सुन्दर सुन्दर मूर्ति व तोरणें कोरलेलीं आहेत. या दोन्ही ठिकाणीं आम्ही इतर शेंकडों प्रकारच्या मूर्ति पाहिल्या, परंतु बुद्धाची मूर्ति कुठेंच नव्हती. माधवनें विचारलें—" बुद्धाच्या मूर्ति इथं कां नाहीं दिसत ? त्या काळीं त्या तयार होत नव्हत्या का ? "

" बुद्धाच्या मूर्ति नव्हत्या तयार होत. विनय-पिटक वाचतांना त्यांत बुद्धाच्या-मूर्तींचा उल्लेख कुठंच येत नाहीं हें तूं पाहिलेलं आहेसच. मला तर सिंहलद्वीपांत असं आढळून आलं कीं भिक्षु लोक उपोसथ ( विनय-पाठ ) करायसाठीं जेव्हां एकत्र जमतात तेव्हां ते कोणत्याहि मूर्तीला वन्दना नाहीं करीत; मात्र ते धर्मासनाला वन्दना करतात. हें धर्मासन म्हणजे तिथल्या तिथं ठेवलेलं छोटंसं आसन असतं. "

" या मूर्तींवरून सुद्धां हेंच आढळून येतं. कुठं रिकामं आसन आहे व त्याच्या समोर उपासक-उपासिका हात जोडून उभ्या आहेत. कुठं बोधि ( पिंपळ ) वृक्ष आहे व त्याच्यावर किन्नर-मिथुनं फुलं वाहताहेत. "

" म्हणजे या गतिमान जगांत धर्महि अचल राहूं शकत नाहीं हेंच यावरून समजून आलं. "

" पण ब्राह्मण लोक तर आपला धर्म सदा सर्वदा अचल राहतो असं सांगतात ना ? "

" ज्यांनीं लाज-लज्जा सोडून दिली त्यांना खोटं बोलायला संकोच कशाला वाटतोय ? ब्राह्मणांच्या ब्रह्मा-विष्णु-महेश या त्रिमूर्तींचं त्यांच्या प्राचीन वेदांत कुठं नांव तरी आहे का ? वेदांचे मूळ रचनाकार वशिष्ठ-विश्वामित्र अन् आजचे ब्राह्मण

यांचे आचार विचार पाहिले तर दोहोंमध्यें केवढा तरी मोठा फरक झालेला आढळून येतो. आज गुप्तवंशीय राजें स्वतःला गो-ब्राह्मण-पूजक म्हणवून घेतात. अन् गाईच्या रक्षणाची काळजी आज येवढी घेतली जाते तरी ही प्रथा फार जुनी नाहीं."

" हें तर बरोबरच आहे. उत्तरापथांत आज देखील अतिथि आला कीं गोमांसासह मधुपर्क देतात. "

" म्हणूनच तर मी सांगतोंय कीं ब्राह्मण लोक आपल्या धर्माला अचल सनातन अशीं विशेषणें लावून सत्याचा खून करतात. "

आम्ही सहजातिय ( भीटा ) गांवावरून यमुनेच्या कांठीं गेलों आणि तिथून नावेंतून प्रतिष्ठान ( झूंशी ) कडे रवाना झालों.

## ( १६ )

## विक्रमादित्याचे मनसुबे

मला तर चन्द्रगुप्ताचीं भेट हवी होती. वस्तुतः येवढ्याच करतां मी प्रतिष्ठानला आलोंहि होतों. तरी पण आम्ही पहिल्या प्रथम तिथल्या विहारांत जाऊन मुक्काम केला. चन्द्रगुप्ताला राज्यावर येऊन आतां चारच वर्षें झालीं होतीं. परंतु तेवढ्या अवधींत त्यानें आपल्या अंगीं चन्द्रगुप्त-मौर्याचें युद्धकौशल्य आहे तें तर सिद्ध केलेंच होतें; आणि शिवाय कूटनीतींत आपण कौटिल्यापेक्षांहि वरचढ आहोंत याचाहि प्रत्यय त्यानें आणून दिलेला होता. विहार असो वा देवालय असो, पानशाळा ( दारूचा गुत्ता ) असो वा वेश्यालय असो, जिथें चन्द्रगुप्ताचे हेर हजर नाहींत अशी एकहि जागा नव्हती असें म्हटलें तरी चालेल. समुद्रगुप्त योद्धा होता; शरण आलेल्या शत्रूशीं तो फारच उदारपणें वागत असे. त्यानें आपल्या राज्याचा विस्तार खूप दूरपर्यंत केलेला होता खरा, परंतु त्याचें राज्य म्हणजे विखुरलेल्या तुकड्यांचा एक पसारा होता. म्हणून त्याला म्हातारपण आल्या बरोबर आर्यावर्ताबाहेरचे त्याचे सामन्त स्वतंत्र झाले. चन्द्रगुप्ताला असला दिग्विजय पसंत नव्हता. तोंडीं मांडलिकत्व मान्य करण्यावर संतोष मानावयाला तो तयार नव्हता. त्याला एका जबरदस्त राज्याची संघटना करावयाला हवी होती. आणि येवढ्याच साठीं आतां

तो मथुरेहून पुंड्रवर्धन ( उत्तर बंगाल ) वरील अंमल पक्का करीत होता. आचार्य वसुबन्धूंच्या शिष्यांची संख्या पुष्कळच मोठी होती आणि मी त्याचा प्रिय शिष्य व परमभट्टारिका दत्तादेवी हिचा धाकटा भाऊ म्हणून बराच प्रख्यात होतों. विहारांत माझ्या ओळखीचे भिक्षुहि होते आणि जय यौधेयाचा पत्ता गुप्त हेरांना नसेल हें तर शक्यच नव्हतें.

चन्द्रगुप्ताला कळावयाचा अवकाश कीं लगेच तो ध्रुवदेवी व बलाधिकृत (सेनापति) वीरसेन यांच्या समवेत विहारांत आला. सैनिकांची व हेरांची गर्दी पाहून लोक चकित झालेले होते. तीं तिथें माझ्या कोठडीच्या दाराशीं आलीं. मी बाहेर आलों. चंद्रगुप्तानें आपला मुकुट प्रतीहाराच्या हातीं दिला व हात जोडून मस्तक नम्र करून सांगितलें—" भन्ते ! माझं मन तर आपल्याला ' जय ' अगर ' मामा ' अशीच हांक मारायला सांगतंय. परंतु या वेषाचा सन्मान तर मला करायलाच पाहिजे. "

ध्रुवदेवी व वीरसेननेंहि प्रणाम केला. चन्द्रगुप्तानें त्याच दिवशीं दुपारच्या भोजनाच्या निमंत्रणाला माझी मान्यता घेतली आणि सांगितलें कीं " आपण बराच वेळ अन्तःपुरांत थांबायच्या तयारीनं यावं. आदल्या नऊ वर्षांतल्या गोष्टी आपल्या जयाला सांगायसाठीं चन्द्रगुप्त उत्सुक झालेला आहे. "

मी एकटाच प्रतिष्ठानच्या राजान्तःपुरांत गेलों. पाटलिपुत्र ही अजूनहि राजधानी होतीच. परंतु चन्द्रगुप्त केवळ एका राजधानीवर संतोष मानावयाला तयार नव्हता. साकेत, प्रतिष्ठान, मथुरा व क्षत्रपांच्या उच्छेदानंतर उज्जयिनीहि आपली राजधानी करण्याचा त्याचा संकल्प होता. प्रतिष्ठानचें अन्तःपुर म्हणजे आतां तोच जुना प्रासाद राहिलेला नव्हता. तिथेंहि पाटलिपुत्राचें वैभव आतां स्पष्ट दिसूं लागलेलें होतें. एक गोष्ट मात्र माझ्या नजरेंतून सुटली नाहीं; चन्द्रगुप्त आपल्या अन्तःपुरांतील स्त्रियांच्या संख्येंत भर घालूं इच्छीत नव्हता. त्यानें स्वतःच सांगितलें कीं—"मी दशरथ अगर कृष्णाप्रमाणं सोळा हजार राण्या करूं इच्छीत नाहीं. एकाद दुसरा दिवस स्पर्श करायचा व घरांत बन्द करून ठेवायचं, फायदा काय त्यांत ? " मात्र राजकीय फायद्यासाठीं मोठमोठ्या राजांच्या कन्यांशीं विवाहसंबंध जोडावयाची त्याची तयारी असे. ध्रुवदेवीला चन्द्रगुप्त कौतुकानें ध्रुवस्वामिनी म्हणतो. तिला वस्तुतः त्रैलोक्यसुन्दरी म्हटलें पाहिजे, इतकी ती सुन्दर आहे. माझ्या येण्याची बातमी कळल्यानंतर चन्द्रगुप्तानें ध्रुवस्वामिनीला माझ्या बाबतींत बऱ्याचशा गोष्टी बहुधा सांगितल्या असाव्यात. अज्जुका मरावयाच्या अगोदरच ध्रुवस्वामिनीचा विवाह रामगुप्ताशीं झालेला होता. अज्जुकाचें आपल्या धाकट्या भावावर केवढें प्रेम होतें हें तिला तिच्या तोंडूनच कळलेलें होतें. मरावयाच्या वेळीं अज्जुकाला नेमकी जयची आठवण होत होती. ती अखेरपर्यंत परमभट्टारकांना सांगत राहिली–" आर्यपुत्र !

कसेंहि करून माझ्या जयाला तेवढं बोलावून घ्या हो. मला त्याला एकवेळ डोळे भरून बघायचा आहे. मग मी शांतपणानं मरेन. " त्यांना माझा पत्ता ठाऊक नव्हता तरी तिला धीर देण्यासाठीं ते सांगत राहिले—" जय फार दूर गेलेला आहे. आपले अश्वारोही ( स्वार ) त्याला आणायला गेले आहेत. "

ध्रुवस्वामिनीनें मला कधीं पाहिलेलें नव्हतें. परंतु जय तिच्या चन्द्राचा बालमित्र आहे, तो बुद्धिमान व धाडशी आहे, हें तिला ठाऊक होतें. याशिवाय ध्रुवस्वामिनीला माझ्याविषयीं विशेष आपुलकी वाटण्याजोगी आणखी एक गोष्ट होती. ती मालविका—मालवगणाची कन्यका—होती. प्रतिष्ठानमध्यें राहून मी राजान्तःपुराखेरीज इतरत्र भोजन करणें शक्यच नव्हतें. रात्रीं उशीर जरी झाला तरी रोजच्या रोज मी विहारांत परत येत असे आणि मग दिवसभरांतल्या घटनांविषयीं माधव व मी चर्चा करीत असूं. ध्रुवस्वामिनी मला आपल्या हातानें भोजन वाढीत असे. चन्द्रगुप्ताला राजकाजांतून सवड मिळाली तरच गप्पागोष्टी करावयाची संधि मिळे, परंतु ध्रुवस्वामिनी मात्र मला तसाच जाऊं द्यावयाला तयार नसे. मी तिच्या पतीचा मातुल ( मामा ) असल्यामुळें माझा मान मोठा होता तरी वयानें मी तिच्या धाकट्या भावासारखा होतों. म्हणून ध्रुवस्वामिनीहि माझ्याकडे चन्द्रगुप्ताच्या दृष्टीनें बघूं लागली. तिनें कितीदां तरी मला बजावून सांगितलें—" मातुल भट्टारक ! आतां या काषाय वस्त्रांचा नाद सोडा. मिळवलं तेवढं पुण्य पुष्कळ झालं. स्वर्गांतल्या अप्सरा तर तुम्हांला मिळणार आहेतच. पण इथल्या अप्सरांना मात्र तुमच्यासारखे वीर न मिळाल्यामुळं नीच पुरुषांचा आश्रय घ्यावा लागतोय. "

नीच पुरुषाचं नांव घेतांना तिच्या मनश्चक्षूं समोर रामगुप्त उभा होता हें माझ्या लक्षांत आलें होतें. चन्द्रगुप्तानें स्वतःच सारी हकीगत सांगितलेली होती. शकराज देवपुत्रशाहीचा वध खुद्द त्याच्या प्रासादांत जाऊन आपण कसा केला याचें वर्णन करतांना तो म्हणाला—" मित्र जय ! माझं शहाणपण अन् कर्तृत्व तुला ठाऊक आहेच. पण इतक्या लवकर तें दाखवायची संधि मिळेल असं मला वाटलं नव्हतं. बाबांचीं अखेर अखेरचीं वर्षं कशीं गेलीं हें तूं थोडं फार पाहिलेलं आहेसच. त्यांना सुरा व सुंदरीखेरीज आयुष्यांत कांहीं ध्येयच राहिलेलं नव्हतं. यामुळं आमच्या दबलेल्या शत्रूंचीं हिंमत वाढली. आमचे अमात्य व बलाधिकृत हे नालायक तोंडपुजे लोक होते. कर्तृत्ववान माणसें उदासीन होऊन पायावर पाय टाकून स्वस्थ बसलेलीं होतीं. शकराज देवपुत्रानें पश्चिमेकडच्या प्रदेशांत जरा अगोदरच पुढें पाऊल टाकलेंहि होतें. परमभट्टारकांच्या मृत्यूची बातमी मिळाल्यावर तर त्यानें आमच्या पश्चिम सरहद्दीवर आक्रमणच केलें. रामगुप्त स्वतः त्याचा मुकाबला करायसाठीं पश्चिम सीमेवर गेला. परंतु त्यानंहि बाबांच्या म्हातारपणींच्या जीवनाची दीक्षा अगोदरच घेतलेली होती. सुरा व सुन्दरीला माझा

विरोध नाहीं, मीहि या गोष्टींना जीवनाचं सारसर्वस्व मानतों; पण त्यांचं पुरतं मोल चुकतं केल्यावर मगच त्यांचा उपभोग घ्यायचा असतो. ''

'' चन्द्र ! या दोन्ही गोष्टी परस्परविरोधी आहेत. ''

'' हें जीवनच मुळीं परस्परविरोधी गोष्टींचा संघर्ष आहे. गुप्तवंशाच्या भाग्याचा निकाल लागायची वेळ आलेली, रामगुप्त त्याचं रक्षण करायसाठीं आपली सेना घेऊन गेलेला, अन् अशा वेळीं देखील तो आपले विलास सोडायला तयार होईना. मानांतल्या मनांत खिन्न होण्यापलीकडे मला तरी काय करतां येत होतं ? असल्या सेनेला प्रबल शत्रूचा मुकाबला कसा करतां येणार ? आमच्या दुसऱ्या सरहद्दीवर क्षत्रप व वाकाटकहि युद्धाची तयारी करीत होते. म्हणून आमची बरीचशी फौज तिकडे अडकून पडलेली होती. शकराज आमच्या सीमेच्या आंत घुसला. बलाधिकृत व सांधिविग्रहिक ( युद्धमंत्री ) यांनीं परमभट्टारकासमोर परि- स्थितीचं अत्यंत निराशापूर्ण चित्र मांडलं. तो कोणत्याहि अटीवर जें काय वांचेल तेवढं वांचवायला तयार होता. याच सुमारास शकराजाचा दूत अशी अट घेऊन आला–'रामगुप्त जर आपली महादेवी ( पट्टराणी ) ध्रुवदेवी हिला स्वाधीन करायला तयार असेल तर देवपुत्रशाही त्याला अभयदान द्यायला तयार आहे.' समुद्रगुप्त व दत्तादेवी यांच्या पोटीं रामगुप्तासारखं सन्तान जन्माला यावं ही मोठी आश्चर्याची गोष्ट म्हटली पाहिजे. त्या निर्लज्ज रामगुप्तानं ध्रुवस्वामिनीचं मन या बाबतींत वळवा- यसाठीं काय काय केलं तें तूं ध्रुवस्वामिनीच्या तोंडूनच ऐकलंस तर जास्त बरं होईल.''

ध्रुवस्वामिनीनें मला सारी हकीकत सांगितली. ती म्हणाली—''त्या वेळीं राम- गुप्ताच्या तोंडचे उद्गार ऐकतांना मला भयंकर संताप व आश्चर्य वाटत होतं. तो सांगत होता—' देवि ! प्रबळ शत्रु गुप्तवंशाचा उच्छेद करायला मागतोय. तसं म्हटलं तर मी याची तितकीशी पर्वा केली नसती. परंतु तो आमच्या प्रजेवरहि अत्याचार करून तिचे हाल करील. गांवंच्या गांवं जाळलीं जातील. शक लोक महा- क्रूर असतात. ते स्त्रिया, मुलं, म्हातारीं माणसं या सर्वांच्या रक्तानं आपले हात रंगवून घेतल्या खेरीज परत जाणार नाहींत. म्हणून माझ्या प्रजेच्या हितासाठीं मला माझ्या पत्नीचा त्याग करणं आवश्यक वाटलं.' ''

'' त्याला रघुकुलांतला राम व्हायचं होतं ! छीः ! ! ''

'' माझ्या अंगाचा भडका उडालेला होता. मी होतें मालवांची कन्या व गुप्त- वंशाची पट्टराणी. मी त्याला चांगलाच सुनावला. मातुल भट्टारक ! तुम्हीच विचार करा बरं. ही बेशरमपणाची परमावधि नव्हे का ? ज्या रामानं आपल्या पत्नीच्या रक्षणासाठीं लंका जाळून फस्त केली, त्याचं उदाहरण हा प्रजारंजनासाठीं देतो ! मी विचार केला, हा नीच इसम माझा नवरा राहतांच कामा नये; मालवगणाची

कम्या वेरया होतां कामा नये. मी चन्द्राला सगळं सांगितलं. चन्द्रहि कांहीं तरी निराळाच विचार करतोय हें मला ठाऊक होतं. रामगुप्ताला त्याचा भयंकर धाक वाटत असे, पण भेकडाच्या अंगांत कांहीं करायची शक्ति कुठून असणार ? चन्द्रानं माझे अश्रु पुसतां पुसतां मला सांगितलं--' मी अगोदर माझे प्राण देईन अन् मगच तुला गुप्त वंशाला कलंक लावायला भाग पाडलं जाईल. ' चन्द्राच्या अंगांत हवे तितके दोष असतील हें तुम्हांला ठाऊक आहेच. पण भेकडपणाचं नांवहि त्याला सहन व्हायचं नाहीं. "

पुढची हकीकत चन्द्रानें सांगितली-- " प्रतिस्पर्धी राजाच्या लक्ष्मीचाच नव्हे तर पत्नीचासुद्धां अपहार करूं इच्छिणारा देवपुत्रशाही अगदींच उल्लू व आंधळा असला पाहिजे हें मी समजून चुकलों. शकराजाशीं समोरासमोर लढण्यांत यशाची आशा फार कमी आहे हा विचार माझ्या मनांत आला. माझ्या शिपायांच्या शौर्यावर माझा पूर्ण विश्वास होता. परंतु बलाधिकृतांच्या बाबतींत मात्र माझं तेंच मत नव्हतं. नीच शकराजाला कपटानंच जिंकतां येईल असा विचार करून मी एक निराळाच बेत आंखला. या बेतांत धोका होता. परंतु ज्यानं मरायचाच संकल्प केला, त्याला कसचा धोका आलाय ? मी वीरसेनाशीं सल्लामसलत केली. त्याला माझं मत पुरतेपणीं पटलं. अन् तो स्वतःच माझ्या बरोबर आगींत उडी घ्यायला तयार झाला. त्यानं पांचशें बेडर जवानांची निवड करायला मला मदत केली. मी त्या जवानांना चक्क सांगून टाकलं -- ' शत्रूच्या घरांत आपल्याला घुसायचंय. त्याला जर अक्कल असेल तर तो इतका गाफील राहणं शक्य नाहीं. मला फारशी आशा नाहीं. पण मगध राजवंशा-बरोबर मगधांची इज्जत उघड्या डोळ्यांनीं शत्रूच्या हातीं देणें आपल्याला सहन होणार नाहीं. एका अर्थी आपण बलिदान करायला जात आहोंत. म्हणून ज्याला मरणाचं वाईट वाटत नाहीं अशानंच आमच्याबरोबर यायला तयार व्हावं. सर्वांनीं एका आवाजांत आपण तयार असल्याची घोषणा केली. मी ध्रुवदेवीचीं वस्त्रें नेसलों अन् माझ्या सहकाऱ्यांनाहि स्त्रीवेष दिले. आम्ही सारेच तरणे बांड गडी होतों. लांबसडक केसांची परिणति सुन्दर वेण्यांमध्यें झाली. मिशी-दाढीचा कांहीं मागमूसहि राहूं दिला नाहीं. दर पांच पांच इसमांना एकेक वस्तरा दिलेला होता. पहांटे उठतांच आम्ही तोंडावरून वस्तरे फिरवीत असूं व वर खूप मुखचूर्ण फांशीत असूं. "

" चन्द्र ! तुझीं नाटकं मी पाहिलेलीं आहेत. तूं या कामांत आपली सारी कला खर्ची घातली असशील याबद्दल मला खात्री आहेच. "

" परंतु कधीं काळीं ती कला येवढी उपयोगी पडेल हें तीं नाटकं करीत असतांना चुकून सुद्धां मला कधीं वाटलं नव्हतं. मी रामगुप्तासमोर माझी योजना मांडतांना सांगितलं-- ' भायर ! एक वेळ मला प्राणांशीं खेळ खेळायची संधि दे. कुणी सांगावं ?

आम्हांला यश मिळेलहि. कमींतकमी थोडी सवड तरी मिळेल. ' रामगुप्ताला अत्यंत आनंद झाला. त्यानें मला हृदयाशीं धरून माझ्या पराक्रमाबद्दल मला धन्यवाद दिले. त्याच्या मनांत एका दगडानं दोन पक्षी मारायचा विचार आल्यामुळं तो खूष झाला आहे हें मी जाणून होतों. त्यानं शकराजाकडे अत्यंत नम्रता दर्शवून संदेश पाठविला कीं ' मी माझ्या महादेवीला परिचारिकांसह आपणांकडे रवाना करायला तयार आहें. परंतु आपण आपली अट मोडूं नये. ' पांचशें शिबिका ( पालख्या ) बरोबर घेऊन ध्रुवस्वामिनी शत्रूच्या गोटांत चालली. शकराज ध्रुवस्वामिनीची भेट घ्यायसाठीं उतावीळ झालेला होता. आम्ही त्याच्या स्कंधावार ( छावणी ) मध्यें पोंचलों. यमुनेच्या पैलतीरावर बुरख्यांत लपलेलं माझं अर्धनग्न सौन्दर्य पाहून त्याचं समाधान नाहीं झालं. त्यानं माझ्या चेहऱ्यावरचा बुरखा काढला. माझ्या टपोऱ्या डोळ्यांतली काजळाची कोर व हास्याची नाजूक लकेर पाहून तो खूपच प्रसन्न झाला. त्यानं ' प्रियतमे ' असं संबोधून माझ्या खांद्यावर हात ठेवला. मी तिरप्या नजरेनं बघत गांलातल्या गालांत हसलों अन् त्याचा हात त्याच्या जांघेला लावला. "

" चन्द्र ! तूं अगदीं कसलेल्या नटाप्रमाणं ध्रुवस्वामिनीचा पार्ट कसा हुबेहुब केला असशील याची जाणीव आहे मला. "

" पहिल्या सपाट्याला येवढं यश मिळाल्याचा मला अपार आनंद झाला. रात्र झालेली होती, अंधःकार दूर करायसाठीं प्रासादांत दीपक जळत होते, परंतु माझ्या हृदयांतला अंधःकार कमी नव्हता झालेला. माझं हृदय राहून-राहून धडधडत होतं. देवपुत्र आपल्या नव्या राणीच्या जवळ आला. कापिशेयी लाल सुरा व सुवर्ण-चषक सजवून ठेवण्यांत आले. चेटींनीं नृत्यसंगीत सुरू केलं. आम्ही दोघं एका आसनावर बसलों. मी मोठ्या प्रेमानं आपल्या प्रियतमाच्या ओंठाला चषक लावीत होतों ! तो मला सुरा पाजीत होता अन् मी त्याला पाजीत होतों. जास्त कोण प्याला असेल हें तुला स्वतःला समजलं असेलच ना ? "

" अरे दुर्दैवी देवपुत्र शाही ! भगवान कौटिल्याचं वरदान घेऊन कुणी तुझ्या अन्तःपुरांत आला आहे हें तुला कुठून ठाऊक असणार ? "

" जोखिम केवढीहि असली तरी ज्या माणसाला आपलं मन शांत ठेवायची कला अवगत आहे त्याला अपयश मिळायचचं नाहीं. शकराजाचे डोळे मद्यासारखेच लालेलाल झालेले होते. अधून मधून त्याला पेंग येत होता, अन् तो आपले हात कधीं माझ्या खांद्यावर ठेवी तर कधीं बेलफळाशीं स्पर्धा करणाऱ्या कृत्रिम स्तनांवर. अन् मध्येंच तो माझ्या गालांचं चुंबन घेई. मी परिजनांना निरोप दिला. चेटीसुद्धां बिछाना नीट करून शय्यागारांतून बाहेर गेल्या. अजूनहि तिथं एक दीपक तेवत होता. तो तर अगदींच अधीर झालेला होता. मी सांगितलं–'मला दिवा असतांना लाज वाटते.'

बाहेर उभ्या असलेल्या प्रतीहारीला मी कापऱ्या आवाजांत दिवा मालवायला सांगून दिलं. प्रतीहारी कोण उभी असेल हें तर तुझ्या लक्षांत आलं असलंच पाहिजे. "

" प्रतीहारीच काय, तुझ्या साऱ्या प्रासादांत कोण कुठं उभं असेल याची कल्पना आहे मला. "

" शकाचं काळीज कुठं आहे हें मी नीट पाहून घेतलं. दारूच्या धुंदीमुळं तो अगोदर अर्धमेला झालेलाच होता. मी आलिंगनाचा बहाणा करून सरळ त्याच्या काळजांत खूप जोरांत सुरी खुपसली अन् त्याच वेळीं माझा डावा हात त्याच्या तोंडावर होता. त्याला आवाजसुद्धां काढतां आला नाहीं. कांहीं करण्याइतका जर तो शुद्धींत असता तर त्याचीहि तरतूद आम्ही करून ठेवलेली होती. पन्नास तरुण तर आमच्या महालाच्या आसपासच हजर होते. आम्ही त्याच वेषांत निरनिराळ्या वाटांनीं प्रासादांतून निघून आलों. अगोदर ठरवून ठेवलेल्या जागीं आम्ही एकत्र जमलों अन् सारी रात्र दौडत निघालों. आमचे सैनिकहि तयार होते अन् त्यांनीं आमच्यासाठीं घोडे पाठवून दिलेले होते. आमच्या सरहद्दीवरच्या स्कंधावारमध्यें पोंचल्यावर मी सारी हकीकत सेनेसमोर सांगितली. सगळे लोक आनन्दानें बेहोष झाले. चहूंकडे युवराज चन्द्रगुप्ताचा जयजयकार होऊं लागला. मी त्याच वेळीं सेनापतींना शकसेनेवर हल्ला करायचा हुकूम दिला. मग वीरसेन व इतर सहकाऱ्यांना घेऊन मी रामगुप्ताच्या शिबिरांत गेलों. त्याला अगोदरच बातमी मिळालेली होती. परंतु ब्रह्मदेवानं साऱ्यांना बुद्धि वांटली त्या वेळीं हा तिथं जरा उशीरां पोंचला हे हें तुला ठाऊक आहेच. ध्रुवस्वामिनी तिथं हजर होती. दिवसाची वेळ होती. राम-गुप्ताच्या जवळपास कांहीं शरीर-रक्षिका होत्या. परंतु त्या मोठ्या यशामुळं माझा आत्मविश्वास खूप वाढलेला होता. तो आलिंगन द्यायसाठीं माझ्याजवळ आला. शकाच्या काळजांत खुपसलेली तीच सुरी आतांहि माझ्या कमरेला होती. मी मागं-पुढं न पाहतां ती त्याच्या काळजांत खुपसून दिली. तो ' आः ! ' करून जमिनीवर कोसळला व अखेरचे आंचके देऊं लागला. ध्रुवस्वामिनी धांवत येऊन माझ्या छातीशीं बिलगली. तिच्या डोळ्यांत अश्रु होते, पण ते आनन्दाश्रु होते. शरीर-रक्षिका दगडी मूर्तींसारख्या निस्तब्ध उभ्या राहिल्या. मी जोरांत म्हणालों—' काय ग, अेकड्यासाठीं संताप वाटतो तुम्हांला ? ' याच वेळीं ध्रुवस्वामिनीचा आवाज ऐकूं आलाः ' जेदु जेदु भट्टा ! ' इतर चेटींनीं उच्च स्वरांत पुकारा केलाः ' जेदु जेदु भट्टारक चन्द्रगुप्त. ' आतां गुप्तराजलक्ष्मीचा स्वामी चन्द्रगुप्त होता. "

" अन् ध्रुवस्वामिनीचा देखील. "

चन्द्रगुप्ताचा चेहरा जरासा उतरला होता हें मला दिसलें. म्हणून मी म्हणालों—" तुला बहुधा दुसरा कोणता मार्गच राहिलेला नव्हता. "

" बरोबर बोललास. भावाचा खून ही राजकुलांत अगदीं मामुली गोष्ट झालेली आहे. भावाचा खूनच काय, राजपुत्रांना तर 'जनक-भक्षक' असं चक्क म्हणतातच. मी माझ्या भावी कार्याच्या बाबतींत अगोदर जेव्हां कधीं विचार करीत असें तेव्हां रामगुप्ताला मारायची कल्पना माझ्या मनांत कधीच येत नसे. त्याला कैद करून ठेवावं असं मात्र नक्कीच वाटत असे; कारण अशा पंगू बुद्धीच्या माणसाला मारायची कांहीं जरूर नाहीं असं मी समजत होतों. पण रामगुप्तानं ध्रुवस्वामिनीचं दान करायची इच्छा प्रकट केल्यामुळं मी अत्यंत निष्ठुर झालों. समुद्रापर्यंतच्या साऱ्या राजेलोकांना आपल्या पायाशीं लोळवणाऱ्या समुद्रगुप्ताच्या सुनेला तो राक्षस शकांच्या शिबिरांत पोंचवून मोकळा झाला होता. त्याच्या या कार्यांत त्याच्याशीं सहमत झालेल्या अमात्यांनीं मागाहूनहि त्याला आपल्या हातचं बाहुलं केलं असतं. मला एकाच वेळीं सारे झगडे खलास करायचा निश्चय करावा लागला."

*　　　　*　　　　*

शिशिर ऋतूंतली संध्याकाळची वेळ. ध्रुवदेवी, चन्द्रगुप्त व मी एका नावेंत बसलेलों होतों आणि जवळपास प्रतीहार, प्रतीहारी व परिजनांच्या आणखी कितीतरी नावा चाललेल्या होत्या. आम्ही अन्तःपुराच्या समोरून वरच्या अंगाला धीरेधीरे चाललों होतों. इथें गंगा-यमुनांचा संगम आहे. एकीकडून यमुनेची नील धारा व दुसरीकडून गंगेची शुभ्र धारा यांचें मीलन होत होतें. दोहोंच्या मधोमध दूर अंतरापर्यंत शुभ्र वाळवंट दिसत होतें. त्यावर तपस्व्यांच्या कितीतरी पर्णकुटी होत्या. माझा जन्म अग्रोदकांत झालेला; तिथें अशी नदी नाहीं. पण एक वर्षाचा झाल्यापासून मी गंगेची गंभीर धारा पाहात आलेलों होतों. तिच्यांत कित्येक घटका पोहण्याचा आनंद मी घेत असें. बालकाचें जसें आपल्या आईवर प्रेम असतें तसें माझें गंगेवर प्रेम होतें. गंगेपासून दूरवर प्रवासाला गेलों तेव्हां तर हें प्रेम आणखीच वाढलें. मी अगदीं लक्षपूर्वक गंगेच्या धारेकडे टक लावून बघत होतों. चन्द्रगुप्तानें माझ्याकडे पाहून मला विचारलें–" काय जय ! तूं गंगेकडे अशा तऱ्हेनं बघतोयस कीं ती जशी कांहीं नवीच चीज आहे."

" गंगा मला सदैव नवीच वाटते. ही धार जिथं अतिशय बारीक आहे अशा ठिकाणींहि मी तुझ्या बरोबर पाहिली होती. तिथल्या बारीकपणाची उणीव तिनं आपल्या कलरवानं भरून काढलेली आहे."

" उत्सव-संकेत ! हिमालय ! किती चांगले होते ते दिवस ! त्यावेळीं आपण चमरीवर बसून कापरासारख्या शुभ्र हिमराशीकडे चाललों होतों. तिथले ते देवदारांचे भव्य वृक्ष ! अन् त्यांच्यांतून दरवळलेला तो सुगन्ध !"

" गंगा इथं जितकी सुन्दर आहे तितकीच ती आपल्या उगमस्थानींहि सुन्दर आहे. त्यांत पुन्हां इथलं हें संगमाचं दृश्य तर आणखीच मनोहर आहे. चन्द्र! तूं प्रतिष्ठान ही आपली राजधानी करून गंगेची संगत ठेवलीस हें फार चांगलं केलंस."

" माझे मित्र अमात्य तर मी माझी दुसरी राजधानी गंगा-यमुनांच्या मधोमध वसवावी असं मत देत होते."

" तसं केलं असतं तर छानच झालं असतं. दोन्ही धारांचं दर्शन होत राहिलं असतं. मग त्या नगरीला तुला स्वतःचं नांव देतां आलं असतं, नाहीं का?"

" होय. तिला विक्रमपुरी म्हणतां आलं असतं. मी विक्रमादित्य ही पदवी घेतलेली आहे हें तुला ठाऊक आहेच ना?"

" तुझ्या अंगीं विक्रम आहे हे कुणाला तरी नाकारतां येईल का?"

" पण विक्रमपुरी वसवायसाठीं प्रतिष्ठानाशीं स्पर्धा करणारी दुसरी नगरी वसवणं मला आवडलं नाहीं. निदान या दोन नद्यांच्या दरम्यान तर नाहींच नाहीं."

" हरकत काय होती?"

" या दोन्ही धारा अलग अलग असलेल्या मला बघवत नाहींत. मला केवळ एक धार हवी आहे. दोन्ही धारांचं अलग अस्तित्व माझ्या डोळ्यांत कांट्यांसारखं सलत राहतंय."

" अन् प्रतिष्ठानच्या अन्तःपुरांतून तर तुला एकच धार पाहतां येते."

" पिता भट्टारकांना ( बाबांना ) जर कदाचित इथं एकादी नगरी वसवावीशी वाटली असती तर त्यांनीं ती या दोन धारांच्या दरम्यानच वसवली असती. ते धारांच्या एकीकरणाचे पुरस्कर्ते नव्हते. मला मात्र एकच धार बघावीशी वाटते."

" चन्द्र! एक धार बघणं अगर एक धार करणं फार कठीण असतं!"

" कठीण तर नक्कीच आहे. पण त्याच्याशिवाय दुसरा कांहीं मार्गच नाहीं. दिग्विजयांत राजांच्या मुकुटांना पायानं स्पर्श करून सोडून देणं हा कांहीं विजय नव्हे. अशानं राजशक्तीला कसलीच शक्ति राहात नाहीं. मला हवंय एक शक्तिशाली राज्य; अन् असं राज्य कीं जे कांहीं काळ चालू राहील."

" कांहीं काळ म्हणजेच कायमचं ना?"

" 'कायमचं' म्हणणं फाजील धाडसाचं आहे. 'पुष्कळ काळ' म्हणतां येईल. अन् जय! गुप्त वंशाच्या बाबतींत माझा हाच विचार आहे हें बहुधा तुझ्या लक्षांत आलं असेलच."

" विचार करायला हरकत काय? आपल्या वंशाची अभिवृद्धि सर्वांनाच हवी असते."

" अडचण तर हीच आहे. कितीतरी राजवंश नामशेष झालेले बघून सुद्धां मी असलाच विचार सांगायचा म्हणजे माझ्या सागण्यांत चूक नाहीं का होत? पांच पिढ्यां-पर्यंत सुद्धां लायक राजे निर्माण करायचं सामर्थ्य ज्यानं दाखवलंय असा कोणताहि राजवंश दिसतच नाहीं. एका पिढींतच गाडं उलटलेलं दिसतं; मग पांच पिढ्यांची गोष्टच सोड. पिता भट्टारकांचाच प्रकार नाहीं का पाहिलास तूं? गुप्तवंशाला भारताचा चक्रवर्ति त्यांनींच केला. पण म्हतारपणीं त्यांनीं काय सांगितलं? "

" गादींच्या आद्य संस्थापकाला जास्त झटावं लागतं. कारण तो आलेला असतो एखाद्या सामान्य अज्ञात वंशांतून. त्याच्या पाठीशीं कसलाच इतिहास नसतो, खानदा-नीचं वैभव नसतं, वजनदारपणा नसतो. पण त्याच्या वंशजांना या साऱ्या गोष्टी फुकटांत लाभलेल्या असतात. तरीसुद्धां कोणत्याहि राजवंशाला पांच पिढ्यांपर्यंतहि आपलं पूर्ववैभव कायम राखतां येत नाहीं हें तुझं म्हणणं खरंहि आहे, अन् ही आश्चर्याची गोष्ट म्हटली पाहिजे. "

" त्यांत आश्चर्य कसलं? सुरा-सुन्दरीच्या नादीं लागतात अन् आपला सारा मोठेपणा, इभ्रत व शक्ति घालवून बसतात. पण जय! तुला भगवान कौटिल्य तर आवडत नाहींत. "

" अजीबातच आवडत नाहींत अशांतली गोष्ट नाहीं. खरं म्हटलं म्हणजे यवनांच्या तावडींतून भारत दोनशें वर्षे मुक्त ठेवणं हें त्यांच्याच दूरदर्शीपणाचं फळ आहे. "

" बस्स. मलाहि तेंच हवंय. मात्र मला माझ्या वंशांत अशी परंपरा कायम चालवायला हवी आहे कीं जिच्यामुळं सुरासुन्दरींना राज्यकारभारांत कसलाहि अड-थळा आणतां येणारच नाहीं—माझे वंशज योग्य आहारविहार करणारेच असले पाहिजेत. परंतु मी केवळ माझ्याच वंशाचा विचार नाहीं करीत. राजवंश कोणताहि यावा, पण तो असा मजबूत असावा कीं कुणाहि शत्रूला भारताकडे वांकड्या नजरेनं बघायची हिंमतच होऊं नये. "

मी विचार करूं लागलों—चन्द्रगुप्ताचे विचार तसे कांहीं वाईट नाहींत. पण माणसं म्हणजे निर्जीव विटा तर नव्हेतच. एकाच जातीच्या चिकणमातीच्या विटा एकमेकींवर अशा घट्ट दाबून बसवाव्यात कीं मधला सांधासुद्धां समजून येऊं नये. मग भिंत फार सुन्दर दिसेल अन् ती चांगली मजबूतहि होईल हें नक्की. पण माणसें म्हणजे गवंड्याच्या हातांतल्या निर्जीव विटा नव्हत. कर्तबगार मानवाच्या पुढारी-पणाखाली एकत्र होणें ही त्यांना फायद्याची गोष्ट वाटते. आमच्या यौधेय गणांत साऱ्यांना ठोकाठोक करून एक करणारी चन्द्रगुप्तासारखी कुणी व्यक्ति नव्हती. अग्रो-दका, पृथूदका, खंडिला, रोहितकी, इत्यादि लहान-लहान गणांमध्यें विभागलेल्या

मानवतेची अशी एक अभेद्य भिंत तयार झाली कीं तिला ज्यानं ज्यानं टक्कर दिली त्याला त्याला डोकं धरून परत फिरावं लागलं. कुणी रचली ही भिंत ? चन्द्रगुप्ताच्या मनांत एकतंत्री अमलाखेरीज दुसऱ्या प्रकारचा विचार येत नाहीं, हा त्याचा दोष नव्हे. तो ज्या निरंकुश राजसत्तेत जन्माला आला, तिचा हा दोष आहे. त्याच्या समोर स्वतः-सारख्याच सर्वशक्तिमान राजांचे दाखले आहेत. त्यांनीं हुकुम करतांच लोकांना उठावें लागतें, त्यांच्या हुकुमाप्रमाणेंच बसावें लागतें हेंच त्याला दिसतें. त्याच्या समोर ब्राह्मणांचा भला मोठा सर्वशक्तिमान परमेश्वर आहे. हा परमेश्वर कधीं कधीं कच्च्या मातींतून मनाला वाटेल ती वस्तु तयार करतो. अन् कधीं कधीं त्याला मातीचीहि जरूर नसतें.

चद्रगुप्ताचें बोलणें ऐकतांना माझ्या मनांत अधून मधून अशा प्रकारचे विचार येत होते. तो पुढें सांगूं लागला--" पिता भट्टारकांनी ज्या साधनांनीं दिग्विजय सुरू केला, त्यांच्यापेक्षां बरींच जास्त साधनं माझ्याजवळ आहेत. त्यांच्या जोडीला गुप्तांच्या तरवार बहादुरीचा लौकिक व रुबाबहि मला वडिलार्जित संपत्तीच्या रूपानं मिळाला आहे. मलाहि दिग्विजय सुरू करतां येईल अन् कदाचित् त्यांच्याहून अधिक यश मिळेल मला. पण मला असला नांवापुरता दिग्विजय नकोय. मला माझ्या राज्याची सीमा पश्चिम समुद्रापर्यंत न्यायला हवी आहे. "

त्याचा चेहरा गंभीर झालेला होता. त्यानें कसला तरी दृढ संकल्प केला आहे असेंच जणूं त्याच्या चेहऱ्यावरून दिसत होतें. मी विचारलें--"पश्चिम समुद्रापर्यंत?"

" होय. पश्चिम समुद्रापर्यंत. जसा पूर्व समुद्र ( बंगालचा उपसागर ) आमच्या हातीं असल्यामुळं पूर्वेकडच्या यवद्वीप व चीनपर्यंतच्या साऱ्या द्वीपांचा व्यापार आमच्या हाती आहे, तशींच पश्चिम समुद्राचीं ( अरबी समुद्राचीं ) पत्तनं ( बंदरं ) आमच्या हातीं आल्यावर पश्चिमेकडच्या यवन, पारस्य वगैरे देशांचाहि व्यापार आमच्या हातीं येईल. आजकाल लक्ष्मी व्यापारांत आहे. मग माझा खजिना इतका भरगच्च भरेल कीं मी जिकडे जिकडे म्हणून नजर वळवीन तिथला तिथला राजमुकुट माझ्या पायांशीं येऊन पडेल. "

" म्हणजे चन्द्र ! तुझी नजर क्षत्रप अन् वाकाटकांवर आहे म्हणायची ! "

" होय. क्षत्रपांचा तर मी मागमूसहि राहूं देणार नाहीं. त्यांनीं पुन्हां डोकं वर काढायचा अवकाश कीं चन्द्रगुप्तानं त्यांना चिरडून टाकलंच म्हणून समज. "

" पण क्षत्रपांच्या ताकतीचा विचार केला आहेस का ? "

" सत्यसिंह अन् रुद्रसेनापेक्षां महाक्षत्रपाची ताकत जास्त आहे. अन् केवळ त्याच्या मुकुटाला आपल्या पायाचा स्पर्श करून चन्द्रगुप्ताचं समाधान होणार नाहीं हें त्याला कळलं कीं तो ' मरणारा काय करणार नाहीं ? ' या नीतीचा अवलंब

करील. पण चन्द्रगुप्तानंहि तयारी केलेली आहे. पिता भट्टारकांच्या वेळच्या म्हाताऱ्या बलाधिकृतांनीं आतां नुसती सन्मानाची आशा धरावी, अधिकाराची आशा त्यांनीं धरूं नये. ''

" अधिकाराची आशा धरूं नये म्हणजे ? ''

'' म्हणजे आतां सेनेचं संचालन त्यांच्या जीर्ण, निर्बल, भेकड हातीं ठेवलेलं नाहीं. ''

" पण त्यांना कित्येक वर्षांचा अनुभव आहे तो ? "

'' अनुभवाचा फायदा घ्यायला मी तयार आहें. त्यांची सल्ला मसलत मला घेतां येईल. पण त्यांच्या निर्णयावर माझा विश्वास नाहीं. त्यांच्या रणकौशल्यावर माझा विश्वास नाहीं. त्यांनीं जें कांहीं शिकून घेतलंय तें आज अस्तित्वांत नसलेल्या पन्नास साठ वर्षां पूर्वीच्या दुनियेंतलं होतं. त्यांच्या अनुभवापासून आजच्या दुनियेला जें कांहीं शिकतां येईल तें शिकायला मी केव्हांहि तयार आहें. ''

" म्हणजे म्हाताऱ्या लोकांच्या हातीं अधिकार द्यायला तूं तयार नाहींस ? "

'' म्हाताऱ्यांच्या हातीं व जुन्या राजवंशांच्या हातींहि अधिकार द्यायला चन्द्रगुप्त तयार नाहीं. म्हातारे लोक पंगु असतात. पिकावर पडलेल्या पिवळ्या रोगासारखी त्यांची स्थिति असते. अन् जुने राजवंश आपल्या जुन्या वैभवाची आठवण ठेवून सदा संधि शोधत असतात. जितकं जमेल तितक्या प्रमाणांत त्यांच्या हातांतली सेना व राज्यकारभार मला काढून घ्यायचांय. तूं बहुधा चन्द्रगुप्ताचे उपरिक ( व्हाइसरॉय ) व कुमारामात्य ( जिल्हाधिकारी ) बघितले नसशील. आमच्या भुक्तींवर ( प्रदेशांवर ) आम्ही नव्या प्रकारचे उपरिक नेमलेले आहेत अन् विषयांवर ( जिल्ह्यांवर ) नव्या प्रकारचे कुमारामात्य नेमलेले आहेत. ''

'' म्हणजे आतां उपरिक हे महाराज नसतील ? ''

'' महाराज ही पदवी त्यांना आमच्याकडून दिली जाते. त्यांना तिच्यावर वंशपरंपरेनं अधिकार सांगतां येत नाहीं. आणखी एक गोष्ट सांगूं ? सेनेखेरीज बाकीच्या हुद्द्यांसाठीं मला ब्राह्मण लोक फारच उपयुक्त वाटतात. योद्धा होण्याची योग्यता ब्राह्मणांच्या अंगीं क्वचितच आढळते. त्यांच्या अंगीं राजे लोकांची सेवा करायला सदैव तयार असलेली बुद्धि असते. पण त्यांचे हात तरवार धरायला योग्य नसून स्रुवा ( होमांत तूप घालायला चमचा ) धरायला योग्य असतात.

'' पण चन्द्र ! तूं पुष्यमित्राला ओळखतोस ना ? ''

'' पुष्यमित्र शुङ्ग ब्राह्मणहि आहे अन् मौर्यांचा सेनापतिही आहे. त्यानं धन्याला दगा दिला अन् आपलं राज्य स्थापन केलं. मौर्यांनीं चूक केली. खड्ग चालवणाऱ्या

ब्राह्मणाची आम्हांला आवश्यकता नाहीं. पण कौटिल्याच्या बुद्धीची मात्र जरूर आवश्यकता आहे. ”

“ म्हणजे सेनेसाठीं तूं क्षत्रियांना उपयुक्त समजतोस ? ”

“ होय. ज्यांच्या अंगीं कुलपरंपरेनं लढाऊ बाणा आलेला आहे असे क्षत्रिय असावेत. मात्र राजमुकुटाच्या परंपरेतले क्षत्रिय नकोत मला. राजमुकुट ही चीजच अशी आहे कीं तिची छाया पडतांच वीरता लुप्त होऊन जाते. ”

“ राजमुकुटाला तूं इतका वाईट समजतोस ? ”

“ जय ! तुला आनंद झाला ना हें ऐकून ! कांहीं झालं तरी तूं आहेस यौधेय !”

“ पण चंद्र ! तें रक्त तुझ्या अंगांतहि आहेच ? ”

“ मला त्याचा अभिमान वाटतो. भविष्यकाळाच्या बाबतींतहि माझी सारी मदार ध्रुवस्वामिनीच्याच पुत्रावर आहे. ” असें म्हणून गालांतल्या गालांत हंसत चन्द्रानें आपल्या महादेवीकडे पाहिलें. ध्रुवस्वामिनी चंद्राचा हात आपल्या हातांत घेऊन प्रसन्न नजरेनें म्हणाली—“ आर्यपुत्र ! शौर्याच्या बाबतींत तुमची सारी भिस्त गणांवरच आहे ना ? ”

“ कारण तिथं राजमुकुटाची सांवली नाहीं पडत. माझे वडील गण-कुमारीच्या पोटीं जन्मले, मी गण-कुमारीच्या पोटीं जन्म घेतला, अन् तूं मला असाच पुत्र देशील अशी आशा आहे मला. ” असें म्हणून चन्द्रानें ध्रुवस्वामिनीच्या हनुवटीवर हात ठेवला.

अवरोधाच्या ( अन्तःपुराच्या ) बाबतींत नवतरुण चन्द्रगुप्त इतका संयम पाळूं शकेल अशी मला आशा वाटणें शक्य नव्हतें. पण आपल्या ध्येयासाठीं हवें तें करावयाची त्याची तयारी होती. त्याचा सिद्धान्त असा कीं एकेका स्त्रीचा उपभोग दोन दिवस घ्यावयाचा असला तर घ्यावा पण दोन दिवस उपभोग घेतल्यानंतर स्त्रियांची फौजची फौज अन्तःपुरांत डांबून ठेवण्यांत काय अर्थ ?

ध्रुवदेवी खरोखरीच आपली सासू दत्तादेवी व आजेसासू कुमारदेवी यांना शोभण्याजोगी वधू होती. ती केवळ चन्द्राच्या होला हो म्हणण्यावर थांबणारी स्त्री नव्हती. तिचे विचार इतके पक्के होते कीं ते ऐकण्यासाठीं चन्द्र तत्परतेनें तयार असे आणि दोघांमध्यें एकमेकांविषयीं प्रेम किती होते हें सांगावयाची जरूरच नाहीं. तिला ध्रुवदेवी म्हणण्याऐवजीं स्वामिनी अगर ध्रुवस्वामिनी म्हणण्यांत तो आपल्या हृदयांतील भावनाच प्रकट करीत होता. माझ्यावर तिनें जेवढा प्रभाव पाडला होता तेवढ्यानें, माझ्या जागीं दुसरा कुणी माणूस असता तर तो गुप्तांचा गुलामच झाला असता. मी राज-मातुल ( राजाचा मामा ) होतों हें तर खरेंच. पण राजकुलांत

असले राजमातुल पैशाला पासरी भटकत असतात, त्यांना कुणी सुद्धां विचारीत नाहीं. शेंकडों चेटी असतांना ध्रुवदेवीनें मला जवळ बसवून घेऊन आपल्या हातानें जेऊं घालण्याची व मला हरप्रकारें सुखी व राजी राखण्यासाठीं खटपट करण्याची कांहींच जरूरी नव्हती. तिनें हें वर्तन कांहीं तरी बहाणा योजून केलें असो अगर कांहींहि असो, ती साऱ्या गोष्टी अगदीं सहजगत्या करीत असे. विनोद करण्यांतहि ती फारच चतुर होती. एक दिवस ती सांगू लागली—

" मातुल भट्टारक! तुम्ही दोघेहि अज्जुकाच्या मांडीवर लहानाचे मोठे झालांत. तुम्ही दोघे सारख्या वैभवानं नांदत असलेले बघायचं भाग्य अज्जुकाला लाभलं नाहीं, पण मला तुम्ही तसं व्हायला हवंय. " हें सांगतांना तिचे डोळे जरा भरून आल्यासारखे झाले होते.

मी हंसत म्हणालों— " हें चीर-चीवर अंगावर ठेवून ही गोष्ट कशी शक्य होणार ? "

" चीर-चीवर कायमचं थोडंच आहे ? कितीतरी राजकुमार कांहीं काळ चीर-चीवर परिधान करतात अन् मग तें सोडून देऊन गृहस्थाश्रमी होतात. तुम्हांला मी बघितलं तेव्हांपासूनच तुम्हांला आपल्याजवळ कसं ठेवून घ्यावं याचाच विचार करत्यें आहे. "

" म्हणजे पदरांत कसं बांधूं याचा ना ? "

" हो. पदरांत बांधत्यें असं म्हण. माझ्या धाकट्या बहिणीच्या पदरांत तुला बांधवून घ्यायला हवंय मला. "

" म्हणजे मग मी मातुल भट्टारक नाहीं राहणार ? "

" मातुल भट्टारक असं मी तुला म्हणत्यें आहे तर खरी. पण तुम्ही एकमेकांना अरे तुरे म्हणतांना मी ऐकलं तेव्हां मीहि क्षमा-प्रार्थना न करतांच मातुल-भट्टारकांना अरे-तुरे म्हणूं लागल्यें. मातुल-भट्टारक! अरे-तुरे म्हणगं तुला गैर नाहीं ना वाटत ? "

" विधात्यानं तुझी जीभ घडवतांना स्वर्ग अन् मृत्युलोक या दोहोंमधल्या मधुर साधनांचा उपयोग केला असला पाहिजे. ध्रुवभट्टारिका! खरोखरीच इतकं मधुर बोलणं तुला कसं काय जमतं ग ? "

" माझी बहीण या गुणांत माझ्यापेक्षां कमी नाहीं हं, मातुल भट्टारक! "

" मग तिच्यासाठीं एखादा चन्द्रगुप्त मिळायला हवा. "

" म्हणजे तूं माझं बोलणं थट्टेवारी नेऊं पाहतोस. मी खरंच सांगत्यें आहे हं, तुला बघतांक्षणींच माझ्या बहिणीचा चेहरा मला आठवूं लागतो. तुम्ही दोघं ज्या दिवशीं एकत्र याल तो दिवस मला मोठा भाग्याचा वाटेल. "

" ध्रुव भट्टारिका ! तुझ्या बोलण्याचा प्रतिवाद करणं मला आवडत नाहीं. पण या बाबतींत तुझी नक्कीच चूक होत आहे. एका सुन्दर तरुणीचं जीवन चीवर-धारी रुक्ष जीवनाशीं निगडित करूं पाहत्ये आहेस तूं. "

" चीवर दूर झाल्यावर मग जीवन रुक्ष कसं राहील? मातुल भट्टारक ! आतांपर्यंत तूं आपलं जीवन रुक्ष करून टाकलं आहेस. ही सौन्दर्य-राशि घडविणाऱ्याच्या मेहनतीचा विचार नाहीं केलास तूं. अन्तःपुरांतल्या स्त्रियांशीं तूं किती अंगचोरपणानं वागत होतास तें ऐकलंय मी. "

" का ? कुणा स्त्रीनं तक्रार केली ? मी कुणा तरुणीचा अपमान केला होता ? "

" अपमान करायचं तुला जमायचं नाहीं रे, त्यांतल्या त्यांत स्त्रीच्या अपमानाची तर गोष्टच सोड-- पण तोंडानं आदर दाखवीत तूं त्यांच्यापासून दूर दूरच राहत होतास हो त्यांची तक्रार असणं शक्य आहे. पण माझी तक्रार नाहीं या बाबतींत. तूं ज्या स्त्रीला आपली म्हणशील तिला तूं आपलं सारं हृदय देऊन टाकशील याबद्दल मला खात्री आहे. "

" येवढ्याचकरतां भट्टारिका आपल्या बहिणीला माझं हृदय देववून टाकूं इच्छिते तर. पण हें चीवर टाकून दिल्यावर मगच साऱ्या हृदयाची गोष्ट बोलतां येईल, नाहीं का ? "

" पिवळ्या चीवराची शक्ति अधिक का निळ्या नेत्रांची शक्ति अधिक, तें पाहीनच मी आतां. माझी बहीण प्रतिष्ठानला यायचीच आहे. एकदां बघून घे अन् मगच काय तें बोल. "

" बघायची जरूरच नाहीं. रत्नाकरांतलं एक रत्न बघितलं कीं इतरांच्या बाबतींतलं मत ठरवतां येतं. "

ध्रुवदेवीची मोहिनी खरोखरीच मोठी जबरदस्त होती. ती दमादमानें पण इतक्या जोरानें मला आपल्याकडे ओढून घेत होती कीं मला स्वतःविषयीं काळजीच वाटूं लागली. प्रेमाचा धागा तोडणें ही मोठी मुष्किलीची गोष्ट असते अन् तोच धागा मला दिवसेंदिवस जास्त जास्तच जखडून टाकीत होता. चंद्राची तऱ्हा जरा वेगळी होती. त्यानें वेगळ्या रीतीनें मला जाळ्यांत पकडण्याचा प्रयत्न केला. तो एक दिवस मला सांगूं लागला--" जय तरुणपणींचीं जीं मनोराज्यं मी करीत होतों त्यांतला एक भाग तर सफल झालाच. पण दुसरा भाग शिल्लक आहे. " मग वळणें घेत घेत मुद्यावर येऊन म्हणाला--" जय यौधेय ज्या दिवशीं चन्द्रगुप्ताचा महाबलाधिकृत (मुख्य सेनापति) होईल त्या दिवशीं मला फार आनंद होईल. स्कन्द कुमार सेनापति मिळाल्यामुळं देवांना जसं वाटलं तसं वाटेल मला. " या सूचनेला सरळ नकार देण्याची आवश्यकताच नव्हती. माझ्या अंगावरचा चीवराचा बहाणा उत्तरादाखल पुरेसा होता.

*

## ( १७ )

# विक्रमादित्याशीं पहिलें युद्ध

आज एक युगानंतर मी अग्रोदकाला परत आलों. आतां मी अपरिपक्क बुद्धीचा किशोर राहिलेलों नव्हतों. मी तीस वर्षांचा प्रौढ तरुण होतों. माधव आणि मी दोघांनींहि यमुना ओलांडून यौधेयभूमींत पाऊल ठेवतांक्षणीं आपापलीं चीवरें यमुनेच्या नील-धारेंत सोडून देऊन गण-क्षत्रियांचा बाणा पतकरलेला होता. चन्द्रगुप्तानें मला प्रलोभन, प्रेम व मानमरातब या सर्व मार्गांनीं आपल्याकडे ओढून घेण्याचा बेत केला. यौधेय किती शूर आहेत, आणि जन्मभूमीचा सवाल आला कीं ते एकामागून एक मरायला तयार होतील पण आपल्या गणाचें अस्तित्व नष्ट होऊं देणार नाहींत, हें त्याला ठाऊक होतें. यौधेयांवर आक्रमण करण्याची गोष्ट चन्द्रगुप्तानें माझ्याजवळ कधींच काढलेली नव्हती. परंतु ही गोष्ट मनांत असूनहि तो माझ्यापासून लपवून ठेवूं पाहात आहे हें मी जाणून होतों. त्यानें क्षत्रपांचें नांव काढलें, वाकाटकांचें नांव काढलें, कुषाण देवपुत्रांचें नांव काढलें, पण कुषाण व क्षत्रप यांच्या दरम्यान आपल्या सरहद्दीवर असलेल्या यौधेयांचें नांव तेवढें नाहीं काढलें. ही स्वारी यौधेयांचें नांव कां काढत नाहीं हें मी ओळखलें. समुद्रगुप्ताला आपल्या मातृकुलाविषयीं प्रेम असलें म्हणून काय झालें ! आपल्या भाच्याला रुग-ळयांच्या अगोदर आपल्या स्वातंत्र्याचें बक्षीस देण्याइतकी चन्द्रगुप्ताला आपल्या मातृकुलाची मुळींच पर्वा वाटत नव्हती. समुद्रगुप्ताच्या अंगीं वीराला शोभणारी उदारता होती. पण चन्द्रगुप्त भगवान् कौटिल्याची मान्यता नसलेल्या कसल्याहि वीरतेला मूर्खपणा म्हणत असे. समुद्रगुप्तानें आपल्या आईबापांच्या नांवानें नाणीं पाडलीं व या दीनारांच्या मागच्या अंगाला ' लिच्छिवयः ' अशीं अक्षरें कोरवून घेऊन आपल्या मातृकुलाविषयीं प्रेम व कृतज्ञता व्यक्त केली. पण यौधेयांसाठीं चन्द्रगुप्त असलें कांहीं करील अशी मला मुळींच आशा नव्हती.

अग्रोदकांतलें माझें घर भाऊबंदांनीं संभाळून ठेवलें होतें. वडिलांची संपत्ति विश्वस्त निधि म्हणून ठेवण्यांत आलेली होती. परंतु त्याच बरोबर मलाच ते वडिलांची संपत्ति

ध कुलाचें आशास्थानं समजत होते. त्यांनीं कितीतरी वेळां माझा पत्ता लावण्याची खटपट केली पण कुठें पत्ताच लागला नाहीं. मला पाहिल्याबरोबर त्यांना अत्यंत आनंद झाला. मलासुद्धां आपल्या बांधवांमध्यें आल्याबद्दल कांहीं कमी आनंद झालेला नव्हता, पण आगामी धोक्याची त्यांना कांहीं फिकीर नव्हती हें पाहून मला दुःखहि झालें. ते बहुधा लिच्छवि-दौहित्राप्रमाणें यौधेय-दौहित्राच्या बाबतींत मोठमोठ्या आशा धरून बसले असावेत. मी गण-वृद्धांना समजावून सांगण्याची खटपट केली, परंतु हे म्हातारे लोक जुन्याच जगांत वावरत आहेत हें मला लवकरच कळून चुकलें. मग मी तरुणांकडे मोर्चा वळविला. यौधेय-नौका महाभयंकर भोंवऱ्यांत सांपडणार आहे हें मी त्यांना दाखवून दिलें. चन्द्रगुप्ताकडून आम्ही कसल्याहि दयेची आशा करतां कामा नये; दयेची गोष्ट तर राहोच, उलट सगळ्यांच्या अगोदर आम्हांलाच तो आपल्या बाणाचें लक्ष्य बनवील अशी शंकाहि मी प्रदर्शित केली. माझ्या बरोबरीचा रेवतक विचारूं लागला—" त्याच्या समोर वाकाटक व महाक्षत्रप जोंपर्यंत हजर आहेत, अजून देवपुत्राचा त्यानं पुरता निकाल लावलेला नाहीं, तोंपर्यंत आमच्याकडे तो प्रथम लक्ष कशाला देईल ? "

" कारण त्याच्या साऱ्या प्रतिस्पर्ध्यांमध्यें तो आम्हांलाच सर्वांत जास्त निर्बल समजतो. "

" तो यौधेयांना ओळखत का नाहीं ? "

" चांगलाच ओळखतोय, पण चौघांपैकीं एकाची निवड त्याला प्रथम करायची आहे. चौघांबरोबर एकाच वेळीं लढाई पुकारण्याइतका चन्द्रगुप्त मूर्ख आहे अशी तर नाहीं ना तुझी समजूत ? "

" ' एका वेळीं एक,' हीच राजनीति असते. "

" अन् मला वाटतं त्यांतला पहिला ' एक ' यौधेय होतील. "

" तो आम्हांला इतके निर्बल कां समजतो ? "

" तूं स्वतःच यौधेयवृद्धांशी चर्चा करून त्यांचं मनोगत समजून घे. गेल्या तीस वर्षांत आम्ही आमच्यांतले लढाऊपणाचे गुण वाढवले का घटवले याचा तपास तूं स्वतःच अग्रोदका, पृथूदका ( पेहुआ ), रोहितकी या ठिकाणीं अगर कुठंहि जाऊन कर. "

" पण यौधेय-तरुण तर आतांहि जन्मभूमीसाठीं सर्वस्वाचा होम करायला तयार आहेत. "

" असो. पण यौधेय-वृद्धांच्या बाबतींत तर तुलाहि तितकी आशा वाटत नाहींच. याशिवाय ज्या घराण्यांनीं गेल्या तीस वर्षांत व्यापार करून लाखो दीनारांची संपत्ति जमा केलेली आहे, त्यांना काय युद्ध आवडेल होय रे ? त्यांचे मुलगे यौधेय रहाण्या-

ऐवजीं आरत प्रमाणांत बनियेच झालेले नाहींत का? त्यांनीं कष्ट व कठोर जीवना-ऐवजीं सुख व विलासी जीवनच नाहीं का पतकरलेलं?"

रेवतकला माझें म्हणणें मान्य करावें लागलें. यौधेय तरुणांना माझ्या बोलण्याचा अविश्वास वाटणें शक्यच नव्हतें. चन्द्रगुप्ताला मी जितका ओळखतों तितका स्वतः चन्द्रगुप्ताखेरीज दुसरा कोणीहि ओळखत नाहीं हें त्यांना ठाऊक होतें. चन्द्रगुप्तानें काय तयारी चालविलेली आहे हें त्यांना यौधेयभूमींत बसल्या बसल्या दिसणें शक्य नव्हतें. तुषार, कम्बोज व सिंधमधले घोडे यमुनेच्या पूर्वतीरावर पोंचताक्षणीं कसे हातोहात विकले जात आहेत हें मी त्यांना दाखवून दिलें. घोड्यांची किंमत इतकी महाग कधींच झालेली नव्हती आणि घोड्यांच्या व्यापारांत येवढा नफा पूर्वीं कधींच मिळत नव्हता हें त्यांना दिसतच होतें. मी वेगवेगळया नगरांतल्या पंचवीस यौधेय तरुणांना अश्व-वणिक होऊन पाटलिपुत्राला जाण्यास सांगितलें. त्यांना सरहद्दीवर पोंचतांक्षणींच चांगले पैसे मिळाले असते, पण त्यांना पाटलिपुत्राला जायचें होतें म्हणून त्यांनीं सौदा नाहीं केला. या दौऱ्यांत त्यांनीं जें पाहिलें त्यावरून विक्रमादित्य कोणत्या तरी भीषण विक्रमाची तयारी करीत आहे याबद्दल त्यांची खात्री झाली.

विक्रमादित्याच्या गुप्त हेरांचा सुळसुळाट यौधेयभूमींत कसा चालू आहे हें मी माझ्या मित्रांना समजावून सांगितलें. भिक्षु, भिकारी, वाणी, ज्योतिषी इत्यादि रूपें घेऊन जेवढे पूर्वेकडले लोक आमच्या देशांत हिंडत आहेत त्यांतली बरीच मोठी संख्या या हेरांची आहे. म्हणून आम्हांला आमची तयारी मोठ्या सावधगिरीनें करावी लागणार होती. आम्ही एकदां घोड्यांच्या शर्यतीची आवड आमच्या लोकांत निर्माण केली; रानडुकरें व इतर हिंस्र जनावरांच्या शिकारींत स्वतः लक्ष घालून लोकांना प्रेरणा दिली; आखाड्यांमध्यें पुन्हां गर्दी होऊं लागली. हत्यारांची संगत त्यांना आवडूं लागली. त्याचबरोबर तरुणमंडळी सुरा व सुंदरींमध्यें गुरफटून गेलीं आहेत असा देखावा निर्माण करण्याची आम्ही पूर्ण खबरदारी घेतली. नाहींतरी त्या दोन वर्षांत बाहेरच्या लोकांना आमचें सुरा-सुन्दरी-प्रेमच जास्त दिसून येत होतें. रोजच्या व्यवहारांत जिथें आम्ही वीसतीस माणसें एकत्र होत असूं, तिथें सुरा-सुन्दरी-संमेलनांत हजारों तरुण जमा होत असत. आम्ही आमच्या लष्करी शिक्षणासाठीं जाणूनबुजून छोट्या छोट्या टोळया साऱ्या देशभर विखरून ठेवलेल्या होत्या. परंतु आमच्या विसांविसांच्या टोळया सर्वस्वीं अलग अलग असे तुकडे नव्हते. त्यांचें एकमेकांशीं संधान बरोबर जुळलेलें होतें. आमच्या सुरेचा रंग पिकलेल्या उंबरापेक्षां अधिक लाल होता. पण ती पिणारे लवकर नव्हते झिंगत; कारण तींत मद्य कमी व रंगच जास्त होता, मादकपणा कमी व दिखाऊपणा जास्त होता.

मी वृद्ध मंडळींची मनोवृत्ति पाहून ठेवलेली असल्यामुळें त्यांना यांतलें रहस्य सांगितलें नाहीं. तरुणांची संघटना जेव्हां जोरांत वाढूं लागली तेव्हां त्यांना यांत तारुण्याच्या उत्साहापेक्षां अधिक कांहीं तरी आहे असें वाटूं लागलें. पण सुरा-सुन्दरींच्या बाबतींतील तरुणांचा जोर पाहून त्यांना काळजी वाटूं लागली. एक दिवस आमच्या गणाचे पुरस्कर्ते बप्प यौधेय यांनीं मला बोलावून विचारलें—" वत्स जय! तुझ्यावर आमची मोठी मदार आहे. तरुणांवर तुझं वजन आहे हेंहि आम्हांला ठाऊक आहे. आपले मुलगे मदिरेनं धुंद होऊन मुलींच्या बरोबर नाचायसाठीं एकमेकांशीं भांडत भटकूं लागले आहेत हें तुला गैर नाहीं का वाटत ? "

" आर्य ! आपलं म्हणणं मी मान्य करतों. पण गेल्या तीस वर्षांत वृद्धांनींच त्यांना हा मार्ग दाखवला. "

" पण आम्ही कधीं इतकी दूरची मजल नाहीं गांठली. "

"मथुरेच्या उपरिक महाराजाच्या दरबाराची नक्कल यौधेय-भूमींत कुणी चालविलेली होती हो ? उपरिकाचं अन्तःपुर पाहून आपल्याहि घरीं अधिक सुन्दर दासी जमा करायची खटपट कोण करीत होता ? अर्थात् या गोष्टी तितक्या उघडपणीं चाललेल्या नव्हत्या हें कबूल आहे मला. पण यौधेय-भूमीचाच प्रश्न घेतला तर एक प्रकार उघड चालला काय अगर दुसरा चोरून चालला काय, दोन्ही बाबतींत आमची वीरता नष्ट होतेच. "

" वत्स ! तूंच सांग. गुप्तांची कुटिल नजर आमच्या भूमीवर आहे असं तूंच म्हणत होतास ना ? तेहतीस वर्षांपूर्वीसारखे गुप्तांचे घोडे जर पुन्हां आमची प्रियभूमी पायाखालीं तुडवूं लागले तर त्या दुर्धर प्रसंगीं तिच्या इज्जतीचं व स्वातंत्र्याचं रक्षण कोण करणार ? "

" रक्षण करायचा प्रश्नच नाहीं. इथं तर दिढीदुपटीनं नफा मिळवायसाठीं आमचे बडेबडे यौधेय सार्थवाह तुषार व कम्बोजहून दरसाल हजारों घोडे आणून चन्द्रगुप्ताला विकत आलेले आहेत. आपण हवं तर दिढीदुपटीच्या नफ्याचा व्यापार करावा अगर हवंतर यौधेय भूमीला वांचवावं. यांत मला वाटतं फायद्याचा विचारच जास्त चांगला. चीनंशुकाऐवजीं जाडंभरडं चीर नेसायचं, गंधशाली व रव्याऐवजीं मका खायची, चारचार पांचपांच मजली हवेल्या व प्रासादांऐवजीं साध्या घरांत राहायचं, म्हणजे आपला बेत तरी काय आहे ? आर्य ! आपण यौधेय भद्रपुरुषांना स्वर्गीय जीवनांतून बाहेर काढून नरकांत लोटूं इच्छितां कीं काय ? मात्र आर्य ! मग आपणहि नांवाचे महाराज राहणार नाहीं हं. "

" वत्स ! तुझं अन्तःकरण दुखावलं म्हणूनच इतके कठोर उद्गार तुझ्या तोंडून निघाले. आम्ही मंडळींनीं तुझ्या बोलण्याचा विचार नाही केला म्हणून त्याबद्दल तूं

आमच्यावर रागाव, यौधेयभूमीवर तर नाहींना रागावणार? आम्ही जर यौधेय आईच्या दुधाला कमीपणा आणला, तर तूं काय आम्हांला तसं करायला मोकळीक देशील होय? " हें बोलतां बोलतां पुरस्कर्ता बप्पांच्या डोळ्यांत पाणी तरारलें. ते सद्गदित होऊन पुन्हां म्हणाले, " यव–धेय मा–त......"

मी पुरस्कर्त्यांचे पाय धरले. माझ्याहि डोळ्यांत पाणी आलें. मी म्हणालों– " तात! कठोर उद्गारांबद्दल मला क्षमा करा. मी माझ्या रक्तानं यौधेय मातेच्या दुधाची लाज राखेन याची आपण खात्री ठेवा. चन्द्रगुप्ताच्या डोळ्यांत धूळ फेंकायसाठीं यौधेय तरुण काय काय करत आहेत हें आपण आज रात्रीं माझ्या बरोबर या म्हणजे मी दाखवीन. "

" संध्याकाळीं पुरस्कर्ता बप्पांना बरोबर घेऊन आम्हांला सुरा-गोष्ठींत ( मद्यपानाच्या मैफलींत ) जायचें होतें. मी अग्रोदकामधील शेंकडों गोष्ठींपैकीं कोणतीहि एक निवडण्यास त्यांना सांगितलें. जिच्याबद्दल सगळ्यांत जास्त तक्रारी त्यांच्याकडे आलेल्या होत्या अशीच एक गोष्ठी त्यांनीं निवडली. ती चांदणी रात्र होती. एका अंगणांत अजमासें शंभर तरुणतरुणी जमलेल्या होत्या. घरीं म्हातारें माणूस कुणीच राहिलेलें नव्हतें. घराचा तरुण मालक स्वतःच गोष्ठींत सामील होऊन दारुड्यासारख्या ताना घेत होता. आम्ही दोघे तिथें पोंचतांक्षणींच पहिल्याप्रथम सर्व तरुण-तरुणी मोठमोठ्यानें हंसल्या. मग रेवतकचा आवाज ऐकूं येऊं लागला.

" आ-ऽ-ऽ-ल-ल-लाऽ ब-ब-ब-घ-घा थ-थ-थे-र-र-ड-डाऽ! त-त-तूंऽ क-क-काऽय स-स-सां-ग-ग-ण-णाऽर रेऽ? "

दुसरा आवाज एका तरुणीचा होता. " ए-ए-ए! य-य-याऽ थ-थ-थेर-ड-ड-ड्याऽ-ल-ल-ला प-प-पण ए-ए-एक प-प-पेऽ-ल-ल-ला भ-भ-भर द-द-द्याऽ रेऽ! "

अशा तऱ्हेचे कितीतरी आवाज येत होते. कुणी सांगत होतेः ' थेरडा चांदण्या रात्रीं बाहेर प्यायचा नाहीं. " कुणी आणखी कांहीं सांगत होते. कुणी कुणाच्या पाठीवर रेलत होते, कुणी पडल्या पडल्या उजव्या हातानें खुणा करून पुरस्कर्ता बप्प यांना आपल्याजवळ बोलावीत होते. मलाहि या मंडळींनीं दोनचार उद्गार ऐकवले; " य-य-याऽ-ल-ल-ला म-म-म्ह-ण-ण-णे ज-ज-ज-व-व-वाऽ-न व-व-हाऽ-य-य-चंऽय! ह-ह-हि-ज-ज-ज-ड-ड-डाऽ ल-ल-ले-क-क-काऽ-च-च-चा! " " य-य-यौऽ-ध-ध-धे-य न-न-नव्हेऽ ह-ह-हा!" " अ-अ-आ-म-म-म्ही य-य-यौऽ-ध-धेऽय अ-अ-आ ह-ह-होंऽ-त! " " घ-घ-घे ह-ह-हा एऽ-क-क घ-घ-घों-ऽट प-प-पी· "

पुरस्कर्ता माझा हात आपल्या हातीं घेऊन म्हणाले–– " वत्स! राहूं दे ही कटकट. हे सारे लोक झिंगलेले आहेत. अब्रू घेतील आपली. " मी हात सोडवून घेऊन सटकलों व काच-कुतुपांत भरलेली लाल सुरा घेऊन बप्पांकडे आलों. प्रथम

चुळक्यांत घालून त्यांना मी तिचा वास घ्यावयास सांगितलें. तिचा वास मादक नव्हता. मग मी एक चुळका पिऊन त्यांना प्यावयास सांगितलें. पिऊन झाल्यावर ते म्हणाले– " यांत तर मद्याचा पत्ताहि नाहीं. " ते तरुण मंडळींकडे पाहून गालांतल्या गालांत हंसले. सारींजणें आतां बतावणी बंद करून शान्त बसलीं होतीं. पुरस्कर्ता म्हणाले– " यौधेय मातेच्या लाडक्यांनो ! मातेची लाज तुमच्या हातांत आहे. "

शंभर कंठांतून एकाच वेळीं उद्गार निघाला– " आधीं आमचे प्राण जातील अन् मगच आईची लाज जाईल. "

पुरस्कर्ता बप्पांनीं तोंड फिरविलें. त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागलेल्या मला दिसल्या. यौधेयगणाचे पुरस्कर्ता महाराज महासेनापति बप्प आतां सर्व प्रकारें आम्हां तरुणांना साथ देऊं लागले. त्यांना आम्ही आमच्या कामाची पूर्ण माहिती करून दिली. आमच्या तरुण-सेनेंत किती सैनिक आहेत, हत्यारें किती आहेत, त्यांचें शिक्षण किती झालेलें आहे, इत्यादि सारी माहिती आम्ही त्यांना सांगितली. तीस तीस वर्षें मर-मर-मरून ज्यांनीं लाखों दीनार जमा केले, अशा लोकांच्या पश्चात् त्यांच्या मुलांनीं आपली सारी संपत्ति हत्यारें व घोडे खरेदी करण्यासाठीं देऊन टाकलेली होती. तरुणांच्या बरोबरीनें तरुणींना धनुष्य, तरवार व भाला उत्तम रीतीनें चालवितां येत होता. या गोष्टींचें बप्पांना आश्चर्य वाटलें. पण त्याचबरोबर मी त्यांना इशाराहि देऊन ठेवला– " आर्य ! आमचं रहस्य चन्द्रगुप्ताला कळतां कामा नये. तें कळलं तरी चालण्याइतकी आमची प्रगती अजून झालेली नाहीं. अन् चन्द्रगुप्ताला या बाबतींत मदत करणारा कुणी यौधेय कुलकलंक आपल्या गणसंस्थेंत कदाचित निघेलहि. म्हणून प्रथम आपण अशाच लोकांना हें रहस्य सांगावं कीं ज्यांच्यापासून कसलाहि धोका येणार नाहीं. "

बप्पांनीं मला निर्धास्त राहण्यास सांगितलें. एक वर्ष लोटलें. मग एक दिवस साऱ्या यौधेयांची सर्वोच्च गणपरिषद अग्रोदकामध्यें भरली. साऱ्या ठिकाणचे सदस्य तिला आले होते. वडिलांच्या मृत्यूनंतर मी परिषदेचा सदस्य झालों होतों. इतर लहान मोठीं कामें उरकल्यानंतर पुरस्कर्ता बप्प म्हणाले— " पूज्य गण ! ऐका. आज कितीतरी पूर्वीपासून आमच्या गणाच्या पुरस्कर्त्याला ' महाराज ' ही पदवी मिळालेली आहे. मलाहि ' महाराज ' म्हणतात. पण आज गणासमोर हात जोडून मी अशी प्रार्थना करतों कीं आमच्या गणांतून आतां ही ' महाराज ' पदवी काढून टाकण्यांत यावी. ' महाराज ' हा महा भयंकर शब्द आहे. आमच्या पश्चिमेला एक राजाधिराज आहे अन् पूर्व बाजूला आणखी एक राजाधिराज आहे. तिथं ' महाराज ' अगर ' महाराजाधिराज ' याचा अर्थ काय करतात हें आपणांस ठाऊक आहे का ? ' शेंकडों मेंढरांचा धनी मेंढपाळ ' असा त्याचा अर्थ करतात. आपल्या इथंहि कधीं

कुणाच्या मनांत हा अर्थ येऊं नये म्हणून यौधेय-भूमींत ' महाराज ' म्हणवून घ्यायचा अधिकार कुणालाहि असूं नये असा नियम करणं आवश्यक आहे. "

नव्यानें लक्षाधीश झालेला जालुक यानें अत्यंत गोड स्वरांत सांगितलें—
" पूज्य गण ! आपले महाराज महासेनापति या पदवीला कदाचित आपला वैयक्तिक बहुमान समजत असावेत. आपल्या गणांत हा सन्मान अनादि कलापासून चालत आलेला आहे असं जर मी सांगितलं तर माझं हें म्हणणं आपणांस पटेल असं मला वाटतं. आपल्या लायक पुत्राला हा बहुमान देण्यांत स्वतःचा सन्मान झाला असं गण समजतो. यांत व्यक्तिगत गोष्ट कसलीच नाहीं. "

जालुकाच्या म्हणण्याला पाठिंबा देण्यासाठीं आणखी दहा बारा लोक उभे राहिलेले होते. ते सगळे एकजात लक्षाधीश व्यापारी होते याबद्दल आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. मी आतांपर्यंत गप्प होतों. मी पुरस्कर्त्याची आज्ञा घेऊन म्हणालों—

" पूज्य गण ! वयानं व अनुभवानं इतका लहान असूनहि मी वृद्धजनांच्या बोलण्याला विरोध करायचं धाडस करतोंय याबद्दल मला क्षमा करा. आर्य बप्पांच्या मताला माझा पूर्ण पाठिंबा आहे. ' महाराज ' हा एक चार अक्षरी शब्द असला तरी त्याचा परिणाम हलाहल विषासारखा होतो. आमच्या पूर्वेला, पश्चिमेला व दक्षिणेला असलेले परमभट्टारक लोक हीं चार अक्षरं देऊन माणसाकडून कुल-घात, देश-घात, धर्म-घात इतकंच नव्हे तर आत्म-घातहि करवून घेतात. गणांमध्यें ' महाराज ' हीं पदवी अनादि कालापासून चालत आलेली आहे हें सांगणंहि चुकीचं आहे. गण-व्यवस्था ही राजतंत्रापेक्षांहि जुनी आहे. आज जिथं आपल्याला परमभट्टारकांची छत्रच्छाया दिसते तिथं एका काळीं गणवृक्षाची शीतल छाया फैलावलेली होती. त्या काळीं परमभट्टारकांच्या राणीवशावर व विलासांवर करोडों दीनार खर्च होत नव्हते. परमभट्टारकाच्या पायाचा स्पर्श इतरांच्या मुकुटांना व्हावा येवढ्यासाठीं लाखों योद्धयांचा बळी दिला जात नव्हता. याच यमुनेच्या पैलतीरावर कुरु व त्यांच्या पुढं पंचाल गणांतला कुणी गणपति अगर पुरस्कर्ता हा राजा झाला अन् त्यानं धीरेधीरे कुरूंच्या व पंचालांच्या गणांचे राज्याधिकार काढून घेऊन सारी सत्ता आपल्या हातीं घेतली. आज या गोष्टीला दोन हजार वर्षं सुद्धां झालीं नसतील. मग याच गोष्टीची पुनरावृत्ति इतर गणांमध्येंहि निघाली. कोशलांचा गण, काशीयांचा गण, चेदींचा गण, वत्सांचा गण, हे सारे गण कुठं आहेत आज ? भारतांतले बहुतेक सारेच गण राजे, महाराजे, राजाधिराज, महाराजाधिराज, परमेश्वर, परम-भट्टारक, यांच्या पोटांत गडप झाले. त्यांच्या पूर्वजांनीं गणाचा विश्वासघात केला हें त्यांना कबूल नाहीं. ते सांगतात–'भगवन्तानं आम्हांला प्रजेवर उपकार करायसाठीं धाडलंय.'
[ तरुण सदस्य कुमारानें मध्येंच उद्गार काढलाः ' उपकाऽ-र ! ' ' उपकाऽ-र ! ' ]

त्याला राजेलोकांचे भोगविलास, त्यांचं नीच कामुक जीवन ठाऊक नाहीं तोच असली उपकाराची भाषा बोलेल. दुराचाराचे व अत्याचाराचे मुर्तीमंत अवतार असे राजे नसते तर प्रजेचं काय बिघडलं असतं ? राजा नसल्यामुळं आम्ही यौधेय काय दुराचारी झालों ? का आम्ही खोटं बोलतों ? का इतरांच्या सुना आम्ही आमच्या घरांत डांबून ठेवतों ? का आम्ही राजे लोकांच्या प्रजेपेक्षां जास्त दुःखी आहोंत ? यमुना नदी अग्रोदकापासून फार दूर नाहीं. तिच्या पैलतीरावर नजर टाकतां क्षणीं आपल्याला कळतं कीं या दोहोंमध्यें फार अन्तर आहे. आपल्या गणानं आपल्या पुरस्कर्त्याला ' महाराज ' ही पदवी दिल्याला बरींच वर्षे झालीं हें मान्य आहे मला. त्या वेळेला बहुधा आम्हांला यवनांची अगर शकांची दहशत बसलेली असावी. राजाधिराजांना खूष करायसाठीं गणवृद्धांनीं बहुधा तसं केलं असावं. पण ही होती मात्र भयंकर धोकेबाज गोष्ट. त्या राजाधिराजाजवळ तेवढी अक्कल अगर ताकत बहुधा राहिली नसावी म्हणून त्यानं आमच्या पुरस्कर्त्याला खराखुरा ' महाराज ' बनवलं नाहीं. मला तर असं वाटतं कीं आम्ही आमच्या पुरस्कर्त्याला ' आर्य ' म्हणून जेवढा मान देतों, केवळ ' यौधेय गणपति ' अगर ' यौधेय सेनापति ' म्हणून जेवढा मान देतों, तेवढा मान ' महाराज ' म्हणून त्यांना मिळणं शक्य नाहीं. म्हणून ' महाराज ' ही पदवी काढून टाकण्यांत यावी हीच माझी पूज्य गणाला प्रार्थना आहे. ''

माझ्या भाषणानंतर आणखीहि कितीतरी यौधेय उठले. सर्वांनीं माझ्या म्हणण्याला पाठिंबा दिला. पुरस्कर्त्यानें विरोधकांना विचारलें— '' तुम्ही आपल्या विरोधाची कसोटी छन्दानं ( मत घेऊन ) पाहणार का विरोध मागं घेणार ? '' या परिषदेंत आपण अलग पडलों आहोंत हें धनिकांनीं पाहिलें. लोकांची प्रवृत्ति किती बदललेली आहे हेंहि त्यांनीं पाहिलें. म्हणून त्यांनीं विरोध मागें घेतला आणि यौधेय गणानें ' महाराज ' ही पदवी रद्द केली.

आमच्या वर्षभराच्या प्रयत्नानें यौधेयांमध्यें एक नवें जीवन, नवी स्फूर्ति दिसूं लागली. जालुकासारखे धनिक व आणखी चार-दोन वृद्ध लोक सोडल्यास बाकीचे सारे लोक आमच्या कामावर खूष होते. जालुक व त्याच्या संगतींतले लोक मात्र आपसांत म्हणत होते– '' हा जय आमच्या यौधेयभूमींत आग पेटवून सोडणार. गुप्तांची सेना पुन्हां येणार अन् पुन्हां आमच्या घरादाराचं वाटोळं होणार. '' जालुक प्रभृतींच्या मनांत काय चाललें आहे हें आम्हांला ठाऊक होतें आणि आमचे दोस्त लोकांना स्पष्ट सांगत होते– '' जालुकाला यौधेय भूमीची कसलीच काळजी नाहीं. त्याला आपले दीनार सुरक्षित रहायला हवेत. त्याला मजल्यावर मजले चढवायला हवेत. त्याला यौधेय भूमीशीं काय करायचंय ? '' यौधेय तरुण आपली कामगिरी

यशस्वी झाल्यामुळें अगदीं खुषींत होते. तसें म्हटलें तर गणपरिषदेचे सदस्य परि-वारांतील वडील माणसें असल्यामुळें तींत वृद्धांचेंच बहुमत होतें. तरी पण आतां तरुणच यौधेय भूमीचे पुढारी होते. आम्ही एकहि यौधेय तरुण आमच्या संघटने-बाहेर राहूं दिला नाहीं. विसांविसांची मंडळी, पांचपांच मंडळींची शतिका, दहादहा शतिकांची साहस्त्रिका सेना, अशा शेंकडों सेना आम्ही तयार केलेल्या होत्या. तरुणांनीं मला आपला सेनापति निवडलें. महासेनापति बप्पांनीं गणपरिषदेतर्फे मला हें पद स्वीकारण्यास सांगितलें. मात्र—आमचें काम सुरू होऊन दीडवर्षांहून जास्त काळ लोटल्यानंतरची ही गोष्ट आहे.

एकदां आमच्या तरुण सेनानायकांची बैठक भद्रा येथें भरली. सर्वांनीं आपापल्या सेनेच्या कारभाराची माहिती दिली. त्यांच्या बोलण्यावरून व व्यवहारावरून त्यांना आपली जबाबदारी चांगल्या रीतीनें कळत असल्याचें दिसून येत होतें. तरीसुद्धां मी त्यांना सांगितलें—

" मित्रहो ! आज यौधेयांनीं तरुणांचा पुढाकार मान्य केला आहे. ही आनंदाचीच नव्हे तर फारच आशादायक गोष्ट आहे. परंतु त्याचबरोबर आपली जबाबदारी किती वाढते हें तुम्हांला स्वतःलाच ठाऊक आहे. माझे मित्र माधव-मालव हे अशा प्रकारें सुरवातीपासूनच आपल्याबरोबर काम करीत असतात हें आपणांला माहीत आहेच. आतां इतक्यांतच ते आमच्या मंडळींचा संदेश घेऊन आपल्या गणाकडे गेले होते. तिथल्या परिस्थितीसंबंधांत ते स्वतः माहिती सांगतील." माधवनें सांगितलें– " मालवगणाकडे मी ज्या आशेनं गेलों होतों तिच्या बाबतींत मला यश मिळालं नाहीं याबद्दल मला खेद वाटतो. जय यौधेयांनीं दोनदां भेट देतांक्षणीं आर्जुनायन तरुणांमध्यें उत्साहाची प्रचंड लाट उसळली. परंतु मालवगण मात्र आज धनिकांचा अनुयायी झाला आहे. तिथले लोक कधीं चन्द्रगुप्ताला जांवई केल्या-मुळें खूष होत आहेत, तर कधीं महाक्षत्रप रुद्रसिंहा बरोबर तहनामा होऊन मान-मरातब मिळाला कीं त्यांच्या आनंदाला पारावार राहत नाहीं. ते सांगतात– ' मालव-गणाला कसलीच धास्ती नाहीं. त्याचे दोन्ही शेजारी एकमेकांच्या नरडीचा घोट घ्यायला टपलेले आहेत. चंद्रगुप्त व रुद्रसिंह या दोघांना आपसांत लढूं दे, म्हणजे आमचं काम आपोआपच पार पडलं.' परंतु या दोघांपैकीं एकानं जर दुसऱ्याचा पराभव केला आणि मग त्यानं मालवगणावर स्वारी केली तर त्याला अडवायची कोणाला हिंमत होईल ? ही गोष्ट कांहीं त्यांच्या लक्षांत येत नाहीं. आमच्या मालव-गणांत महाराज महासेनापति या पदव्या चालू झाल्या आहेत इतकंच नव्हे तर ध्रुवदेवीचे वडील...वर्मा आपल्या वंशांत राजपद चालू ठेवतां येईल अशी उमेद धरून आहेत. दुःखाची गोष्ट ही कीं या गोष्टी मालवगणाला दिसत नाहींत. आपण

यौधेय गणांतून महाराज पद काढून टाकलंत ही फार चांगली गोष्ट केलीत. कुणिन्द यौधेय आर्जुनायन या गणसंघांत मालवगणानंहि सामील व्हावं अशी माझी फार इच्छा होती. पण मालवांना यांत आपला फायदा आहे हें कळत नाहीं. शेवटीं त्यांना पस्तावावं लागेल यांत काय संशय ? ''

माधवनें इतरहि कामकाजाच्या गोष्टी सांगितल्या. आमचे अश्वपति सेनानायक रेवतक अश्ववाहिनीची ( घोडदळाची ) माहिती देतांना म्हणाले--"आगामी युद्धांत घोड्यांना फार महत्व येईल. विशेषतः गजसेनेच्या बाबतींत आम्हाला प्रतिस्पर्ध्यांशीं मुकाबला करतां येत नाहीं म्हणून तर आम्हांला घोड्यांचं महत्व फारच आहे. परंतु आम्हांला जेवढे घोडे हवे आहेत, तेवढे मिळणं सोपं नाहीं, त्यांत पुन्हां ते कोणत्या जातीचे मिळायचे हा तर प्रश्न आहेच. देवपुत्र आपली अश्वसेना स्वतंत्रपणानं वाढवीत आहे. चन्द्रगुप्त व महाक्षत्रपहि जास्तींत जास्त घोडे खरेदी करीत आहेत. अशा परिस्थितींत आम्ही आमचं घोडदळ वाढवायला कांहींतरी वेगळाच उपाय शोधून काढायला हवा. चांगले घोडे तुषार व कम्बोज या देशांतच पैदा होऊं शकतात, दुसरीकडे कुठंहि पैदा होऊंच शकत नाहींत, ही समजूत माझ्या मतानं चुकीची आहे. मी चांगल्या अवलादींच्या एका कम्बोज घोड्यापासून आमच्या इथल्या दोन वडवांच्या पोटीं दोन शिंगरं पैदा करविलीं आहेत अन् आम्ही खुद्द यौधेय-भूमींतच चांगले घोडे पैदा करूं शकतों असा मला विश्वास वाटूं लागला आहे. ''

सेनानायक चित्र म्हणाले— '' वयस्य रेवतक यांचं बोलणं मलाहि पटतं. आमचे प्रतिस्पर्धी आम्हांला घोडे मिळूं देतील या आशेवर आम्हीं राहूं नये. घोड्या विकायला तर देवपुत्राकडून कडक मनाई हुकूम निघाले आहेत. पण आमच्या इथं दहा हजारांहून अधिक घोड्या आहेतच. आमच्या कामासाठीं आम्हांला त्यांचा फायदा घेतां येईल. ''

यौधेय-भूमींतून घोडे--घोड्या बाहेर जाऊं द्यावयास मनाई करण्याचाहि ठराव आम्ही केला. आमचेहि गुप्त हेर शेजाऱ्यांच्या हालचालींची माहिती आणून देत होते. तीवरून चन्द्रगुप्त फारच उतावळेपणा करतो आहे असें आम्हांला कळून आलें. परंतु आतां आम्ही सावध आहोंत हें त्यालाहि माहीत होतें. मथुरेच्या उपरिकानें जालुकासारख्या आपल्या परिचयांतल्या लोकांना अप्रत्यक्षपणें धमकीहि दिली होती. परंतु आमच्या तर्फे अत्यंत नम्रतापूर्वक असा निरोप गेला कीं '' आम्ही दिवंगत परमभट्टारकांशीं झालेल्या तहाच्या अटी आतांहि पाळत आहोंत. आम्हांला गुप्त-नृपतीचे सहायक व मित्र म्हणूनच राहायचंय. ''

यौधेय-भूमींत मी परत आल्याला आतां दोन वर्षें होऊन गेलीं होतीं. येवढ्यांत एक दिवस आमच्या हेरानें बातमी आणली कीं गुप्तांची सेना यौधेयांच्या सरहद्दीकडे चाल

करून येत आहे. या वेळीं पश्चिम व दक्षिणेकडील शेजाऱ्यांच्या बाबतींत आम्ही निश्चिन्त होतों हें आमचें एक सुदैवच म्हटलें पाहिजे. महासेनापति बप्पांनीं गणपरिषद भरवून सारी हकीकत तिच्यापुढें सादर केली. परिषदेनें तीन इसमांची युद्धसमिति नेमली, युद्धसमितीच्या हातीं सेना-संचालनाचें काम सोपविलें. या समितींत स्वतः महासेनापति व मी या दोघांच्या जोडीला रेवतकहि होते. मग कुणिन्द व आर्जुनायन या दोन्ही गणांबरोबर संयुक्त बैठक होऊन तिनें त्या दोन्ही गणांचे दोन सदस्य धनमित्र व शिव यांना युद्धसमितीवर धाडलें. मथुरेच्या पश्चिमेला सुघ्ना ( अंबाल्या ) पर्यंतच्या सरहद्दीवरील सारेच दुर्ग आम्ही युद्धासाठीं सज्ज ठेवले. आमचीं मोठीं नगरें इन्द्रप्रस्थाच्या ( दिल्लीच्या ) नजीक होतीं; म्हणून तिथें आक्रमण होण्याची धास्ती सगळयांत जास्त होती. मी, रेवतक व माधवसेन त्याच ठिकाणीं कामगिरीवर आलों. कुरू ( मीरत ) चे लोक दोनशें वर्षांपूर्वीच आपलें गणस्वातंत्र्य गमावून बसले होते. परंतु गुप्तांविषयीं त्यांना चीडच होती—करांच्या बोज्यापायीं बिचारे टेंकीला आलेले होते. आम्हांला त्यांची आंतून सहानुभूति होती. आतां हास्तिनापुरच्या व इतर घाटांवर गुप्तांच्या सेना उतरूं लागल्या बरोबरच आम्हांला याची बातमी मिळाली. त्यांच्या सेनेबरोबर पांचशें हत्ती आहेत हेंहि आम्हांला कळलें. आम्ही मनांत आणलें असतें तर यमुना ओलांडून आम्हांला गुप्तांचा मुकाबला करतां आला असता. परंतु त्यांत धोका होता. आम्हांला सारी सेना पैलतीरावर न्यावी लागली असती आणि रसदीची तरतूदहि तिकडेच करावी लागली असती. आम्ही आमच्या सीमेच्या आंतलीं पुष्कळशीं गांवें ओस पाडविलीं. आणि आम्ही मोठ्या उत्सुकतेनें आमच्या शत्रूची वाट पाहूं लागलों. झेंडे-पताकांनीं सुसज्जित असा तो शत्रुसेनेचा प्रचंड जमाव मी आमच्या इन्द्रप्रस्थाच्या दुर्गावरून पाहत होतों. रथांच्या बाबतींत आम्ही निश्चिन्त होतों; कारण त्यांना यमुना ओलांडतां येणें सोपें काम नव्हे हें आम्हांला ठाऊक होतें. साऱ्या नावा तर आमच्या हातीं होत्या आणि त्या आम्ही जागोजाग बुडवून ठेवलेल्या होत्या. मथुरेहून नावा येण्याची धास्ती होती, पण त्यांना वाटेंत आमच्या तीन तीन चौक्या ओलांडाव्या लागल्या असत्या आणि आमच्या सैनिकांनीं तिकडून एकहि नाव इन्द्रप्रस्थाच्या दिशेनें वर येऊं दिली नाहीं. गुप्तांच्या सेनेनें पैलतीरावर छावणी उभारली आणि ऐल तीरावर आमचे स्वार व सैनिक सज्ज राहिले.

ते तिकडे मोठमोठे पटह ( नगारे ), नरसिंह, भेरी व इतर अनेक प्रकारचीं वाद्यें खूप जोरजोरानें वाजवीत होते. माधव सांगूं लागले— " फुंकरीसरशीं उडून जायला यौधेय म्हणजे तूस नव्हेत हें चन्द्रगुप्ताच्या लक्षांत नाहीं आलेलं. " आमच्या बाजूनेंहि रणवाद्यें वाजत होतीं, आमच्या बाजूनेंहि यौधेयगणाचा जयजयकार चालू होता. गुप्तांना आपले हत्ती नदीवर आणतां येतील हें आम्ही समजून चुकलेलों होतों.

आणि झालेंहि तसेंच. पांच दिवस वाट पाहिल्यानंतर अष्टमी आली. मध्यरात्रीला चंद्र मावळला. चहूंकडे अंधार पडला होता. पण आज हेमन्ताच्या निरभ्र आकाशांत तारे खूपच चमचमत होते. दोन्ही तीरांवर लाखों लोक होते पण कुणी कुठें येवढा-सुद्धां आवाज होऊं देत नव्हता. याच सुमारास पाण्यांत थप् थप् असा आवाज झाला. आमचे सैनिक तयार झाले. मोठमोठे भाले घेऊन मजबूत स्वार तयारच होते. धानुष्क ( तिरंदाज ) आपल्या धनुष्यांना तीर लावून शत्रूची वाट बघत उभे होते. पदाति देखील तयार होते. त्या रात्रीं आम्हांला शत्रूवर नेम धरून बाण सोडतां येत नव्हते ही आमच्या शत्रूंना मोठीच फायद्याची गोष्ट होती. तरी पण आम्ही त्यांचें स्वागत कसें करणार होतों हें त्यांना कांहीं ठाऊक नव्हतें.

हत्ती तीनचार रांगा करून येत होते. त्यांच्या पद-गतीनें समुद्रमन्थनाची आठवण येत होती. आमच्या हृदयांतहि मन्थन चालू होतें याबद्दल शंकाच नको. हत्ती जवळ येत असलेले पाहून आमच्या सैनिकांनीं थोडेसे बाण सोडले. पण अजून आम्ही प्रतिहल्ला नाहीं सुरू केला. आम्ही जागोजाग वीस वीस तीस तीस हत्तींना यमुने-बाहेर येण्याची संधि दिली-आणि मग मोठ्या जोरांत बाणांचा वर्षाव व भाल्यांचा प्रहार सुरू केला. हत्ती त्या जागेहून परत फिरून दुसरीकडे मोर्चा वळवूं पाहात होते. तिथें जिकडे तिकडे सराट्यांसारखे लोखंडाचे कांटे पसरून ठेवलेले होते. कुठें कुठें खड्डे खणून वर तूस व माती पसरून ते झांकून ठेवलेले होते. हत्ती चीत्कार करीत खड्ड्यांत कोसळूं लागले अगर लोखंडाच्या सराट्यांनीं पायांना दुखापत झाल्यामुळें मागें हटूं लागले. या युक्तीनें आमचें काम बरेंच सोपें झालें. याच्या मागोमाग आमच्या घोडेस्वारांचे लांब लांब भाले तर होतेच. दोन घटका युद्ध झाल्याबरोबरच आम्हांला परिणामाचा अंदाज कळून चुकला. तरीपण युद्ध सूर्योदयापर्यंत चाललें. बहुधा एकहि हत्ती परत गेला नसेल. कितीतरी कैदी आमच्या हातीं सांपडले. त्यांत गुप्तांचा महाबलाधिकृत वीरसेन हा जखमी स्थितींत मिळाला.

वीरसेनाला आमच्या समोर आणण्यांत आलें. मी पाहतांक्षणीं त्याच्याजवळ जाऊन कर-स्पर्श केला. आणि मोठ्या नम्रतेनें म्हणालों— " विक्रमादित्याच्या महाबलाधिकृताचं यौधेयभूमींत स्वागत असो." त्यानें डोळे उघडून मान वर करून माझ्याकडे पाहिलें आणि मग स्मित केलें.

मी म्हणालों— " बंधु वीरसेन ! आपली एकमेकांशीं भेट कसल्या जागीं झाली पहा. पण आतां आपण प्रतिस्पर्धी नाहीं. आपण जय व वीरसेन या व्यक्तिगत नात्यानं एकमेकांना भेटूं शकतों."

वीरसेनाच्या जखमेला मलमपट्टी करण्यास सांगून मी त्याला माझ्या छावणींत उत्तम प्रकारें ठेवण्यासाठीं पाठवून दिलें. सकाळीं पाहिलें तेव्हां शत्रूची बरीचशी सेना

यमुनेच्या पात्रालगत उभी होती. माझ्या मनांत विचार आला— " नेम काय सांगावा ? शत्रूचे स्वार तर पुढें सरसावणार नाहींत ना ? गुप्त सैनिक यौधेयांशीं हातघाईची लढाई करायसाठीं नदी ओलांडून अलीकडे तर नाहीं ना यायचे ? पण थोडा वेळ वाट पाहिल्यावर सारी सेना उलट दिशेला वळली. आमच्या सेनेनें विजयघोष केला. यौधेय तरुणांनीं यौधेयमातेची लाज राखली. मी आमच्या युद्धकैद्यांना आणवून महासेनापति बप्पांकडे गेलों आणि त्यांना वन्दना करून विजयाची बातमी सविस्तर सांगितली. बप्पांनीं मला, रेवतकला व माधवसेनला आलिंगन दिलें. आम्ही अग्रोदका, पृथूदका, रोहितकी, खंडिला, भद्रा इत्यादि आमच्या नगरांमध्यें तर विजयाची बातमी पाठविलीच, पण शिवाय आमचे दोस्त जे कुणिन्द व आर्जुनायन गण, त्यांच्याकडेहि विजयसंदेश धाडून दिला. साऱ्या यौधेभूमीवर आनंदाची लाट उसळून राहिली.

आमचे युद्धकैदी बरोबर घेऊन आम्ही अग्रोदकाला पोचलों.

## ( १८ )
## नवीन यौधेय

आम्ही विक्रमादित्यावर पहिला विजय मिळविला खरा, परंतु या विजयानें आम्ही विक्रमाची ताकत खच्ची केलेली नव्हती हें आम्हांला ठाऊक होतें. आणि त्याचबरोबर आम्ही त्याच्या मनावर येवढा जबरदस्त आघात केलेला होता कीं त्याचा त्याला कधींच विसर पडणें शक्य नव्हतें. आमच्या शत्रूची रणनिपुणता व पराक्रम या बाबतींत जास्त सांगावयास पाहिजे असें नाही. कदाचित असें झालें असेल कीं त्यानें आपल्या प्रतिस्पर्ध्याच्या ताकतीचा अगदींच चुकीचा अंदाज केला असावा, आणि सेनासंचालनाच्या बाबतींत विशेष बुद्धि खर्चून काम केलें नसावें. मी वीरसेनाची बडदास्त फार चांगल्या तऱ्हेनें ठेवली आणि चन्द्रगुप्ताकडे निरोप पाठविला कीं वीरसेन आतां युद्धांत नाहीं, तो माझ्या घरीं आहे, माझ्या भावासारखा मी संभाळला आहे, जखम बरी झाल्याबरोबर त्याला पाठवून देईन. आतां प्रत्येक गांवांत व नगरांत आमच्या वीर योध्यांच्या सन्मानार्थ यात्रोत्सव चाललेले होते. गण-परिषदेनें माझा व माझ्या दोस्तांचा मोठा बहुमान केला. सेनानायक रेवतकनें वीरसेनाला

जिवंत कैद केलें होतें, मी इन्द्रप्रस्थाच्या साऱ्या सेनेचा संचालक होतों, आणि माधवनें खड्डे, लोखंडी सराटे इत्यादिसाठीं जागांची निवड करण्याची मोठी कामगिरी बजवलेली होती; म्हणून या विजयाबद्दल माझ्या मागोमाग सगळयांत जास्त सन्मान यौधेयांनीं या दोघां सेनानायकांचा केला. पण मानमरातब जरी आम्हांला जास्त मिळाला, तरी हा विजय मिळवून देण्याचें सगळयांत जास्त श्रेय कुणाकडे होतें हें मला ठाऊक होतें. तरुणांच्या बरोबरीनें तरुणींनींहि आश्चर्यकारक स्वार्थत्याग या युद्धांत केलेला होता. आम्ही तरुणींना शस्त्रास्त्रांचें शिक्षण अर्थात दिलेलें होतेंच. पण त्यांना आम्ही युद्धाच्या मोर्च्यांत नाहीं पाठविलें. पहिल्याच मोर्च्यांत जर आम्ही हार खाल्ली असती व कोणत्या ना कोणत्या रीतीनें विक्रमाची सेना जर यौधेय भूमींत घुसली असती तर ते आमच्यावर दया करतील अशी आम्हांला जरासुद्धां आशा नव्हती. म्हणून यौधेयांना आपलें सर्वस्व पणाला लावून तसूतसूभर जमिनीसाठीं लढावयाचें होतें. यौधेयभूमीला आपला अंकित मुलुख करून तिच्यावर आपला उपरिक (व्हाइसरॉय) नेमावयाचा ही चन्द्रगुप्ताची इच्छा आम्हांला ठाऊक होती. त्याला गणाचें नांवसुद्धां राहूं द्यावयाला नको होतें. कारण त्यानें कम्बोज व वाल्हीक हे देश जिंकण्याचा मनसुबा केलेला होता आणि या कामासाठीं त्याला आपला रस्ता पक्क्या सांधलेल्या विटांनीं बांधून काढावयास हवा होता. यौधेयभूमी जिवंत आहे तोंपर्यंत तींत आपल्याला असा रस्ता तयार करतां येणार नाहीं हें बहुधा त्याला ठाऊक असावें. या कामासाठीं त्याला यौधेय भूमीची स्मशानभूमी करावयाची होती. म्हणूनच आम्ही या सर्वसंहारक युद्धांत आमच्या एकहि व्यक्तीला गुलामगिरींत जगण्यासाठीं संभाळून ठेवावयास तयार नव्हतों—मग ती व्यक्ती स्त्री असो वा पुरुष असो, वृद्ध असो वा तरुण असो. आम्ही आमच्या तरुणींना त्या दृष्टीनें शिकवून तयार केलें होतें. तसा दिवस आला कीं त्या आपल्या हातीं कंकणाऐवजीं तरवारी घेतील, मस्तकावर वेण्यांऐवजीं शिरस्त्राणें घालतील आणि वक्षस्थळावर मंजुश्रीच्या (बोधिसत्वाच्या) आकृती ऐवजीं जखमा अंकित करून घेतील अशी तयारी आम्ही ठेवलेली होती. पहिल्या मोर्च्यावर आम्ही तरुणींच्या कांहीं तुकड्या ठेवून त्यांजकडे खाण्या-पिण्याची व औषध-पाण्याची तरतूद करण्याची कामगिरी सोंपविलेली होती.

रात्रीं जर युद्ध झालें नसतें तर तरुणींना आमची योजना धुडकावून युद्धांत उडी घेतां आली नसती. त्यांच्या या साहसाचा आम्हांला राग आला, गणपरिषदेंतहि आम्ही याबद्दल त्यांना ठपका दिला; तरी पण त्यांचें शौर्य कुणाला तरी विसरतां आलें असतें का ? गणपरिषदेंत त्यांच्या साहसाचा निषेध करणाऱ्यांमध्यें पहिला नंबर माझा होता. पण त्याचबरोबर मी असेंहि सांगितलें– " पूज्य गण ! यौधेयानींनी हें जें मन मानेल तसं वर्तन केलं तें आपणांपैकीं कुणालाहि पसंत

पडलं नसेल. मीहि याचा निषेधच करतों. सेना अन् जमाव यांमध्यें फरक काय असतो ? सेना हजारोंची असली तरी एक नियम, एक आज्ञा, एक रांग, एक ध्येय घेऊन चालते. तींत हज़ारों डोकीं अलग अलगपणानं आपापल्या मार्गाचा विचार नाहीं करीत. अन् जमाव ? त्यांत एकता कसलीच नसते. ' मुण्डे मुण्डे मतिर्भिन्ना ' ' पादे-पादे गतिर्भिन्ना ' ( ' जितकीं डोकीं तितकीं मतें, ' ' जितके पाय तितक्या गति ' ) अशी जमावाची अवस्था असते. म्हणून एक हज़ार सैनिक एक लाखाचा जमाव उधळून लावूं शकतात. आपल्याला यौधेयांचा जमाव करायचा नसून त्यांची सेना तयार करायची आहे. आमच्या तरुणींनीं मन मानेल तसं वागून आपल्या सेनेला जमावाची कळा आणायचा बेत केला. याबद्दल आम्ही त्यांच्यावर रागावतों. परंतु त्याच बरोबर आपल्याला हेंहि कबूल करावं लागेल कीं यौधेय तरुणींना जमाव व्हायला आम्हीच भाग पाडलं. आपली केवढ्या क्रूर शत्रूशीं गांठ आहे हें आम्हांला ठाऊक आहे म्हणून आम्ही आमच्या स्त्रियांनाहि तरवारीच्या धारेवर चालायला शिकवलं. परंतु एकदां स्त्रीनं कंकण काढून ठेवून हातीं तरवार घेतली कीं तिला मग कोंपऱ्यांत बसवून ठेवतां येत नाहीं, याचा आम्ही विचारच केला नाहीं. जर कुणा यौधेयानींनीं चूक केली असेल तर या बाबतींत त्यांच्यापेक्षांहि मी स्वतःलाच जास्त अपराधी समजतों. पूज्य गणानं जयावर आपली भिस्त ठेवली; अशा परिस्थितींत यौधेयानींची सेना संघटित करायची परवानगी पूज्य गणाकडून जयानं घ्यायला पाहिजे होती. पण त्यानं तसं न करण्यांत मोठीच चूक केली. वैश्वानर प्रज्वलित करायचा (आग पेटवायची) अन् मग त्याचा उजेड नाहीं पडणार, आंच नाहीं लागणार, अशी आशा धरायची म्हणजे भलताच प्रकार म्हटला पाहिजे. शत्रू आमच्या देशाच्या हद्दीतून आंत घुसतोय अशा वेळीं हातीं तलवार असलेली सारी यौधेय स्त्रीजात गप्प बसेल अशी आशा करणंच चुकीचं होतं. मला वाटतं देशासाठी प्राण देण्याचा जेवढा हक्क यौधेय पुरुषांना आहे, तेवढा हक्क आतांपासून गणानं स्त्रियांना देऊन टाकावा. हें झालं आमच्या चुकीसंबंधाचं विवेचन. ज्या स्त्रियांनीं सेनानायकांच्या मर्जीविरुद्ध इन्द्रप्रस्थाच्या मैदानांत शत्रुसेनेचा मुकाबला केला त्यांच्या चुकीसंबंधांत आतां सांगतों. मात्र त्यांनीं तिथं जें शौर्य गाजवलं त्याबद्दल आमचं मस्तक अभिमानानं उन्नत झाल्याखेरीज राहणारच नाहीं. सुनन्दा वहिनीचं नांव, तिचं शौर्य, आम्ही कधींहि विसरणार नाहीं. जोंपर्यंत पृथ्वीवर एक तरी यौधेय जिवंत राहिलेला असेल तोंपर्यंत ही आठवण आमच्या हृदयावर कोरून ठेवलेली आढळेल. ती हत्यारं चालवायला अत्यंत तत्पर-तेनं शिकलेली होती. परंतु तिचा विनोदी स्वभाव लक्षांत घेतां, तिला जीवनाकडे इतक्या गंभीर दृष्टीनं बघतां येईल असं मला कधींसुद्धां वाटलं नव्हतं. सुनन्दानं आपल्या विनोदानं ज्याच्या दुर्मुखलेल्या चेहऱ्यावर टवटवी आणली नाहीं असा एक

तरी माणूस अग्रोदका नगरींत असेल का ? असं कोणतं जोडपं आहे कीं ज्याचा आपसांतला कलह तिनं आपल्या एका स्मितासरशीं निकालांत काढलेला नाहीं ? विवाहमंडप असो अगर नृत्यांगण असो, कुठंहि सुनन्दा नसेल तर कार्यक्रमाचं स्वारस्य निम्मं शिम्मंहि नाहीं राहात. अन् मी ज्या ज्या वेळीं अग्रोदकाला येत असे त्या त्या वेळीं सुनन्दा आपल्या मधुर भाषणानं व मधुर वागण्यानं मला आपल्या बोटावर नाचवीत फिरत असे. हे सारे गुण स्त्रियांच्या ठिकाणीं दुर्लभ असले तरीहि अगदींच आढळत नाहींत असं नाहीं. परंतु सुनन्दाचं जें स्वरूप आम्ही या युद्धांत पाहिलं, त्याची आम्हांला कधीं कल्पनासुद्धां आलेली नव्हती. शत्रूचे पांच हत्ती लोखंडी सराटे व गुप्त खड्डे यांतून वांचून आमच्या रांगेंत घुसत होते. सुनन्दा, नन्दा व वसुनन्दा या तिघी बहिणींनीं वीस यौधेयानींना घेऊन त्यांचा मुकाबला केला. त्यांनीं आपल्या लांब भाल्यांनीं हत्तींचे डोळे कसे फोडले, तें दृश्य आम्हांला बघायला मिळालं असतं तर अत्यंत प्रेक्षणीय ठरलं असतं. हत्तीनं सुनन्दाला आपल्या सोंडेचा विळखा घातला व तिचे दोन्ही पाय त्यानं आपल्या पायाखालीं चेंगरून त्यांचा चेंदामेंदा केला. वसुनन्दानं तरवारीचा वार करून हत्तीची सोंड अर्धी कापली. हत्ती चीं चीं करीत मागें फिरला. सुनन्दाच्या सख्या तिला उचलून नेण्याच्या बेतांत होत्या. त्या वेळीं जखमांचा भयंकर त्रास होत असतांनाच सुनन्दानं बाकीच्या दोघां हत्तीवर चालून जाण्याचा हुकूम आपल्या सख्यांना मोठ्या निर्धारानं दिला. तिचा हुकूम पार पाडण्यांत त्यांना यश आलं. पण सुनन्दा त्यांना जिवंत बघायला मिळाली नाहीं. पूज्य गण ! आपल्या सुनन्दाचा ज्याला अभिमान वाटणार नाहीं असा एक तरी प्राणी यौधेय भूमींत असेल का ? सुनन्दाच्या प्रत्येक सखीच्या अंगावर दहा दहा पांच-पांच जखमा झालेल्या आहेत. वसुनन्दा जबर जखमी झालेली आहे, मात्र तिच्या जिवाला आतां धोका नाहीं असं आपले वैद्य सांगताहेत. या यौधेयानींच्या शौर्याला साजेसा त्यांचा सन्मान आम्हांला करतांच येणार नाहीं. पूज्य गणाला माझी अशी आमहाची विनंति आहे कीं आपल्या मातृभूमिसाठीं प्राण अर्पण करायचा जो हक्क आम्हां पुरुषांना आहे तोच हक्क यौधेयानींना मिळाला पाहिजे. ”

ज्या गोष्टी करावयाला वर्षे लागली असती, त्या गोष्टी घटके-घटकेंत होऊं लागल्या. शत्रूच्या या जबरदस्त प्रहारानें यौधेयभूमींत डोळ्याचें पातें लवतें न लवतें येवढ्या अवधींत केवढा तरी फरक घडवून आणला. मात्र अजूनहि जालुका-सारखे कांहीं धनिक आमच्यांत होतेच. विक्रमादित्याचा विजय झाला असता तर त्याचा या लोकांना तितका खेद झाला नसता असं वाटतं मला. पैसा माणसाची उन्नति करतो का त्याला अधोगतीच्या सगळ्यांत खोल खड्डयांत ढकलतो याचं हे जालुकासारखे लोक म्हणजे ढळढळीत उदाहरण आहे. हे दबले गेले असले तरी या

सापांचें डोकें पुरतें ठेचलें गेलेलें नाहीं. तरी पण आतां आम्हांला संधि फार चांगली मिळालेली आहे आणि आम्ही आमचा एकहि क्षण वाया जाऊं देतां कामा नये याची आम्हांला उत्तम प्रकारें जाणीव होती. गणपरिषदेनें देश-रक्षणाच्या बाबतींत स्त्रीपुरुष भेद रद्द करून मोठीच प्रगति घडवून आणलेली होती. तसाच जर गरीब-श्रीमंत हा भेद रद्द करण्यांत आला असता तर यौधेयांचा असा अभेद्य दुर्ग तयार झाला असता कीं त्याची एक वीट दुसऱ्या विटेपासून अलग करणें अशक्यच झालें असतें. परंतु संपत्तीच्या बाबतींत हजारो वर्षांपासून जी धारणा लोकांच्या मनांत ठाण मांडून बसली आहे ती लवकर उखडून टाकणें सोपें नाहीं हेंहि आम्ही जाणून होतों. मात्र एक गोष्ट घडलीच. ग्रीष्माच्या अखेरीला जेव्हां शेतांची वांटणी करण्यांत येऊं लागली तेव्हां अग्रोदकाच्या पन्नास तरुण घरधन्यांनीं सगळ्यांत मिळून एकाच ठिकाणीं समाइक शेत घेतलें. हें पाहून लोकांना आश्चर्य वाटलें इतकेंच नव्हे तर लोक मनांतल्या मनांत आम्हांला हंसत होते. या पन्नास घरांत मी व रेवतक नसतों तर लोकांनीं बहुधा उघडउघड टर उडविली असती. म्हाताऱ्या लोकांच्या टीका तर चाललेल्याच होत्या. मला त्यांत निराश होण्याजोगें कांहींच दिसत नव्हतें. परंतु हजारों वर्षें चालत आलेला रस्ता सोडून अगदीं नवा रस्ता पतकरल्यामुळें जी एक प्रकारची आशंका मनांत निर्माण होते तशी ती माझ्या मनांतहि होती. पण ती सारी आशंका जेमतेम महिनाभर मनांत राहिली असेल येवढ्यांत आम्ही नांगराचें रुमणें धरलें. गरीब यौधेयांजवळ दास व मजूर नसतात. त्यांना आपलें सारें काम आपल्या हातांनीं करावें लागत होतें. परंतु ज्यांच्या घरीं शेतीचें बरेंचसें काम दास अगर मजूर करीत असत असे माझ्यासारखे लोक आमच्या समाइक शेतींत निम्म्यांहून अधिक होते. मात्र गुप्तांच्या दरबाराचें वातावरण आमच्या कांहीं धनिक मंडळींत फैलावूं लागलें तेव्हांपासून आपल्या हातांनीं शेतीवाडीचें काम करणें लोकांना कमीपणाचें वाटूं लागलें होतें. त्या दिवशीं पावसाचे पहिले थेंब पडले. जमीव अजून फार खालपर्यंत भिजलेली नव्हती. इतर यौधेय अजून एका पावसाची वाट पहात राहिले होते. पण आम्ही आमचे शंभर नांगर घेऊन शेतांवर गेलों. दासांचें व मजुरांचें काम आम्हांला काढून घ्यावयाचें नव्हतें; कारण मग त्यांच्या चरितार्थाचा प्रश्न उद्भवला असता. मात्र आम्ही आमचे नांगर दिढीनें वाढविलेले होते आणि पुरेशा कुदळी आम्ही बरोबर नेल्या होत्या. कोणत्या जागीं किती जमिनींत मूग पेरावयाचा, किती जमिनींत माष ( उडीद ), किती जमिनींत श्यामाक, किती जमिनींत मसूर, हें सारें आम्ही अगोदरच ठरवून ठेवलेलें होतें. तसेंच किती जमीन नांगरून गहूं पेरण्यासाठीं तयार ठेवावयाची हेंहि आम्ही अगोदरच ठरविलेलें होतें. सेनापति जय नांगर चालवीत आहेत, सेनानायक रेवतक कुदळ चालवीत आहेत, उपसेनापति माधव

गवत काढत आहेत, मोठमोठ्या कुलांतील यौधेयानी काया मारून कुंपणें दुरुस्त करीत आहेत, हें सारें दृश्य अग्रोदकाच्या नागरिकांना एक करमणुकीचा विषय झालें होतें आणि तें पाहण्यासाठीं सारा गांव लोटत होता. म्हातारे लोक म्हणत होते—"चार दिवसांचा उत्साह आहे. कुदळ चालवणं म्हणजे थट्टा नव्हे. माथ्याचा घाम टांचेपर्यंत वाहत जाईल तेव्हां मग या बचंजींना कळेल काय तें."

आम्हांला कडक उन्हांतहि कितीदां तरी काम करावें लागे. हें ऊन आम्हांला आवडत नव्हतें हेंहि मी कबूल करतों. आमच्या हातांना संवय नसल्यामुळें फोड येऊन फुटावयाचे, ते पाहून मनाला आनंद नव्हता वाटत. दोन घटका मेहनत केली कीं कंबर व हात दुखूं लागत. पहिला महिनाभर हें सारें आम्हांला कडु कडु वाटत होतें. परंतु यौधेयांनीं हा सारा कडवटपणा युद्धांतील जखमांप्रमाणे आनंदानें सोसला. नन्दा आपला पति रेवतक याला म्हणाली—

"आर्यपुत्र! जरा विश्रांति घ्या. तुम्हांला धांप लागली आहे."

रेवतक स्मित करून म्हणाला--"पहिली गोष्ट अशी कीं आतां तूं प्रासादांत रूढ असलेले शब्द बोलायचं सोडून दे. या चिखलानं माखलेल्या देहाला आर्यपुत्र म्हणा-यचं म्हणजे त्या शब्दाचा तरी अपमान होतो नाहींतर या देहाचा तरी अपमान होतो."

"मग मी कोणत्या नांवानं हांक मारूं?"

"रेवतक म्हण; अगर डांस, ढेंकूण, पिसूं यांतलं एकादं नांव ठेव."

ती आंबट तोंड करून म्हणाली--"माझा वीर जर तसल्या नांवाला लायक असता तर तें तसलं नांव द्यायला मी मागंपुढं नसतं पाहिलं."

"नन्दा! मी सांगतों तुला; माझं आपलं साधं-सुधं रेतवक अगर रेवत हेंच नांव राहूं दे. अन् तूं ही धांप लागायची गोष्ट सांगितलीस, तर तूंच कां नाहीं अगोदर बसून थोडी विश्रांति घेत?"

"मी माझ्या सहचरींची पुढारीण ओंह म्हटलं."

"ठीक! म्हणजे आमचा पुढारी ज्या अर्थी जय आहे त्या अर्थी मी स्वस्थ बसून विश्रांति घ्यायला कांहींच हरकत नाहीं, नव्हे का?"

मी दोघांचें बोलणें ऐकत होतों. मी हंसत हंसत म्हणालों--"नन्दा वहिनी! इथं शेतांत नाक घांसायची गोष्ट कां नाहीं काढत?"

"भाऊजी! तुम्ही ती गोष्ट विसरलां नाहींत अजून? तुम्ही त्या वेळीं दूध लुटायला चाललां होतां."

"ती गोष्ट कधींच विसरण्याजोगी नाहीं."

"पण भाऊजी! तुम्ही मला चांगलंच बनवलंत हं. आपल्यापेक्षां जास्त बलवान माणसाची मूठ उघडणं मुष्किलीचं असतं."

" पण तूं तर अशी, कीं नुसती घामाघूम होऊन गेलीस. उत्तरीय एकीकडे गळून पडलं होतं, वेणी सुटलेली होती, अन् काळे केंस मुखावर पसरून त्यांनीं त्याला अगदीं चन्द्राची कळा आणली होती. ... ... ..."

" राहूं द्या हो तुमचं काव्य." असें म्हणतां म्हणतां नन्दाचा आरक्त चेहरा आणखीच लाल झाला.

मी म्हणालों—" कवितेचंहि प्रयोजन असतंच. पहा मी देखील आतां विश्रांति घेतोंय, रेवतहि आराम करतोय, नन्दा वहिनीहि विश्रांति घेत आहे, अन् माझ्या टोळीचे वीस कुदळवाले अन् त्यांच्या बरोबर गवत अलग करणाऱ्या स्त्रियाहि आतां विश्रांति घेत आहेत. चार दिवसांच्या अवधींत आम्हांला आमचे तळहात दगडासारखे टणक खरोखरीच नाहीं करतां येणार. अन् इतक्या लवकर लवकर आमची दमछाटहि कमी व्हायची नाहीं. हा सुद्धां व्यायामच आहे."

रेवत—" अन् जय ! मला वाटतं हा व्यायाम सगळ्यांत चांगला. कारण इथं व्यायामाबरोबरच आम्ही धरणीला कांहीं ना कांहीं द्यायला भाग पाडतों."

नन्दा—" भाऊजी ! तुम्ही आम्हां साऱ्यांना या चिखलांत ढकललंत तें कोणत्या हेतूनं ?"

" रेवतक—" जय ! तूं खरोखरीच फार निष्ठुर आहेस. तुझ्या वहिनीचे गाल तूं जास्त लाल करून ठेवलेस खरे, पण हे दिवस आहेत मेन्दी लावायचे. मेन्दी लावून बिचारी बाजल्यावर स्वस्थ बसून राहिली असती."

नन्दा—" अन् रेवतक आला असता तर मोठ्या कौतुकानं म्हणाली असती—' आर्यपुत्र ! उत्तरीय घसरलंय. हें जरा डोक्यावर ठेवून तर द्या.' "

रेवतक कुदळ ठेवून देऊन नन्दाजवळ गेला आणि तिची जरा घसरलेली चादर वर सारून म्हणाला—" तें करायला रेवतकला इथंहि फुरसत काढतां येते. पण तुला मेन्दीऐवजीं काय मिळालं ?"

नन्दा—" रेवतक ! पाहत्यें आहे मीं. तूं नाटकहि करायला लागलास. तुझ्यावर किती नजरा रोंखलेल्या आहेत तें तरी बघ जरा."

रेवतक—" नाटकच जर करायचं तर नजरांची पर्वा कोण करतो !"

मी म्हणालों—" भायर ! छान ! छान !"

नन्दा—" भाऊजी ! गुडघे टेंकायची आठवण विसरलांत वाटतं. पुन्हां गुडघे टेंकावे लागतील हं. नन्दा आहे तीच आहे म्हटलं !"

त्या वेळीं मला सुनन्दा वहिनींची आठवण झाली. माझा स्वर करुण झाला. मी म्हणालों—

" तुझ्यापुढं मी हजारदां गुंडघे टेंकीन. परंतु ओः ! आतां सुनन्दावहिनी कुठं ग भेटेल ? त्या दिवशीं दोन म्हशींची टक्कर लागली होती तेव्हां तिनं कशा हातानं रेटून दोन्ही अलग केल्या होत्या, आठवतं तुला ? "

सर्वांचे चेहरे शोकाकुल झाले. आम्ही पुन्हां आमच्या कामाला लागलों.

आम्ही समाइक शेती व स्वतः मेहनत करावयास प्रारंभ केला तेव्हां त्याच्यामुळें आमच्या जीवनांत केवढे परिवर्तन होईल हें आम्हांला तितकेंसें उमगलें नव्हतें. आमच्यांतलें सगळ्यांत मोठें परिवर्तन आमच्या दासांना व मजुरांना दिसलें. विकत घेतलेले दास मालकाच्या दृष्टीनं पशूपेक्षां जास्त योग्यतेचे नसत. मजुराला जास्तींत जास्त काम, कमींत कमी दाम आणि त्याच बरोबर जितका करतां येईल तितका अपमान असाच, सनातन नियम चालत आलेला होता. त्याच्यासाठीं निकृष्ट अन्न कुत्र्यापुढें टाकतात तसें टाकलें जात असे. परंतु यौधेयानी गव्हाच्या जाडजाड रोट्या, लोण्याचे गोळे, कांद्याची चटणी, आणि घडे भरभरून दाट ताक घेऊन शेतावर येत. बैलांपुढें हिरवा चारा टाकला जाई. नांगर, कुदळ, खुरपीं ठेवून देऊन स्त्रीपुरुष मध-माशांप्रमाणें त्या मडक्यांभोंवतीं जमून गोंगाट करूं लागत आणि मग सारे एकदम जेवावयास बसत. तिथें हा यौधेय हा अयौधेय, हा पुरुष ही स्त्री, हा दास-कर्मकर हा मालक, असा भेदभाव मुळींच नसे. बिछायत घालून तीवर लोणी व चटणीसह रोट्या सर्वांपुढें येत आणि ताक भरलेले लोटे या हातांतून त्या हातांत जाऊं लागत. सर्वांचें खाणें एकत्र होई आणि खातांखातां विनोदहि चाले. त्यांत रोट्या तयार करणाऱ्या यौधेयानींच्या बरोबरीनें दासींना वांटणी मिळे. कुणी म्हणत— " आजची चटणी तर कुणा रंभा-उर्वशीनं स्वतः आपल्या हातांनीं कुटलेली असावी असं वाटतं. "

" चटणी कुटणारे सारेच हात रंभा-उर्वशींचे होतात. "

" श्यामानं कुटली आजची चटणी. श्यामाच्या हातांचं चुंबन घ्यावसं वाटतं "...

दास-कर्मकर व यौधेय यांच्यांत भेदभाव बराच होता; पण आमच्या समाइक शेतीनें व समाइक कामानें हा भेदभाव कमी करण्याची बरीच मोठी कामगिरी बजावली. यौधेयभूमींत राहणारे दास-कर्मकर, कारागीर-व्यापारी, यांना गणसंस्थेंत समान राजकीय अधिकार देणें ही आतां आमच्या शक्तीबाहेरची गोष्ट होती याची आम्हां सर्वांना जाणीव होती. कारण सारी गणपरंपरा रक्ताच्या नात्यावर आधारलेली होती. परंतु यावेळीं आमच्या समोर जे दृश्य दिसत होतें तें पाहून आम्ही खूषच झालों आणि आमच्या दास-कर्मकरांच्या आनंदाला तर सीमाच राहिली नाहीं. त्यांना आम्ही आपल्यापैकींच समजतों हें आम्ही कृतीनें दाखवून दिलें. सुगीच्या वेळेपर्यंत तर त्यांच्यांत केवढा तरी मोठा फरक झालेला दिसत होता. त्यांच्या अंगावर शेंकडों ठिगळें लावलेलीं फाटकीं लक्तरें नव्हतीं.

ते आतां आंघोळ वगैरेच्या बाबतींत विशेष लक्ष देतात हें त्यांच्या निर्मळ चेहऱ्यां-वरून कुणालाहि सांगतां आलें असतें. आतां त्यांच्या अंगावर मांस चढलेलें होतें. खालीं मान घालण्याऐवजीं इतरांच्या नजरेला आपली नजर त्यांना भिडवितां येत होती. आमच्या दास-कर्मकरांना आतां अधिक विपुल व अधिक चांगलें खाणें-पिणें-लेणें मिळत होतें. परंतु याबद्दल त्यांनीं आमचे उतराई व्हावें असें आम्ही समजत नव्हतों. आतां ते स्वतः आपल्या मनानेंच दुप्पट-तिप्पट काम करीत होते. कुणाला डंवचायचें अगर कुणावर देखरेख करावयाचीहि कांहीं जरूरीच नव्हती. आमच्या दासी-काम-करणी आपल्या चरख्यांवर खूप बारीक सूत काढत होत्या. विणकर सुंदर वस्त्रें विणीत होते. शिंपिणी उत्तम शिलाई करीत होत्या आणि त्यांतल्यात्यांत सवड मिळवून कपड्यावर हंसाच्या आकृतीचा व पानांफुलांचा कशीदा काढीत होत्या. आपण जें कांहीं उत्पादन करीत आहोंत त्याचा उपभोग घेण्याचा आपलाहि हक्क आहे हें आतां सर्वांनाच समजूं लागलें. याचा एक वाईट परिणाम मात्र असा झाला कीं आमच्या पन्नास घरांतल्या दास-कर्मकरांची सुस्थिति पाहून इतर घरांतले दास-कर्मकर देखील आपल्या स्थितीविषयीं असंतोष प्रदर्शित करूं लागले. दास तर बिचारे विकले गेलेले होते; त्यांना कुठें जातां येणार ? पण कर्मकर ( कामगार ) आमच्या शेतींत सामील होण्याचा आपल्या मालकांना खूप आग्रह करीत होते. आपल्या मालकांच्या कामाकडे त्यांचें पूर्वांपेक्षां जास्तच दुर्लक्ष होत होतें. जालुकानें आमचा दास कुंभीलक याच्या हातचें विणलेलें कापड पाहिलें आणि तो आपल्या दासाला म्हणाला—" बघ. कुंभीलक कसं छान कापड विणतो ! तुझ्याजवळ काय त्याच्यासारखे हात नाहींत होय रे ? " त्यानें उत्तर दिलें-"स्वामी ! कुठं कुंभीलक अन् कुठं मी. त्याचं शरीर आपण पाहिलंय ? त्याचं खाणं-पिणं-लेणंहि आपण पाहिलंय ? " जालुक गप्प बसणारा माणूस नव्हता. त्यानें लोकांना भडकावण्याची खटपट केली. म्हातारे लोक त्याला थोडीशी साथहि देऊं लागले. पण आमची तरुण सेना त्याला तोंड द्यावयाला हजर होती. आम्ही तरुणांना हत्यार चालविण्याचें शिक्षण चांगलें देत होतों इतकेंच नव्हे तर यापुढें विक्रमादित्य केवळ पांचशें हत्तीच घेऊन नाहीं येणार हेंहि आम्ही समजावून सांगत होतों. तो जर आपली शक्ति दसपट वाढवीत असला तर आम्ही आमची शक्ति वीसपट वाढविली पाहिजे. शरद्‌ऋतूंत धान्याचा हिशेब करण्यांत आला तेव्हां आमच्या शेतांत इतरांच्या दुप्पट धान्य पैदा झालें असें कळून आलें. आम्ही आमच्या शेतांची सेवा पुष्कळ केलेली होती. पुष्कळ नांगरणी केलेली होती. गवताची काडीन काडी काढून टाकलेली होती. पाणी देण्याची व जास्त पाण्याचा निचरा करण्याची तरतूद केलेली होती. आमचीं पन्नास घरें व त्यांतले दास-कर्मकर मिळून सर्वांचा आतां एक विशाल परिवार झालेला होता. आमच्या परिवारांतले सारेच लोक प्रसन्न

होते. सारे चढाओढीनें काम करीत होते. मुलांच्या मनोवृत्तींत तर आणखीच बदल झालेला होता. लहान-मोठे शंभर मुलगे होते. आमच्या खूप लांबरुंद शेतीजवळ जाऊन हे मुलगे म्हणत असत–" ही आमची शेती आहे." दास-कर्मकरांचीं मुलेंहि त्यांच्यांत सामिल असत. आमच्या परिवारांतला एक मुलगा एक मोठी चिरफळी घेऊन चवाठ्यावर बसलेला होता. त्याचे चार पांच सोबती आमच्या परिवारांतले होते आणि पांचसात बाहेरचे मुलगेहि आपल्या लहान लहान पट्ट्या घेऊन आलेले होते. एक बाहेरचा मुलगा म्हणाला–' तुझी पट्टी खूप मोठी आहे. कुठून आणलीस ? " आमच्या घरच्या एका मुलानें लगेच जबाब दिला—" तुझी पट्टी असणार कुठून मोठी ? तुझं शेत लहान, तुझा परिवार लहान. आमची पट्टी मोठी आहे, आमची शेतीहि मोठी आहे, आमचा परिवारहि मोठा आहे." एका बाहेरच्या मुलाला हें सहन नाहीं झालें. तो ताडकन् म्हणाला––" अरे जा जा ! तुझी काय शहामत लागलीय आमच्याशीं बोलायची. काली-दासीच्या मुलाचं उष्टं खातोस तूं." यावर आमच्या मुलानें सांगितलें––" तुला उष्टंहि नाहीं मिळायचं. तूं उपाशी मरशील. बघितलीस, आमच्या घरांत डोंगरायेवढी धान्याची रास लागली आहे."

मी सिंहलद्वीपांतल्या विशाल वापी ( तलाव ) पाहिल्या तेव्हांच माझ्या मनांत असा विचार आला होता कीं जर यौधेयभूमींत आम्हांला पाण्याची चांगली सोय करतां आली, तर आम्ही एक वर्षाचें पैदा केलेलें अन्न पांच वर्षे खाऊनहि सरणार नाहीं. परंतु येवढ्या मोठ मोठ्या वापी बांधावयाला हजारों हातांची जरूर होती. त्यांत पुन्हां आमच्या इथें फार थोड्या ठिकाणीं उंच सखल जमीन होती. तशी असती तर वरच्या जमिनींत वापी बांधून तिथून दंड काढून खालच्या जमिनीला पाणी देतां आलें असतें. तरी पण माझ्या डोक्यांत आणखी एक विचार चालू होताच. अग्रोदकामध्यें विहिरींच्या पाण्यावर शेती चालत असे आणि विहिरींची संख्या फार थोडी होती. आम्ही आमच्या शेतीसाठीं कांहीं विहिरी खोदावयाचा निश्चय केला. जें शेत आज आम्हांला मिळालें असेल तें उद्यां कदाचित दुसऱ्याच्या हातीं जाईल हें आम्हांला ठाऊक होतें. हा प्रकार पूर्वी फार कमी होत असला तरी आतां विहिरी पाहून म्हाताऱ्यांच्या तोंडाला पाणी सुटणार हेंहि आम्ही जाणून होतों. पुरस्कर्ता बप्पांनीं आम्हांलाच पूर्णपणें पाठिंबा दिलेला होता; आणि तरुण तर आमच्या बाजूचेच होते. म्हणून म्हाताऱ्या लोकांच्या विरोधाचें आम्हांला तितकेसें भय नाहीं वाटलें. आमचें काम व पीक पाहून सारे तरुण आमच्या मार्गानें जाऊं इच्छित होते परंतु अजून लगाम म्हाताऱ्यांच्या हातीं होता. तरीसुद्धां आम्ही या वर्षी पन्नास विहिरी बांधण्याची योजना सादर केली तेव्हां तरुण सेनेनें तिचें स्वागत केलें. या विहिरी केवळ आमच्याच जमिनींत बांधावयाच्या हें आम्हांला पसंत नाहीं पडलें. आम्ही

नांगरलेली जमीन दुसऱ्याच्या हातीं जाईल या धास्तीचा विचार या बाबतींत आमच्या मनांत नव्हता. निदानपक्षीं शेतीला पाणी देण्याच्या बाबतींत तरी समाईक काम करण्याची संवय लागावी हाच विचार आमच्या मनांत मुख्यत्वेंकरून आला.

पावसाळा संपल्याबरोबर आमच्या पिकाची कापणी झालेली होती. आणि रिकाम्या शेतांतून पुन्हां पहिल्यासारखीच नांगरट सुरू झाली. आम्ही आमची शेती खूप बार-काईनें नांगरली. त्यांत कुठें ढेंकळाचें नांवहि राहिलें नाहीं. मग त्यांत निवडक गहूं पेरले. गव्हाची पेरणी आम्ही जास्त केली. थोडासा हरभरा, जव, मोहरीं, जवस, करडई, मटारहि पेरला. हीं पिकें चांगलीं येणें न येणें बऱ्याच अंशीं हेमन्तांतल्या पावसावर अवलंबून होतें. म्हणून त्यांचा आम्हांला तितकासा भरंवसा धरतां येत नव्हता. तथापि पेरणी पूर्ण होतांक्षणीं आम्ही विहिरी खोदण्याच्या तयारीला लागलों. या कामांत सारे यौधेय तरुण-तरुणी व दास-कर्मकरांची बरीच मोठी संख्या सामील होती. शेकडों लोक जंगलांत लांकडें तोडण्याच्या कामाला लागलेले होते. आणखी बरेचसे लोक विटा तयार करीत होते. शेतांमध्यें आम्ही खूप खात टाकलेला होता. हेमन्तांत पाऊस चांगला झाला. परंतु अजून शेतीला गारांचा धोका होताच. चैत्रांत पिकाची कापणी होऊन तें खळ्यावर येईपर्यंत माझी काळजी दूर झालेली नव्हती. आमचें वसंतातलें पीक शरदांतल्या पिकाहूनहि सरस आलें. हेमन्ताचा पाऊस संपल्यावर आम्ही मोठमोठ्या भट्ट्या लावून त्यांत विटा भाजल्या. आणि त्याचबरोबर निवडक स्थानीं आम्ही विहिरी खोदण्याच्या कामाला लागलों. पहिल्या सुगींत आमचें जास्तींत जास्त लक्ष कामाकडे होतें. आम्ही उत्साहानें काम करीत होतो. परंतु अशा कामाचा आम्हांला अगोदरचा अनुभव कसलाच नव्हता. दुसऱ्या हंगामापर्यंत मात्र आम्हांला सामुदायिक कामाच्या बाबतींत अपार उत्साह वाटला इतकेंच नव्हे तर तें काम आम्ही मोठ्या मनोरंजक धर्तीवर करूं लागलो. कामाची व भोजनाची वेळ ठराविक होती. कामाचा बोजा हलका वाटावा म्हणून पूर्वींहि आम्ही गाणीं म्हणत असूं; परंतु आतां पंचवीस नव्या धर्तीचीं गाणीं तयार झालीं होतीं. कांहीं गाण्यांतून जयाचें गौरवगानहि केलेलें होतें. तें ऐकतांना मला फारच संकोच वाटत असे. काम संपवून घरीं आल्यावर पुन्हां आमचें नृत्यगीतमंडळ जमे. मी, रैवतक व माधव यांसारख्या पुढाऱ्यांना कामाची व्यवस्था करण्यासाठीं बराच वेळ द्यावा लागे. तरी पण आम्ही बहुधा नृत्यांगणांत हजर असूंच.

आमच्या विहिरी बांधून तयार झाल्या तरी अजून पावसाळा सुरू व्हावयाला अडीच महिने अवकाश होता. अग्रोदकामध्यें जलाशय होते. पण आतां आम्हांला त्यांची संख्या व आकार वाढवावयाचे होते. आम्ही या वर्षी एक विशाल सरोवर खोदावयाच्या कामाला हात घातला. हजारों पावडीं व टोकऱ्या जमा करण्यांत

आल्या. ग्रीष्माचा मोसम होता. आणि यौधेयभूमींत उकाडा बराच असतो. आम्ही दिवसाच्या मधल्या वेळांत सुट्टी घेत असूं आणि काम पहिल्या प्रहरांत व संध्याकाळच्या दोन प्रहरांत रात्रींपर्यंत करींत असूं. तसें म्हटलें तर श्रीमंत व कुलीन यौधेयानींनीं आपल्या मोरपिसांसारख्या तुकतुकीत केंसांवर धुळीचा एक कण देखील पडलेला खपवून घेतला नसता. परंतु आतां त्यांचे केंस व सारें शरीर धुळीनें माखून राही आणि याला त्या शोभेची गोष्ट समजत असत. एक दिवस आमचा असाच विनोद चाललेला असतांना नन्दानें मला टोमणा मारला–

" भाऊजी ! मला वाटतं तुम्ही यौधेयभूमींतून स्त्री-सौन्दर्याची हकालपट्टी करणार. "

मी उत्तर देण्याच्या अगोदरच रेवतक सांगूं लागला– " बरोबर आहे. या बाबतींत मी माझ्या अर्धांगीशीं सहमत आहें. यौधेय तरुणींची येवढ्यांत कुठं जरा कदर होऊं लागलेली होती. पण आतां त्यांना कोण विचारणार ? पाहिलेस ना नन्दाचे पद्म कमळासारखे अरुणकोमल कर-पल्लव किती काळपटलेले व खरबरीत झाले आहेत ते ! बिचारी. ... "

नन्दा त्याचें बोलणें पुरते होऊं न देतां मध्येंच म्हणाली–– " पुरे पुरे ! रेवत ! तूं कवि होणार वाटतं. "

रेवतक––" स्त्रीसौन्दर्याचं गान कवीच सतत करीत आलेले आहेत. तूंच काय, मी स्वतःसुद्धां कमनशिबी आहें बघ. संगीताची स्फूर्ति नष्ट होऊं पाहते आहे अशा वेळीं मी लागलोंय कवि व्हायला. बिचारी ... "

नन्दा– " पुरे रे ! मोठा निघालाय काव्यगायन करायला ! "

रेवतक– " मला माझ्या दुर्दैवाला बोल लावून रडूंहि देत नाहींस तूं ! मी काय चुकीचं सांगतोंय ? "

मी मध्येंच म्हणालों– " वहिनी ! मी माझा अपराध कबूल करायला अन् त्याबद्दल शिक्षा भोगायला तयार आहें. पण यौधेयानींचं सौन्दर्य खरोखरीच नष्ट होत चाललंय हें तूं अगोदर सिध्द तर करशील ? "

रेवतक–"जय! तूं जखमेवर मीठ चोळायला लागलास ! बिचाऱ्यांचीं पोळलेलीं अंतःकरणं आंतल्या आंत कुढत आहेत. पूर्वी कसे त्यांच्या अंगावर चर्बीचे थरच्या थर जमा होत असत ! त्यांमुळं त्यांचं शरीर लोण्यासारखं कोमल होत असे; हात ठेवला कीं विरघळून जात असे ! मी तर एक वर्षापूर्वीच्या नन्दाच्या रूपाची आठवण काढकाढून रडतोंय. "

नन्दा–" म्हणजे तुला सौन्दर्य नकोय. तुला हवी आहे म्हैस. "

रेवतक–" प्रियतमे ! असं नको ग बोलूंस. माझी नन्दा तशी कधींच नव्हती. अन् तशी जरी असती तरी सुद्धां यौधेयानं तें आपलं सुदैवच मानायला हवं होतं. यौधेय भूमींतल्या म्हशीच्या सौन्दर्याची ख्याति साऱ्या भारतभर झालेली आहे. त्यांचीं छोटींछोटीं वांकडींतिकडीं शिंगं, त्यांचीं बाटलीसारखीं तुकतुकीत शरीरं, त्यांचीं घागरीसारखी भरदार थानं, त्यांचीं जमिनीला टेकायला आलेलीं पोटं--हें सारं पाहून ज्याच्या तोंडाला पाणी सुटणार नाहीं असा आमच्या शेजारचा एकतरी देश आहे का ? "

मी–"म्हणजे स्त्री-सौन्दर्याची हीच का तुझी परिभाषा ? "

रेवतक–" जय ! तूं सुद्धां ही परिभाषा चुकीची समजतोस ? त्या दिवशीं म्हशीला शिव्या देणाऱ्यांपुढं तूं केवढं तरी लांबलचक व्याख्यान दिलं होतंस. विसरलास वाटतं तें येवढ्यांत ? "

नन्दा–" भाऊजी ! तुम्ही रेवतकचं मन अगदीं बिघडवून टाकलंय. तो आतां आपण, सेनानायकच नव्हे तर सौन्दर्य-पारखी कवि देखील आहोंत असं समजूं लागलाय. सौन्दर्याची हीच जर परिभाषा असेल तर रेवतकनं ती पहिल्यांदां आपल्याच शरीराच्या बाबतींत अमलांत आणावी. "

रेवतक–" स्वामिनी ! मी स्वतःला वगळूं इच्छीत नाहीं. पण करणार काय ? जय मला तसा होऊं देईल तर ना ! जालुकाच्या बायकोकडे पाहून मला फार हेवा वाटतो बघ. "

मी हंसत हंसत म्हणालों--" ठीक ! म्हणजे भायर रेवतकाची नजर जालुकाच्या पत्नीवर गेली म्हणायची ! "

रेवतक--"जय ! आतां तूं दोन्ही अर्धांगांचंहि भांडण लावूं पाहतोस होय ? "

मी–"भांडण लावणं हेंच तर दिराचं काम असतं. वहिनी बारा महिने तेरा काळ गर्भारच असलेली पाहणं तुला आवडतं असं कां नाहीं म्हणत ? "

भुंवयांचीं धनुष्यें रेवतकवर रोंखून नन्दा म्हणाली--" म्हणजे मला पुरतीच म्हैस व्हायला हवं ! डोळे आंत ओढलेले, गाल बाहेर आलेले, छाती दबून गेलेली, पोट बाहेर आलेलं ! भाऊजी ! माझ्या नवऱ्याला झालंय तरी काय ? असं कां बोलतोय हा ? "

रेवतक–" जें नवऱ्याला आवडतं तेंच स्त्रीचं सौन्दर्य. "

नन्दा–" तुझ्यासारख्या नवऱ्याला आवडतं तें ना ! भाऊजी ! माझ्या नवऱ्याचं हृदय आंतून किती काळं आहे तें पाहिलंत ना ! यौधेयानींचं सौन्दर्य आणखी वाढवा असं सांगत होत्यें मी तुम्हांला; अन् हा म्हणतोय कीं जालुकाच्या बायकोसारखं व्हावं ! "

रेवतक– " नन्दा ! नाराज नको होऊंस. यौधेयानींना जर आपले हात लाल असावेत व आपलं शरीर लोण्यासारखं गुलगुलीत असावंसं वाटूं लागलं तर त्यांना जालुक पत्नीच व्हावं लागेल. "

मी—" वहिनी ! भय्याचं हें बोलणं तर बरोबर दिसतंय. खूपसं तूप-दूध-मांस खायला मिळालं, सावलींत राहायला मिळालं, हालचाल करायची जरूरच पडली नाहीं, म्हणजे मग जालुक-पत्नी नाहीं होणार तर दुसरं काय होणार ? "

वसुनन्दा आतांपर्यंत गप्प बसलेली होती. तिला आतां तोंड उघडल्यावांचून राहवेना—" तुम्हां लोकांना दुसरं कांहीं काम नाहीं म्हणून हें सौन्दर्याचं भांडण भांडत बसलांत होय ? "

मी—" वसु ! तूंच आतां नीट न्याय कर बरं ! "

रेवतक—" वसु न्याय करील तर काय झालं. हिचे सोनेरी केंस तर उन्हामुळं आणखीच चमकदार होतात. यौधेयभूमींत हिला आपल्या तोडीची कुणी असायची धास्तीच नाहीं. पण वसु ! ब्रह्मदेवानं तुला पट्टराणी करायसाठीं जन्माला घातलं अन् हा जय तुझ्या अंगावर माती ओतओतून तुला मारून टाकायला टपलाय हें मात्र लक्षांत ठेव हं. "

वसुनन्दा—" रेवत भाऊजी ! आतां ताईला सोडून मला दडपायला लागलांत होय ? ठीक ! "

रेवतक—" तूं जिथं विक्रमादित्याच्या विक्रमाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या केल्यास तिथं बिचारा रेवतक कुठल्या झाडाचा पाला ? मी माझ्या मतानं सौन्दर्याची परिभाषा सांगितली. आतां तूं आपली परिभाषा सांग. मात्र ती स्वतःलाच लागू होईल अशी नको हं सांगूं. "

नन्दा– ( वसुनन्दाचें मस्तक आपल्या गालांशीं लावून )–" माझी बाळी ग तूं ! बघितलास ना तुझ्या मेव्हण्याच्या जिभेचा पट्टा कसा फडाफड चाललाय तो. रेऊ रे ! तूं लोखंडाचे तीर जितक्या वेगांत सोडतोस तितक्याच वेगानं तुला शब्दांचेहि तीर सोडतां येतात म्हणायचे. "

रेवतक—" अग तिला बोलूं तर देशील. ती सौन्दर्याची योग्य परिभाषा सांगूं दे, रेवतक ती कबूल करील. "

वसुनन्दा—" ठीक ! रेवतक भाऊजी ! ऐका तर. मी पुरुषाच्या सौन्दर्याचं सांगत्यें हं. अन् तीच गोष्ट जवळ जवळ तशीच स्त्रीलाहि लागू पडते. शरीरांत खूप मांसपेशी असाव्यात, पण चर्बीचं नांवहि नसावं. खांदे उंच असावेत, अन् छाती रुंद असावी. पण कमरेंत लठ्ठपणा मुळींच असूं नये. दंड खूप पिळदार असावेत, अन् पंजे लोखंडासारखे असावेत. ... ... "

" म्हणजे तंतोतंत जय जसा आहे तसं सौन्दर्य असावं. "

बिचारी वसुनन्दा लाजली. नन्दानें आपल्या गालांनीं तिचे डोळे झांकले.

पावसाळयाच्या अगोदरच आम्ही आमचा मोठा तलाव खोदून तयार ठेवला. मातीच्या मोठमोठ्या बांधांवर शिसवीच्या झाडांचें बीं पसरून दिलें. पावसाच्या पाण्यानें तलाव भरल्यावर त्याची शोभा औरच दिसत होती. पुरस्कर्ता बप्पांनी त्या दिवशीं यौधेयांची मोठी सभा भरविली आणि तलावाला ' सुनन्दा-सागर ' असें नांव दिलें.

( १९ )

## विवाह

वसुनन्दाला मी पूर्वीहि एकदोन वेळां पाहिलें होतें. त्यावेळीं ती एक साधीभोळी सुन्दर बालिका दिसत होती. ती यमुनेच्या तीरावर जखमी झाल्यावर तिला अग्रोदकाला शुश्रूषेसाठीं खाटेवर पडून राहावें लागलें. त्या वेळीं मी तिच्या प्रकृतीची चौकशी करण्यासाठीं जात असें. तिच्या अंगावर कितीतरी जखमा झालेल्या होत्या. परंतु सर्वांत भयंकर जखम झालेली होती डाव्या कांखेंत. भाल्याचें टोंक खाली काळजापर्यंत भिडण्यास अवघ्या एका जवाचें अन्तर बाकी राहिलेलें होतें. तें नसतें तर ती आम्हांला जिवंत दिसलीच नसती. वैद्यानें लगोलग औषध लावून जखमेला टांके घातले. तरीपण कांहीं दिवसपर्यंत तीं जीवनमृत्यूंच्या दरम्यान हेलकावे खात होतीच. अधून मधून बेशुद्ध होत होती. तिचा अरुण-गौर चेहरा कापसासारखा पांढराफटक दिसत होता. अंगांत रक्तच राहिलेलें नव्हतें. पुरस्कर्ता बप्प तर दररोज एक तासभर तिच्याजवळ बसत असत. सुनन्दाला आपल्या शौर्याचें पारितोषिक आपल्या हयातींत मिळूं शकलें नाहीं. पण वसुनन्दा मोठी भाग्यवान होती. यौधेयांच्या साऱ्या नगरींमधील स्त्रीपुरुष तिच्या दर्शनासाठीं येऊं लागले. गर्दी फार होऊं लागलेली पाहून आम्हांला त्यांना मनाई करावी लागली. कारण त्यांच्या प्रसन्न चेहऱ्याकडे पाहून-पाहूनच तिला थकवा येऊं लागला. नन्दा तिच्या खाटेजवळ कायमची राहिलेली असे. तिची जखम बरीचशी भरून आली व तिच्या

अंगांत थोडीशी ताकद येऊं लागली तेव्हां नन्दा मला म्हणाली--" भाऊजी ! तुमचं बोलणं ऐकून वसूला फार आराम वाटतो. तुम्ही आपल्या प्रवासाची एकेक हकीकत सांगतां अन् मग ती नेमक्या त्याच बाबतींत सवालजबाब करीत राहते. मला वाटतं तिची प्रकृति लवकर सुधरायसाठीं तिला अगदीं आनंदांत ठेवायलाहि हवंच."

ती चांगली हिंडूं फिरूं लागेपर्यंत मी नियमानें तिच्याजवळ तास दोन तास बसून राहूं लागलों. तिच्या अंगांत रक्त मुळींच नसतांना व ती अगदीं सुकून गेलेली असतांना मी तिचा चेहरा पाहिलेला होता. परंतु त्या वेळीं देखील तिचे टपोरे टोंकदार डोळे व त्यांवरील बारीकशा नाजुक भ्रूलता फारच आकर्षक दिसत असत. तिच्या श्रान्त मुखमंडलावर एक प्रकारचें अद्‌भुत मुग्धसौन्दर्य विलसत असें. ती हळूहळू बोले पण तिचें स्वरमाधुर्य कानाला फारच गोड लागे. मी चन्द्रगुप्ताविषयीं एखादी विनोदी हकीकत सांगितल्यावर ती गालांतल्या गालांत हंसे आणि त्या वेळीं तिच्या पातळ लाल ओठांच्या आडून रेखीव दन्तपंक्तींचीं शुभ्र किरणें मध्येंच चमकून तिच्या सौन्दर्याला आणखी शोभा आणीत असत. मी एक दिवस आमचें जहाज फुटलें त्याची हकीकत तिला सांगत होतों. वर तारे विखुरलेलें आकाश आणि खालीं अगाध समुद्र अशा स्थितींत मी हातपाय हालवून पोहूं लागलों हें मी तिला सांगितलें त्या वेळीं तिच्या चेहऱ्यावर अधिक टवटवी आली. ती एकदम म्हणाली- " ती लढाई तुम्ही कसे लढले असाल बरं ? "

मी- " पण वसु ! समुद्राच्या जलराशीवरून त्याच्यांतील धोक्याचा अंदाज तर तुला करतां आला नसेलच. "

वसुनन्दा- " अन्दाज केला आहे म्हणूनच तर मला हेवा वाटतोय. "

मी- " तुझी ही जखम पाहून मला जसा तुझा हेवा वाटतोय तसाच. "

वसुनन्दा- " इथं हेव्याचा काय प्रश्न ? इथं तर मृत्यूशीं लढायची तेवढी संधीहि नाहीं मिळाली. एका क्षणांत निकाल लागला. सुनन्दा ताईवर त्यानं विजय मिळविला अन् माझ्याशीं लढतांना त्याचा पराजय झाला ! मी त्याला सलामी केव्हां दिली अन् त्याला आखाड्यांतून केव्हां बाहेर फेंकून दिला हें मला कळलंहि नाहीं.

नन्दा- ( वसूच्या सोनेरी केसांवरून हात फिरवीत )- " माझी बाळी ती ! स्वतःचा लढा कळतच नाहीं हिला. सहासहा दिवस हिनं मृत्यूशीं झुंज दिली. "

मी- " अन् वहिनी ! मी तर सहा तासहि लढलों नाहीं. "

वसुनन्दा- " सेनापति ! तुम्ही गुप्तांचे शेषशायी भगवान् होऊन राहिलांत हेंच ना सांगायचंय तुम्हांला ? पण मृत्यु आपल्या अकाळ विकाळ दाढांचा आ करून तुमचा घोट घ्यायला सज्ज झालेला आहे अन् तुम्ही फळीवर यथास्थित ताणून दिली

वसुनन्दा– " म्हणजे आमचे सेनापति जय ? "

नन्दा– " अन् ... "

मी– " अग ! मलाहि थोडासा खुलासा करूं याल का नाहीं ? "

नन्दा– " भर परिषदेंत आमची निन्दा करत फिरतां अन् आतां लागले खुलासा करायला. खरं सांगूं वसु ! मी ज्या वेळीं यांचं भाषण ऐकत होत्यें त्या वेळीं मनांत आगीचा डोंब उसळला होता. काय करावं ! या पुरुषांनीं आम्हांला गणपरिषदेंत बसायचा हक्कहि दिलेला नाहीं. बायकांच्या बाबतींत एकतर्फी निकाल करायची यांना संवयच जडलेली आहे.

मी– " तुझी ताई अगदीं उलट सांगत आहे हं, वसु ! अन् पुन्हां मला बोलायला अवसरहि द्यायला नकोय तिला. "

नन्दा– " तुम्ही लोकांनीं आम्हां स्त्रियांना परिषदेंत बोलायला अवसर दिलाच होता जसा कांहीं. "

मी– " पण यौधेयानींना यौधेयांच्या बरोबरीनं युद्धांत भाग घ्यायचा हक्क द्यायची गोष्ट मी काढली कीं नाहीं ? अन् परिषदेनं तिला मान्यता दिली कीं नाहीं. "

हें ऐकतांक्षणीं वसुनन्दाचा चेहरा आनंदानें प्रफुल्लित झाला. ती माझ्याकडे आदरभरल्या नजरेनें बघत म्हणाली– " म्हणजे आमच्या सेनातपतींनीं आमच्या हातीं तरवार दिली इतकंच नव्हे तर पुरुषांप्रमाणं आम्हांलाहि तिचा उपयोग करायचा हक्क देखील देववला ! ताई ! ही गोष्ट बरोबर आहे ना ? "

नन्दा– " देववला , पण केवढी फजीति करून ! "

मी– " म्हणजे परवानगीशिवाय युध्दांत उडी घ्यायच्या तुमच्या अपराधाचं खापर मी जसं कांहीं माझ्या माथीं फोडून घेतलंच नाहीं नव्हे का ? "

वसुनन्दा– " ताई ! तूं सेनापतींवर नाराज होतां कामा नये. त्यांनीं सतत यौधेयानीं यांची बाजू घेतलेली आहे. अन् लढायचा हक्क देऊन आम्हां स्त्रियांवर त्यांनीं मोठे उपकार केले आहेत. "

मी– " आम्ही कांहीं उपकार केलेला नाहीं. तुम्ही आपल्या बलिदानाच्या जोरावर हा हक्क मिळवून घेतलांत. "

तिच्या कापसासारख्या पांढऱ्या फटक गालांवर हळूहळू अरुणिमा कसकसा येऊं लागला , तिचा खप्पड चेहरा गोल गोल कसा होऊं लागला, तिचे मोठे डोळे आणखी मोठे कसे होऊं लागले, तिचे सोनेरी केंस अधिक चमकदार कसे झाले, हें सारें मी पाहात होतों. आतांशा कितीदां तरी ती बसल्या बसल्या माझ्या तोंडून गोष्टी ऐके व माझ्यावर प्रश्नांचा वर्षाव करी. आम्ही आमची समाइक शेती सुरू केली त्या वेळीं ती हिंडूं फिरूं लागलेली होती. नन्दाला धुळीनें माखलेल्या स्थितींत

परत आलेली पाहून तिनें विचारलें– " ताई ! मी जेव्हां नव्या धर्तीच्या शेतीची गोष्ट पहिल्यांदां ऐकली तेव्हां तुझ्या तोंडावरचे हे घामाचे थेंब व त्यांच्यामुळं ओल-सर झालेली ही पिवळट-धूळ इतकी चांगली दिसेल असं नव्हतं वाटलं मला. "

नन्दा– " बरं झालं तूं अशा स्थितींत आहेस ती. नाहींतर इतर मुलींच्या सारखं तूंहि वादळ माजवलं असतंस. "

वसुनन्दा– " काय ग ताई ! इतर मुली वादळ माजवतात ? अन् मी तर अगदींच साधीभोळी मुलगी आहे. "

नन्दा–"तूं जर इतकी साधी भोळी असशील तर नन्दा-सुनन्दांची बहीण कसची ग तूं ! तूं जर चांगली धडधाकट असतास तर साऱ्यांच्या अगोदर शेतावर पोंचली असतीस हें जाणून आहें मी. "

वसुनन्दा– " पण ताई ! इतर मुली शेतावर जायसाठीं इतका जीव कां टाकतात ग ? "

नन्दा– " त्या दिवशीं तूं नाहीं कां रणांगणावर जाऊं नकोस म्हणतांक्षणीं मोठ्या ताईशीं भांडलीस ? तशाच ! "

वसुनन्दा– " पण साऱ्या मुंग्या तिकडे धांवत सुटायला आमच्या सेनापतीनं तिथं असा काय गूळ ठेवलाय तो ? "

नन्दा– " आमचे सेनापति ना ! बरोबर बोललीस बाळ. त्यांच्या रोमरोमांत केवळ गुणच गुण भरून राहिले आहे. आगींत उडी घ्यायला साऱ्यांच्या अगोदर स्वारी तयार असते, कीं मग हजारों तरुण-तरुणी यांच्या मागोमाग प्राण द्यायला तयार होतात. येरव्हीं असल्या उन्हांत कुणा यौधेयानीनं शेतांत जायचं नांव सुद्धां काढलं नसतं, मग पेरण्याखुरपण्याची तर गोष्टच राहूं दे. पण साऱ्याजणी धांवत सुटल्या आहेत. बेभान झाल्या आहेत जशा कांहीं. कुठं गटागटानं गाणीं म्हणत आहेत, कुठं कापणी करीत आहेत, कुठं एका हातांत पेंढ्यांचा कवळा व दुसऱ्या हातांत विळा घेऊन तरुणी नाचत सुटल्या आहेत नुसत्या. "

वसुनन्दा—" ताई ! मला फार वाईट वाटतंय. "

नन्दा–" तूं इतर मुलींच्याहि दहा पावलं पुढं राहशील हें ठाऊक आहे मला. हातांपायांत भरपूर ताकत असती तर तूं बसून थोडीच राहिली असतीस ? "

वसुनन्दा—" म्हणजे तिथं काहीं काम नाहींच; खेळच असावा सगळा असं वाटतंय. "

नन्दा—" इतकं मजेदार रीतीनं काम चालतं कीं वेळ कसा गेला तें कळत सुद्धां नाहीं. कुठंहि मुलींचा एक गट गाणं सुरू करतो. ' श्रावणमासीं मेघ वर्षती ' हें कडवं एका गटानं म्हटलं कीं दुसरा गट ' हिरवळ दाटे चोंहिकडे ' हें कडवं

म्हणतो. कीं मग विळे-खुरपीं जणूं आपोआप चालूं लागतात. मुलींची गाण्याची चढाओढ लागते. अन् रोजच्या रोज कुठून कुठून नवनवीं गाणीं निघतात कोण जाणे. ''

सुनन्दा—'' ताई ! आतां मी जास्त वेळ अशी दुर्बल नाहीं राहणार. मी लवकरच तुमच्या बरोबर काम करायला येणार हं. ''

वसुनन्दा बरी झाली तरी तिच्या मोठ्या जखमेवरचें कातडें अजून नाजुक होतें. पण लोकांनीं नको नको म्हटलें असतांहि ती शेतावर जाऊं लागली. गव्हाची कापणी चालू झाली तेव्हां तर तिला आमच्या तरुणींनीं अन्नपूर्णा देवी म्हणून सजविलें. तिच्या सोनेरी केंसांत हिरव्या फळांची लता गुंफण्यांत आली; तींत अधूनमधून गव्हाचे पिंवळे तंतु व जवसाचीं निळीं फुलें घातलीं. तिच्या गळयांत हरभऱ्याच्या घाट्यांची माळ होती. कानांत कुसुंब्याच्या फुलांचीं कर्णफुलें लटकावलेलीं होतीं. तिच्या हातांत मंगल-कलश होता; आंब्याचे हिरवे टहाळ व जवाच्या हिरव्या लोंब्या त्यांत खोंचलेल्या होत्या. दुसऱ्या हातांत गव्हाच्या तंतूंचा एक खूप मोठा गुच्छ होता. तिच्या बरोबर इतर तरुणीहि लता, जवसाचीं फुलें इत्यादींचा शृंगारसाज करून बसलेल्या होत्या आणि आपल्या मधुर कंठांनीं रान कोकिळांनाहि लाजवीत होत्या. त्या दिवशीं तरुण-तरुणींमध्यें नृत्याची खूपच चढाओढ झाली. रासकनृत्य झालें तसेंच जोडप्यांचें नृत्यहि झालें. त्या दिवशीं वसुनन्दाला आपला जोडीदार निवडायची पाळी आली. तेव्हां मुलींनीं तिला माझ्याकडे जाण्यासाठीं खुणावलें. बिचारी लाजली. जागची हलेना. मी पाहत होतों. मग मी स्वतःच तिच्याकडे गेलों आणि म्हणालों–'' वसु ! मी तुझ्याबरोबर नाचायला तयार आहे. ''

मी वसुनन्दाबरोबर नाचावयाचा तो पहिलाच प्रसंग. त्या वसंतांत आमचीं पिकें फार चांगलीं आलीं हें मी अगोदरच सांगितलें आहे. आमच्या तरुण कवींनीं त्या प्रसंगाला अनुसरून कांहीं सुंदर गाणीं रचलीं होतीं. आज तीं गाणी मला आणखीच गोड लागत होतीं आणि नृत्य तर जास्तच आवडत होतें. आमची एक वर्षाची मेहनत भोंवतालच्या साऱ्या सुखी चेहऱ्यांवरील आनंदांत मूर्तिमंत अवतरलेली आम्ही पाहिली.

माझें स्वतःचें घर होतें. परंतु त्यांत माझ्याशिवाय कुणीच राहत नव्हतें. माझ्या दोघी बहिणी कधीं कधीं येत असत; त्या वेळीं काय तें घर भरलेलें दिसे. मुलांच्या किलबिलाटानें तें गजबजून राही. घरीं गेल्याबरोबर पाहिल्याच वर्षी मी रेवतकच्या संसारांत सामील झालों. मी नन्दावहिनीच्या हातचें जेवण जेवीत होतों आणि राहात होतों स्वतःच्या घरीं. जसजशी आमच्या तरुण दलाची संघटना अधिकाधिक वाढूं लागली तसतसें माझें घर वैयक्तिक न राहतां सामुदायिक घर होऊं लागलें.

माझ्या आणि रेवतकच्या गोशाळांतल्या गाई एकत्र करून त्याच्या घरीं अश्वशाळा ठेवली. माझें जेवणखाण पूर्वीप्रमाणें नन्दावहिनीच्या घरींच होत राहिलें. आमच्या समाइक खेतींत पुढच्या वर्षी आणखी अनेक परिवार सामील झाले. आमची शेती एकत्र होत असली तरी धान्य आम्ही कामाच्या हिशोबानें वांटून घेत असूं. आणि या वांटणींत दास-कर्मकरांचाहि सारखा हिस्सा असे. वस्तुतः आमच्या व इतरांच्याहि बाबतींत त्यांचे नातें आतां दास-कर्मकरांचें राहिलेलेंच नव्हतें. आम्ही विजयाच्या तिसऱ्या वर्षी आमच्या घरांतून तर दासतेची हकालपट्टीच केली होती. आमचे दास अजूनहि आमच्याकडेच राहात होते. परंतु ते आपल्या खुषीनें राहात होते. मात्र आमच्या या मुक्त कर्मकरांना राजकाजांत समान हक्क आम्हांला देतां नाहीं आले.

जखम बरी झाल्यानंतर वसुनन्दाहि बहिणीकडेच राहूं लागली. आम्ही रोज एकमेकांना पाहत होतों, पण जसजसे दिवस जाऊं लागले तसतसा माझ्याशीं बोलतांना तिचा संकोच वाढतच गेला. वास्तविक ज्याची रोजच्या रोज भेटगांठ होते त्याच्या स्वरूपांतलें परिवर्तन पाहणाराच्या लक्षांत येत नाहीं. पण मला मात्र वसुनन्दाच्या वाढत्या सौंदर्याचें मोजमाप करतां येत होतें. तिचे अवयव मुळांतच सुन्दर होते, पण आतां आमच्या शेतीवाडीवरची मेहनत, नृत्य, लष्करी कवाइत इत्यादींच्या योगानें तें सौन्दर्य आणखी घोटीव होत चाललें होतें. आतांशा मी तिला कांहीं विचारलें कीं ती सेनापतीला अत्यंत नम्रतेनें उत्तर देई. पण तिची नजर पूर्वीप्रमाणें निःसंकोचपणें माझ्या चेहऱ्यावर खिळून नसे राहत. मुग्ध सौन्दर्य हें केवढें अनुपम सौन्दर्य असतें हें मला तिचें रूप पाहून कळलें. पण जेव्हां माझी नजर तिच्याकडे लागलेली नसे तेव्हां मात्र ती जास्त धिटाईनें माझ्या तोंडाकडे बघत असे. तिच्या शौर्याची हकीगत मी ज्या वेळीं ऐकली व तिच्या जखमा पाहिल्या, तेव्हांपासूनच मी तिला इतरांपेक्षां वेगळ्या प्रकारची तरुणी समजूं लागलों होतों. एक वर्षपर्यंत मी लोकांसमोर शौर्याचा आदर्श म्हणून वसुनन्देचेंच उदाहरण देत राहिलों. पण पुढें पुढें या बाबतींत मला संकोच वाटूं लागला. आणि याला कारण झाला नन्दावहिनीचा विनोद—मात्र हें सांगणें सर्वस्वीं बरोबर नाहीं ठरणार. कदाचित मला माझें मनोगत उमगण्यापूर्वीच वहिनीच्या नजरेनें तें ओळखलें असावें. मी स्वतःला वसुनन्देच्या सौन्दर्याचा निर्विकार निरीक्षक किती काळपर्यंत समजत होतों कोण जाणे. बहुधा एकाद दिवशीं मी वसूची प्रशंसा करीत असतांना मला पाहून वहिनी गालांतल्या गालांत हंसली असावी, आणि त्या दिवसापासूनच माझ्या मनांत चलबिचल सुरू झाली. वसु अन्नपूर्णा झाली असतां मी तिच्या बरोबर नाचलों त्याच्या अगोदरची आहे ही गोष्ट.

आम्ही यौधेयांना केवळ बहुधान्यक ( पुष्कळ धान्य पिकविणारे ) करून संतोष मानणारे नव्हतों. गाई, म्हशी, घोडे, बोकड, बकरे या साऱ्या पशुधनाच्या संवर्धनाकडेहि आमचें तितकेंच लक्ष होतें. वांसरें पैदा करायासाठीं आम्ही केवळ उत्तम प्रतीचे बळूच तेवढे उपयोगांत आणीत असल्यामुळें आमच्या जनावरांची अवलाद सुधारत चालली हें पाहून मला आनंद होत होता. दहा वर्षांच्या अवधींत या दिशेनें जी प्रगति आम्ही केली आहे ती लक्षांत घेतां पुढच्या पिढीला आपल्याला लागणाऱ्या घोड्यांसाठीं सिंध, कम्बोज व काबुल या देशांचें दर्शन घेण्याची जरूर राहणार नाहीं याची मला पूर्ण खात्री वाटते. पुन्हां बहुपशु ( पुष्कळ पशूंचे धनी ) होण्याच्या बरोबरच यौधेयांना आपल्या शिल्पाचीहि प्रगति करावयाची होती. त्यांतहि आम्ही यशस्वीपणें प्रगति केली. पण आमचें सर्वांत मोठें धन होते यौधेय शिशु, यौधेय तरुण. यौधेयांच्या दिव्य भूमीचें दिव्यत्व राहणें ही त्यांच्याच हातची गोष्ट होती. शारीरिक व्यायाम तर आमचीं मुलें धुळींत खेळावयाला लागल्याबरोबरच सुरू करतात. एकदां उत्तम संततीविषयींच आमची चर्चा चालू झाली. यौधेयांनीं आपल्या डोळ्यांदेखत आपल्या घोड्यांची व इतर पशूंची अवलाद सुधारत असलेली पाहिली होती. ही अवलाद सुधारण्याचें सर्वांत जास्त श्रेय आमच्याकडे आहे ही गोष्ट सर्वांच्या सहज लक्षांत येण्याजोगी होती. म्हणून मानवी संततीच्या बाबतींतहि माणसाला थोडीफार कामगिरी करतां येईल असें त्यांना वाटूं लागलें होतें. कित्येक गोष्टी सरळ सांगण्याच्या बाबतींत तसा मी फारच कमी संकोच करतों; पण माधव माझ्यापेक्षांहि जास्त फटकळ आहे. तो एक दिवस तरुण सेनानायकांच्या बैठकींत सांगत होता—" जनावरांची प्रजाच सुधारत राहणार कां यौधेयांचीहि ? "

यावर रेवतक म्हणाला—" म्हणजे बेत काय आहे ? काय माधव ! आम्ही हलके सलके बळू जसे यौधेयभूमींतून बाहेर काढून लावले, खुज्या-कुरूप गाई-म्हशी जशा आम्ही यमुनेच्या पलीकडे घालवून दिल्या तसलाच प्रकार कांहीं यौधेय-यौधेयानींच्या बाबतींत करायचा विचार चाललाय कीं काय तुझा ? "

माधव—" मित्र रेवतक ! घाबरू नकोस तूं. तुझ्यावर नि नन्दावहिनीवरहि गंगेच्या पलीकडे हद्दपार व्हायची पाळी नाहीं येणार. मात्र तुम्हीं दोघांनीं यौधेयांना जीं तीन मुलं दिलींत तीं पाहिल्यावर हा आंकडा फार कमी आहे असं आम्हांला ठांसून सांगावं लागणार हं. "

मी—" म्हणजे वर्षाला एक मूल येवढी संतति यौधेय-गणाला पुरेशी वाटत नाहीं असं नन्दावहिनीला सांगावं लागेल. माधव ! मलाहि तुझं मत पटतं बुवा ! एका मुलासाठीं सहा महिने पुष्कळ झाले असं वहिनीला सांगितलं पाहिजे आतां. "

रेवतक—" मलाहि जयचं मत मान्य आहे. जमल्यास सहा महिन्यांत, अन जर

निसर्गावर तेवढी हुकुमत असेल तर जुळीं-तिळीं अशीं मुलं व्हायला हवींत. त्याचे बरोबर आपणां सर्वांच्या वतीनं माझी अशीहि विनंति आहे कीं माझा मित्र माधव यानंच हा संदेश नन्दाकडे घेऊन जावा. ''

सारे एका सुरांत सांगूं लागले-'' भायर जयनं दाखवून दिलेली गोष्ट फारच चांगली आहे. माधवला या कामासाठीं नन्दावहिनीकडे पाठवलं पाहिजे. ''

माधव बिचारा भलत्याच पेंचांत अडकला. तरी पण तो गप्प बसणारा नव्हे. त्यानें सांगितलें-'' दोस्त हो ! हें काम तर आमचा सेनापति जय यालाच साधेल. नन्दावहिनी त्यालाच वळते. तुम्ही सारे लोक जाणूनबुजून अज्ञान कां दाखवतां ? दूध लुटायच्या वेळची गोष्ट विसरलांत का तुम्ही ?'' लोकांच्या नजरा आतां माझ्याकडे वळल्या. माधव आपलें घोडें तसेंच पुढें दामटीत नेत म्हणाला--'' भावजयीचा प्रश्न तर आपण दिरावर सोंपवून देतच आहोंत. पण चांगली संतति निर्माण करायचा विचार देखील मुळांत माझ्या डोक्यांतून नाहीं निघालेला. भाई जयलाच विचारा तुम्ही. कुणा यवनगणानं या कामासाठीं खास कायदाच केलेला होता ही माहिती तर यानंच मला सांगितली. '' सर्वजण एकदम म्हणाले--'' वा सेनापति ! आम्हां-लाहि सांगा ना त्या गणाची हकीगत. ''

मी म्हणालों--'' होय. यवन देशांत कांहीं गण होते. त्यांतल्या एकाचं नांव होतं स्पार्टा. त्यांच्यांत अशी चाल होती कीं मूल जन्माला आल्याबरोबर तें एका डोंगरावर सोडून येत असत. थंडी-ऊन सहन करून तें चोवीस तास जिवंत राहिलं तरच तें स्पार्टाचा नागरिक व्हायला लायक आहे असं समजत असत. नाहीं तर असल्या कमजोर बालकांना ते आपल्यांत जिवंत राहूंच देत नसत. ''

बंधुक म्हणाला-'' ही गोष्ट तर यौधेयांत चालायची नाहीं बुवा. ठाऊक आहे ना तुम्हांला ? आपल्यांतले कित्येक भाई जैनहि आहेत. ''

माधव--''अहो जैनांचं चाललं असतं तर ढेंकूण-पिसवा-उवा या चट साऱ्यांना यांनीं कुणाला हात नसता लावूं दिला. मी एक दिवस जालुकला म्हणालों--' श्रेष्ठि ! बिचाऱ्या ढेंकणांचे फार हाल चालले आहेत हो. यौधेय इतके क्रूर झाले आहेत कीं पाणी गरम करून तें खाटांच्या पायांवर ओततात बघा. या बाबतींत आपण कांहीं तरी करायला हवं अन् करोडों जिवांचे प्राण वांचवायचं पुण्य घ्यायला हवं. ' माझा गंभीर चेहरा पाहून त्याला मी हें मनापासून सांगतोंय असं वाटलं. मग तो म्हणाला-' हा नास्तिक जय इथं आला तेव्हांपासून यौधेय तरुण तर अर्हतांनीं दाखविलेल्या मार्गाची जास्तच टिंगल उडवूं लागले आहेत. त्यांचं चाललं असतं तर पशूंना यमुनेच्या पलीकडे पाठवायच्या ऐवजीं त्यांनीं इथंच त्यांना पचवून टाकलं असतं. बिचाऱ्या ढेकणांची गोष्ट कोण ऐकून घेणार ? ' मी म्हणालों--' ढेकणांना वांचवायचा उपाय

मी सांगतो तुम्हांला. जुन्या खाटा मी घरांघरांतून जमा करून आणवून देईन अन् त्या ठेवायसाठीं तुम्ही एक धर्मशाळा बांधवून द्या. मात्र एक गोष्ट करावी लागेल हं. जुन्या खाटांच्या बदल्यांत नव्या खाटा द्याव्या लागतील. ' म्हातारा पक्का कवडी-चुंबक. तो उसळून म्हणाला–' युवक ! तूं तर चेष्टाच चालवली आहेस ! धर्मशाळा बांधली तरी बिचारे ढेकूण तिथं खातील काय ? ' मी म्हणालों–' हा प्रश्न मात्र मोठा कठीण आहे. अन् ढेकूण फलाहार नाहीं करत. मग असं कां नाहीं करत ? त्या खाटांवर झोंपायसाठीं कांहीं लोकांना पैसे देऊन तयार केलं तर ? ' तो गालांतल्या गालांत हंसत म्हणाला–' तूं हरेक बाबतींत पैशाची गोष्ट काढतो आहेस. ' अशी जिथं स्थिति आहे तिथं कमजोर मुलांना एकाद्या डोंगरावर सोडून येणं जमायचं कसं ? "

रेवतक–" म्हणजे स्पार्तांचे लोक मोठे मजबूत असतील नव्हे ? "

मी–" मोठे मजबूत अन् मोठे शूर. कमजोर, अशक्त, कुरूप, ठेंगू स्त्रीपुरुष तिथं दिसायचेच नाहींत. "

रेवतक–" आपल्यालाहि यौधेयांच्या ठिकाणीं चांगली संतति पैदा करायसाठीं कांहीं करतां येईल का ? "

मी—" नर-मादीच्या मनोभावांचा कसलाहि विचार न करतां मन मानेल तशी संतति पैदा करायसाठीं लोकांवर जुलुम करायला आपण पशु का आहोंत ? त्यांत पुन्हां आपल्याला केवळ शारीरिक शक्तीची जरूर आहे इतकंच नव्हे तर मनुष्य आपल्या बुद्धिबलाच्या जोरावर सार्‍यां प्राण्यांमध्यें श्रेष्ठ झालेला आहे. जो शरीरानं दुबळा असेल तो बुद्धीनं दुबळा असलाच पाहिजे अशी आपण कशी खात्री देणार ? म्हणून शक्यतं असती तरीसुद्धां आम्ही स्पार्तांचा क्रूर प्रयोग आपल्या मुलांवर केला नसता."

माधव–" म्हणजे मग मानवी संतति पैदा करायसाठीं आपल्या यौधेयांतल्या सार्‍यांना आपण मोकाट सोडून द्यायचं ? "

मी–" तसं नव्हे. आपण चांगल्या निरोगी सुदृढ पतिपत्नींना जास्त मुलं जन्माला घालायला उत्तेजन दिलं पाहिजे. "

बंधुक—" मग भैया जय ! आम्ही इथं रेवतकच्या हातां पायां पडतों अन् तुम्ही नन्दावहिनीची समजूत काढा. तुमच्या सांगण्याला ती विशेष मान देते. धृतराष्ट्र-गांधारीनं शंभर पुत्रांना जन्म दिला, वहिनीनं बीस पुत्रांना जन्म द्यायची तरी आमच्यावर कृपा करावी. "

रेवतक–" बंधुक ! तूं फार पुढं चाललास हं. हें बोलणं इथंच राहील असं नको हं समजूं. नन्दानं जर ऐकलं तर डोक्यावर केस नाही राहूं देणार.

माधव–" निरोगी बलिष्ठ लोकांच्या हातांपायां पडायचं हें ठीक. पण जालुका-सारख्या लोकांच्या बाबतींत तुमचं काय धोरण आहे ? "

मी—" आम्ही आमच्या तरुणींना जें वळण लावतों आहोंत त्याच्या योगानं कांहीं दिवसांनीं जालुकासारख्या बुद्धिबलशून्य माणसाकडे बघणं सुद्धां नाहीं आवडायचं त्यांना. "

माधव–" म्हणजे आम्ही केवळ भावी पिढींतल्या तरुण तरुणींवरच आशा लावून बसणार ? "

मी–" केवळ कां म्हणतोस बाबा ? हे कांहीं थोडे नव्हेत. जुनीं माणसं किती दिवस पर्यंत जिवंत राहणार ? सारा भविष्यकाळ तर आमचाच आहे. मग ज्या जोडप्यांच्या अंगीं निरोगी संतान जन्माला घालायची ताकत आहे त्याला आपल्याला आपल्या प्राचीन रूढीनुसार अलग करवितां येतं. "

माधव–" अन् दोघांना सारखीच ताकत नसेल तर ? "

रेवतक–" मी एक इलाज सांगूं ? त्यांना जैन-बौद्धांच्या मठांत पाठवून द्यावं. "

सारे खो खो हंसले. माधव म्हणाला–" भाई जय ! आपणहि कांहीं वर्षं या मठांत घालवलेलीं आहेत. पण आपल्याला हें नव्हतं दिसलं. रेवतभैया ! तुझ्या मुलाला उदंड आयुष्य लाभो. हे मुण्डक व नंगट शहरोंशहरीं गावोंगांवीं पसरलेले आहेत. यांच्या ताब्यांत सुन्दर सुन्दर घरं आहेत, अन् सावक ( श्रावक ) लोक यांच्याकडे उत्तमोत्तम भोजन पोंचवतात. तिथं जाणाऱ्यांना दुःखच व्हायचं नाहीं. "

रेवतक—" पण आमच्या तरुणांना या भदन्तांची व मुनींची कुचेष्टा करणं सोडून द्यावं लागेल. "

माधव—" नाहीं बाबा ! आम्हांला त्यांच्यापुढं साष्टांग दंडवत घालावं लागेल. साऱ्या यौधेय वंशाची पिढान्‌पिढ्या सांठून राहिलेली इडापिडा जे दूर करतात त्यांच्या विषयीं आपण आदरभाव दाखवलाच पाहिजे. "

रेवतक—" मग कमी काय आहे ? मानसन्मानहि मिळतो, खाण्यापिण्याची व राहायची सोयहि आहे अन् वर निर्वाण व स्वर्गप्राप्तीचं आमिष आहेच. "

माधव—" मग आपण यांचे मेंढरांच्या कळपासारखे कळप कर करून यांना मठांत पोंचवून येऊं. "

बन्धुक—" तो थेरडा जालुक आहे मोठा हिमकती अन् हुशार हं. हुशार जर नसता तर त्यानं उपाश्रयांत ( मठांत ) उपास करून स्वर्गांत जायची तयारी करायच्या ऐवजीं मथुरेहून दुसरी तरुण बायको विकत आणली असती अन् आमच्या देशाचा नरक करायची खटपट केली असती. "

यौधेय लोक राजकीय दृष्टया स्वतंत्र होते इतकेंच नव्हे तर त्यांच्यामध्यें बौद्धिक स्वातंत्र्याचीहि एक जबरदस्त लाट उसळलेली होती हें पाहून मला मोठा आनंद होत होता.

नन्दाला खरोखरीच माधव व बन्धुक यांच्या उद्गारांची बातमी कळली. एक दिवस आम्ही नृत्यांगणांत होतों. नृत्य सुरू झालेलें होतें. नन्दा आपल्याकडे येत आहे हें पाहतांच माधवनें तर दडीच मारली. पण बन्धुकचा उजवा हात नन्दानें आपल्या वज्रमुठींत पकडून ठेवीपर्यंत त्याला ती आल्याचा पत्ताच लागला नाहीं. तिनें भुंवया उंचावून त्याला दम भरला–" काय रे बन्धुटल्या ! भर सभेंत अन् त्यांत सुद्धां माझ्या पाठीमागं माझी चेष्टा करत फिरतोस होय रे ! तुझी हिंमत बरीच वाढली म्हणायची ! अं ! "

बन्धुक सर्दच झाला. तो गयावया करूं लागला—" नाहीं ग वहिनी ! तुझ्या शपथ सांगतों, हें सारं खोटं आहे ! कुणी तरी खोटी चहाडी केली आहे ही ! "

रेवतक गंभीर मुद्रेनें म्हणाला—" छेः ! छेः ! असं कसं होईल ! त्या वेळीं जसं जोरांत सांगितलंस तसं आतां पुन्हां कां नाहीं सांगत ?

बन्धुक—" वहिनी ! तूं कुणाच्या बोलण्याकडे लक्षच नको देऊं. हा माझा सूड घ्यायला मागतोय. तुझ्या बाबतींत एक शब्द जर बोललों असेन तर कान धरून उठाबशा काढायला तयार आहे मीं. "

मंगलक मध्येंच म्हणाला— " अन् तो जालुकच्या ठेंकूणशाळेंत कुणाला तरी पाठवायचंय म्हणत होता. एक दीनार दिला तर नन्दावहिनी एक लाख ढेकणांची एका रात्रीची भूक भागवेल असं कांहीं तरी बोलणं चाललं होतं ना ? "

नन्दा दुसरा हात बन्धुकच्या खांद्यावर ठेवून त्याला जोरजोरांत हिसके देऊं लागली. बन्धुक ओरडूं लागला— " अरे बापरे ! नन्दावहिनी ! सोडव मला या संकटांतून ! हे सारे लोक आपल्या मनचंच कांहीं तरी रचून खोटं खोटं सांगताहेत. भैया जय ! तूं तरी वहिनीला समजाव बाबा ! "

नन्दानें त्याला आणखी एक हिसका देऊन सांगितलें— " जयचं भय घालतोय मला. फौजेचं काम असेल तेव्हां आम्ही मानतों त्याला सेनापति. येरव्हीं तोहि कांहीं बोलूं दे बघूं बरं ! " मी तिच्या पुढें हात जोडले. मग स्वतःचे कान धरतां धरतां म्हणालों–" वहिनी ! क्षमा कर मला. हा तुझा वीर सदैव तुझ्या सेवेला हजर आहे. पण जालुकच्या ठेंकुणशाळेची गोष्ट आपण कांहीं ऐकली नाहीं बुवा. "

नन्दानें बन्धुकला सोडून मंगलकाकडे मोर्चा वळविला. पण तेवढ्यांत दोघेहि बघ्यांच्या आड दडून पसार झाले. सारे लोक पोट धर धरून हसूं लागले.

आमच्या विजयाला तीन वर्षे होऊन गेलीं. वसुनन्दाला आतां विसावें वर्ष लागलें होतें. तारुण्याबरोबर तिच्या सौन्दर्यालाहि खूप बहर आलेला होता. आम्ही दोघे कितीदां तरी जोडीजोडीनें नाचत असूं. मी अग्रोदकाला असलों कीं तीच मला जेऊं घालीत असे. कधींकधीं एखाद दुसरा गमतीचा विषयहि निघत असे. परंतु आम्ही उघडपणें प्रेमाचें प्रदर्शन नाहीं केलें. ती नन्दावहिनीची बहीण असल्यामुळें तिची वाटेल तशी थट्टा करण्याचा हक्क मला होता, पण माझ्यामागें कामें फार होतीं. दुसऱ्या वर्षानंतर तर मला माझ्या शेतांत काम करावयाला फारच थोडी फुरसत मिळत असे. आमच्या यौधेयभूमींतील इतर गांवीं व नगरामध्येंहि समाइक शेती सुरू झालेली होती. त्यांना सल्ला देण्यासाठीं मला तिकडे जावें लागे. याशिवाय लष्करी शिक्षणावर देखरेख करण्याचें कामहि मजकडेच होतें. माझा बहुतेक वेळ मला घोड्यावरून प्रवास करण्यांतच घालवावा लागे. काम फार असे. झोंपण्यासाठीं सुद्धां फार कमी वेळ मिळे. तरी पण या जीवनावर मी फारच खुष होतों. मला माझ्या कामगिरीचें फळ समक्ष पाहावयास मिळत होतें. लहान लहान मुलें देखील विक्रमादित्याशीं लढाई करण्याचा खेळ खेळत असत. नन्दा भगिनींचा खेळ तर आणखीच मशहूर झालेला होता. पांच मुलें अंगावर कांबळें ओढून घेऊन हत्तींचें सोंग आणीत; मग तिघी मुली यौधेयानी होऊन त्यांच्यावर बिनटोंकांचे बाण मारीत; आणि चन्द्रगुप्ताच्य बलाधिकृताला कानाला धरून ओढून आणीत. दहा-दहा बारा-बारा वर्षांचीं मुलें काठी लगामाच्या मदतीशिवाय घोड्याची नुसती आयाळ पकडून घोरपडीसारखीं घोड्याला चिकटून घोडदौड करीत असलेलीं पाहिलीं कीं कधीं कधीं माझ्या डोळ्यांत आनंदाश्रु उभे राहत.

मी असाच फेरफटका करून त्या दिवशीं अग्रोदकाला पोंचलों होतों. वहिनी मला जेऊं घालावयास बसली यांत नवीन असें कांहींच नव्हतें. तिनें आपणहूनच विषय काढला—" भाऊजी ! त्या दिवशीं बिचारा बन्धुक नाहक माझ्या सपाट्यांत सांपडला हें कळलं मला. ही सारी कारवाई तुमचीच होती ! "

मी वहिनीच्या प्रफुल्लित डोळ्यांकडे नजर लावून म्हणालों—" मग काय खोटं होतं माझं म्हणणं ? सिंहाच्या छाव्यासारखे आमचे चार पुतणे आहेत; तसे आणखी सोळा झाले तर यौधेय-भूमि स्वतःला धन्य-धन्य नाहीं मानून घेणार ? "

नन्दा—" अन् तसे आणखी छत्तीस झाले तर मग ? "

मी—" ओहो वहिनी ! मग तर मी साऱ्या यौधेय-भूमींत अभिनंदनाचीं मंगल वाद्यं वाजवायला लावीन अन् तुझ्या पायांवर डोकं ठेवून तें तीन दिवस वरच नाहीं करणार. "

नन्दा माझ्या पाठींत एक धपाटा घालून म्हणाली: -- "तुम्ही फार दुष्ट आहांत."

मी—" भावजय दिराला दुष्ट म्हणते तेव्हां तिचा उद्देश काय असतो ठाऊक आहे ? "

" याचा उद्देश आहे हा "— असें म्हणून नन्दानें माझ्या दोन्ही गालांवर एकेक नाजुकशी चपराक ठेवून दिली.

मी म्हणालों—" आज वहिनी दिरावर फार खूष आहे. आज त्याचा भाग्योदय होणार. "

नन्दा—" होय. मला भाऊजींचा भाग्योदय करायचा आहेच. "

मी–" तो कसा ? "

नन्दा–" चाळीस यौधेय जन्माला घालायच्या कामांत तुम्ही नि मी वीस–वीस वांटून घेऊं. "

मी–" भावजय-दिरांत तुझं-माझं कां ? "

नन्दा–" तुम्ही आहांत निव्वळ पोर. तुम्ही इतरांनाच उपदेश करीत राहणार. अन् स्वतः कांहींच नाहीं करणार ? "

मी–" आज्ञा कर. वहिनीची आज्ञा मी कधीं मोडली आहे का ? "

नन्दा–"मग लग्न करावं लागेल अन् वीस यौधेय जन्माला घालावे लागतील."

मी–" लग्न ? मी लग्न करायला पाहिजे ? "

नन्दा –" नाहीं तर काय जन्मभर ब्रम्हचारीच राहणार ? ब्रम्हचारीच राहायचं होतं तर बौद्धविहारांत पडून होतां तेंच बरं होतं ! "

मी–" पण वधू तरी आहे का कुठं ? "

नन्दा–" फारच छान आहे वधू . बघितलीत तर गारीगार व्हाल. अशी सुन्दरी तर इन्द्रलोकांतहि नाहीं मिळायची . अप्सरा आहे म्हटलं, अप्सरा ! "

मी–" आहे कुठं ती अप्सरा ? जरा दाखवशील तर खरी ! "

नन्दा इकडेतिकडे डोकावल्यासारखें करून हळूच म्हणाली—" मी बोलणं करून ठेवलं आहे. सगळं काहीं ठीक आहे. तुमची पसंतीच तेवढी हवी आहे. "

मी–" ती आहे तरी कोण हें ऐकूं दे तर खरं ! "

नन्दा हळूच म्हणाली–" जालुकाची थोरली मुलगी ." आणि असें म्हणून ती हंसूं लागली . मी तिरप्या नजरेनें तिच्याकडे पाहत म्हणालों–" अन् तिच्या पोटीं तूं वीस यौधेय जन्माला घालवूं इच्छितेस ! "

नन्दा–" यौधेय नाहीं हो , ढेंकूण ! ती कुब्जा राहील जालुकाच्या ढेंकूणशाळेंत. यौधेय जन्माला घालायची जबाबदारी मी घेतली आहे ना स्वतःवर . "

मी–" बन्धुक तिला उपाश्रयांत रवाना करवूं पाहतोय . "

नन्दा–" उपाश्रयांत न जाईल तर करील काय बिचारी? वयाला तीस वर्षे तर होऊन चुकलीं. तसं शक्य असतं तर जालुक हजार दोन हजार दीनार खर्चून तिला कुणाच्या तरी गळयांत बांधायला तयार होता; परंतु आतां यौधेय तरुण तुमच्या-पायीं त्याच्या घरीं पाऊलहि घालूं इच्छित नाहींत. साऱ्यांना मेनका व तिलोत्तमा हव्या असतात आजकाल."

मी–" म्हणजे वहिनी! आतां तूं या बिचाऱ्या कुरूप मुलींचा उद्धार करायचा विडा उचलला आहेस होय?"

नन्दा–" गुप्तांनीं गो-ब्राम्हणांचा ढोल बडवायला सुरवात केली आहे; तेव्हां मी असा विचार केला कीं या अभागी कुमारिकांच्या रक्षणाचा भार आपल्या खांद्यावर घ्यावा."

मी–" वहिनी! तुझा खांदा खूप मजबूत आहे खरा, मण माझा खांदा फारच कमजोर आहे ग."

नन्दा गालांतल्या गालांत हंसत म्हणली–" ठीक आहे. मग मी तुमच्या कमजोर खांद्याला झेंपण्याजोगा हलका भार देतें."

मी–" बघितलंस! तुझ्या गप्पांत अडकलों अन् अर्धं जेवणहि नाहीं झालं. अन् तुझं कोडं लांबतच चाललंय."

नन्दा माझ्या पाठीला लगटून आपले केंस माझ्या गालाला लावून अत्यंत गोड स्वरांत म्हणाली–"जय भाऊजी! तुम्ही अन् वसुनन्दा हा जोडा कसा काय जमेल?"

मी डावा हात नंदाच्या मस्तकावर ठेवून तें माझ्या गालाशीं आणखी लगटून घेत म्हणालों–" वहिनी! तुला हजारदां धन्यवाद!"

नन्दा––" म्हणजे माझी आज्ञा तुम्हांला मान्य आहे."

मी—" एकदां नव्हे, हजारदां मान्य आहे. वसु जर मला आपला दास व्हायला लायक समजत असेल तर एकदम मान्य."

नन्दा धांवतच गेली आणि वसूला हाताला धरून माझ्या समोर ओढत आणून म्हणाली—" वसु! लाजूं नकोस गडे! मी भाऊजींना सांगितलंय कीं माझी बहीण तुमच्या साठीं प्राण टाकत आहे. तूं एक वेळ डोळे भरून बघ तर खरी त्यांच्या-कडे."

वसुनन्दाचे गाल लालेलाल झाले होते. ती भुंवया वक्र करून नन्दावहिनीकडे बघत होती आणि आपला हात सोडवून घेण्याच्या खटपटींत होती. माझें जेवण आतां आटोपलेलें होतें. तिथेंच थाळींत हात धुतले आणि दोन्ही हातांची अंजलि करून वसूच्या पायांशीं नेत म्हणालों—" वसु! नन्दावहिनी कशी आहे तें ठाऊक आहे तुला. ती कुणालाहि आपल्या कचाट्यांत आणल्याशिवाय सोडत नाहीं. मी

कितीतरी दिवस विचार करतां करतां आज वहिनीला विनंति केली. तूं जर जयला आपल्या पायांची सेवा करायला लायक समजत असशील तर जय तुझा दास व्हायला तयार आहे."

वसुनन्दाच्या वक्र भुंवया पुन्हां सरळ झाल्या. तिनें माझ्याकडे एकच नेत्रकटाक्ष फेंकून खालीं मान घातली. तिचे टपोरे डोळे वीज चमकावी तसे एक क्षणभरच मजकडे वळले, पण तेवढयांत त्यांनीं माझ्या अंतःकरणाचा ठाव घेतला. त्यांनीं तेवढया एका क्षणांत त्याला इतक्या गोष्टी सांगितल्या कीं त्या वर्णन करण्यासाठीं आदिकवीला एक सबंध काण्ड लिहावें लागलें असतें.

नन्दा माझ्या हाताला धरून मला उठवून म्हणाली—" भाऊजी ! उठा. माझी बहीण आहे मुकी. मी तिच्या वतीनं तुमच्या विनंतीचा स्वीकार करत्यें. अगोदर माझ्या पायांची धूळ तुम्ही आपल्या कपाळाला लावून घ्या बघूं. " मी तिच्या तळपायांना स्पर्श करून तोच हात आपल्या कपाळाला लावून घेउन उठून उभा राहिलों. तिनें माझा हात वसुनन्दाच्या हातीं देऊन सांगितलें– " घ्या ही. आतां वसु तुमची झाली, अन् तुम्ही वसूचे झालांत. " मग डोळयांत आलेले आनंदाश्रु तसेच वाहूं देऊन ती आम्हां दोघांना म्हणाली– " जा आतां. मी माझं कर्तव्य परं केलं. "

## ( २० )

## संतति हेंच आमचें भवितव्य

अम्रोदकामध्यें भातशेतीची प्रथा नव्हती. पण आम्ही केवळ गतानुगतिक नव्हतों. आम्ही खलतिकाहून अत्यंत उत्कृष्ट गंधशाली ( बासमती = सुवासिक ) तांदुळाचें बीं मागवून मोठया उत्साहानें पांच पांच करीस ( अंदाजें दहा एकर ) जमिनींत हें भात लावलें होतें. भात दोन दोन हात उंच वाढल्यावर एक दिवस मी वसूबरोबर पाहणी करावयास गेलों. आम्ही तेथें पोंचलों त्या वेळीं आकाश बहुतेक निर्लेंझार होतें, कुठेंकुठें शुभ्र ढग पूर्वेकडून पश्चिमेकडे तरंगत चाललेले दिसत होते. निळया सागरांतून जणूं काय फेंस उसळत आहे असें वाटत होतें. आम्ही आमच्या शेताच्या बांधावरून हिंडत होतों. तेवढयांत ढग वाढूं लागले आणि पूर्वेला काळया

ढगांची खूप गर्दी जमली. मन्द वाऱ्याच्या झुळुकेसरशीं भाताचे दाट रोपे डोलूं लागले. जणूं काय हिरव्यागार सरोवरांत लाटा उसळत आहेत असें तें दृश्य दिसत होतें. कुठें रोपे ताठ उभे तर कुठें एकीकडे अर्धे झुकलेले–लाटांच्या चढउतारासारखे दिसत होते ते. आम्ही अधूनमधून रोप्यांना स्पर्श करीत होतों. मी एकदोन रोपे खुडून घेतले होते. वसुहि लहरत्या रोप्यांवर हात फिरवीत होती. परंतु माझ्या हातांतले दोन तीन खुडलेले रोपे पाहिल्याबरोबर ती म्हणाली—" प्रियतम ! किती सुन्दर आहे हें धान्य ! किती हिरवंगार ! याचा स्पर्श किती सुखकर वाटतो ! पण तुम्ही हें खुडून कां घेतलंत ? " तिच्या तोंडून हे उद्गार निघत होते त्या वेळीं माझी नजर तिच्या डोळ्यांकडे लागलेली होती. तिच्या डोळ्यांत दुःखावेग दिसत होता. मी खुडलेले रोपे तिथेंच टाकून दिले आणि तिचे हात आपल्या हातीं घेऊन म्हणालों–" प्रिये ! बरोबर बोललीस. या कोमलतेचा उपभोग केवळ स्पर्श करूनच घ्यायला हवा. या सौन्दर्यलहरी नुसत्या बघूनच डोळ्यांचं पारणं फेडून घ्यावं."
त्याच वेळीं विजा चमकून आमचे डोळे दिपले. आम्ही पूर्वेकडे तोंड करून पाहूं लागलों. घनदाट काळ्याकुट्ट ढगांनीं अर्धे आकाश झांकाळून टाकलें होतें. आणि हे ढग मोठ्या वेगानें पुढें सरसावत होते. त्याच वेळीं दुसऱ्यांदा विजा चमकल्या. त्या पाहून वसु म्हणाली––" प्रियतम ! बघा बघा ! हे ढग बघा ! असं वाटतंय कीं कुठंतरी एखादी मोठी होळी पेटलेली असावी अन् तिच्यावर ओल्या लांकडांचा ढीग पडल्यामुळें तिच्यांतून दाट धुराचे लोळच्या लोळ निघून आकाशाकडे जात असावेत. "

मी—" अन् असं वाटतंय कीं आग आंतल्या आंतच पुष्कळशी धुमसत राहिली आहे. अन् तिच्यांतून अधूनमधून सोन्यासारख्या ठिणग्या उसळत आहेत."

" विजेला लोक इतके घाबरतात कां बरं ? "

" कारण तिच्या कडकडाटानं कानठळ्या बसतात अन् ती ज्या वस्तूवर पडेल तिला जाळून खाक करते. "

" पण वीज पडून आग लागायचा प्रसंग तर फारच क्वचित येतो. तसा तर आयुष्यांत केव्हां ना केव्हां कसला तरी धोका हा येतोच. "

" माणसाचं चाललं असतं तर त्याला बिन टरफलाचं भाताचं पीक काढणं जास्त आवडलं असतं. पण बिनटरफलाच्या भाताचा फार थोडा अंश घरीं आला असता. पांखरांनीं शेतांतल्या शेतांतच सारं फस्त करून टाकलं असतं. "

" मला वाटतं जीवनाचे कांहीं पैलू धोक्याचे नसतील तर माणूस निष्क्रिय होतो. "

" शरीरानंच नव्हे, तर मनानंहि तो निष्क्रिय होतो. अन् प्रिये ! मग त्याचं काय होतं ठाऊक आहे ? मांसाचा गोळा होतो तो नुसता ! "

" त्याला जीवन म्हणतांच येत नाहीं. "

" बरोबर आहे. जीवन म्हणजे गति. गति दर क्षणाला नवं रूप निर्माण करते अन् प्रत्येक रूप आपापल्यापरी सुंदर अन् सफल असतं. आम्ही इथं प्रथम भात लावलं तेव्हां हे रोपे अगदीं लहान होते. ते हिरवे असायच्या ऐवजीं पिंवळेच जास्त होते. त्यांची उंचीहि एका वितीहून जास्त नव्हती. मुली घरांतल्या घरांत जव पेरतात आणि त्यावर टोपली घालून ठेवतात; तसले घरांत उगवलेले रोपे कसे असतात पाहिले आहेस ना ? "

" पिंवळे-पिवळे अन् थोडे पांढरेहि असतात. "

" आम्ही भाताचे रोपे लावले त्या वेळीं ते तितके पिवळे नव्हते. पाण्यांत लावणी करतांना ते आडवे झाले होते. मग ते ताठ झाले. त्यांचा पिवळेपणा गेला, त्यांना हिरवेपणा आला अन् या हिरव्या रंगांत काळसर छटा आली. मग या रोप्यांचीं शिरं जरा मोठीं होऊं लागलीं. याच्यां बारीक धडाला वरचं मोठं शिर झेंपायचं नाहीं."

" मी अजून असलं धान्य पाहिलेलंच नाहीं. "

" आत्तांच तर अमोदकांत पहिल्या प्रथमच हें भात लावलंय. आतां बघशील तूं तें. "

" त्याचा तुरा येवढा जड कां असतो ? "

" कारण पूर्ण वाढ झाल्यानंतर हळूहळू निःशेष होत जाणं हा जीवनाचा धर्मच आहे. जीवनाचा आणखी एक व सर्वांत मोठा धर्म म्हणजे आपली जागा घ्यायसाठीं नवीन जीवन निर्माण करणं हा असतो. "

वसूची शंका दूर झाल्यावर तिनें माझ्या गळ्याला दोन्हीं हातांनीं मिठी घातली. मी तिला गाढ आलिंगन देऊन तिच्या मुखाचें चुंबन घेतलें.

ती म्हणाली— " जीवनाचा हा धर्म किती छान आहे ! – आपली जागा घ्याय-साठीं नवीन जीवन निर्माण करायचं ! " हें सांगतां सांगतां तिचे डोळे आनंदानें उल्हसित झाले; त्यांतून मनोहर स्निग्धता ओसंडून राहिली.

आतां काळ्या ढगांनीं आकाश पूर्णपणें झांकाळून आलें. अजून एक याम ( चार-तास ) दिवस शिल्लक होता. पण संध्याकाळच्या अगोदरच अंधार सर्व कांहीं झांकून टाकणार असें वाटत होतें. मधून मधून विजाहि कडकडाट करीत होत्या. मी वसूचा हात पकडून पुढें जातांजातां म्हणालों— " प्रिये ! पाऊस येणारच असा रंग दिसतो. त्याच्या आंत आपल्याला घराकडे परत जातां येणार नाहीं. चल आपण सुनन्दासाग-राच्या उंच धक्क्यावर जाऊं या. " आम्ही तिकडे निघालों. तसे दोनचारच थेंब

आमच्या अंगावर पडले होते; पण ते होते मात्र मोठमोठे. ढगांचा गडगडाट एकसारखा चाललेला होता आणि त्यांचा प्रतिध्वनि म्हणून कुंजांत मोरांच्या केका चाललेल्या होत्या. वसूचा चेहरा अत्यंत सुप्रसन्न दिसत होता. ती सांगूं लागली-- " माणसाच्या मनावर बाह्य निसर्गाच्या सौन्दर्याचा केवढा तरी प्रभाव पडतो ! "

" आपलं सौन्दर्य, आपल्या जीवनाचा बहुतेक भाग, बाह्य निसर्गच असतो. आज आकाशांत ढगांची गर्दी झालेली आहे. एकीकडे सुनन्दासागराच्या जलराशीची विशाल शुभ्र चादर पसरलेली आहे तर दुसरीकडे हें हिरवंगार साळींचं शेत पसरलं आहे. ढगांच्या गडगडाटाबरोबरच मोरांच्या केकांचा आवाजहि ऐकूं येत आहे. पूर्वेकडचा शीतल मन्द वारा अंगाला लगटून राहिला आहे. निसर्गाचं हें रूप पाहून कुणाला आनंद नाहीं होणार ? "

येवढ्यांत आमच्या जवळच केका-ध्वनि ऐकूं आला. आम्ही झाडीजवळ जाऊन पाहिलें. एक मोर आपला पिसारा पसरून लांडोरीभोंवतीं नाचत होता.

वसु माझ्या खांद्यावर हात ठेवून म्हणाली--" बघा बघा प्रियतम ! याचा चाकासारखा पिसारा किती सुन्दर दिसतोय ! याची मंद गति किती गोड वाटते ! "

" अन् हीं दोघं आहेत बघ. ही मोहिनी जर नसती तर कदाचित हा पिसारा खुललाहि नसता. " असें म्हणून मी तिचें मस्तक माझ्या कंठाशीं लावलें.

ती म्हणाली— " किती सुन्दर ! किती मनोहर ! "

" अन् या जीवनाच्या सुखाचा अनुभव हाच नव-जीवनाची तयारी पण आहे. मोराचा हा नाच म्हणजे प्रेयसीसमोर त्यानं केलेली प्रेमयाचना आहे. त्याची ही मधुर केका म्हणजे प्रेयसीच्या भयभीत हृदयाची सांत्वना आहे. "

" म्हणजे या पक्षाला सुद्धां माणसासारखंच हृदय असतं ? "

" कारण जीवन एकच असतं. जीवनाच्या स्वरूपांत विलक्षणता असली तरी जीवनांतलं सुख व सृष्टीचा नियम सर्वत्र सारखाच असतो. आपल्या प्रेयसीचं प्रेम मिळाल्यावर या मोराला केवढा आनंद होत असेल ? पण त्याचा आनंद आपल्यापुरताच त्याच क्षणीं समाप्त नाहीं होणार, तो नव्या जीवनाची निर्मिति करील; तो असं जीवन निर्माण करील कीं जें ही जोडी निवर्तल्यावर देखील नवं रूप घेऊन पुन्हां आपलं नृत्य चालू ठेवील. "

" प्रियतम ! जीवन पाहिलं कीं माणसाची आशा केवढीतरी जोरावते ! "

" मरणाला काय बघायचंय ! तिथं बघण्याजोगं राहिलेलंच काय असतं मुळीं ?"

" अन् पुनर्जन्म ? "

" पुनर्जन्म मला मान्य आहे. पुनर्जन्म मला फार आवडतो. प्रिये ! तुझा डोळ्यांना दिसणारा पुनर्जन्म आवडतो का ज्याबद्दल संशय आहे असा आवडतो ? "

" डोळ्यांदेखली वस्तु मिळत असतां न दिसणारी कोण पसंत करील ? पण पुनर्जन्म काय डोळ्यांनीं पाहतां येतो ? "

" होय तर. डोळ्यांनीं पाहतां येतोच. पण तो पुनर्जन्म मिळवणं एका माणसाच्या हातचं नसतं. हीं मोर-लांडोर आपल्या पुनर्जन्माच्या तयारींत आहेत. "

वसूनें माझ्या डोळ्यांकडे पाहिलें आणि ती गालांतल्या गालांत हंसली. मी तिच्या गळ्यांत गळा घालून म्हणालों—" कां ? प्रिये ! तूं कां हंसलीस ? "

" आपणंहि पुनर्जन्म घेणार आहोंत म्हणून. "

मी वसूच्या मुखाचें चुंबन घेतलें. आनंदातिशयानें माझे डोळे भरून आले तरीहि मी तिच्या तोंडाकडे बघत राहिलों. तिच्या सौन्दर्यांत आणखी भरच पडली आहे असें मला वाटलें. तिच्या टपोऱ्या डोळ्यांत तडफदारपणाच्या जोडीला अपार आनंद भरून राहिलेला दिसला. ती सांगूं लागली–" दोघांच्या सहकार्यानं पुनर्जन्म ! एकेकट्याला आपलं जीवन अनंत काळपर्यंत कायम टिकवितां येत नाहीं. दोन परस्परप्रेमी .जीवनांचं मीलन म्हणजेच एका नव्या जन्माचा प्रादुर्भाव. "

" नव्या जीवनाचा आरंभ देखील किती सुन्दर रीतीनं होतो ! अन् त्या जीवनांत दोघांच्या जीवनाचं सर्वस्व एकत्र झालेलं असतं. त्यांची शक्ति, त्यांची बुद्धि, त्यांचं धाडस, त्यांची प्रतिभा, यांपैकीं कोणतीहि गोष्ट अलग राहूं शकत नाहीं. "

" कोणतीहि गोष्ट लुप्त नाहीं होऊं शकत. "

पावसाचे थेंब जोरांत येऊं लागलेले होते. आमचे कपडे भिजून चिंब झालेले होते. वसूचें हर्षोत्फुल्ल मुख या थेंबांनीं धुवून आणखीच टवटवीत व सुन्दर केलें होतें. मी जणूं काय मोत्यांच्या झालरींतून तिच्याकडे पाहत होतों. तिच्या सोनेरी केशपाशांत पाणीच पाणी झालें होतें. मी तिची वेणी सोडली आणि विखुरलेल्या केंसांवरून पाण्याचे थेंब खालीं ओघळूं लागले. सुनन्दासागरावर असंख्य बारीक जलधारा पडत असलेल्या आम्ही किती तरी वेळ पाहात राहिलों. मध्येंच समोरच्या हिरव्यागार साळीच्या शेतावर आम्ही नजर टाकीत होतों. मध्येंच मी वसूकडे पाहात होतों. तिची कंचुकी भिजून अंगाला चिकटली होती आणि तिच्या आडून तिच्या सुन्दर वक्षःस्थळाचा सारा चढ-उतार, त्याची रेषा नि रेषा स्पष्ट दिसत होती. एका खांद्यावर पडलेली तिची चादर भिजून जड झालेली होती; म्हणून वाऱ्याचा जोर होता तरी ती फडफडत नव्हती. मी तिच्या सुन्दर अंगोपांगांकडे अतृप्त नजरेनें बघत राहिलों. मी म्हणालों–" मला वाटतं मी तुला अगदीं नव्यानंच पाहतोंय. पूर्वीहि तुझं सौन्दर्य मी पाहिलं होतं, पूर्वीहि त्याच्या योगानं माझ्या हृदयांत आनन्दाच्या लहरी उसळल्या होत्या; पण आज तें पूर्वीच्या शंभर पटींनीं अधिक आकर्षक वाटतंय बघ. "

वसूनें माझ्या भिजून चिंब झालेल्या आंखुड केसांतून बोटें चाळवीत अत्यंत प्रेमळ स्वरांत सांगितलें–" मी तर पूर्वीचीच वसु आहे ना ? मग असं कां वाटावं ?"

" मला वाटतं जीवन जसं स्थिर राहत नाहीं तसं तें क्षणोक्षणीं नवनवं सौन्दर्य धारण करतं. "

आम्ही असेच किती तरी वेळ एकमेकांकडे बघत गप्पा गोष्टी करीत राहिलों तरी आमची तृप्तीच होईना. पाऊस कमी व्हावयाच्या ऐवजीं आणखी वाढतच चालला होता. ढगांनीं साऱ्या दिशा झांकाळल्यामुळें सूर्यास्त, तिनीसांजा, कशाचाच पत्ता लागला नाहीं. जेव्हां निशेनें खरोखरीच आपल्या हातांनीं दिगंतावर शाई फासावयास सुरवात केली तेव्हां आमच्या लक्षांत आलें कीं आतां घरीं जाण्यासाठीं निघालें पाहिजे.

*　　*　　*　　*

मला माझ्या कामामुळें महिना-महिनाभर अमोदका नगरींत गैरहजर राहावें लागत असे. विक्रमादित्याचा आम्ही पराभव नव्हता केला; उलट त्याला आम्ही दुखवून सोडून दिलें होतें. जखमी चित्ता फारच धोकेबाज असतो. आम्ही अत्यंत सावधगिरीनें त्याच्या हालचालींवर लक्ष ठेवलेलें होतें. तो आपल्या खजिन्याची भर एकसारखी करीत होता, पण त्याच बरोबर त्याला प्रजेलाहि संतुष्ट राखावयास हवें होतें. त्यानें चोर-डाकूंचा बदोबस्त करून रस्ते अगदीं निष्कंटक केले होते. वाटसरू व सार्थांना वाटेंत मुक्काम करण्यासाठीं त्यानें जागोजागीं धर्मशाळा, विहिरी व हौद बांधविले होते. रस्त्यांच्या कडेला फळझाडें लावून जेणें करून शकट व माणसें यांना चालावयास रस्ते सोईचे होतील अशी खास तजवीज त्यानें केलेली होती. त्याच्या दीनारांमध्येंशुद्ध सोनें पुष्कळच होतें आणि ते दीनारहि तऱ्हतऱ्हेचे होते. कांहींमध्यें तर समुद्रगुप्त व देवगुप्त यांच्या नाण्यांपेक्षांहि अधिक सोनें होतें. कांही दीनारांवरील त्याच्या चित्रांत त्यानें हाती धनुष्य घेतलेलें होतें व त्यावर ' श्रीविक्रम' अशीं अक्षरें कोरलेलीं होतीं. इतर कांहीं नाण्यांवरील चित्रांत तो सिंहावर बाण सोडतो आहे असें दर्शविलें होतें, तर आणखी कांहींमध्यें कुणा वामनानें ( बुटक्या माणसानें ) त्याच्यावर छत्र धरलें आहे असें दर्शविलें होतें. दीनारांच्या दुसऱ्या बाजूवर लक्ष्मीची मूर्ति असे. आपला दरारा जिकडे तिकडे बसविण्यासाठीं त्यानें नाणींहि साधन म्हणून उपयोगांत आणलीं होतीं आणि आपला प्रभाव दर्शविणारीं लहान लहान वाक्यें त्यानें त्यांच्यावर कोरवून घेतलेलीं होतीं. " नरेन्द्रचंद्रप्रथितो दिवं जयत्यजेयो भुवि सिंह विक्रमः ", " सिंह चंद्रः ", " सिंह विक्रमः ", " देव श्री महाराजाधिराजा श्री चंद्र गुप्तः "—अशीं तीं वाक्यें होतीं. त्याला त्याच्या या प्रयत्नांत किती यश मिळालें याचें एक उदाहरण असेंः छत्रधारी वामनाचें चित्र पाहून कुरूंच्या एका गांवांतील कुणी इसम सांगत होता

—" विक्रमादित्याचा पराभव कुणालाच करतां येत नाहीं. माणसंच काय, राक्षस, दानव, वेताळ देखील त्याची आज्ञा शिरसावंद्य मानतात. " त्या भोळ्याभाबड्या सैनिकाला चन्द्रगुप्ताच्या नाण्यावरचा वामन हाच वेताळ वाटत होता.

आम्हांला दक्षिणेकडून भय नव्हतें. आमचा गणसंघ व महाक्षत्रप रुद्रसिंह यांच्या दरम्यान मालवांचा गण आहे या विचारानें आम्ही निर्धास्त होतों अशांतला प्रकार नव्हता. पण जोंपर्यंत चंद्रगुप्त निर्बल होत नाहीं तोंपर्यंत रुद्रसिंहाच्या स्वतंत्रतेची शाश्वती नाहीं हें आम्ही जाणून होतों. आम्हांला पश्चिमेकडूनहि तितकीशी धास्ती नव्हती. कारण आमचा शेजारी देवपुत्रशाही याला खुद्द पारसीक शाहंशाहाचीच मान्यता होती. आणि त्यानें आपल्या पश्चिमोत्तर सरहद्दीवर किल्ले बांधून ठेवले होते. चद्रगुप्ता-च्या पराजयावरून कुषाण देवपुत्राला आमची ताकत कळून चुकली असली तरी त्याचबरोबर तो हेंहि जाणून होता कीं कुणिन्द-यौधेय-आर्जुनायन गणसंघ विपाश ( बियास ) व शतद्रु ( सतलज ) या नद्यांच्या पलीकडे चालून जाऊं इच्छीत नाहीं. तसेंच आम्ही यमुना ओलांडून पुढें चाल करूं इच्छीत नाहीं हें चन्द्रगुप्तालाहि ठाऊक होतें. पणं त्याला आ-समुद्र क्षितीश व्हावयाचें होतें. त्यांत पुन्हां त्यानें आमच्याच हातून जबरदस्त हार खाल्लेली होती. म्हणून त्याचें वाढतें सामर्थ्य पाहून आम्हांला काळजी वाटूं लागलेली होती. याच कारणास्तव आम्हांला एक क्षणभर देखील गाफिल राहावयाचें नव्हतें आणि मला तर सतत फिरतीवरच राहावें लागत होतें. माझा मुक्काम त्या दिवशीं खण्डिला येथें होता. दिवसा धनुष्य-बाण, घोडदौड, दांडपट्टा इत्यादींची चढाओढ मी पाहून घेतली. संध्याकाळीं आमच्या मित्रमंडळींची गप्पाष्टकांची बैठक भरली. त्याच वेळीं माधव तिथें आला. अजूनहि त्याच्या अंगावर घोडेस्वाराचाच पोशाक होता आणि त्याच्या हातांत चाबूक होता. आम्ही सारेजण त्याच्याकडे पाहूं लागलों, माधव नमस्कार करतां करतां म्हणाला–" भायर जय! मोठी आनंदाची बातमी आणली आहे मी. अन् ती आनंदाची बातमी तुझ्या एकट्यासाठींच नव्हे तर आम्हां सगळयांसाठीं आहे. "

मी प्रसन्नता दर्शवीत म्हणालों— " आहे तरी काय ती आनंदाची बातमी ? क्षत्रप अन् विक्रमाची जुंपली कीं काय ? खरोखरीच ही बातमी मोठी आनंदाची ठरेल. "

" भय्या जय ! तुझी नजर तर नेहमींच फार दूरपर्यंत जाते. "

" आज प्रत्येक यौधेयाची नजर दूरदूरपर्यंत जायलाच हवी. यौधेयभूमीवर येवढं मोठं संकट कधींच आलेलं नव्हतं. विक्रमादित्य आमचीं पाळंमुळं खणून काढायचा संकल्प करून चुकला आहे. "

" आम्ही विक्रमाची एकदां घाबरगुंडी उडविलेली आहे. पण त्याची हौस पूर्ण झालेली नसेल तर पुन्हां येऊन बघ म्हणावं. मी निराळयाच प्रकारची आनंदाची

बातमी आणलेली आहे. वसुवहिनीनं एक यौधेय जन्माला घातलाय." असें म्हणून त्यानें बसल्या बैठकींतच मजजवळ येऊन मला आलिंगन दिलें. सारेच यौधेय मला आलिंगनें देऊन आनंद प्रदर्शित करूं लागले. मलाहि खूप आनंद झाला. पण आमची मित्रमंडळी तो जसा शब्दांनीं व्यक्त करीत होतीं तसा मी नव्हतों व्यक्त करीत.

माधव म्हणाला— " भय्या जय ! एक नवा यौधेय जन्माला आल्यावर यौधेयांनीं खूष व्हायलाच हवं. यौधेय कांहीं एका पिढीच्या शौर्याच्या जोरावर ' जय यंत्रधारी ' नाहीं झाले ! "

" बरोबर आहे. यौधेय माता सदैव वीरांनाच जन्म देतात या गोष्टीचा आम्हांला अभिमान वाटणं योग्यच आहे. अन् आतां तर तुझ्या परिश्रमामुळं यौधेय माता नुसत्या वीरमाताच नव्हेत तर स्वतःच वीरस्त्रिया झालेल्या आहेत. "

खंडिलाच्या पुरस्कर्त्यानें माझा हात आपल्या हातीं घेऊन सांगितलें— " जय ! माझ्या नातवाचं नांव ' विजय ' असावं अशी माझी इच्छा आहे. " यावर सर्वजण एका सुरांत म्हणाले— " बरोबर आहे. आम्हांला असंच नांव हवंय. "

माधवनें यावर सांगितलें— " जयनं यौधेयांसाठीं जें कांहीं केलंय त्याची कायमची आठवण राहीलच. जयचा मुलगा त्याच्याहि एक पाऊल पुढं जाऊन ' विजय ' झालेला आम्हांला बघायला हवाय. "

मी म्हणालों— " पुरस्कर्ते काकांची आज्ञा आपल्याला टाळतां येते थोडीच ! "

त्या रात्रीं मला बऱ्याच उशीरपर्यंत झोंप नाहीं आली. मध्येंच मी आजच्या परिस्थितीचा विचार करीत होतों; मध्येंच यौधेयांच्या भवितव्याचा विचार माझ्या मनांत येत होता. यौधेयांच्या इज्जतीचें रक्षण करण्यासाठीं आणखी दोन हात जन्माला आलेले आहेत, माझ्या हातांची शक्ति क्षीण होईल त्या वेळी हे हात खूप बलिष्ठ होऊन आपली कामगिरी करीत राहतील, या विचारानें मला आनंद वाटत होता. केव्हां एकदां उजाडेल व मी अग्रोदकाला रवाना होईन असें मला झालें होतें.

खंडिला ( खंण्डेल ) हून अग्रोदका सोळा योजनांपेक्षां जास्त दूर होती. तरीपण आम्ही फक्त एकच दिवस वाटेंत घालवून दुसऱ्या दिवशीं तिथें पोंचलों देखील. नन्दावहिनीसमोर जातांक्षणीं तिनें माझ्या धुळीनें धूसर झालेल्या घामेजलेल्या कपाळाचें चुंबन घेतलें. तिच्या डोळ्यांतून आनंदाश्रु वाहत होते. ती म्हणाली— " भाऊजी ! मला किती आनंद झालाय म्हणून सांगूं ! आमच्या घरीं आणखी एक यौधेय आला. अन् खरोखरीच त्याचा चेहरा हुबेहुब तुमच्यासारखाच आहे. "

मी वहिनीच्या खांद्यावर हात ठेवून म्हणालों— " यौधेय आलाय हें ठीकच आहे. पण चार दिवसांच्या बालकाच्या चेहऱ्यांत माझ्या चेहऱ्याचं साम्य तुला कसं काय दिसलं ग ? "

वहिनी गालांतल्या गालांत हंसून म्हणाली– " ही विद्या आम्हां स्त्रियांनाच ठाऊक असते. "

माधव मध्येंच म्हणाला–" अन् मनीमावशी आपल्या साऱ्या विद्या वाघाला नाहीं शिकवीत. पण वहिनी! रागावूं नकोस हो! मी आपली एक प्रचलित म्हण सांगितली."

वहिनीची तिरपी नजर माधवकडे वळलेली पाहून मी म्हणालों– " म्हणीच्या नांवाखर कांहींहि सांग तूं. पण कोणत्या वहिनीसमोर तूं उभा आहेस हें ठाऊक आहे ना तुला ? "

वहिनी माझा हात आपल्या हातीं घेऊन म्हणाली– " वहिनी जर मांजरी असली तर माधव अगोदरच भिजलेली मांजरी झालाय. चला, तुम्ही दमलेले आहांत, अगोदर कांहींतरी खाऊन पिऊन घ्या. मग तुम्हांला तुमचा मुलगा दाखवीन... ... "

माधव म्हणाला– " अन् वहिनी! ठाऊक आहे का तुला? खंडिलावाल्यांनीं या यौधेयाचं नांवसुध्दां ठेवून टाकलं! "

वहिनी–" त्यांनीं नांव ठेवलंय! नांव मी ठेवायचं ना ? "

मी– " आपले खंडिलाचे पुरस्कर्ते व इतर मित्रांच्या तोंडून अनायासं ' विजय ' हें नांव निघालंय. तुला पसंत असलं तर ठेव तूं. "

वहिनी खूष होऊन माझा हात आपल्या दोन्ही हातांनीं घट्ट धरून म्हणाली– "अगदीं माझ्या मनांतलंच नांव आहे हें. मी माझ्या भाच्याचं नांव विजयच ठेवीन."

वहिनीनें आम्हांला जेवायला वाढलें. मग जुनाट कापिशेयी दारूचा एक कुतुप व प्याले आणून तिनें आमच्यापुढें ठेवले. आम्ही गप्पा मारीत मद्यपान करीत होतों आणि तिकडे अंगणांत यौधेयानी पुत्रोत्सवाची गाणीं गाण्यांत व नृत्य करण्यांत दंग झालेल्या होत्या. तशीं मी यौधेयानींचीं गाणीं पुष्कळ ऐकलीं होतीं. पण पुत्रोत्सवाचीं गाणीं इतकें मन लावून ऐकण्याची संधि मला नव्हती मिळाली. आणि हीं गाणी किती अर्थपूर्ण होतीं! यौधेयांनीं पिढयानुपिढया केलेल्या पराक्रमांची कथा या गाण्यां-मध्यें गुंफलेली होती. त्यांत रुद्रदामाला ' रुद् अ ' ( रुद्रक ) म्हणून त्याच्या-विषयीं तिरस्कार प्रदर्शित केलेला होता आणि त्याच्याशीं सामना देणाऱ्या यौधेय वीरांचें यशोगान केलेलें होतें. यौधेयानी अशाच मुलांना जन्म देण्याचीं स्वप्नें पहात असतात. पुत्रोत्सवाचीं गौरवगीतें गातांना देखील त्यांच्या समोर यौधेयांचा सारा इतिहास, यौधेयांचा सारा गुणगौरव साक्षात् उभा असतो.

मी वहिनीला म्हणालों– " यौधेय पुरुषांना त्यांच्या शौर्याबद्दल योग्यतेपेक्षां अधिक श्रेय मिळतं. वहिनी! मी तर असं म्हणेन कीं आज यौधेयांचा हा जो लौकिक आहे त्याचं सगळ्यांत मोठं श्रेय यौधेयानींकडे जातं. "

वहिनी– " पण भाऊजी ! आम्हां यौधेयानींना तुमच्या कामगिरीचा विसर पडणं शक्य नाहीं. आम्हीं केवळ नांवाच्या यौधेयानी राहिलों होतों. "

" वहिनी ! हें काय भलतंच सांगत्ये आहेस तूं ! ज्या यौधेयानी बालकाचे कान खुले झाल्याबरोबर अशा प्रकारच्या वीरगाथा त्याला ऐकवतात, ज्या अशा प्रकारचीं गाणीं रचून आमचा इतिहास पिढयानुपिढया संभाळून ठेवायची तरतूद करतात, ज्या आम्हांला बाळकडूबरोबरच वीररसाचं पान करवितात त्यांना यौधेयानी कोण म्हणणार नाहीं बरं ? "

" भाऊजी ! कबूल आहे मला तुमचं म्हणणं. पण आम्ही आई, बहीण व पत्नीच्या नात्यानंच यौधेयानी राहिलों. तुम्ही आम्हांला आमच्या अधिकारांत यौधेयानी म्हणवून घ्यायची लायकी मिळवून दिली. आतां आम्ही अशा कायमच्या यौधेयानीच राहिलं पाहिजे असं मला हवंय. "

वहिनीनें दुसऱ्या दिवशीं सकाळींच मुलगा दाखवीन असें सांगितलें होतें. मी सकाळींच हाततोंड धुवून तयार राहिलों. माझी ही घाई पाहून तेवढयांत तिनें रेवतकला खिजविलें– " रेऊ ! पाहिलंस का ! हे कसे बाप आहेत बघ बरं ! नाहींतर तूं झालाच आहेस बाप ! "

रेवतक– " काय बुवा, माझ्या हातून काय अपराध घडला ? "

नन्दा– " अपराध ! मला पहिला मुलगा झाला त्या वेळीं पुत्रमुख बघायला तूंहि इतका उत्सुक होतास ? "

माझ्या चेहऱ्यावरील लज्जेची छटा पाहून वहिनी माझ्याजवळ आली आणि माझ्या खांद्यांवर आपले गाल टेंकवून म्हणाली– " तसं नव्हे भाऊजी ! यांत लाजायसारखं कांहींच नाहीं. " आणि माझ्या हाताला धरून ती मला बाळंतिणीच्या खोलींत घेऊन गेली.

माझी नजर मुलाकडे जाण्याच्या अगोदर वसूच्या चेहऱ्याकडे गेली आणि तिथेंच मंत्रमुग्ध झाल्याप्रमाणें स्थिर राहिली. आतां तिचा चेहरा अरुणोदयाला फुलणाऱ्या पद्मासारखा राहिलेला नव्हता. तिचें मुख निस्तेज व फिकट झालेलें होतें. त्यावर कौमार्याची चपलता दिसत नव्हती. ती मातृत्वाची गंभीर मुद्रा होती. तिचे काळे केंस आतां मोरपिसाऱ्यासारखे चमकत नव्हते; ते अस्ताव्यस्त व रखरखीत झालेले होते. तिच्या शरीराच्या एकेका भागांतून नव्या जिवाच्या पोषणासाठीं वसूल झालेल्या खंडणीच्या खाणाखुणा साऱ्या अंगभर दिसत होत्या. तसें पाहूं गेलें तर ती रूढ अर्थानें सुन्दर नव्हती दिसत. पण मला मात्र तिच्या ठिकाणीं एक प्रकारच्या अनुपम सौन्दर्याचा प्रत्यय येत होता. त्याचबरोबर मातृत्वासाठीं स्त्री केवढा त्याग करीत असते याचाहि विचार माझ्या मनांत येत होता. मग वहिनी

बाळाला हातीं घेत होती त्या वेळीं वसूचे टपोरे डोळे या तिच्या काळजाच्या तुकड्या-कडे कसे निरखून बघत राहिले होते हें मी पाहिलें. तिच्या डोळयांतल्या श्वेतिम्या-मध्यें अभिमान दिसत होता आणि त्यांच्या काळ्याभोर बाहुल्यांमध्यें मातृप्रेमाची चमक दिसत होती. मी माझा पद्मपुष्पासारखा चिमुकला कोमल बाळ पाहिला. वहिनीच्या हातीं तो एकसारखा वळवळत होता. डोक्यावर छोटे छोटे नाजुक पिवळे केंस होते. डोळे उघडलेले होते. त्यांच्या निळ्या रंगावरून त्यानें वसूचें नेत्र-सौन्दर्य चोरून घेतलें असावेंसें दिसत होतें. मुख, हनुवटी, गळा, हात, पाय, किती छोटे, किती कोमल होते! पण हेंच शरीर वीस वर्षांनीं एका दणकट यौधेयाच्या स्वरूपांत परिणत होणार होतें. मोठ्या कार्यांचा आरंभहि किती लहान स्वरूपांत होतो याची मला या वेळीं आठवण होत होती. मी बाळाकडे एकटक बघत राहिलों आणि वसु बघत राहिली माझ्याकडे. आमच्या अबोल भाषेंत आम्ही आमच्या हृदयांतला गुप्त अभिमान व्यक्त करीत होतों. आम्ही या जगांत वाळूंतील पावलांच्या खुणांप्रमाणें लुप्त नाहीं होणार; आम्ही आमचा प्रतिनिधी मागें ठेवून जाणार.

वहिनी म्हणाली--" भाऊजी! बघितलांत किती सुन्दर आहे तुमचा बाळ! अन् हुबेहुब तुमच्याच सारखा आहे कीं नाहीं ? "

मी--" आहे सुंदर. पण वहिनी! हा तुझ्यासारखा आहे. "

वहिनी--" माझ्यासारखा! म्हणजेच वसूसारखा! होय. याचे केस व डोळे वसूच्या सारखे आहेत. पण कपाळ अन् हनुवटी ? अन् छोटासा बाळ वीस वर्षांनीं कसा दिसेल हें कळायची एक खास विद्या आम्हां स्त्रियांना अवगत असते हें मी तुम्हांला सांगितलंयच. "

मी--" वीस वर्षांनंतरची गोष्ट आज सांगतेस तूं. ज्योतिष असेल हें. "

वहिनी--" नाहीं हो भाऊजी! मी चुकीचं नाहीं सांगत. विजयचे केस व डोळे आईच्या वळणावर जातील, अन् बाकीचं सारं शरीर बापाच्या वळणावर जाईल. "

वहिनीनें बाळाला त्याच्या आईच्या हातीं दिला. वसूनें माझ्याकडे नजर वळविली. ती गालांतल्या गालांत हंसत होती. वहिनी मला बरोबर घेऊन बाहेर आली. ती सांगूं लागली--" केवढा चमत्कार आहे हा! थोडे आईचे गुण, थोडे बापाचे गुण; अन् शून्यांतून अशा सजीव देहाचा उगम व्हायचा! "

मी--" प्रत्येक नवनिर्मिति हा चमत्कारच असतो. जीवन हें तर विश्वांतली सर्वश्रेष्ठ वस्तु असते. त्यांतल्या त्यांत मानवजीवन तर विशेषच. मग त्यांत येवढा चमत्कार कां नाहीं असणार ? पण वहिनी! हें जीवन शून्यांतून नाहीं हं निर्माण झालेलं. त्याच्या ठिकाणीं आई-बापांच्या रज-वीर्याचा संयोग झालेला आहे; अन्

उभयतांची शारीरिक व मानसिक संपत्ति सूक्ष्म स्वरूपांत एकत्र आलेली आहे. इथं मूस आहे, संस्कार आहे, अन् मूर्ति घडवायचा पिंडहि आहे. म्हणजेच याचा उगम शून्यांत झालेला नाहीं. याचा उगम झाला आहे सूक्ष्मांतून. अन् तो सूक्ष्म असूनहि विशाल आहे. "

वहिनी– " हजारों पिढ्यांची ही संचित संपत्ति आहे म्हणानात. "

मी– " त्या हजारों पिढ्या एकमेकींशीं किती एकजीव झालेल्या आहेत हीहि एक विचार करण्याजोगी गोष्ट आहे बघ. मला माझ्या आई-बापांचा वारसा मिळाला, वसूला अर्थांत तिच्या आईबापांचा वारसा मिळाला. अशा रीतीनं सहा जिवांचा वारसा घेऊन पुढच्या पिढींतला हा छोटासा बाळ जगांत अवतरला आहे. "

वहिनी— " म्हणजे तिसऱ्या पिढींत आईच्या व वडिलांच्या दोन्ही घराण्यां-तील आजा-आजींचं आईबाप मिळून आठजणांचा वारसा बालकाला मिळतो. "

मी— " म्हणजे बघितलंस ना आतां वहिनी ! आपला विजय केवळ दोघांच्या शारीरिक व मानसिक संपत्तीचा वारसा घेऊन आलेला आहे असं अगोदर वाटत होतं नव्हे का ? त्याचे केस व डोळे त्याला तूं आईकडून देवविलेस व बाकीचं शरीर त्याला तूं बापाकडून देवविलंस. पण जय अन् वसुनन्दा यांची ही शारीरिक-मानसिक संपत्ति त्यांच्या आधींच्या चार स्त्री-पुरुषांची देणगी आहे. अशा रीतीनं या पिढींत जन्माला आलेल्या बालकाला पाठीमागच्या दुसऱ्या पिढींतलीं दोन माणसं आपला वारसा देतात; तिच्या मागच्या तिसऱ्या पिढींतलीं चार, तिच्याहि आधींच्या चौथ्या पिढींतलीं आठ व पांचवींतलीं सोळा-- अन् एकेका पिढींतल्या या साऱ्या माणसांची एकंदर गोळाबेरीज केली तर मागच्या पांचच पिढ्यांतलीं मिळून तीस माणसं आपला वारसा या बालकाला देतात. म्हणून याचा आरंभ सूक्ष्म असला तरीहि केवढा विशाल आहे पहा. आणि याचा भाविकाळ तर याहूनहि अधिक विशाल आहे. कारण इथें पुढची दुसरी पिढी दोहोंनीं सुरू न होतां चार-सहा-आठांनीं सुरू होऊं शकते आणि तिसऱ्या चौथ्या पिढींत वारसदारीचा येवढा विस्तार होत जातो कीं त्याला आम्ही अमर प्रवाहच म्हणूं लागतों. "

वहिनी-- " भाऊजी ! तुम्ही जें सांगत असतां ना, कीं मेल्यानंतर पुनर्जन्म वगैरे कांहीं नसतो, परलोक नसतो, तें मला तितकंसं कळत नव्हतं. पण आपल्या औरस संततीच्या स्वरूपांत जन्म घेणं हा आपला फारच छान पुनर्जन्म आहे हें मला चांगलं कळतंय. "

मी-- " अग तो काल्पनिक पुनर्जन्म म्हणजे सर्वस्वीं आत्मसंकोच, विनाशाचं भय व व्यक्तिस्वार्थ यांचा निदर्शक असतो हेंहि त्याचबरोबर समजून घे तूं. उलट-पक्षीं मुलांमुलींच्या स्वरूपांत झालेला हा पुनर्जन्म म्हणजे, आत्मविकास, स्वार्थत्याग

व आशीर्वाद यांचा निदर्शक असा मोठा गौरवशाली जन्म असतो. हा पुनर्जन्म आपल्याला अशी जाणीव करून देत असतो कीं ज्या समाजांत आपण जन्माला आलों व ज्यांत आमच्याच पुनर्जन्माच्या स्वरूपांत आमचीं हजारों संतानं जन्माला येतील, त्या समाजाकडे आपण एक क्षणभरहि उपेक्षेच्या दृष्टीनं पाहतां कामा नये. "

वहिनी-- " यांच्यावरच तर आपली सारी आशा असते. मी विजयचे डोळे पाहूं लागल्यें कीं मला वसूच्याच डोळ्यांनीं हा अत्यंत तरुण व अधिक चिरस्थायी स्वरूपांतला नवा जन्म घेतलाय असं वाटतं. अशा रीतीनं प्रत्येक नवा जन्म जुन्या शारीरिक-मानसिक संपत्तीचा अगदीं नव्या कोऱ्या स्वरूपांत आविष्कार करतो. शेवटीं आपण ज्या देहाचं विसर्जन करतों तो फारच दुबळा, जीर्णशीर्ण अशा अवस्थेला पोंचलेला असतो-- डोळ्यांत तेज नाहीं, अंगावर चकाकी नाहीं, मनांत स्मृति व समजशक्ति राहिलेली नाहीं, अशी त्याची अवस्था असते. पण त्या मानसिक-शारीरिक संपत्तीच्या नाशानं आपल्याला वाईट वाटायचं कांहींच कारण नाहीं. "

मी-- " बरोबर आहे. मला तर वाईट वाटायचंच नाहीं. मात्र असल्या विचारांनीं भित्र्या लोकांचीं मनं खचतात. आणि आपण मेल्यानंतर संततीच्या स्वरूपांत नव्हे तर स्वतःच पुन्हां नवं शरीर धारण करुन पुन्हां पूर्वीच्याच हासविलासांत व सुखोपभोगांत दंग व्हायला आपल्याला मिळेल ही कल्पना या भित्र्या लोकांना फार छान वाटते. "

वहिनी- " म्हणजे पुनर्जन्म ही काय केवळ कल्पनाच ? "

मी-" ही कल्पना आहे का नाहीं याबद्दल मी जास्त चर्चा करूं इच्छीत नाहीं. पण ही गोष्ट अत्यंत संदिग्ध आहे यांत तर कांहींच संदेह नाहीं. अन् तिच्यांत स्वार्थीपणा केवढा आहे ! मनुष्यानं आपला आनंद केवळ आपल्या उपभोगापुरता मर्यादित ठेवलेला नाहीं. त्याला आपलीं माणसं आनंदात असलीं म्हणजेहि आनंदाचा लाभ होतो. पुनर्जन्म मात्र सदासर्वदा केवळ आपल्याच सुखोपभोगांत दंग राहायचा मोह आपल्यापुढं ठेवतो. "

---



*

( २१ )

## कालिदास आणि यौधेय

दिवसां मागून दिवस चालले. यौधेयांची समृद्धि वाढत गेली. शेती, जनावरें व माणसें यांच्या उपयोगासाठीं गांवोंगांवीं मोठमोठे तलाव व विहिरी तयार झाल्या. यौधेयभूमींत अवर्षणाचें व दुष्काळाचें भय नाहींसें होत चाललें. आमच्या देशांत नुसते गहूं, हरभरा, मूग, उडीद इत्यादि धान्येंच नव्हेत तर सुन्दर भातहि पैदा होत होतें. पुंड्रइक्षु ( पौंडा ऊंस ) आम्ही मोठ्या खटपटीनें पुण्ड्रवर्धन भुक्ति ( उत्तर वंग ) येथून मागवून आमच्या देशांत त्याचा प्रसार केला होता. पक्षानें चोंच मारली कीं त्यांतून रस गळूं लागतो अशी त्याची ख्याति झालेली होती. या उंसांत रस जास्त असतो हें निःसंशय. पण चोंच मारतांच रस गळतो ही केवळ अतिशयोक्ति आहे. डाळिंबें, द्राक्षें, अंजीर इत्यादि गंधार-कंबोज या देशांतलीं फळेंहि आम्ही आमच्या देशांत लावलीं. पुढच्या वीस वर्षांत यौधेयांचें लष्करी सामार्थ्य खूप वाढलें इतकेंच नव्हे तर त्यांच्या गांवांचा व नगरांचा कायापालट झाला. त्यांचीं शेतें व बागबगीचे पाहून मन प्रसन्न होत होतें. त्यांच्या गाई, म्हशी, घोडे, मेंढ्या, शेळया यांच्या सुद्धां निराळयाच अवलादी तयार झालेल्या होत्या आणि आमच्या शेजारच्या देशांतून व दूरदूर ठिकाणांहून त्यांना फार मागणी असे. आमची मानुष-संपत्ति देखील याच्याच अनुरोधानें वाढलेली होती. वहिनी म्हणाली त्याप्रमाणें मी वीस अपत्यांचा बाप कांहीं होऊं शकलों नाहीं. पण विजय, रिपुंजय व संजय असे तीन मुलगे मला झाले. विजय आतां सोळा वर्षांचा झालेला होता. त्याचें शारीरिक-मानसिक बळ पाहून कोणाहि बापाला अभिमान वाटल्या खेरीज राहिला नसता. दुसरे मुलगे बारा व आठ वर्षांचे होते. वसु माझ्या सार्‍या कामांत सहभागिनी होती. नन्दावहिनी आतांहि पूर्वीप्रमाणेंच आम्हांला आनंद व धाक देण्यांत तत्पर असे. आम्ही यौधेय-भूमींत विद्येचा व शिल्पकलेचा खूप प्रचार केला. आमच्या देशांतून कम्बल, कापूस, वस्त्रें, त्याचप्रमाणें इतरहि हस्तिदंती, लाकडी, दगडी व धातूच्या वस्तु तयार होऊन बाहेर निर्गत होत होत्या. आम्ही आमच्या शिल्पकारांना आमच्या बरोबरीचा मान दिला. फक्त त्यांना गणसंस्थेचे सभासद होण्याचा

हक तेवढा आम्ही त्यांना देऊं शकत नव्हतों. यौधेयभूमींतून आम्ही आतां दास-प्रथेचेंहि उच्चाटन केलें होतें. यौधेय सर्व प्रकारें संतुष्ट प्रसन्न होते. मीहि त्यांच्या या सुखांत सहभागी होतों. पण महासेनापति बप्प यांच्या मृत्यूनंतर मला यौधेय-गण-पुरस्कर्ता व महामंत्री करण्यांत आलें.

माझ्या जन्मभूमीची शक्ति व समृद्धि पाहून मला अपार प्रसन्नता वाटत होती हें तर खरेंच. पण त्याच बरोबर यमुनेच्या पलीकडे ज्या घडामोडी घडत होत्या त्यांच्याकडे माझें लक्ष होतें व त्यांमुळें मन विकल होत होतें. चन्द्रगुप्तानें पूर्वेकडे लौहित्य ( ब्रह्मपुत्रा ) व समुद्रावर आपल्या राज्याच्या विस्तार करून घेतलेला होता. पश्चिम समुद्रापर्यंतचा स्वामी वाकाटक याला आपल्या मुठींत आणण्यासाठीं चन्द्रगुप्तानें जें कौशल्य लढविलें तें पाहून तर मी गुंगच झालों. पृथ्वीषेणानें समुद्रगुप्ताच्या अखे-रच्या काळांत डोकें वर केलें. वाकाटकांचें राज्य नर्मदेपासून कृष्णेपर्यंत, पूर्वसमुद्रा-पासून पश्चिमसमुद्रापर्यंत पसरलेलें असून त्याच्या जवळ मोठी सेना होती. चन्द्रगुप्ताची ज्या दिवशीं वाकाटक राजाशीं झुंपेल तो दिवस आम्हांला केवढा तरी भाग्याचा ठरेल या उमेदींत मी होतों. दोघे अत्याचारी आपापसांत लढून नष्ट होतील अशी मला आशा वाटत होती. पण चन्द्रगुप्तानें एकहि बाण खर्ची घातला नाहीं, एकहि सैनिक गमावला नाहीं आणि सारी वाकाटक भूमि चन्द्रगुप्ताच्या अधिराज्याखालीं आली. चन्द्रगुप्ताची दुसरी राणी कुबेर नागा हिच्यापासून त्याला प्रभावती नांवाची एक मुलगी झाली. पित्याच्या गुणावगुणांचा सर्वांत मोठा भाग मुलीच्या ठिकाणीं जातो असें वाटतें. प्रभावती विक्रमादित्याच्या घरीं सरस्वतीचा अवतार घेऊनच जन्माला आलेली होती. अशा प्रकारच्या बोलबाल्यांत सत्य कितपत आहे हें मला नाहीं सांगतां येत, पण ती मोठी चतुर व हुशार तरुणी आहे यांत तर कसलाच संदेह नाहीं. पृथ्वीषेणाचा पुत्र रुद्रसेन प्रभावतीचा पति व विक्रमादित्याचा जांवई झाला इतकेंच नव्हे तर आतां तो विक्रमाचा एक अतिशय सन्माननीय असा सामन्त आहे. वाकाटकांची सारी सेना आतां विक्रमाची सेना झाली.

दुसरीकडे मालवांनींहि गुप्तांसमोर मान बांकविली. जयवर्मा व सिंहवर्मा हे दोघे पितापुत्र अगोदरपासूनच मालवगणाला आपल्या परिवाराची संपत्ति समजत होते. मालव वेळेवर जागे नव्हतेच. आणि आतां तर जयवर्माचा नातू नरवर्मा यानें मालवांना विक्रमाच्या हातीं विकून टाकलें. नरवर्मानें केवढा विश्वासघात केला हा ! कोणतेंहि गणसंतान इतके कसें पतित होऊं शकते याचें नवल वाटतें ! छीः ! छीः ! ! चन्द्रगुप्तानें नरवर्माचा सन्मान केला, गणाचा अंमल नष्ट करून त्याचा लगाम नरव-र्माच्या हातीं देण्याच्या कामीं मदत केली. आतां आपला वंश अनंतकाळपर्यंत मालवांच्या-वर राज्य करील अशी दगलबाज नरवर्मानें समजूत करून घेतली आहे. नरवर्माच्या

दगलबाजीची हकीकत ऐकल्यानंतर कित्येक दिवसपर्यंत मी रात्रीच्या रात्री तिचा विचार करीत असे. हा मालवांचा पराजय नसून आपलाच पराजय आहे असें मला वाटे. चन्द्रगुप्तानें रक्ताचा एक थेंबहि न सांडतां आमचा हा सूड घेतला आहे असें मी माझ्या बांधवांना सांगितलें.

महाक्षत्रपावरचें अरिष्ट आणखीच वाढलें. त्याच्या पूर्वेला व दक्षिणेला चन्द्रगुप्त व प्रभावती-पति या दोघांचा घेरा होताच. उत्तरेला नरवर्म्याच्या विश्वासघातामुळें मालव-देश चन्द्रगुप्ताच्या हातीं गेला. आतां महाक्षत्रपाला विक्रमानें तीन्ही बाजूंनीं घेरलें. चन्द्र-गुप्ताला सगळ्यांत जास्त लोभ क्षत्रपाच्या भूमीचा–अवन्ती लाट व सौराष्ट्र या देशांचा–आहे हें मी जाणून होतों. कारण सारौष्ट्र व लाट देशांच्या पत्तनांवरच ( बंदरांवरच ) पश्चिमेकडे ढग सोन्याचा पाऊस पाडत असतात हें तो समजून आहे. पण चन्द्रगुप्त आपला पराक्रम अगोदर यौधेयांसमोर प्रदर्शित करील का महाक्षत्रपासमोर, हें कुणा-लाच सांगतां येणें शक्य नव्हतें.

चन्द्रगुप्ताचें सैन्यबळ व द्रव्यबळ त्याच्या पित्याच्या पेक्षां बरेंच अधिक आहे हें मला स्पष्टच दिसतें. त्याचबरोबर तो पित्यापेक्षां जास्त शाहणा, कूटनीतिप्रवीण व निष्ठुर आहे हेंहि मला ठाऊक आहे. दुसरा कोणताहि मार्ग राहिला नाहीं अशी परिस्थिति उद्भवल्यावर मगच तो आपलें लष्करी सामर्थ्य उपयोगांत आणावयाचा बेत करतो. त्याची मजल किती दूरवर जाऊं शकते हें त्यानें वाकाटकांना आपली मुलगी देऊन दाखवून दिलें. या शिवाय प्रजेची सद्भावना आपल्याकडे ओढून घेण्या-साठीं तो हजार प्रकारें खटपट करीत असतो. त्यानें कितीतरी मंदिरें बांधविलीं आहेतच. पण त्याचबरोबर देशाच्या कोनाकोपऱ्यांतील कलाकारांना बोलावून घेऊन त्यांच्याकडून मूर्ति, चित्र अगर इमारतीच्या बांधकामाचे उत्कृष्ट नमुने त्यानें तयार करविले व त्या-बद्दल त्यांना भरपूर बक्षिशी व मानसन्मान देऊन त्यांना आपले आभारी व प्रशंसक करून ठेवलें आहे. श्रद्धाळु जनतेपुढेंहि तो धर्मराजाच्या स्वरूपांत येत असतो. स्वतः संबंधीं एक वेताळाचीच गोष्ट नव्हे तर इतरहि शेंकडों गोष्टींचा फैलाव करण्यासाठीं तो स्वतः सूचना देत असतो. विक्रमादित्य असामान्य माणूस नसून एखादें मोठें दैवतच त्याच्या रूपानें जगांत अवतार घेऊन आलें आहे अशी लोकांची समजूत करून देण्या-साठीं त्याची ही सारी खटपट आहे. स्वतःला त्यानें परमवैष्णव अशी पदवी तर लावून घेतलीच आहे पण त्याचबरोबर म्लेच्छांपासून धरित्री मातेचा उद्धार करणारा वराहावतार म्हणजे चंद्रगुप्त विक्रमादित्य होय हें लोकांच्या मनावर त्याला ठसवावयाचें आहे. त्यानें बांधविलेलें एक वराह-मंदिर तर मी स्वतःच मथुरेंत पाहिलें. मूर्तीचें शिर तेवढें वराहाचें असून बाकीचें सारें धड एका धष्टपुष्ट पुरुषाचें आहे. वराहाच्या दांताला लटकलेल्या पृथ्वीला पाहून मला आश्चर्य वाटलें, चन्द्रगुप्त इतकी दूरची मजल गांठेल

हें मला खरेंच वाटत नव्हतें. ती मूर्ती पृथ्वीची नसून ध्रुवदेवीची होती. मूर्ती फारच सुंदर होती हें मी एक कलावंत या नात्यानें सांगूं शकतों. पण चंद्रगुप्तानें आपल्या पत्नीची मूर्ती वराहाच्या दांतांत कां बरें लटकावून दिली ? त्यानें कुषाण देवपुत्राच्या तावडींतून ध्रुवस्वामिनीला सोडविलें हें ठांकच झालें. त्यानें जर तेवढें धाडस केलें नसतें तर गुप्तांची राजलक्ष्मी कदाचित नष्टच झाली असती. पण या कामगिरीला वराहावतारांतील पृथ्वीच्या उद्धाराचें स्वरूप देणें ही चन्द्रगुप्ताचीच करामत आहे. ध्रुवदेवीची गोष्ट ज्याला माहीत आहे तो तिचा अर्थ या रीतीनें लावील. ज्याला माहित नाहीं तो याला नुसताच वराह समजेल. जो कलाप्रेमी आहे तो ही अद्‌भुत मूर्ति पाहून परमभट्टारकाची प्रशंसा करावी तितकी थोडीच म्हणेल.

आम्ही पहिला विजय मिळवून आतां एकोणीस वर्षें होऊन गेलेलीं होतीं. या मुदतींत आम्ही आमचें लष्करी सामर्थ्य सतत वाढवीत राहिलों. तरीहि आमची धास्ती कमी होण्याऐवजीं वाढतच चालली. चन्द्रगुप्ताला एकदां शेवटचा धडा कसा द्यावा ही एकच गोष्ट आज प्रत्येक यौधेय बाल-वृद्ध स्त्रीपुरुषाच्या तोंडीं आहे. चन्द्रगुप्ताला माझ्या साऱ्या गोष्टींची बातमी कळत असे. आपण वाकाटकांच्या बाबतींत आपला डाव यशस्वी रीतीनें लढविला, आणि आपला स्वतःचा मामाच आपल्या हातांतून कसा निसटला याचें त्याला राहून राहून वाईट वाटत होतें. ध्रुवदेवीनें मला किती पत्रें पाठविली त्यांची गणतीच नव्हती. आपल्या बहिणीमार्फत प्रेमपत्रांच्या जाळयांत मला अडकविण्याची तिनें बरीच खटपट केली होती. पण पहिल्या युद्धानंतर मी तिला कांहीं उत्तरच दिलें नाहीं. आपल्याला अज्जुकाची जन्मभूमि पाहावयाची इच्छा आहे असा निरोपहि ध्रुवदेवीनें दूतामार्फत पाठविला. अग्रोदकाला समक्ष आल्यावर माझें मन वळविण्यांत यश मिळविण्याची तिला बहुधा खात्री वाटत असावी. मला तिची भीतीच वाटत होती. ती इथें येणार तर नाहीं ना, अशी मला धास्ती वाटे. तिच्या जादूचा प्रभाव माझ्यावर नसता चालला. पण मुद्दाम ही पीडा आपल्यावर ओढवून कशाला घ्या ? मी कांहीं तरी सबबी सांगून टाळाटाळ करीत राहिलों. चन्द्रगुप्त तर पंधरा वर्षांपासून एकसारखा माझ्या पाठीस लागलेला होता. तो मला मोठ्यांत मोठें पद द्यावयास तयार होता इतकेंच नव्हे तर वाकाटकांप्रमाणें आपल्या मामाच्या वंशाला देखील एका प्रतापशाली राजवंशाचें वैभव प्राप्त करून देण्याच्या गोष्टी तो सांगत होता.

* * * *

पावसाळा संपलेला होता. आतां जमिनीवर चिखल दिसत नव्हता. मात्र अजूनहि भूमि हिरवळीनें आच्छादलेली होती. आमच्या शेतांतील सोनेरी पिकें वाऱ्याच्या लहरींवर झोंके घेत होतीं. मी रेवत व वसुनन्दाबरोबर संध्याकाळच्या

वेळीं बांधांवरून भटकत होतों. याच सुमारास दोन प्रवासी तिकडून चाललेले दिसले. त्यांच्या पैकीं एक घोडयावर होता आणि दुसरा त्याचा परिचारक दिसत होता. प्रवासी माझ्याकडे येऊन म्हणाला– " आर्य ! महासेनापति जय यौधेय यांचं घर आपल्याला दाखवितां येईल का ? "

मी त्याच्या तोंडाकडे पाहूं लागलों. त्याचें वय तीस पस्तीस वर्षांचें असावें. चेहऱ्यावर नम्रता होती, पण त्याच्या डोळ्यांतलि चमक माझें लक्ष आपल्याकडे वेधून घेतल्याखेरीज राहीना. त्याच्या अंगावर शुभ्र कंचुक, शुभ्र उष्णीष, शुभ्र अन्तर-वासक, व खांद्यावर शुभ्र उत्तरीय येवढया कपड्यांशिवाय आणखी कसलाहि दागिना नव्हता. मी नम्रपणें विचारलें- " आर्य ! आपण कुठून आलांत ? "

" मथुरेहून आलों. महासेनापति जय हे जाडे विद्वान व कलारसिक आहेत, मीहि एक क्षुद्र कलावंत आहे, अन् याच नात्यानं त्यांचं दर्शन घेण्यासाठीं दूर दक्षि-णेकडे अवन्तीपुरींत राहाणारा हा ब्राम्हण त्यांच्याकडे आला आहे. "

मी दोन्ही हात जोडून म्हणालों– " आर्य ! वन्दे ! मीहि एक कलाप्रेमी क्षुद्र यौधेय आहे. पण मला वाटतं आमच्या महासेनापतीच्या बाबतींत कुणीतरी खोटेच प्रशंसोद्गार आपल्या कानांवर घातले असावेत. ते एक योद्धे आहेत हें यौधेयभू-मींतील साऱ्याच लोकांना ठाऊक आहे. पण कलेशीं व विद्येशीं त्यांचा काय संबंध ? "

पाहुणा किंचित हंसरा चेहरा करून म्हणाला– " आर्य ! आपल्याला कदाचित नसेल ठाऊक पण मी अत्यंत विश्वसनीय लोकांच्या तोंडून ऐकलंय, म्हणून मला शंका वाटत नाहीं. आपण जर मला महासेनापतींचं घर दाखवूं शकाल तर मोठी कृपा होईल. "

मी अशा प्रकारें बोलत राहिलों असतां रेवतक व वसुनन्दाला हंसूं आंवरण्याची मुष्किल झालेली होती. मी म्हणालों–" आर्य ! आपल्या खात्रीच्या बाबतींत मी काय सांगणार बरं ? ते आमचे महासामन्त आहेत खरे, पण त्यांचं स्वतःचं घर नाहीं. "

पाहुणा आश्चर्य व्यक्त करीत म्हणाला–"मग महासेनापति राहतात कुठं ? मी तर ऐकलंय कीं ते अग्रोदका नगरींत राहतात ? "

मी–"अग्रोदका ही त्यांची जन्मभूमि आहे, तिथं भाऊबंद राहतात त्यांचे. ते तर सतत फिरतीवरच असतात. जेव्हां त्यांचें राहणं इथंच असतं तेव्हां ते भाऊबंदांकडेच असणार. "

पाहुणा किंचित निराश होऊन म्हणाला–" आजकाल तर महासेनापति घरींच आहेत ना ? "

मी–" मला सांगायला फार वाईट वाटतं कीं महासेनापति बाहेर गेले आहेत अशाच समयाला आर्यांचं आगमन इथं झालंय. "

पाहुणा–" मला तर त्यांची भेट घेण्याची फार फार इच्छा आहे. ते कुठंहि असले तरी त्यांचा तपास करून मी भेटेन त्यांना."

मी–" आपल्याला किती कष्ट पडतील ठाऊक आहे ? एकदां मीहि कसल्या तरी कामासाठीं त्यांच्याकडे त्यांना भेटायला गेलों होतों. पण मला वीस दिवस त्यांच्या पाठोपाठ धांवाधांव करावी लागली. ज्या गांवीं मी पोंचावं, तिथून ते पुढं गेले आहेत अशी बातमी लागावी. अन् त्यांत पुन्हां एका दिवसांत दोन चार योजनं नव्हेत, चांगली बाराबारा चौदा चौदा योजनांची मजल मारायची म्हणजे किती मुष्किलीची गोष्ट ! "

" तें कांहींहि असो. मला तर त्यांची भेट घेणं आवश्यकच आहे." हें सांग· तांना पाहुण्याचा चेहरा उदासला.

मी–" आपण जर भेट घ्यायचा निश्चयच केला असेल तर निदान आतां कांहीं पुढं जाण्याइतका वेळ राहिलेला नाहीं. आर्य ! आज आपण माझ्या पाहुणचाराचा स्वीकार कराल ना ? "

पाहुण्यानें प्रसन्नता दर्शवीत माझ्या पाहुणचाराचा स्वीकार केला. आम्ही त्याला बरोबर घेऊन आमच्या घरीं पोंचलों. खरोखरच मी माझें वडिलार्जित घर आमच्या सामुदायिक शेतीला व तींत काम करणाऱ्या कामगारांना दिलें होतें व मी स्वतः रेवतकच्या घरीं राहत होतों. आम्ही पाहुण्याला आमच्या वरच्या मजल्यावरील सर्वांत चांगल्या खोलींत घेऊन गेलों. आम्ही त्याचें पाय धुवविले आणि मग मध-मिश्रित पाणी व फलाहार देऊन तृप्त केलें. पाहुण्याच्या बाबतींत तो अवन्तिपुरीचा एक ब्राह्मण कलावंत आहे इतकेंच मला आतांपर्यंत कळूं शकलें होतें. त्यांतल्या त्यांत माझें जास्त लक्ष चित्रकला व मूर्तिकलेकडे जात होतें, पण आपण एक लहानसा कवि आहोंत असें पाहुण्यानें आपणहूनच भोजनाच्या अगोदर सांगितलें होतें. इतकेंच नव्हे तर तारुण्यमदानें मुसमुसलेल्या तरुणीच्या सौंदर्यावर त्यानें स्वतः रचलेली कविताहि गाऊन दाखविली. मी विचारलें–" आर्य ! आपली मद्यपानाला हरकत नाही ना ? "

पाहुणा–" नाहीं आर्य ! मद्यपानाला ज्यानं नकार दिला तो कवि कसचा म्हणायचा ? त्यांत पुन्हां मी तर भगवती कालीचा दास आहें."

मी महाकवि कालिदासाशींच बोलत आहे याविषयीं मला आतां संशय राहिला नाहीं. तरीहि मी इतक्यांतच स्वतःची ओळख नाहीं दिली.

आमच्या घरच्या साऱ्या मंडळींना फार आनंद झाला. महाकवीचें नांव आमच्या कानांवर आलेलेंच होतें, आणि त्यांचें "मेघदूत" काव्य तर आमच्या तरुणांना मुखोद्गत होतें. मीहि तें वाचलें होतें आणि मेघाला अलकापुरीला पाठवितांना कवीनें

वाटेंत लागणाऱ्या यौधेयभूमीचें वर्णन केलें नाहीं याचें मला वाईटहि वाटलें होतें. भोज-नानन्तर मद्याचे चषकांवर चषक उडूं लागले, कवीच्या गौर गालांवर जराशी गुलाबी छटा दिसूं लागली, तेव्हां मी विचारलें—" महाकवि ! ... ... "

कालिदास—" छेः छेः ! मला महाकवि नका म्हणूं. "

मी —" आर्य ! आपल्या सांगण्यानं का आमचं मत बदलणार आहे ? यौधेय-भूमि महाकवि कालिदासाला चांगल्या रीतीनं ओळखते. "

कालिदास—" याबद्दल मी यौधेय भूमीचा उतराई आहें. पण मी असं कोणतं महाकाव्य केलंय ? अश्वघोष, सौमिल्ल व भास यांच्या पुढं माझा काय पाड लागणार ? "

मी—" छे छेः ! मी आपली तोंडदेखली प्रशंसा करत नाहीं. आपलं मेघदूत घरोंघरीं गातात. हें लहानसं काव्य देखील आपल्या प्रतिभेचा परिचय करायला पुरेसं आहे. महाकवि ! अलकेच्या वाटेवरच तर आमची यौधेयभूमि लागते. पण आपण तिचा कांहीं उल्लेखच केला नाहीं. "

कालिदास—" मी यौधेयभूमि कधीं पाहिलेली नाहीं. यौधेयभूमि किती रम-णीय आहे हें आत्तां कळतंय मला. "

मला त्याच्या काव्यसौन्दर्याची पारख करतां येते हें पाहिल्यावर महाकवीनें आम्हांला आपल्या कितीतरी कविता म्हणून दाखविल्या. मीहि त्याला कांहीं गीतें वीणेवर वाजवून दाखविलीं. तो माझ्या पाहुणचारावरच नव्हे तर कलाप्रेमावरहि फार खूष झाला. त्यानें दुसरें दिवशीं प्रस्थान करण्याची गोष्ट काढली तेव्हां मी पुढच्या प्रवासांत किती कष्ट होणार आहेत हें दाखवून त्याला आणखी एक दोन दिवस आराम करण्यास सांगितलें.

मी कालिदासाला अग्रोदकामध्यें एक आठवडाभर ठेवून घेतलें आणि त्याचा सत्कार-सन्मान तर इतका भरपूर झाला कीं त्यानें स्वतःच सांगितलें-" यौधेयभूमीनं माझा जो अकृत्रिम सन्मान केला, ज्या रीतीनं तिनं मला आपल्या हृदयांत स्थान दिलं, तिच्यापुढें महाक्षत्रपाचं सामोरं जाणं अन् विक्रमादित्याचा प्रसाद म्हणजे कांहींच नव्हे. "

आम्ही त्याच्यासाठीं नृत्य आणि संगीताचे खास कार्यक्रम करविले. त्यानें रच-लेल्या नव्या कविता यौधेय तरुणीनीं आपल्या मधुर कण्ठांतून गाऊन दाखविल्या. त्याच्याविषयीं आदर दाखविण्याची व त्याचा सत्कार करण्याची सर्वांनीं चढाओढ चाल-विलेली होती. मी काव्य-कलेच्या क्षेत्राबाहेरची इतर कोणतीहि गोष्ट काढलीच नाहीं. महासेनापतीला भेटण्याचा विचार त्यानें सोडून द्यावा हें तर मला नक्कीच हवें होतें. पण अजूनहि त्याचा हा निश्चय कायमच होता. मी एके दिवशीं संध्याकाळीं मद्यपानाच्या बैठकीचे वेळीं त्याला सांगितलें— " महाकवि ! मी इतके दिवस आपणांला भ्रमांत

ठेवलं याबद्दल मला क्षमा करा. आपण ज्या जय यौधेयाला भेटूं इच्छितां तो हा आपणां समोर हजर आहे. "

कालिदासानें एकवार विस्फारलेल्या डोळयांनीं स्तब्धपणें पाहून घेतलें व मग तो दोन्ही हात लांब करून उठून उभा राहिला. आणि मला समोर उभा पाहून त्यानें मला गाढ आलिंगन दिलें. कांहीं वेळ तो तसाच अनिमिष नेत्रांनीं मजकडे बघत राहिला आणि माझा हात धरून बसला. मग त्यानें तोंड उघडलें–" मित्र जय ! छे छे ! महासेनापति जय यौधेय...... "

मी–" छे छे ! पहिलंच संबोधन मला जास्त आवडतं. आपल्या अमृतमधुर वाणीतून ' जय ' असा जो साधा उद्गार निघाला, तसं म्हणवून घेण्यानंच मी स्वतःला कृतकृत्य समजेन. "

कालिदास–" ठीक तर. मित्र जय ! मला तुम्ही आपल्या प्रतिस्पर्ध्यातर्फे पाठविण्यांत आलेला दूत समजा. पण मी तुमचा दूत आहे का विक्रमादित्याचा, हें माझं मलाच सांगणं कठीण झालंय. यौधेयभूमीनं मला जिंकून घेऊन आपलंसं केलं हें तर मी कबूलच करतों. तसंच यौधेयभूमीपेक्षां अधिक सुखपूर्ण जीवन जनतेला इतरत्र कुठं मिळत असेल का नाहीं याबद्दल मला जबरदस्त शंका आहे हेंहि मी मान्य करतों. अन् इथल्या स्त्रीपुरुषांत जी स्वच्छन्दता व स्वाभिमानाची भावना पाहिली, ती मी जर माझ्या डोळ्यांवर विश्वास ठेवला नसता तर मला स्वप्नांतलीच गोष्ट वाटली असती. मित्रा ! क्षमा मागायची गोष्टच नको. तुम्ही तर मला पहिल्याच दिवशीं ओळखलं होतं पण त्याच बरोबर अग्रोदकाचे सारे स्त्रीपुरुष सात-सात दिवसपर्यंत माझ्या समोर नुसत्या बतावण्या करीत नव्हते, किंबहुना आपल्या खऱ्याखुऱ्या जीवनाचंच प्रदर्शन करीत होते, हेंहि मी जाणून आहे. यौधेयभूमीनं कवीचं हृदय किती प्रमाणांत जिंकून घेतलं हें उघड करून सांगायचं काम मी दुसऱ्या एकाद्या प्रसंगासाठीं राखून ठेवतों. आतां नीट लक्ष द्या हं. मी ज्या उद्देशानं इथं आलोंय तो मी तुम्हांला सांगतों. "

मी–" महाकवि ! लक्ष आहे माझं. तुमच्या जें कांही मनांत आहे तें अगदीं निःसंकोचपणानं सांगून टाका. "

कालिदास–" तुम्ही अगोदरच माझा संकोच नाहींसा करून टाकलाय. हो, पण याच्यामुळं एकादी अनुचित गोष्ट माझ्या तोंडून निघून गेली तर ती मनावर घेऊं नका. तसंच मी जें कांहीं सांगेन त्याच्या पाठीशीं चन्द्रगुप्ताची प्रेरणा आहे हेंहि तुम्ही लक्षांत ठेवा. "

मी–" म्हणजे चन्द्रगुप्तानं आपल्याला धाडलंय ? पण आपण तर उज्जयिनीचे ......... "

कालिदास–" होय. महाकालेश्वराच्या नगरांत जन्मायचं भाग्य लाभलंय मला."

मी–" अन् महाक्षत्रपांच्या वैभवशाली अमदानींत उज्जयिनीचं वैभव, विद्या, कलाप्रेम खूपच वाढलं. "

कालिदास–"प्रद्योत व त्याच्या वंशजांचीं शेसव्वाशें वर्षे सोडलीं तर उज्जयिनीला महाक्षत्रपांच्या काळीं जें हें महत्व लाभलं तेवढं पूर्वी कधींच लाभलं नव्हतं. "

मी-" महाक्षत्रप रुद्रसिंह व त्यांचा पुत्र हे त्यांचे महान् पूर्वज रुद्रदामा यांच्या प्रमाणंच सरस्वतीचे मोठे भक्त आहेत असं वाटतं मला. "

कालिदास–" सरस्वतीपूजा क्षत्रपवंशाच्या रक्तांतच भिनलेली आहे. "

मी–" मग महाकवि ! आपण आपली जन्मनगरी सोडून पाटलिपुत्राचा आश्रय कां घेतला ? "

कालिदास–" मित्र ! तुम्हांला कदाचित ठाऊक नसेल, पण आतांशा विक्रमादित्याचं अधिक राहणं पाटलिपुत्राऐवजीं गंगायमुना संगमावरच प्रतिष्ठानपुरांत होत असतं. "

मी–" गंगा-यमुना संगम परमभट्टारकाला इतका कां आवडला ? "

कालिदास–" तिथल्या बाबतींत ' तनुत्यजां न शरीरबन्धः ' असं मी लिहून ठेवलंच आहे. "

मी–" बहुधा तिथं तनुत्याग करून मोक्ष मिळवायची आशा धरून तर परमभट्टारक नसतील राहिले ? "

कालिदास– " मित्र ! परमभट्टारकाच्या बाबतींत माझ्यापेक्षां तुम्हांलाच जास्त माहिती आहे."

मी–" पण ती कित्येक युगांपूर्वीची गोष्ट झाली. "

कालिदास–"युगांपूर्वीची गोष्ट खरी. पण मनुष्यस्वभावाचा एक विशिष्ट प्रवाह बनत असतो. अन् त्यांत पुन्हां ' छ मास का कुत्ता बारह वर्षका पुत्ता हुआ सो हुआ नहीं तो गया ' ( सहा महिन्यांचा कुत्रा व बारा वर्षांचा पुत्ता ( मुलगा ) झाला तो झाला नाहींतर गेला ) ही म्हण तर प्रसिद्धच आहे. तुम्ही जेव्हां चन्द्रगुप्ताचा सहवास सोडलांत तेव्हां तो पुरा मनुष्य होऊन गेलेला होता. "

मी–" बरोबर आहे. तो वीस वर्षांचा होता. अन् महाकवि ! कांहीं वर्षांनीं तो राजा झाल्यावर जेव्हां मी त्याला पाहिलं तेव्हां तुमचंच म्हणणं खरं ठरलं–त्याच्यांत तसा फरक कांहींच झालेला नव्हता. हो, पण तुम्ही उज्जयिनी कां सोडलीत तें मला ऐकायला हवं होतं. "

कालिदास–" उज्जयिनीनं मला जन्म दिला, माझं पालनपोषण केलं, मला विद्या शिकविली. कालिदास म्हणून जो कांहीं मी झालोंय ती उज्जयिनीची निर्मिती

आहे. अन् क्षत्रप कुलानंहि, मी कवि या नात्यानं नुकती कुठं पोपटपंची करायला लागलों होतो तेव्हांपासूनच, अगदीं उदार मनानं माझा सन्मान केला. कवीनं भीत भीत थोड्याशा स्फुट कविता लिहिल्या पण तेवढ्यांवरच उज्जयिनींचे राजे-रंक सारेच त्याला डोक्यावर घेऊन बसले. अन् मेघदूत लिहिल्यावर तर महाक्षत्रप रूद्रसिंहानं मला आपल्या अन्तःपुरांत बोलावून घेतलं. कुठलं काय नि कुठलं काय, तो खूष झाला येवढ्यावरच मी स्वतःला कृतकृत्य मानून घेत होतों, अन् त्यानं तर मला आपल्या अर्ध्या आसनावर बसवून घेतलं. आपल्या सर्वांत गोड आवाजाच्या गायिकेला त्यानं मेघदूत काव्याचं गायन करायला सांगितलं. गायन संपल्यावर महाक्षत्रप सद्गगित स्वरांत म्हणाला–' तरुण कवि ! खरोखरीच का तुम्हांला कुणाच्या तरी शापाची बाधा झाली आहे ? तुमच्या प्रेमांत कुणी बिघाड केला बरं ? ' मी सांगूं लागलों–'छे, छे, भट्टा ! ही तर नुसती कविकल्पना आहे. ' यावर महाक्षत्रप गालांतल्या गालांत हंसून म्हणाला––' तुम्ही सांगायला संकोच करतां आहांत. पण केवळ कल्पनेंत इतकं सामार्थ्य नसतं. हा खरोखरीच शापित हृदयाचा उसासा आहे. क्षत्रपवंशानं विद्वानांची सेवा सतत केली आहे. कुणा क्षत्रप कुमारीच्या प्रेमाचा शाप जर तुम्हांला बाधला असेल, तर सांगून टाका काय तें. तुम्हांला न देण्याजोगी अशी कोणतीहि वस्तु असणार नाहीं. ' यावरून महाक्षत्रपाच्या बाबतींत माझी भावना काय असेल हें तुमच्या लक्षांत आलं असेल. अन् ती सुद्धां अशा काळांत, कीं जेव्हां कालिदासाचं संगीत अजून क्षिप्रा नदीच्या कांठांपर्यंतच घुमत होतं. "

मी–" होय, महाकवि ! आपण दूत होऊन आल्याचं मी आपल्या तोंडून ऐकलं तेव्हां मला असंच वाटलं होतं कीं महाक्षत्रप रुद्रसिंहानंच आपणांला धाडलं असावं. "

कालिदास–" अन् तशा परिस्थितींत माझं अन् तुमचं, दोघांचंहि काम कदाचित हलकं झालं असतं. "

मी–" फारच हलकं झालं असतं खरंच. यौधेय अन् महाक्षत्रप एकाच बाणाची शिकार झाले आहेत. "

कालिदास– " मी माझ्या नगरींचा दूत होऊन आलों नाहीं याचं फार दुःख होतंय मला. पण माझं दूतकर्माचं कर्तव्य करायच्या आधीं मला स्वतःविषयीं चार शब्द सांगणं आवश्यक होतं. मेघदूतानंतर मी कधीं थोडं फार लिहिलं कीं तें उज्जयिनी व अवन्तीच्या लोकांनीं डोक्यावर घेऊन त्याचं कौतुकं केलंच, असा नित्यक्रमच झाला. मला यश लाभलं, सन्मान लाभला, त्याचबरोबर सुखोपभोग लाभले, अन् या साऱ्याच गोष्टींचा अतिरेक झाला. मी मेघदूत लिहिला त्या वेळीं कुणाहि क्षत्रप कुमारीचं माझ्यावर प्रेम नव्हतं, पण पुढं मी नुसती इच्छा प्रदर्शित करायचा अवकाश, कीं लोण्यासारख्या गोऱ्यापान कोमलांगी शक तरुणी माझ्यासाठीं

सर्वस्वाचा होम करायला तयार असत. कवित्वाच्या जोडीला माझ्या अंगीं तारुण्य व फार नसलं तरी अल्पस्वल्प सौन्दर्यहि होतं. "

मी–" महाकवि ! अल्पस्वल्प कसचं, तुमच्या अंगीं भरपूर सौन्दर्य आहे. "

कालिदास–" अवन्तीनं मला कवि केलं, माझा मानसन्मान केला, त्याचबरोबर मला भोग सहज उपलब्ध करून दिले. पण मी स्वतःला अतिरेकापासून आंवरूं शकलों नाहीं. जर तरुणींनीं माझ्याचकडे आकर्षित व्हायचा प्रश्न असता तर कदाचित त्यांतून सुटका करून घ्यायचा मार्ग निघाला असता. पण तुम्हांला ठाऊकच आहे, अवन्ती म्हणजे सुंदरींची खाण आहे; त्यांत पुन्हां यवनी, शकानी, आभीराणी तरुणींचं तें सौन्दर्य; त्याच्या चित्रणासाठीं कालिदासाला आरंभीं आरंभीं नवी तूलिका तयार करावी लागली, नवी शब्दसामुग्री जमा करावी लागली. त्यांच्या लोण्यासारख्या गुलगुलीत गोऱ्या गालांवर उठून दिसणारा लालिमा, त्यांचे स्वभावतःच पोंवळ्यासारखे लाल आठें, अशा कोणकोणत्या अवयवाच्या बाबतींत सांगूं ? तिथं कसल्याहि अतिशयोक्तीची आवश्यकताच नव्हती. जसंच्या तसं वर्णन केलं तरी देखील ती हीनोक्तीच ठरत होती. अन् मग जर ते विशाल सुंदर डोळे प्रेमभरानं अनिमिषणानं रोखून बघत राहिले, ते बिंबाधर जर लटक्या रागानं अगर किंचित स्मितपूर्वक कवीवर चाल करून आले, तर, तुम्हीच सांगा मित्र, तरुण कवीचं रक्षण या जगांत कुणाला तरी करतां आलं असतं का ? मी संयमी योगी तर नव्हतोंच, अन् योग्यांच्या संयम-योगावर माझा विश्वासहि नव्हता. बहुधा हा संयम म्हणजे बरंचसं ढोंगहि असतं. मी माझ्या प्रेमाला अथांग सागरांत गोते खायला सोडून दिलं. अन् कित्येक वर्षांनंतर जेव्हां मी त्याचं रूप निरखून बघूं लागलों तेव्हां मला असं दिसून आलं कीं त्याचं तेज कमी झालंय, त्याची गोडी फिकी पडली आहे. अन् तें प्रेम आतां निरन्तरच्या मादक मदिरेंत क्षणिक उत्तेजन देणाऱ्या साध्या पेयासारखं झालंय. याचा कोणत्याहि दृष्टीनं विचार केला तरी मला असं वाटतं कीं आपलं आचरण कुणालाहि नापसंत न होऊं देणं हा देखील मोठा भ्रमच होता. मित्र ! ज्या प्रेमाचं मी माझ्या कवितांतून गुणगान करतों तें आतां माझ्या जीवनांत राहिलेलंच नाहीं. "

मी–"प्रेमाचा इतका अपव्यय ! शेवटीं याचा निराळा परिणाम तो काय होणार ! "

कालिदास– " अन् आतांहि मी मदिरा पितों, पण तृप्ति होत नाहीं. मी मदिरेक्षणांनाहि आलिंगन देतों, पण त्यामुळेंहि तृप्ति क्षणभरापुरतीच वाटते. वस्तुतः ती मदिरा हि मला दोनदोनदां पिववत नाहीं, अन् त्या मदिरेक्षणेला आलिंगनहि मला पुन्हां पुन्हां देववत नाहीं. जें प्रेम मला जीवनांत मिळालं नाहीं तें मी कल्पनेंत हस्तगत करायच्या खटपटींत असतों. मित्र जय ! तसं म्हटलं तर अवन्तिपुरीच्या घरोघरींची सुरा व सुंदरी माझं स्वागत करायला तयार होतो हें तर तुम्ही पाहिलंच आहे. ही

सोय महाराणा व परमभट्टारकांनाहि उपलब्ध असते, पण ती त्यांना सत्तेच्या जोरावर मिळते. जें आकर्षण प्रेमांत आहे तें सत्तेच्या जोरावर कुठून निर्माण होणार ? अन् माझं आकर्षण होतं प्रेमाचं. मी तर स्वतःचीं तृप्ति करून घेत होतोंच अन् त्याचबरोबर इतरांनाहि तृप्ति देत होतो. आतां माझ्या कानीं अशी गुणगुण येऊं लागली कीं कालिदासाची वाणी पूर्व पश्चिम समुद्राच्या लाटांबरोबर निनादत आहे, हिमालयाच्या श्वेत शिखरांपर्यंत तिचे पडसाद उमटत आहेत. तेव्हां प्रेमा-पेक्षांहि मोठी अशी एक गोष्ट असते हें मला कळून आलं. ती गोष्ट म्हणजे यश. माझ्या यशाच्या शतांशावरहि प्रेमाचा कारभार चालत होता–अर्थात या ठिकाणीं मी प्रेम हा शब्द अगदीं मोघम अर्थानं उपयोगांत आणतोंय. मला माझं यश येवढं मोठं वाटलं कीं तें पाक राखायच्या कामीं मी जास्त लक्ष देऊं लागलों. ''

मी–'' यश वाढवायसाठीं तुम्ही प्रयत्न तर कांहीं केलाच नाहीं. ही तर कालि-दासाची भारती ( वाणी ) होती. ज्यानं ती ऐकली त्यानं ती आपल्या हृदयांत ठेवली. अन् ती अशीच वणव्यासारखी एका हृदयांतून दुसऱ्या हृदयांत शिरकाव करींत करीत साऱ्या भरतखंडभर फैलावली. मग यश पाक राखायचा प्रयत्न कशा-साठीं ? ''

कालिदासानें त्या दिवशीं येवढ्यावरच बोलणें समाप्त केलें आणि पुढच्या गोष्टींचा संबंध त्याच्या दूत–संदेशाशीं होता म्हणून त्या दुसऱ्या दिवशीं सांगण्यासाठीं त्यानें राखून ठेवल्या.

मी रात्रीं तसा किती तरी उशीरां झोंपावयास गेलों. तरी देखील माझ्या मनांत कवीचें बोलणें बऱ्याच उशीरपर्यंत घोळत राहिलें होतें. कालिदासाची प्रतिभा तीक्ष्ण होती, पण त्याचें हृदय कुटिल नव्हतें. त्याच्या हृदयांत सौन्दर्य–प्रेम होतें पण चोरटी कामुकता नव्हती. कालिदासाच्या ठिकाणीं ज्या उणीवा मला दिसल्या त्या सर्वांबद्दल मी त्याला एकट्याला जबाबदार नाहीं धरूं शकत.

दुसऱ्या दिवशीं मी कवीला बरोबर घेऊन अमोदका नगरीबाहेरच्या आमच्या बगीच्यांत गेलों. अजूनहि झाडांच्या बुंध्यांशीं हिरवीगार हरळी होती. आम्ही पुष्क-रिणीच्या फरसबंद घाटावर बसलों. कालिदास सभोंवार नजर टाकीत म्हणाला––''माझ्या कवितेसाठीं इथं भरपूर साधनं आहेत, पण त्यांचा उपयोग करायचा म्हणजे मला पुन्हां नवे प्रयोग करावे लागतील. मित्र जय ! मी कितीदां तरी स्वतःवर असंतुष्ट झालेला असतों. ''

मी–– '' छे छे महाकवि ! तुम्ही आपला असंतोष काढून टाकला पाहिजे. तुमच्या वाणींत दोष असूं शकेल, पण तो दोष तिचं सौन्दर्य कमी करण्याऐवजीं चंद्रावरच्या डागाप्रमाण तें वाढवायचं काम करतो.

कालिदास—" यौधेय अन् त्यांची भूमि मित्रभावानं बघायची संधि मला मिळाली नसती तर कदाचित असा असंतोष नसता वाटला. असो. मी कालचं बोलणं संपवून टकतों एकदांचं. मी माझ्या यशाचा फैलाव करायच्या बाबतींत कांहीं प्रयत्न केला नाहीं व तो करायची आवश्यकताहि नव्हती हें तुमचं म्हणणं बरोबर आहे. पण मी असा विचार करीत होतों कीं इतरहि अनेक कवि झाले, त्यांच्या प्रतिभेची थोडी फार चुणुक अधूनमधून आम्हांला मिळते, पण ते आम्हांला पूर्ण स्वरूपांत बघायला मिळत नाहींत. वाल्मीकि, अश्वघोष, मातृचेट, भास, सौमिल्ल व आणखी पांच सात इतर कवींच्या पलीकडे आमच्याकडे आणखी महाकवि झालेच नाहींत हें मान्य करायला मी तयार नाहीं. मी विचार करूं लागलों : कुणी सांगावं ? माझ्या कवितेचीहि तशीच संभावना झाली तर ? लिहिण्या वाचण्याची ज्या वेळीं प्रथा नव्हती त्यावेळीं कविता ऐकूनच एक पिढी दुसऱ्या पिढीकडे पोंचवीत असे. वेदांत जागोजाग विखुरलेल्या कविता आमचे प्राचीन ऋषि रचीत असत त्यांची गोष्टहि माझ्या समजुतीनं अशीच होती. आतां तर मी माझ्या कविता केवळ मनांतल्या मनांत रचण्यावर समाधान नाहीं मानलं. मी त्या भूर्जपत्रावर अन् त्याहूनहि जास्त प्रमाणांत तालपत्रावर लिहून काढल्या. त्यांच्या नकला कर करून लोक जिकडे तिकडे घेऊन जाऊं लागले. पण कवितांना येवढ्यावरच चिरस्थायित्व नाहीं मिळूं शकत. व्यासाचं महाभारत व वाल्मीकीचं रामायण ब्राह्मणांनीं जर आपलं म्हणून त्याचा प्रचार केला नसता तर हीं काव्यं इतकीं लोकप्रिय नसतीं झालीं. अर्थात् माझ्या कवितांना त्या ऋषिकाव्यांचा दर्जा नाहीं मिळणार; कारण तीं आहेत फारच अलीकडचीं; मात्र माझ्या अगोदर होऊन गेलेले ऋषि काव्यकार कालिदासापेक्षां जास्त संयमी नव्हते हें मी जाणून आहें. ब्राह्मणांच्या बाबतींतील आशा सोडून दिल्यावर राहतां राहिले राजे. तेच माझ्या कवितेला चिरस्थायित्व मिळवूं देऊं शकतात हें मला दिसत होतं. "

" पण राजे स्वतः तर चिरस्थायी नाहींत त्याचं काय ? "

" मित्र ! कालिदास चंद्रगुप्तावर अगर त्याचा मुलगा कुमारगुप्त याच्यावर काव्य लिहिणार आहे, अगर गुप्तवंशाची कीर्ति अस्मानापर्यंत पोंचविणार आहे अशी नका समजूत करूं घेऊं. "

"मग महाकवि ! असं असूनहि विक्रमादित्य आपल्या कृतींना चिरस्थायित्व मिळवून द्यायसाठीं खटपट कां म्हणून करील ? "

" ' श्लेषालंकाराला ' देखील कवींनं केलेला एक चमत्कार म्हणतात. मी रघुवंश काव्य लिहितोंय. ' त्यांतला दिलीप दुसरा कुणी नसून तुमचे आजोबा चन्द्रगुप्त हेच आहेत ' असं मी परमभट्टारकाला सांगून दिलं. अन् असंहि सांगितलं कीं

' नन्दिनीच्या कपाळाला कुंकू लावणारी सुदक्षिणा म्हणजेच तुमची आजी कुमार देवी. दिग्विजयी रघु म्हणजे परमभट्टारक समुद्रगुप्त अन् अजाच्या नांवानं तुमचं यश अमर करतोंय मी. ' "

" पण महाकवि ! विक्रमादित्य काय येवढयावर संतुष्ट होऊं शकतो ? "

" महाकाव्य लिहिणं पुष्कळच सोईस्कर असतं. मी राजाला स्वार्थापासून सर्वस्वीं अलिप्त असा रंगविला आहे. ऐका—

' प्रजानामेव भूत्यर्थं स ताभ्यो बलिमग्रहीत् ।
सहस्रगुणमुत्स्रष्टुमादत्ते हि रसं रविः ॥ '

मी हंसून म्हणालों– "महाकवि ! प्रजेच्या कल्याणासाठींच राजा तिच्यापासून कर घेतो हें खोटं नव्हे का ? परमभट्टारक, युवराज, राजकुमार-राजकुमारी परमभट्टारिका व तिच्या हजारों सवती व सख्या या सर्वांवर जे कोटयावधी दीनार खर्च होतात ते काय या प्रजेच्याच कल्याणासाठीं ? मग सूर्याप्रमाणं थोडासा रस शोषून घेऊन हजारपट परत द्यायची गोष्ट ऐकूनच कान ठणकूं लागतात. राजापाशीं जें कांहीं धन जमा होतं त्याचा उगम केवळ प्रजेचे परिश्रम हाच आहे. कुणा राजाच्या घरांत दीनारांचीं झाडं नाहींत लावलेलीं, मग तो हजारपट परतफेड कशी करूं शकतो ? "

कालिदास– " मी खोटं लिहितों हें नाकबूल कधीं केलं ? उलट माझं असंहि मत आहे कीं खोटं बोलायचं असलं तर तें थोडं थोडकं बोलूं नये, चांगलं खूपखूपसं खोटं बोलावं. इतकं मोठं खोटं बोलावं कीं लोकांना हात पसरूनहि तें वेंगेंत घेतां येऊं नये. अन् असं खोटं बोलणारा मी एकटाच नाहीं कांहीं; व्यास, वाल्मीकि यांच्यासारखे मोठमोठे ऋषिमुनी आम्हांला हा मार्ग दाखवून गेले आहेत. विक्रमादित्याला तुम्ही ओळखतां; तो भोळाभाबडा माणूस नाहीं. "

मी– " चंद्रगुप्त मौर्य व कौटिल्य या दोघांच्या बुद्धिबलाची बेरीज केली तरी तिच्यापेक्षांहि याचं बुद्धिबल जास्त वरचढ आहे. "

कालिदास– " माझ्या या उद्गारांवर स्वारी अगदीं खूष असते. मी ' भुवा महावराहदंष्ट्रायां ' हा एक श्लोक लिहिला, अन् काय सांगावं तुम्हांला, हा श्लोक ऐकतांक्षणीं विक्रम ताडकन उठला आणि या श्लोकांत वर्णन केलेल्या प्रसंगाचं चित्र पाषाणांवर कोरलं पाहिजे असं म्हणाला. महावराहाची पहिली मूर्ती एका कुशल माथुर शिल्पकारानं तयार केल्याबरोबर ती दाखवायसाठीं तो मला आपल्याबरोबर घेऊन गेला. मित्र ! तुम्ही आम्ही राजेलोकांमध्यें वावरून त्यांना खऱ्याखुऱ्या नग्न स्वरूपांत पाहून घेतलंय म्हणून आपल्याला त्यांच्या कोणत्याच गोष्टीचं आश्चर्य नाहीं वाटत. पण त्या दिवशीं मला नक्कीच आश्चर्य वाटलं. त्यानं आपल्याच मूर्तीला वराहावताराचं

रूप दिलं होतं पण त्याचं शिर मात्र आपलं नव्हतं ठेवलं, पण त्याच्या दांताला लटकलेली भूदेवी अगदीं थेट ध्रुवदेवी होती. "

मी हंसत म्हणालों– " मीहि असलीच एक मूर्ति मथुरेंत पाहिली आहे. "

कालिदास– " मथुरेंतहि ? मित्र ! मी त्या दिवशीं मथुरेहून आल्याचं खोटं-च सांगितलं होतं. म्हणजे मग माझ्या मनांत जो विचार आला तोच विचार तिथलं दृश्य पाहून तुमच्याहि मनांत आला असला पाहिजे. पण विक्रमादित्याला हें सारं पसंत आहे. त्यानं सरळ स्वतःवर अगर स्वतःच्या कुळावर कविता लिहायला मला नाहीं सांगितलं; जर सांगितलं असतं तर मला काय करावं लागलं कोण जाणें; मी माझ्या कवितांमधून अशाच अमर सौन्दर्याचं व हृदयव्यथांचं वर्णन करतों कीं ज्यांना मनुष्यप्राणी जोंपर्यंत जिवंत आहे तोंपर्यंत मरण नाहीं. त्याच बरोबर मी राजेलोकांच्या स्वार्थांचं रक्षण करायसाठीं इतक्या गोष्टी लिहून ठेवतोंय कीं गुप्तवंशच काय, प्रत्येक राजवंश त्या सुरक्षित ठेवायची खटपट करील. "

मी– " पण ही गोष्ट महाक्षत्रपालाहि करतां येत होती, नाहीं का ? "

कालिदास– " नाहीं. इतर कित्येक शक राजांच्या आश्रित ब्राम्हणांप्रमाणं मी शकांना म्लेच्छ विदेशी समजत नसलों तरी क्षत्रपवंशांत तें सामर्थ्य नाहीं. तसं म्हटलं तर पल्लव, वाकाटक, गुप्त इत्यादि राजवंशांशीं तुलना करतां क्षत्रप कोणत्याहि बाबतींत कमी नाहींत. तेहि ब्राह्मणांचा सन्मान करतात, विद्येचा सन्मान करतात. स्वतःला भरतभूमीचीं सन्तानं समजतात, धर्माचं रक्षण करतात. मग त्यांना आप-ल्याला विदेशी म्लेच्छ कसं म्हणतां येईल ? विक्रमादित्याच्या तोंडूनहि अशा प्रका-रचा शब्द ऐकलाय, पण मला एक गोष्ट लक्षांत घ्यावीशी वाटते ती ही कीं क्षत्रप-वंश फार जुनाट झालाय आतां. कोणत्याहि राजवंशाला शेंदोनशें वर्षांपेक्षां जास्त काळ आपलं वैभव टिकवून ठेवतां येत नाहीं. "

मी– " अन् क्षत्रप-वंश तर तीनशें वर्षांहूनहि अधिक जुना झालेला आहे. "

कालिदास– "अस्ताचलावर पोंचला तरीसुद्धां सूर्याची किरणं सकाळच्या सार-खींच लाल असतात. पण माणसाला आशा लावलेली असते बालसूर्यानंच. "

मी– " म्हणजे तुम्ही गुप्त बालसूर्याला अर्घ्य देणं पसंत केलं. "

कालिदास– " बरोबर आहे हें. पण गुप्तांच्या ठिकाणीं मला केवळ बालसूर्यच नाहीं दिसला. त्याच्या रूपानं एका नव्या धर्माचीं किरणं बाहेर पडत असलेलीं मला दिसली. हा नवा धर्म कांहीं निवडक लोकांना समजतो इतकंच नव्हे तर सामान्य जनताहि याला पाठिंबा देऊं लागली आहे. "

मी– " गोब्राह्मणपूजा, मंदिरांचं विशाल अवडंबर, कथापुराण ! "

कालिदास– " मला वाटतं ब्राह्मणांची ताकत पुन्हां मजबूत होणार. माफ करा हं, मी तुमच्या घरीं बुद्धाची सुंदर मूर्ति पाहिली, पण या पुढच्या काळांत तिला कांहीं वाव मिळेल अशी मला तर आशा वाटत नाही. "

मी– " माझंहि मत तुमच्यासारखंच आहे. बुद्धाचा धर्म बहुजनहिताय होता, पण बौद्धांनीं राजे लोकांच्या उपरण्याचा सोगा धरला. यवन, कुषाण व शक यांच्या-सारखे राजे जेव्हां आमच्या देशांत आले तेव्हां त्यांचं स्वागत बौद्धांनींच सर्वांच्या अगोदर केलं. ब्राह्मण त्यांना म्लेच्छ म्हणून मोकळे होत असत. बौद्धांना वर्णभेद–जातिभेद–नष्ट करतां आला नाहीं, अन् या वर्णव्यवस्थेंत या पाहुण्यांना उच्चस्थान द्यायचा अधिकारहि त्यांना नव्हता. "

कालिदास–" ब्राह्मणांनी आपल्या चुकीचं परिमार्जन केलं अन् आपल्या अधि-काराचा पूर्ण उपयोग करून म्लेच्छांना उच्च क्षत्रिय ठरविलं. देवपुत्रशाही व महा-क्षत्रप हे ब्राह्मणांचे केवढे मोठे भक्त आहेत हें आज तुम्हांला ठाऊकच आहे. म्हणूनच ब्राह्मणांचा हा नवा धर्म, ही नवी व्यवस्था आपल्या कृतींना चिरस्थायित्व मिळवून देईल अशी आशा कालिदासाला वाटते. ही आशा मला क्षत्रपांच्या बाबतींत नव्हती वाटत. वाकाटक वंशाचा सूर्यहि आतां अस्ताचलावर पोंचला आहे. पृथ्वीषेणानं त्याला वांचवायचा थोडा फार प्रयत्न केला, पण विक्रमादित्यानं रुद्रसेनाला जांवई करून आपला दास बनविलं आहे; वाकाटकांच्या सत्तेचा लगाम आतां प्रभावती गुप्ता हिच्या हातीं म्हणजेच विक्रमादित्याच्या हातीं आहे. "

मी–" म्हणजे महाकवि! तुमचा स्वतःच्या कलाकृतीवर विश्वास नाहीं राहिला. मला ही तुमची चूक वाटते. तुमच्या कलाकृतींत अमर राहायची पात्रता आहे. "

कालिदास–" मी चुकत असेन हें शक्य आहे. मी विक्रमादित्याच्या उपरण्याचा सोगा धरलाय खरा; याचं कारण असं आहे कीं याच्या योगानं मला सारे सुखोपभोगहि मिळताहेत अन् माझं यशहि अक्षय राहील अशी आशा वाटते आहे मला. मी विक्रमादि-त्याच्या वतीनं आलोंय. "

मी हंसतमुखानें म्हणालों–" हें मला अगोदरच ठाऊक आहे. "

कालिदास–" पण ज्या युक्तिवादांचा प्रयोग करायची तयारी करून मी आलों ते सारेच तुमच्या पुढं कुंठित झाल्यासारखे वाटतात. अम्रोदका नगरींत तुम्ही स्वतः-साठीं एक घर देखील राखून ठेवलं नाहींत, अशा स्थितींत प्रलोभनाचं आकर्षण तुम्हांला कसचं वाटणार? यौधेय अन् मालवभूमीच नव्हे तर लवकरच जिंकली जाणारी अवन्ति व सौराष्ट्र भूमि देखील तुमच्या चरणीं अर्पण केली जाईल असं जर मी विक्रमादित्याच्या वतीनं सांगितलं तर तुम्हांला हा स्वतःचा मोठा अपमान वाटेल. "

मी–" मला मालवराज बनवायची उमेद विक्रमादित्यानं धरण्यांत कांहीं अर्थ नाहीं."

कालिदास–" हें तर मी अगोदरच सांगून टाकलंय. पण विक्रमादित्याला साऱ्या भरतखंडावर पक्का एकछत्री अंमल प्रस्थापित करायला हवाय."

मी–" अन् तो सुद्धां धर्मासाठीं, परोपकारासाठीं, चिरस्थायी शांततेसाठीं, पर-कीय आक्रमणापासून भरतभूमीचं रक्षण करायसाठीं! चंद्रगुप्त मौर्य व कौटिल्य यांचा विचारहि असाच होता."

कालिदास–" अन् त्यांना यश आल नाहीं हेंच सांगायचंय ना तुम्हांला? पण विक्रमादित्याचं म्हणणं असं आहे कीं गणराज्यांनीं आम्हांला यशस्वी होऊं दिलं नाहीं."

मी–" अनियंत्रित राजांच्या डोळ्यांत गण कांट्यासारखे सलताहेत. आतां विक्रमादित्याच्या काळांत तर तेवढे गणहि राहिलेले नाहींत. मालव गण तर त्यानं गिळूनच टाकला. आतां राहतां राहिला आहे यौधेय गणसंघच काय तो. यालाहि तो गिळून टाकावं म्हणतोय, अन् विक्रमादित्य जेव्हां या गणांना नामशेष करून टाकील तेव्हां त्यांच्या बाबतींत मुग्धता पतकरून इतिहासांत त्यांचं नांवसुद्धा राहणार नाहीं अशी व्यवस्था ब्राह्मणांनीं व तुम्हां कविलोकांनींहि करायचं ठरविलेलं आहे."

कालिदास—" तुमचं बोलणं खरं ठरायचा संभव दिसतो. यौधेयांना गिळून टाकणं ही सगळ्यांत कठीण गोष्ट ठरेल हें विक्रमादित्य जाणून आहे."

मी–" त्याचा समज बरोबर आहे. यौधेयांमध्यें त्याला कोणी बिभीषण नाहींच मिळणार."

कालिदास–" अन् याचा परिणाम काय होईल?"

मी–" त्यांचा प्रत्येक माणूस लढतांलढतां मरेल."

कालिदास–" यौधेयांच्या हिरण्यागार भूमीला विक्रमादित्य स्मशानाची अव-कळा आणील हें तुम्हांला दिसत नाहीं का?"

मी–" शक्य आहे तें. पण उघड्या डोळ्यांनीं यौधेय नामशेष झालेले बघणंहि आम्हांला नाहीं आवडणार."

कालिदास–" वीरांचा सदैव सन्मानच होत आलाय हें नाकबूल कुणाला करतां येईल? पण यमुना ते लौहित्य अन् हिमालय ते कृष्णावेण्या ( कृष्णा नदी ) येवढ्या प्रदेशांतल्या साऱ्या सैनिक बळाचा मुकाबला यौधेयांना कसा करतां येणार?"

मी–" मुकाबला करायच्या अगोदरच शस्त्रं खालीं ठेवणं हा कुठला शहाण-पणा? अन् तें सुद्धां यौधेयांच्या जीवनमरणाचा सवाल असतांना? मी चन्द्रगुप्ताला आणखी काय सांगणार? समुद्रगुप्तापुढं यौधेयांनीं ज्या अटी मान्य केलेल्या होत्या त्या आतांहि आम्ही मान्य करायला तयार आहोंत."

कालिदास–" पण विक्रमादित्याला राजेलोकांचा उच्छेदक उगीचच म्हणतात. तो उच्छेदक असलाच तर सर्व गणांचा उच्छेदक आहे. गणांना राहूं देऊन आपल्याला भरतखंडाच्या सामर्थ्याला मजबुती आणतां येत नाहीं असं तो सांगतो. "

मी–" अर्थात्. गण आहेत तोंवर राजाच्या खुणेसरसे लाखों सैनिक तोंड बांधून मेंढरांसारखी स्वतःची कत्तल करून घ्यायला तयार नाहीं होणार. त्याला बहुधा असं वाटत असावं – ज्या दिवशीं सारी प्रजा एका राजाच्या हुकमासरशीं मरायला तयार होईल, त्या दिवशीं नुसती खूण करायचा अवकाश कीं ती मेंढरां-प्रमाणं कुणाहि विदेशी शत्रूला ओरबाडून खाऊन टाकील. पण तो दुसऱ्या बाजूकडे बघतच नाहीं. भरतखंडांत असे वीस वीस परमभट्टारक झाले म्हणजे काय होईल ? हीं मेंढरं आपापल्या परमभट्टारकाच्या खुणेबरोबर भरतखंडांतल्या भरतखंडांतच एकमेकांना खाऊं लागतील. मग भरतखंड सबल होईल का दुर्बल ?"

कालिदास–" नक्कीच दुर्बल होईल. "

मी–" गणांमध्यें अशीं मेंढरं मिळायचींच नाहींत. यौधेय सैनिक लढण्यांत किती शूर असतात याची प्रशंसा शेंकडों वर्षांपासून आमचे शत्रु करीत आले आहेत. पण ते नुसतेच योद्धे नाहींत. त्यांच्या अंगीं विवेकहि आहे. मी त्यांचा महासेनापति व पुरस्कर्ता आज जर त्यांना मेंढरं व्हायला सांगूं लागलों तर ते विक्रमादित्यासमोर हत्यारं खालीं ठेऊन त्याची सत्ता मान्य करतील ? "

कालिदास–" नाहीं करणार. ते तुम्हांलाच खाऊन टाकतील. "

मी–" मला हें पसंत आहे. साऱ्या देशाला मेंढरं बनवून आपण प्रबल होऊं अशी चन्द्रगुप्ताला आशा वाटते आहे. अन् साऱ्या देशाला विवेकी योद्धे बनवून आपलं बळ वाढतं हें मी प्रत्यक्ष पाहतोंय. "

कालिदास–" पण मित्र ! साऱ्या देशांत यौधेयांप्रमाणं जिकडेतिकडे गणच गण असते तरच ही गोष्ट शक्य झाली असती. तुम्ही तर मालवगण देखील तुमच्या देखतच लुप्त झालेला पाहिलाय. "

मी—" म्हणजे मी काय यौधेयांनाहि लुप्त व्हायच्या कामांत मदत करूं ? कांहींहि होवो, भरतखंडाला मेंढरूं बनवायचं धोरण मी मान्य करणार नाहीं. जनता मेंढरूं झाली तर ही भूमि सदा आमच्यांतल्याच गिधाडांचं भक्ष्य होऊन राहील अन् एक-दोन गिधाडांनीं विश्वासघात केला कीं परक्यांच्या हातीं जाईल. "

कालिदास—" म्हणजे साऱ्या भरतखंडभर यौधेयगणाचा एकछत्री अंमल झालेला बघायचाच तुम्हांला. "

मी–– " यौधेयगणाचा एकछत्री अंमल नकोय आम्हांला. यौधेयांनीं आपणहूनच अशा एकछत्री अंमलाला नकार दिलेला आहे. आमच्या गणसंघांत कुणिन्द, यौधेय व

आर्जुनायन असे तीन्ही गण बरोबरीनं सहकार्य करीत आहेत. सक्तीनं नव्हे तर स्वेच्छेनं ते एकमेकांशीं संलग्न झाले आहेत. अशाच रीतीनं भरतखंड हें स्वतंत्र गणांचा खुषीचा संघ झालेला बघायला मिळावा असं वाटतं मला. "

कालिदास-- " हें स्वप्न आहे. "

मी— " पण आपले आत्मवादी वियोगी जीं स्वप्नं बघतात त्यांच्यापेक्षां कितीतरी चांगलं आहे हें स्वप्न. अन् कुणी सांगावं ? विश्वामित्र, वशिष्ठ, भारद्वाज प्रभृति अव्वल राजपुरोहितांनीं राजेलोकांची स्थापना ज्या काळांत केली त्या काळापासून आज विक्रमादित्यापर्यंत आपण जेवढ्या मुदतींत आलों तेवढीच मुदत आणखी पुढं गेलों तर दुनिया अशीच राहील असं थोडंच आहे ? "

कालिदास-- " दुनिया तर एकसारखी बदलतच राहते. "

मी-"तर मग माझं स्वप्न कधीं ना कधीं खरं ठरेल अशी मलाहि उमेद वाटते."

माझ्या उत्तरानें कालिदासाची निराशा झाली. पण निरोप घेतांना तो यौधेयांविषयीं स्नेहाची भावनाच घेऊन गेला. कालिदास आपल्या प्रतिभेचा अंश आमच्या गणांसाठीं उपयोगांत आणील असा संभव आहे. पण मला अशी धास्ती वाटते कीं कालिदासाची शंका खरी तर नाहीं ना ठरणार ? अन् त्याच्या कवितेचा तो भाग पिढ्यानुपिढ्या प्रभुत्व गाजवणाऱ्या राजांच्या द्वेषाग्नींत जळून नष्ट तर नाहीं ना होणार ?"

## ( २२ )

## अखेर

पुढची हकीकत अजून बरीच लिहून व्हावयाची शिल्लक राहिलेली होती. पण ती लिहिण्याच्या अगोदरच लेखक निधन पावला; आणि हें काम आज माधवसेनला शोकाकुल हृदयानिशीं करावें लागलें—

कालिदास परत गेल्यानंतर जय समजून चुकला कीं आतां यौधेयांवर आक्रमण करण्यास विक्रमादित्य विलंब लावणार नाहीं. आणि म्हणून आतां त्यानें युद्धाची अखेरची तयारी सुरू केली. यौधेय जर विक्रमादित्याच्या सरहद्दीच्या आंत घुसून लढले असते, आणि त्यांचें युद्ध केवळ स्वसंरक्षणाचें न राहतां आक्रमक स्वरूपाचेंहि राहिलें असतें तर

त्याचा परिणाम कदाचित वेगळाच झाला असता. कुणी सांगावें ? पण यौधेयांना इतरांच्या भूमीचा लोभ नव्हता. इतर लोकांना कष्ट पडूं द्यावयाची त्यांची इच्छा नव्हती. त्यांची रणनीति सर्वस्वीं शुद्ध होती. ते निर्मळ हत्यारांनिशींच लढले. उज्ज-यिनींत जयची माझ्याशीं प्रथम दृष्टिभेट झाली तेव्हांपासून आम्ही दोघे एकमेकांना साथ देत राहिलों. मृत्यूनेंच आमची जोडी फोडली. जयनें यौधेयानींच्या एका मोठ्या सभेंत् भाषण केलें त्या दिवशीं मीहि रोहितकींत हजर होतों. या भाषणांत त्यानें सांगितलें—

" यौधेय–यौधेयानी ! तुम्ही यौधेय आया, बहिणी व मुली, तुम्हीच इतिहास-प्रसिद्ध यौधेयांना जन्म दिलांत, त्यांना आपलं दूध पाजलंत. पण तुम्ही केवळ यौधेय माताच राहिलां नाहींत. तुम्ही स्वतः यौधेयानीहि आहांत. आज आपल्यावर जें संकट आलं आहे, असं संकट आपल्या साऱ्या इतिहासांत बहुधा कधींहि आलं नव्हतं. तुम्ही यौधेय हें नांव सोडून द्या, यौधेय धर्म सोडून द्या, अशी मागणी आतां-पर्यंत कुणाहि शत्रूनं आमच्याकडे केली नव्हती. आम्ही यौधेय नांव सोडून द्यावं, यौधेय धर्म सोडून द्यावा, या अटीवरच चंद्रगुप्त आम्हांला जिवंत राहूं द्यायला तयार आहे. आमचं नांव व धर्म नष्ट झाल्यावर जगून तरी काय उपयोग ? शत्रू फार बलाढ्य आहे, अर्ध्या भरतखंडाचं धनबळ व मनुष्यबळ त्याच्या हातीं आहे हें आम्ही जाणून आहोंत. पण यौधेयांनीं राजेलोकांच्या धनबळाची व मनुष्यबळाची कधींच पर्वा केलेली नाहीं. आम्ही एक वेळ चंद्रगुप्ताला हार खायला लावली होती. ती बहुधा त्याच्या आठवणींत राहिली नसावी, म्हणून आपल्याला तिची आठवण त्याला पुन्हां करून द्यावी लागेल. अन् या वेळीं यौधेयांच्या बरोबरीनं यौधेयानींना देखील हत्यार हातीं घ्यायचा पूर्ण हक्क आहे. सुनन्दानं तुम्हांला मार्ग दाखविला. आज अशा सुनन्दांची संख्या पुष्कळ वाढलेली आहे याबद्दल मला मोठा आनंद होत आहे. आज घरोंघरीं सुनन्दा आहेत. यौधेयानींमध्येंच नव्हेत, तर कुणिन्दानी व आर्जुनायनींमध्यें देखील आज सुनन्दा निर्माण झाल्या आहेत. यौधेय नर-नारींना वीराच्या कर्तव्याचं पालन करायला सांगणं म्हणजे त्यांचा अपमान करण्यासारखं आहे. "

आम्हांला तयारी करावयाला उणींपुरीं वीस वर्षे मिळालेलीं होतीं. गुप्त संवत ८० ( इ. स. ३८० ) हें साल चालू होतें. जयचें वय ५० वर्षांचें होत आलेलें होतें. या वयाला तरवार हातीं घेण्याचा त्याचा हा अखेरचा प्रसंग होता. आतांच्या प्रसंगीं विक्रमादित्य एकाच ठिकाणीं आक्रमण करून सरळ अग्रोदकावर चाल करून जाण्याचा प्रयत्न करणार नाहीं हें जयला ठाऊक होतें. म्हणून या वेळीं उत्तर व पश्चिम या दिशा सोडून बाकीच्या दोन दिशांकडून आक्रमण होण्याची धास्ती होती. मालवांनी गुप्तांचीं दासता पतकरून दक्षिणेकडूनहि आम्हांला धोका निर्माण करून ठेवला.

युद्धाचें विस्तृत वर्णन करण्याचें माझ्या अंगीं सामर्थ्यहि नाहीं आणि तें करण्याची मला इच्छाहि नाहीं. आम्ही आमच्या पूर्व व दक्षिण सरहद्दीवर दुर्ग ( किल्ले ) बांधून ठेवले. घोडेस्वार व पायदळावरच मी जास्त भर दिलेला होता. गुप्तांच्या जवळ रथ व फार मोठी संख्या हत्तींची होती. पहिलें आक्रमण स्रुघ्न (अंबाला) सुध्न या बाजूनें झालें. आम्ही त्यांना तिथें यमुना ओलांडूं दिली नाहीं. मग जरा दूर अंतरावर मथुरेच्या जवळपास त्यांनीं यमुना ओलांडण्याचा बेत केला. पण तिथेंहि त्यांना यश नाहीं आलें. मथुरा तर अगोदरपासूनच त्यांच्या हातीं होती आणि हीच गोष्ट आम्हांला सगळ्यांत जास्त धोक्याची ठरली. गुप्तांची सेना मथुरेच्या वाटेनें यमुनेच्या उजव्या कांठानें वरच्या अंगाला पुढें सरकूं लागली. जय तसा गणसंघाच्या साऱ्या सेनेचा महासेनापति होता पण त्याला मथुरेच्या मोर्च्याचें महत्व ठाऊक होतें. त्यानें या ठिकाणीं गुप्तांच्या सेनेला अडविलें इतकेंच नव्हे तर तिला मागें हटविलें. एक महिनापर्यंत गुप्तांना पुढें चाल करतांच आली नाहीं. विक्रम स्वतः मथुरेंत राहून तिथून साऱ्या सेनेचें संचालन करीत होता. त्यानें आपल्या सेनापतींना असा हुकुम दिला होता—" किती मेले याची जरा सुद्धां पर्वा न करतां पुढें चाल करून जा. " मथुरेच्या मोर्च्यावर शत्रूची फार हानि होत होती, तशीच आमचीहि स्थिति फारशी चांगली नव्हती. आम्हांला इतर मोर्चांवरील सेना काढून घेऊन तिकडे रवाना करावी लागली. पुरे अडीच महिनेपर्यंत घनघोर युद्ध केल्यानंतरच शत्रुसेनेला यमुनापार होऊन आर्जुनायन भूमींत घुसण्याच्या कामीं यश मिळालें. मात्र यौधेयांनीं एकेक अंगळ भूमीसाठीं प्राण दिले. गुप्त सेनेनें दक्षिणेकडून आर्जुनायन भूमींत व पूर्वेकडून यमुना ओलांडून मथुरेच्या मोर्च्यांची पिछाडी कापण्याचा धोका निर्माण केला तेव्हां मात्र जयला आपला मोर्चा मागें हटवून घ्यावा लागला.

इन्द्रप्रस्थालगत गुप्त सेनेनें यौधेयांना सर्वांत मोठी हार खावयास लावली. आणि इथें त्यांनीं आपला महासेनापति घालविला, ही त्यांची सगळयांत मोठी हानि झाली. महासेनापति जयला कसेंहि करून जिवंत पकडून आणण्याचा हुकुम विक्रमादित्यानें देऊन ठेवलेला होता, त्यांनीं त्याला जिवंत पकडलाहि. पण जखमांनीं साऱ्या शरीराची चाळण झाल्यावर आमचा सेनापति रणभूमीवर कोसळला तेव्हां त्यांना त्याला पकडतां आलें. यौधेयांनीं पुन्हां पुन्हां हल्ला चढवून आपल्या जखमी सेनापतीला घेऊन येण्याचा बेत केला, पण गुप्त सेनेनें त्याच्या भोवतीं आपल्या शरीरांचा एक प्रचंड दुर्गच उभारलेला होता, त्याच्या पुढें नाइलाज झाला. वीरसेनानें जयजवळ येऊन प्रणाम करून त्याला आपली ओळख दिली तेव्हां " यौधेयभूमींतून तुम्हांला माझं शवच घेऊन जातां येईल, " इतकेंच जयला बोलतां आलें. वीरसेनानें आपल्या

मोठमोठ्या चिकित्सकांना उपचारार्थ बोलावलें, पण जय थोड्याच अवधींत निधन पावला.

त्यांचा महासेनापति जरी मरण पावला होता तरी यौधेय सैनिकांनीं आपण कांहीं निव्वळ मेंढरें नाहीं हा जयनें त्यांच्या बाबतींत पूर्वी सांगितलेला शब्द खरा करून दाखविला. त्यांनीं ओढ्या-ओढ्यांतून, नदीनदींतून, जंगलाजंगलांतून, डोंगराडोंगरांतून व गांवांगांवांतून लढाया दिल्या. स्त्रियाहि लढत होत्या, पुरुषहि लढत होते. त्यांचा मोर्चा, त्यांचें युद्धक्षेत्र म्हणजे एक विशिष्ट मैदान असें राहिलेंच नाहीं; सारी अफाट यौधेयभूमि हीच युद्धक्षेत्र झालेली होती. विक्रमादित्यानें अग्रोदका, रोहितकी, खंडिला, पृथूदका इत्यादि यौधेय नगरांवर अंमल बसविला. तिथें जेवढे म्हणून पुरुष त्याच्या हातीं लागले, त्यांची त्यानें कत्तल केली. यौधेय लढवय्ये जंगलांत पळून गेले आणि तिथें ते एकसारखे लढत राहिले. दहा वर्षे पर्यंत तर गुप्त सेना केवळ नगरें व त्यांच्या आसपासच्या थोड्याशा जमिनीवरच अंमल चालवू शकत होती. सरहद्दीपासून नगरां-पर्यंत पोंचणारे रस्ते देखील पूर्णपणें त्यांच्या हातीं नव्हते. प्रत्येक ठिकाणीं यौधेयांच्या आक्रमणाची धास्ती निर्माण झालेली होती. विक्रमादित्याला साऱ्या यौधेयभूमीमध्यें जागोजाग लष्करीं छावण्या. उभाराव्या लागल्या. लाखों यौधेय कुणिन्द आर्जुनायन स्त्रीपुरुषांनीं आपल्या स्वातंत्र्यासाठीं सर्वस्वाचें बलिदान केलें. गुप्त सेनेनें अपराधी-निरपराधी असा कोणताहि भेदभाव न करतां प्रत्येक यौधेयाला ठार मारणें हें आपलें कर्तव्य आहे अशा रीतीनें वर्तन केलें. यौधेयांच्या सुंदर भूमींचें स्मशान झालें. रोहि-तकी, अग्रोदका, खंडिला पृथूदका यांसारखी नगरें उजाड झालीं. विशाल जलाशय व त्यांचें बांधबंधारे उध्वस्त झाले. कित्येक यौधेयांना शेजारच्या देशांमध्यें जाणें भाग पडलें. जे तरवारीचे धनी होते ते व्यापार करीत कसेंबसें आपलें आयुष्य घालवीत आहेत. केव्हां ना केव्हां तरी आपण आपल्या यौधेयभूमींत परत जाऊं अशी आशा अजूनहि त्यांच्या मनांत जीव धरून आहे.

आणि विक्रमादित्य ? यौधेयांवर विजय मिळवितांक्षणीं त्यानें अवंतीवर हल्ला चढविला. मालव व वाकाटक सेनाहि त्याच्या बरोबर होत्या. जयनें या धोक्याची सूचना क्षत्रपाला दिली होती पण यौधेयांशीं एकजूट करून विक्रमादित्याशीं लढण्यास क्षत्रप तयार नाहीं झाला. आतां त्याला कोणीच मित्र राहिला नाहीं चष्टन व रुद्रदामा यांचें रक्त अजूनहि रुद्रसेनाच्या नसानसांतून सळसळत होतें. त्यानें व त्याच्या सेनेनें मुकाबला केला. पण मुकाबला कुठवर करणार ? थोड्याच महिन्यांमध्यें अवंती लाट व सौराष्ट्रानें विक्रमासमोर मान वांकविली. क्षत्रपवंश कायमचा लुप्त झाला. विजयोत्साहांत विक्रमादित्यानें स्वतःच्या नांवाचीं कितीतरी चांदीची नाणीं पाडविलीं. एका दीनाराला हीं सोळा नाणीं मिळत असत. त्यांच्यावर त्यानें अशीं अक्षरें कोरविलीं होतीं—

" श्री गुप्त कुलस्य महाराजाधिराजश्रीचंद्रगुप्त विक्रमादित्यस्य । "